ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीचा ग्रंथमाला,
ग्रंथ ३१ वा.

श्रीमद्भारतीतीर्थप्रणीता



# पंचदशी

आचार्यभक्तविष्णुकृतसान्वयार्थमहाराष्ट्रविवरणसमेता.

---

भाग दुसरा.

—: ० :—

ग्रंथकार,
वे. शा. विष्णु वामन शास्त्री बापट,
‘ सविवरण शतश्लोकी ’ ‘ सविवरण अपरोक्षानुभूति ’
इत्यादि ग्रंथांचे कर्ते.

प्रकाशक,
दामोदर सांवळाराम आणि मंडळी,
मुंबई व बडोदें.

सन १९०६.

मुंबई ‘ इंदुप्रकाश ’ छापखाना.

किंमत २ रुपये.

# प्रस्तावना.

निरतिशयप्रेमास्पद जो परमात्मा त्याच्या कृपालेशानें आज पंचदशीचा उत्तरार्ध समाप्त होऊन वाचकांच्या हातीं पडण्याचा सुयोग आला आहे. यथामति विवरण लिहून तयार केलेल्या ह्या ग्रंथाचा प्रेमळ वाचक सप्रेम स्वीकार करितील अशी मला मोठी उमेद आहे.

पंचदशीचा हा उत्तरार्ध श्रीभारतीतीर्थांनीं केलेला आहे; याविषयीं पूर्वार्धाच्या प्रस्तावनेंत स्पष्ट उल्लेख केला आहे. व तेथें सांगितल्याप्रमाणें त्या सत्पुरुषाविषयीं जी कांहीं थोडीशी माहिती उपलब्ध आहे, ती येथें द्यावयाची आहे. श्रीमत् शंकराचार्यांनंतर शालीवाहन शके ११८२ पर्यंत शृंगेरीच्या मठामध्यें एकंदर पंचावन्न आचार्य अधिपति झाले. त्या परंपरेंतील तिसावे आचार्य ईश्वरभारती स्वामी होत. त्यांनीं शके १००४ पासून शके १०५४ पर्यंत मठाधिपत्य चालविलें. त्यानंतर एकतिसावे अधिपति श्रीभारतीतीर्थ स्वामी झाले. त्यांच्या मागून शके १०८९ या वर्षी विद्यातीर्थभारती मठाधिपति झाले. ते अडतीस वर्षे त्या अधिकारावर होते. नंतर शके ११२७ मध्यें तें स्थान विद्यारण्यभारती स्वामींस मिळालें. व त्यांनीं त्याचा बेचाळीस वर्षे अव्याहत उपभोग घेतला, असें हिंदीमध्यें पंडित पीतांबर यांनीं जी पंचदशी केली आहे तिच्या प्रस्तावनेंत म्हटलें आहे. या सज्जनांनीं शृंगेरी मठांतील गुरुपद्धतीची एक यादी दिली आहे. व ही यादी "कोणींशी सांप्रतकालीं प्रसिद्ध केली आहे" असें म्हटलें आहे. पण ती कोणीं व कोठें याचा स्पष्ट उल्लेख नसल्यामुळें तिच्यावर किती विश्वास ठेवावा हें समजत नाहीं. शिवाय ही यादी खरी मानिल्यास पंचदशी विद्यारण्य व भारतीतीर्थ यांनीं केली असें म्हणतां येण्यासारखें नाहीं. कारण भारतीतीर्थ शके १०५४ मध्यें मठाधिपति झाले व विद्यारण्यांचें आधिपत्य शके ११६९ मध्यें समाप्त झालें. संकेश्वरचे गुरुस्वामी वृद्ध झाल्यामुळें त्यांनीं जसें कांहीं दिवसांपूर्वी आपल्या मठाचें स्वामित्व एका शिष्यास दिलें होतें, त्याप्रमाणें श्रीभारतीतीर्थांनींही केलें, असें जरी घटिकाभर मानिलें, तरी वृद्धावस्थेमुळें शके

१०८९ मध्यें मठाधिपत्य विद्यातीर्थास दिल्यानंतर ११६९ पर्यंत त्यांनीं इहलोकीं वास करणें व विद्यारण्यानंतर त्यांच्या हातून अर्धाच झालेला हा ग्रंथ संपणें शक्य नाहीं. योगसामर्थ्यानें ते तितकीं किंवा त्याहून अधिक वर्षेंही जगांत राहूं शकते; नाहीं असें मी ह्मणत नाहीं. पण त्यानंतर प्रस्तुत ग्रंथासारखा ग्रंथ त्यांच्या हातून पार पडणें जरा अशक्य अथवा असंभवनीयच होय. तेव्हां ही यादी जर खरोखरच विश्वसनीय असेल तर " नत्वा श्रीभारतीतीर्थविद्यारण्यमुनीश्वरौ " या टीकाकारांच्या नमनाची व्यवस्था लावणें कठिण पडतें. व पंडित अच्युतरायांनीं सातव्या प्रकरणाच्या आरंभीं " येथपासून पुढील सर्व प्रकरणें भारतीतीर्थांनीं केलेलीं आहेत " असा जो स्पष्ट उल्लेख केलेला आहे, त्याच्याशीं विरोध येतो. पंचदशीच्या आरंभीं श्रीविद्यारण्यांनीं " नमः श्रीशंकरानन्द० " इत्यादि प्रकारें मंगलाचरण करून वेदान्ताचे गुरु किंवा दीक्षागुरु श्रीशंकरानंद आहेत असें जरी स्पष्टपणें सुचविलें आहे, तरी भारतीतीर्थांकडेही त्यांच्या गुरुत्वाचें नातें येतें. कारण ज्या वेळीं हे माधवाचार्य होते त्या वेळीं त्यांस " जैमिनीयन्यायमालाविस्तार " हा पूर्वमीमांसा ग्रंथ लिहिण्याविषयीं वीरबुक्कराजानें भरसभेंत आज्ञा केली. व राजाज्ञेप्रमाणें त्या ग्रंथास आरंभ करितांना माधवाचार्यांनीं भारतीतीर्थयतीद्रांच्या कृपेचें स्मरण केलें आहे. त्यावरून भारतीतीर्थ हे विद्यारण्यांचे गुरु व समकालीन असावे असा तर्क होतो. व तो खरा धरून चालल्यास पूर्वोक्त परंपरेची यादी अविश्वसनीय ठरते. सारांश, आपल्या ग्रंथकाराच्या कालाविषयीं निश्चयानें कांहींच ठरवितां येत नाहीं. केवल अनुमानें करीत बसावें लागतें, व त्यांतील कांहीं खरीं आहेत, असें जरी निश्चयपूर्वक वाटत असलें तरी तीं वस्तुतः तशीं असतीलच असें ह्मणवत नाहीं.

असो; येणेंप्रमाणें भारतीतीर्थांच्या कालाविषयीं याहून अधिक निर्णय होत नाहीं. व त्यांनीं पंचदशीचीं हीं पुढील नऊ प्रकारणें केलीं असें ह्मणण्यास दंतकथा व उभय टीकाकार यांवाचून दुसरें कांहीं प्रमाण नाहीं. या यतींद्रांनीं " वैय्यासिकन्यायमाला " ह्मणून एकच ग्रंथ स्वतंत्रपणें केला आहे; असें दिसतें. पण तोही श्री विद्यारण्यांचाच ग्रंथ असावा असें कित्येक ह्मणतात. कारण त्या ग्रंथाच्या आरंभीं " प्रणम्य

परमात्मानं श्री विद्यातीर्थरूपिणम् । वैय्यासिकन्यायमाला श्लोकैः संगृह्यते स्फुटम् ॥ ”
असे म्हटलें आहे. व जीवन्मुक्ति विवेक, तैत्तिरीयोपनिषद्दीपिका, शांकरदिग्विजय या ग्रंथांच्या आरंभीं विद्यारण्यांनींही “ यस्य निश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् । निर्ममे तमहं वंदे विद्यातीर्थमहेश्वरम् ॥ ” असें म्हटलें आहे. पण “ विद्यातीर्थ ” हीं अक्षरें ज्या ज्या ग्रंथाच्या मंगलाचरणांत आढळतील तो तो विद्यारण्यांचाच ग्रंथ असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण विद्यातीर्थ हा शब्दसमूह रूढ व यौगिक असा दोन्ही प्रकारचा असूं शकेल. शिवाय वैय्यासिकन्यायमालेची व्याख्या समाप्त झाली असतां “ श्री भारतीतीर्थमुनिप्रणीतायां वैय्यासिकन्यायमालायां ” असें म्हटलेलें आढळतें. व त्यावरून हा ग्रंथ श्रीभारतीतीर्थांचाच आहे असें म्हणतां येतें.

श्रीभारतीतीर्थांची भाषासरणीही विद्यारण्याप्रमाणेंच सोपी, सरळ व जोरदार आहे; पण त्यांच्या हातून विद्यारण्यांच्या इतकें काम झाल्याचें दिसत नाहीं. तरी सुद्धां ते महाप्रासादिक व ब्रह्मनिष्ठ यति होते ही गोष्ट निर्विवाद आहे. प्रत्येकाचें प्रारब्ध निरनिराळें असल्यामुळें सर्वांच्या हातून सारखेंच काम होणें शक्य नाहीं. शिवाय ग्रंथलेखनादि केल्यानेंच मनुष्याची योग्यता कळते किंवा वाढते असेंही नाहीं. कारण या अनादि व विपुल सृष्टीमध्यें विद्यारण्यांच्या बरोबरीचे किती महापुरुष झाले असतील व त्यांनीं स्वानंदसाम्राज्याचा यथेच्छ उपभोग घेतला असेल, याचा कांहीं नियम नाहीं. व्यावहारिकदृष्ट्या पाहिल्यास मात्र विद्यारण्यांचे आमच्या सारख्या अज्ञांवर अनंत उपकार झाले आहेत, असें म्हटल्यावांचून गत्यंतर नाहीं. श्रीविद्यारण्यांशीं शिष्यसंबंध झाल्यामुळें श्रीभारतीतीर्थयति हे द्रविड ब्राह्मण असावे असें अनुमान होतें. या ग्रंथकारासंबंधीं याहून अधिक कांहीं सांगतां येण्यासारिखें नाहीं.

पंचदशीच्या पूर्वार्धाप्रमाणें या उत्तरार्धामध्येंही अन्वय, सरळ अर्थ व विवरण असाच क्रम ठेविला आहे. व विवरणकाराच्या अल्प समजुतीप्रमाणें त्यानें मूळ ग्रंथ वाचकास सुगम करून देण्याचा प्रयत्न केला आहे. तो कितपत साध्य झाला आहे, हें पहाणें त्याचें काम नसून वाचकांचें आहे. व तें ते करितील अशीही त्यास आशा आहे. हा प्रयत्न संस्कृतज्ञ पंडिताकरितां नसून

असंस्कृतज्ञ वेदांत जिज्ञासूंकरितां आहे, इत्यादि प्रकारची विनंति मीं पूर्वार्धाच्या प्रस्तावनेंत केलीच आहे.

या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणांत 'विकल्पो निर्विकल्पस्य सविकल्पस्य वा भवेत्॰' इत्यादि श्लोक आहे, व तो पंचदशींतील अति कठिण श्लोक ह्मणून त्याची प्रसिद्धि आहे. यास्तव तो परिशिष्टरूपानें या भागाच्या शेवटीं दिला आहे. वाचक त्याचा उपयोग करून घेतील अशी मला उमेद आहे. शेवटीं ज्या श्रीशंकर किंवा श्रीशंकराचार्य जगन्नियंत्याच्या कृपेनें हें अवघड काम माझ्या हातून तडीस गेलें, त्या अंतर्यामीचें अनन्यमनानें चिंतन करून मी हा ग्रंथ त्याच्याच चरणारविंदीं सप्रेम समर्पण करितों.

हैदराबाद (सिंध)
आषाढ शुद्ध ११
सोमवार, शके १८२८

विष्णु वामन बापट,
गिडुमल संस्कृत पाठशाळेचे
मुख्याध्यापक.



सूचनाः—२५१ ते ३६८ पर्यंतच्या आंकड्या ऐवजीं नजर चुकीनें १४१ ते ३५६ हे अंक पडले आहेत. तथापि विषयसंगति बरोबर आहे.

# पंचदशीच्या उत्तरार्धांतील विषयांची अनुक्रमणिका.

## ७ तृप्तिदीपः ।

## ८ कूटस्थदीपः ।



## ९ ध्यानदीपः ।



## १० नाटकदीपः ।

## ११ योगानंदः ।



## १२ आत्मानंदः ।

१३ अद्वैतानन्दः ।



१४ विद्यानन्दः ।



१५ विषयानन्दः ।

॥ श्रीः ॥

# पंचदशी.

शंकराचार्यभक्तविष्णुकृतसान्वयार्थमहाराष्ट्रविवरणसमेता ।

## भाग २ रा.

### तृप्तिदीपः ।

ह्या प्रकरणामध्यें मुख्यत्वानें श्रुतीचें व्याख्यान करावयाचें असल्यामुळें, ह्या तृप्तिदीपाख्य सप्तम प्रकरणाचा आरंभ करणारे श्रीभारतीर्थगुरु प्रथमतः प्रकरणार्थमूलभूत श्रुति अर्थल्यानें सांगतात.

**आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ।**
**किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥ १ ॥**

अन्वयः—पुरुषः 'अयं अस्मि' इति आत्मानं विजानीयात् चेत् किं इच्छन् कस्य कामाय शरीरं अनुसंज्वरेत् ।

अर्थः—पुरुष 'हा मी आहें' असें आत्म्याला ( स्वतःला ) जर जाणेल तर मग कशाची इच्छा करून व कोणाच्या इच्छेकरितां तो शरीराच्या संबंधाचे ताप भोगील ? ॥ १ ॥

विवरणः—हातांतील कंकणाप्रमाणें आत्म्याचें साक्षात् ज्ञान होणें शक्य आहे. ह्मणजे ज्ञेय, ज्ञान व ज्ञाता या भावनाद्वारा जसें कंकण दिसतें, तसा जरी हा नं

दिसला तरी ह्या स्वसंवेद्याच्या सत्तेविषयीं निश्चय होणें युक्त आहे. ह्मणून श्रीभारतीतीर्थ श्रुतीच्या आधारानें ह्मणतात, पुरुषाला ' हा मी आहें ' असें एकदा समजलें ह्मणजे मग त्याला स्वतःविषयीं संशय रहात नसल्यामुळें अविद्वान् पुरुष जसे ' शरीरच मी ' असें समजून त्याच्या पीडेनें पीडीत होतात तसा तो होत नाहीं. कारण मी एक आहें, अद्वितीय आहें, निरिच्छ आहे, शरीरातीत आहें इत्यादि प्रकारें ज्ञान झाल्यावर चिंतेला जागाच रहात नसल्यामुळें व इच्छेचें निमित्त समूल नष्ट झाल्यामुळें त्याला शरीराच्या अपेक्षेनें होणाऱ्या यातना होत नाहींत. तात्पर्य–चित् व जड यांचें ऐक्य हेंच जीवांच्या यातनेचें मुख्य बीज होय. पंचदशीचीं पंधरा प्रकरणें श्रीविद्यारण्यांनीं केलेलीं आहेत, असें पुष्कळांना माहीत आहे, पण तें खरें नव्हे. कारण पंचदशीच्या दोन्ही टीकाकारांनीं गेल्या प्रकरणापर्यंतच श्रीविद्यारण्याचार्यांचा प्रतिप्रकरणारंभीं साक्षात् किंवा अर्थतः निर्देश करून आतां येथून पुढें श्रीभारतीतीर्थांचा निर्देश केला आहे, त्यावरून चित्रदीपान्त सहा प्रकरणें पूर्वाश्रमीं सर्वज्ञ माधवाचार्य या नांवानें प्रसिद्ध असलेल्या विद्यारण्यांनीं केलेलीं आहेत. अवशिष्ट राहिलेलीं नऊ प्रकरणें ह्यांच्या गुरूंनीं ह्या. भारतीतीर्थांनीं केलीं असें ह्मणणें भाग पडतें. पंडित अच्युतरायांनीं तर " आपल्या परम धन्य शिष्यांचीं हीं सहा प्रकरणें पाहून संतुष्ट झालेल्या भारतीतीर्थांनीं पुढील नऊ प्रकरणें सहज लीलेनें केलीं. व शिष्याच्या प्रातिज्ञेप्रमाणें केवल अद्वैत शास्त्राचें अवलंबन करणाऱ्याच मुमुक्षूंवर अखंड उपकार केला " असें स्पष्ट ह्मटलें आहे. ॥ १ ॥

या प्रकरणाचा आरंभ कशाकरितां केलेला आहे हें आतां सांगतात.–

**अस्याः श्रुतेरभिप्रायः सम्यगत्र विचार्यते ।**
**जीवन्मुक्तस्य या तृप्तिः सा तेन विशदायते ॥ २ ॥**

अन्वयः—अत्र अस्या श्रुतेः अभिप्रायः सम्यक् विचार्यते । तेन च जीवन्मुक्तस्य या तृप्तिः सा विशदायते ।

**अर्थः—या प्रकरणांत या पूर्वोक्त श्रुतीचा अभिप्राय काय आहे याचा पूर्णपणें विचार केला आहे. व त्याच्या योगानें जीवन्मुक्त पुरुषाची जी तृप्ति ती स्पष्ट केली जात आहे. ॥ २ ॥**

विवरण:—अत्र–या तृप्तिदीप नामक सातव्या प्रकरणांत. अस्याः–आत्मानं चेत् विजानीयात् इत्यादि कण्वोपनिषदांतील श्रुतीचा. अभिप्रायः—तात्पर्य हाच श्रुतीचा खरा अर्थ आहे; वाच्य अर्थ हा खरा अर्थ नव्हे. कारण तोच खरा, असें जर मानलें, तर वेदांतील आख्यायिकाही खऱ्या मानाव्या लागतील, पण तसें पूर्वीच्या कोणत्याही आचार्यांनीं मानलेलें नाहीं. विशदायते—या श्रुतीचें तात्पर्य काय आहे हें सांगितलें कीं तेवढ्यानेंच जीवन्मुक्त पुरुषाची तृप्ति कशी असते हें स्पष्ट होतें. ह्मणजे जीवन्मुक्त पुरुषाच्या तृप्तीचें वर्णन करण्याकरितां निराळा प्रयत्न करावा लागत नाहीं. ॥ २ ॥

पूर्वोक्त श्रुतीचें व्याख्यान करण्याकरितां ह्या प्रकरणाचा आरंभ झालेला आहे व " पदांचा छेद करणें. पदांचा अर्थ सांगणें, समासांचा किंवा तद्धित शब्दांचा विग्रह करणें, वाक्यांची अन्वयद्वारा योजना करणें व आक्षेपांचें समाधान करणें हीं व्याख्यानाचीं पांच लक्षणें आहेत. " असें सांगितलें आहे. म्हणून या लक्षणांनीं युक्त असें पुरुष शब्दाचें व्याख्यान करण्याच्या इच्छेनें ग्रंथकार प्रथमतः सृष्टीचें संक्षेपतः वर्णन करितात––

**मायाभासेन जीवेशौ करोतीति श्रुतत्वतः ।**
**कल्पितावेव जीवेशौ ताभ्यां सर्वं प्रकल्पितम् ॥ ३ ॥**

अन्वयः—' माया आभासेन जीवेशौ करोति ' इति श्रुतत्वतः जीवेशौ कल्पितौ एव। च ताभ्यां सर्वं प्रकल्पितं अस्ति।

**अर्थः—माया चिदाभासाच्या योगानें जीव व ईश्वर करिते असें श्रुतीमध्यें सांगितलेलें असल्यामुळें जीव व ईश्वर हे कल्पित होत; व त्यांनीं हें सर्व कल्पिलें आहे. ॥ ३ ॥**

विवरण:—जीव व ईश्वर यांना निर्माण करणारी माया होय. व ती संसर्गामुळें स्वतःमध्यें येणाऱ्या चैतन्याभासानें त्यांना उत्पन्न करिते, असें श्रुतींत वर्णन आहे. अर्थात् जीव व ईश्वर दोघेही आत्मस्वरूप असल्यामुळें मिथ्या ( कल्पित ) आहेत. व अशा ह्या कल्पित जीवेश्वरांनीं सर्व सृष्टि निर्माण केली आहे. ' शुद्धसत्वप्रधान मायेमध्यें प्रतिबिंबित झालेल्या चैतन्याला ईश्वर व मलिनसत्वप्रधान मायेंत प्रतिबिंबित

झालेल्या चैतन्याला जीव म्हणतात; ' असें प्रथम प्रकरणांत व ' त्यांनींच हें सर्व द्वैतजात स्वसंकल्पानें निर्माण केलें आहे ' असें द्वैतविवेकाख्य चवथ्या प्रकरणांत विस्तृतपणें वर्णन केलेलें आहे. तात्पर्य ईश्वरापासून तृणापर्यंत सर्व सृष्टि रज्जुसर्पाप्रमाणें कल्पित आहे. ॥ ३ ॥

या चवथ्या श्लोकांतही पूर्वोक्त सृष्टीच्या उत्पत्तीचेंच स्मरण देतात.

**ईक्षणादिप्रवेशांता सृष्टिरीशेन कल्पिता ।**
**जाग्रदादिविमोक्षांतः संसारो जीवकल्पितः ॥ ४ ॥**

**अन्वयः**—ईक्षणादि प्रवेशान्ता सृष्टिः ईशेन कल्पिता अस्ति । तथा जाग्रदादि विमोक्षान्तः संसारः जीवकल्पितः अस्ति ।

**अर्थः—ईक्षणापासून प्रवेशापर्यंत जी सृष्टि ती ईश्वरानें कल्पिलेली आहे व जाग्रदवस्थेपासून मुक्तीपर्यंत जो संसार तो जीवानें कल्पिलेला आहे. ॥४॥**

**विवरणः**—प्राण्यांच्या विविधकर्मांच्या फलाचा काल प्राप्त झाला असतां पूर्वी केवळ सद्रूप असलेल्या शबल ब्रह्माला मी पुष्कळ व्हावें अशी इच्छा होते. या इच्छेपासून सर्व भूतभौतिक सृष्टि निर्माण करून त्यांत प्रवेश करीपर्यंत जो सृष्टिक्रम श्रुतीनें सांगितलेला आहे तो ईश्वरकृत होय. ह्मणजे ईश्वराच्या केवळ संकल्पानेंच तो सर्व उत्पन्न झालेला आहे. पण तो संकल्पजन्य असल्यामुळें खोटा आहे. याचप्रमाणें संसाराचा जाग्रदवस्था हा आरंभ व आत्मसाक्षात्कारानें होणारा तोच अंत होय. या जाग्रदादि मोक्षान्त संसाराचा कल्पक जीव आहे. अर्थात् हाही खोटा आहे. तात्पर्य मायाजन्य जे जीवेश्वर त्यांनीं कल्पित अशी ही सर्व चराचर सृष्टि खोटी आहे असें समजावें. ॥ ४ ॥

ह्याप्रमाणें दोन श्लोकांनीं पुरुषशब्दाच्या अर्थाचें ज्ञान करून देणारी जीवेश्वर-कृत उभयविध सृष्टि सांगून आतां पुरुष शब्दाचा अर्थ सांगतात—

**भ्रमाधिष्ठानभूतात्मा कूटस्थासंगचिद्वपुः ।**
**अन्योन्याध्यासतोऽसंगधीस्थजीवोऽत्र पूरुषः ॥ ५ ॥**

**अन्वयः**—यः कूटस्थासंगचिद्वपुः भ्रमाधिष्ठानभूतात्मा सः एव अन्योन्याध्यासतः असंगधीस्थजीवः सन् अत्र पुरुषः इत्युच्यते ।

अर्थः—जो विकारशून्य असंगचैतन्यरूप व भ्रमाचें अधिष्टान झालेला आत्मा तोच अन्योन्याध्यासाच्या योगानें असंग बुद्धींतील जीव झाला असतां त्याला या श्रुतींत पुरुष असें ह्मणतात. ॥ ५ ॥

विवरणः—प्रथम श्लोकांत पुरुष म्हणून ज्याला म्हटलें आहे तो कोण? असंग आत्मा पुरुष नव्हे; जड बुद्धीही देखील पुरुष नव्हे; व त्या बुद्धींतील आभासही पुरुष नव्हे; याचें, कारण पुढच्या श्लोकांत समजेल. तर मग पुरुष म्हणजे कोण? कधींही विकार न पावणारें व कोठेंही सक्त न होणारें असें चैतन्य तद्रूप व देह, इंद्रियें इत्यादिकांच्या भ्रमाला आधारभूत असा परमात्मा अन्योन्याध्यासाच्या योगानें बुद्धीमध्यें जीव होतो. व अशा असंग बुद्धिगत जीवरूप असंग परमात्म्यालाच श्रुतिमाता पुरुष असें म्हणते. आत्मा व बुद्धि हीं परस्पर विरोधी असल्यामुळें परमार्थतः असंग आहेत. म्हणजे ह्या उभयतांचा त्रिकालींही संसर्ग होणें शक्य नाहीं. पण अनादि अविद्येमुळें त्यांच्या धर्माचा परस्पर आरोप झाला कीं त्या सर्व ( जीव, बुद्धि व ईश्वर ) या समूहाला पुरुष हें नांव प्राप्त होतें. ॥ ५ ॥

शंकाः—पुरुष म्हणजे चिदाभासरूप जीव, असें मानल्यास कोणता प्रत्यवाय आहे? समाधान—

**साधिष्ठानो विमोक्षादौ जीवोऽधिक्रियते न तु ।**
**केवलो निरधिष्ठानविभ्रांतेः क्वाप्यसिद्धितः ॥ ६ ॥**

अन्वयः—साधिष्ठानः जीवः विमोक्षादौ अधिक्रियते । न तु केवलः, कुतः निराधिष्ठानविभ्रान्तेः क्व अपि असिद्धितः हेतोः ।

अर्थः—अधिष्टानासहवर्तमान जीव मोक्षादिकांविषयीं अधिकारी होतो. केवळ आभास नव्हे. कारण अधिष्ठानरहित भ्रांति कोठेंही सिद्ध होत नाहीं. ॥ ६ ॥

विवरणः—**साधिष्ठानः**–जीवाचें अधिष्ठान ( आश्रय, बिंब ) जें कूटस्थ चैतन्य त्यासहवर्तमानच जीव मोक्ष, स्वर्ग इत्यादिकांच्या साधनाधिष्ठानाचा अधिकारी होतो. केवळ जीव ( चिदाभास ) अधिष्ठानाचा आभास असल्यामुळें वस्तुतः तो कोणी पदार्थच नव्हे व त्यामुळें त्याला कोणत्याही प्रकारचा अधिकार मिळणें

शक्य नाहीं. कारण वंध्यापुत्र कोठें राज्य करीत असल्याचें ऐकण्यांत नाहीं. बरें जिव ही भ्रांति आहे असें म्हणावें तर ती अधिष्ठानावांचून कधीं होत नाहीं; असा नियम आहे. सारांश, केवल चिदाभास हा पुरुष होय, असें म्हणणें अयुक्त आहे. म्हणून पुरुषाचें पूर्वोक्त लक्षणच ग्राह्य होय. ॥ ६ ॥

आतां आपल्या अधिष्ठानासहवर्तमान जीव संसारी होत असतो, असें दोन श्लोकांनीं ठरवितात.

**अधिष्ठानांशसंयुक्तं भ्रमांशमवलंबते ।**
**यदा तदाऽहं संसारीत्येवं जीवोऽभिमन्यते ॥ ७ ॥**

अन्वयः—यदा जीवः अधिष्ठानांशसंयुक्तं भ्रमांशं अवलंबते तदा अहं संसारी इति एवं अभिमन्यते ।

अर्थः—जेव्हां जीव अधिष्ठानाच्या अंशासहवर्तमान भ्रमाच्या अंशाचा आश्रय करितो तेव्हां 'मी संसारी' असा अभिमान धरितो. ॥ ७ ॥

विवरणः—अधिष्ठानांशसंयुक्तं-जीवाचें अधिष्ठान जें कूटस्थ चैतन्य त्यासह. भ्रमांशं-चिदाभास असणारीं सूक्ष्म व स्थूल हीं दोन शरीरें. अवलंबते-हेंच माझें स्वरूप आहे अशा खोट्याच समजुतीचा स्वीकार करितो. सारांश, अधिष्ठानांश व भ्रमांश यांचें ऐक्य झाल्यावांचून चिदाभासाला संसारित्व येत नाहीं. ॥ ७ ॥

**भ्रमांशस्य तिरस्कारादधिष्ठानप्रधानता ।**
**यदा तदा चिदात्माऽहमसंगोऽस्मीति बुध्यते ॥ ८ ॥**

अन्वयः—यदा भ्रमांशस्य तिरस्कारात् अधिष्ठानप्रधानता भवति तदा अहं चिदात्मा असंगः अस्मि इति बुध्यते ।

अर्थः—ज्या वेळीं भ्रमाच्या अंशाचा त्याग केल्यामुळें अधिष्ठानाचें प्राधान्य होतें त्या वेळीं मी चिदात्मा असंग आहें असें तो समजतो. ॥ ८ ॥

विवरणः—भ्रमांशस्य—दोन्ही देहांसहवर्तमान चिदाभासाचा. तिरस्कारात्—हें सर्व मिथ्या आहे अशा ज्ञानानें अनादर वाटल्यामुळें. सारांश, दीर्घकालपर्यंत निष्ठापूर्वक श्रवणादिकांचा अभ्यास व गुरुचरणकमलाची प्रेमपूर्वक सेवा यांच्या

योगानें भ्रमांशाचा अनादर वाटून जेव्हां मुमुक्षु अधिष्ठानरूप होऊन रहातो तेव्हां त्याला मी असंग, कूटस्थ, आत्मा आहें असें निःसंशय वाटतें. ॥ ८ ॥

पूर्वोक्त श्लोकांतील 'अस्मि' या पदासंबंधीं शंका घेऊन तिचें समाधान सांगतात.

**नासंगेऽहंकृतिर्युक्ता कथमस्मीति चेच्छृणु ।**
**एको मुख्यो द्वावमुख्यावित्यर्थस्त्रिविधोऽहमः ॥ ९ ॥**

**अन्वयः**—असंगे अहंकृतिः न युक्ता अतः 'अस्मि' इति कथं जानीयात् इति चेत् शृणु । एकः मुख्यः द्वौ अमुख्यौ इति अहमः त्रिविधः अर्थः अस्ति ।

**अर्थः—असंग आत्म्याचे ठिकाणीं अहंकार असणें अयुक्त आहे तेव्हां 'आहें' असें तो कसें जाणील? असें जर ह्मणशील तर ऐक. एक मुख्य व दोन गौण असे अहं या शब्दाचे एकंदर तीन अर्थ आहेत. ॥ ९ ॥**

**विवरणः**—अहो, पण आत्मा जर संगरहित आहे, तर त्याचे ठिकाणीं 'अहं' अशी अहंवृत्ति तरी कोठून असणार? कारण मुमुक्षु अधिष्ठानप्रधान झाला कीं सुषुप्ती-प्रमाणें त्याला द्वैताचें भान होणें शक्य नाहीं. व अन्य असें जर कांहीं नाहीं तर त्याहून निराळा 'मी' हें तरी कोणाला वाटणार? अशी जर तूं शंका काढशील, तर ह्याचें उत्तर सांगतों, ऐक. अहं या शब्दाचे एक मुख्य व दोन गौण असे एकंदर तीन अर्थ आहेत व आह्मी या ठिकाणीं जो 'अहं' शब्द योजिलेला आहे, तो अमुख्य आहे. याचें सविस्तर वर्णन पुढें होणार आहे. ॥ ९ ॥

आतां प्रथमतः अहंचा मुख्य अर्थ सांगतात—

**अन्योन्याध्यासरूपेण कूटस्थाभासयोर्वपुः ।**
**एकीभूय भवेन्मुख्यस्तत्र मूढैः प्रयुज्यते ॥ १० ॥**

**अन्वयः**—यतः तत्र मूढैः प्रयुज्यते अतः कूटस्थाभासयोः वपुः अन्योन्याध्यास-रूपेण एकीभूय मुख्यः भवेत् ।

**अर्थः—ज्या अर्थी त्या ठिकाणीं मूढ पुरुष त्याचा प्रयोग करितात, त्या अर्थी कूटस्थ व चिदाभास याचें स्वरूप अन्योन्याध्यासरूपानें एक झाल्यामुळें तो मुख्य होतो. ॥ १० ॥**

**विवरणः**—कूटस्थ व चिदाभास यांचें ऐक्य झाल्यामुळें परस्परांविषयीं अविवेक होऊन जो ' अहं ' असा शब्दप्रयोग होतो तो मुख्य होय. कारण बहुतेक सर्व मनुष्यें कूटस्थ व चैतन्य यांच्या अविवेकजन्यग्रंथीला उद्देशूनच मी असें ह्मणतात. व हा ' मी ' आबालवृद्धांना ठाऊक असतो, कारण व्यवहारांत मी ब्राह्मण, मी क्षत्रिय, इत्यादि शब्दप्रयोग होत असल्याचें सर्वत्र दिसतें. सारांश, सर्व प्राण्यांच्या परिचयांतला जो अहं तोच मुख्य होय. ॥ १० ॥

आतां अमुख्य ' अहं ' कोणता तें सांगतात—

**पृथगांभासकूटस्थावमुख्यौ तत्र तत्त्ववित् ।**
**पर्यायेण प्रयुंक्तेऽहं शब्दं लोके च वैदिके ॥ ११ ॥**

**अन्वयः**—यतः तत्त्ववित् तत्र अहंशब्दं लोके वैदिके च पर्यायेण प्रयुंक्ते अतः पृथक् आभासकूटस्थौ अमुख्यौ भवतः ।

**अर्थः**—ज्या अर्थी तत्त्ववेत्ता पुरुष आभास व कूटस्थ यांच्या ठिकाणीं अहंशब्द लौकिक व वैदिक व्यवहारांत पर्यायानें योजितो त्या अर्थी अहं शब्दानें कूटस्थ व आभास हे जेव्हां पृथक्पणें वाच्य असतात तेव्हां गौण होतात. ॥ ११ ॥

**विवरणः**—प्राकृतपुरुषाप्रमाणें तत्त्ववित् पुरुष जडचैतन्याचें ऐक्य करीत नसल्यामुळें तो व्यावहारिक लोकांशीं भाषण करीत असतांना एका प्रकारें अहं शब्द योजितो व वैदिक व्यवहारकालीं ह्मणजे शिष्यांशीं संभाषणादि करीत असतांना निराळ्या प्रकारें योजितो. उदाहरणार्थ पहाः—मी आज गंगेवर स्नान करण्यास जातों. यांतील अहं शब्द केवल चिदाभासाला उद्देशून त्यानें योजिलेला आहे. व ' मी ब्रह्म आहें ' या वाक्यांतील अहं शब्द केवल कूटस्थाला उद्देशून आहे. यास्तव विद्वानांनीं योजिलेला अहं शब्द भिन्न कालीं भिन्न वस्तु दाखवीत असतो. तस्मात् केवल आभास व केवल कूटस्थ यांचें लक्षणेनें ज्ञान करून देणारे अहं शब्द अमुख्य ( गौण ) आहेत. ॥ ११ ॥

लौकिक व वैदिककालीं विद्वान् अहं शब्द पर्यायानें योजितो असें जें वर ह्मटलें आहे त्याचेंच आतां स्पष्टीकरण करितातः—

**लौकिकव्यवहारेऽहं गच्छामीत्यादिके बुधः ।**
**विविच्यैव चिदाभासं कूटस्थात्तं विवक्षति ॥ १२ ॥**

अन्वयः—अहं गच्छामि इत्यादिके लौकिकव्यवहारे बुधः कूटस्थात् चिदाभासं विविच्य एव तं विवक्षति ।

**अर्थः—' मी जातों ' इत्यादि लौकिक व्यवहारांत ज्ञाता कूटस्थाहून चिदाभासास प्रथक् करूनच त्याला अहं असें ह्मणत असतो. ॥ १२ ॥**

विवरणः—शरीर असेपर्यंत, निदान त्याच्याकरितां तरी, ज्ञान्याला व्यवहार हा केलाच पाहिजे. पण तो ज्ञानी अगदीं प्राकृताप्रमाणें देहापासून अहंकारापर्यंत जेवढ्या वस्तु आहेत, त्या सर्वांचे ठिकाणीं अहं असें तादात्म्य करून व्यवहार करीत नाहीं. तर ' मी जातों ' या लौकिकवाक्यांत सुद्धां चिदाभास कूटस्थाहून अगदीं निराळा आहे, असें समजून केवळ चिदाभासालाच ' अहं ' असें तो ह्मणतो; व नंतर व्यवहार करितो. कारण असंग व निराकार आत्मा जाणें, येणें, बसणें, बोलणें, इत्यादि व्यवहार कधींच करणार नाहीं अशी त्याची दृढ समजूत असते. सारांश, विद्वान् पुरुष व्यावहारिक भाषेंत केवळ चिदाभासालाच अहं असें ह्मणत असतो. ॥ १२ ॥

तसेंच

**असंगोऽहं चिदात्माऽहमिति शास्त्रीयदृष्टितः ।**
**अहंशब्दं प्रयुंक्तेऽयं कूटस्थे केवले बुधः ॥ १३ ॥**

अन्वयः—अयं बुधः शास्त्रीयदृष्टितः अहं असंगः, अहं चिदात्मा, इति केवले कूटस्थे अहंशब्दं प्रयुंक्ते ।

**अर्थः—हा ज्ञानी शास्त्रीय दृष्टीनें ' मी असंग आहें, मी चिदात्मा आहें ' इत्यादि प्रकारें केवल कूटस्थाच्या ठिकाणीं अहं शब्दाचा प्रयोग करितो. ॥१३॥**

विवरणः—शास्त्रीयदृष्टितः—वेदान्ताचें श्रवण केल्यानें उत्पन्न झालेलें जें ज्ञान त्या ज्ञानदृष्टीनें. केवले कूटस्थे–प्रकाश जसा अंधकारापासून पृथक् असतो, त्याप्रमाणें चिदाभासाहून अगदीं भिन्न असलेल्या निर्विकार आत्माचे ठिकाणीं. तात्पर्य, ज्ञानी पुरुष शास्त्रीयदृष्टीनें जो अहं असा शब्द योजितो, तो चिदाभास व कूटस्थ यांच्या

एक्याला किंवा चिदाभासाला उद्देशून नसतो; तर तो सर्वाधारभूत प्रत्यगात्म्याला उद्देशून असतो. इंद्रानें प्रतर्दनाला उपदेश करितांना "मी प्रज्ञानात्मा प्राण आहें" असें ह्मटलें आहे. पण तें शास्त्रदृष्ट्या ह्मटलेलें असल्यामुळें त्याचा इंद्राच्या शरीरादिकांशीं कांहीं संबंध नाहीं; असें 'शास्त्रदृष्ट्या तूपदेशो वामदेववत्' या व्याससूत्रांत व त्यावरील शांकरभाष्यांत स्पष्टपणें सिद्ध केलें आहे. ॥ १३ ॥

शंका:—अहो, पण

**ज्ञानिताज्ञानिते त्वात्माभासस्यैव न चात्मनः ।**
**तथा च कथमाभासः कूटस्थोस्मीति बुध्यताम् ॥ १४ ॥**

अन्वय:—ज्ञानिताज्ञानिते तु आत्माभासस्य एव न च आत्मनः तथा च आभासः अहं कूटस्थः अस्मि इति कथं बुध्यताम् ।

**अर्थ:—ज्ञानत्व व अज्ञानत्व हे धर्म आत्म्याच्या आभासाचेच होत. आत्म्याचे नव्हेत. तेव्हां आभास मी कूटस्थ आहें असें कसें समजेल ? ॥ १४ ॥**

विवरण:—हा सर्व श्लोक शंकारूप आहे. ज्ञानत्वादि धर्म चैतन्याभासाचे आहेत तुह्मांलाही मान्य आहे. तेव्हां त्याचे धर्म कूटस्थ आत्म्याच्या ठिकाणीं कसे जाणार? आणि असें जर होणें शक्य नाहीं, तर 'मी कूटस्थ आहें' असें तरी चिदाभासाला कसें ह्मणतां येईल ? ज्ञानत्वादि धर्म चिदाभासाचेच आहेत हें तर उघड आहे. कारण ते असंग चिद्रूप आत्म्याचे नव्हेत, हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. तात्पर्य कूटस्थाहून अगदीं भिन्न असणारा चिदाभास आत्मा कसा होणार ? ॥ १४ ॥

या पूर्वोक्त शंकेचा आतां परिहार करितात—

**नायं दोषश्चिदाभासः कूटस्थैकस्वभाववान ।**
**आभासत्वस्य मिथ्यात्वात्कूटस्थत्वावशेषणात् ॥ १५ ॥**

अन्वय:—अयं दोषः न । आभासत्वस्य मिथ्यात्वात् च कूटस्थत्वावशेषणात् चिदाभासः कूटस्थैकस्वभाववान् अस्ति ।

**अर्थ:—हा दोष येत नाहीं. आभासत्व खोटें असल्यामुळें व कूटस्थत्व अवशिष्ट राहात असल्यामुळें चिदाभासाचा कूटस्थ हाच एक स्वभाव आहे. ॥ १५ ॥**

**विवरणः**—चिदाभास म्हणून जर कोणी कूटस्थाहून खरोखरीच निराळा पदार्थ असता तर ही तुमची शंका योग्य झाली असती. पण जो जो आभास (ती वस्तु नसतांना तिच्यासारखा भास) तो तो खोटा अशी व्याप्ति असल्यामुळें आभासाच्या निवृत्तीनंतर त्याचें अधिष्ठान अवशिष्ट रहाणेंच युक्त आहे. जसें एकादा विलासी पुरुष आपल्यापुढें आरसा धरून त्यांत आपलें स्वरूप पहात असला तरी त्यात दिसणारें मुख खोटें असतें, व पहाणाऱ्या पुरुषाचें मुख हेंच त्याचें खरें तत्त्व असतें, त्याप्रमाणें बुद्धिस्थ आभास हा खोटा आहे व त्याचें बिंबभूत कूटस्थ सत्य आहे. सारांश, आभासाचा कूटस्थ हाच एक स्वभाव आहे. आणि त्यामुळें 'मी कूटस्थ आहें' असा जो गौण प्रयोग होत असतो तो केवल शास्त्रीयदृष्ट्या होय. ॥ १५ ॥

'अहो, पण आभास जर खोटा, तर त्याच्या आश्रयानें रहाणारें 'मी कूटस्थ' हें ज्ञानही खोटेंच, अशी शंका घेऊन समाधान करितात—

**कूटस्थोऽस्मीति बोधोऽपि मिथ्याचेन्नेति को वदेत्।**
**न हि सत्यतयाऽभीष्टं रज्जुसर्पविसर्पणम् ॥ १६ ॥**

**अन्वयः**—कूटस्थः अस्मि इति बोधः अपि मिथ्या इति चेत् 'न' इति कः वदेत्। हि रज्जसर्पविसर्पणं सत्यतया न अभीष्टम्।

**अर्थः**—'मी कूटस्थ आहें' हें ज्ञान सुद्धां खोटें असें जर ह्मणशील तर 'नाहीं,' असें कोण ह्मणणार? कारण रज्जूमुळें भासणाऱ्या सर्पाचें चलन सत्य आहे, असें कोणालाही मान्य नाहीं. ॥ १६ ॥

**विवरणः**—'मी कूटस्थ आहें' अशा प्रकारें होणारा जो विद्वानाचा शास्त्रीयदृष्ट्या व्यवहार तो परमार्थतः खोटाच आहे. तो खरा आहे, असें कोणीही ह्मणणार नाहीं. कारण तसें ह्मणणें हा सुद्धां एक वाणीचा व्यापार आहे. व सर्व कायिक, वाचिक, मानसिक व्यापार हा शुद्ध व्यवहारच असल्यामुळें तो चिदाभासाचा आश्रय करून असतो हें उघड आहे; आणि त्यामुळेंच तो खोटा आहे. रज्जूच्या आश्रयानें भासणारा भुजंग भ्रमिष्ठाला चालत आहेसा वाटतो, पण तें त्याचें वाटणें खरें का असतें? तसाच प्रकार या 'अहं' चा आहे, असें समजावें. ॥ १६ ॥

पण हें ज्ञान जर मिथ्या आहे, तर त्याच्या योगानें संसाराची निवृत्ति कशी होणार? या शंकेचें आतां निवारण करितात—

**तादृशेनापि बोधेन संसारो हि निवर्तते ।**
**यक्षानुरूपो हि बलिरित्याहुर्लौकिका जनाः ॥ १७ ॥**

अन्वयः—तादृशेन बोधेन अपि संसारः निवर्तते हि । हि यक्षानुरूपः बलिः इति लौकिकाः जनाः आहुः ।

अर्थः—तशा प्रकारच्या बोधानें सुद्धां संसाराची निवृत्ति होतेच. कारण जसा यक्ष तसा बलि असें प्राकृत लोक ह्मणत असतात. ॥ १७ ॥

विवरणः—जसा समंद किंवा पिशाच असेल तसाच त्याला बलि दिला पाहिजे असें व्यावहारिक लोक सुद्धां ह्मणत असतात. किंवा स्वप्नामध्यें दिसलेला व्याघ्र व त्यामुळें वाटलेली भीति स्वप्नांतील आताच्या उपदेशानेंच नाहींशी होणार हें उघड आहे. त्याप्रमाणेंच ह्या खोटा संसार नष्ट होण्यास असलें खोटें ज्ञानच उपयोगीं पडतें. सारांश, मिथ्या संसाराची निवृत्ति करण्यास मिथ्या ज्ञानच जर उपयोगीं पडलें तर त्यांत कांहीं हानि नाहीं. ॥ १७ ॥

आतां या प्रकरणाचा उपसंहार करितातः—

**तस्मादाभासपुरुषः सकूटस्थो विविच्य तम् ।**
**कूटस्थोऽस्मीति विज्ञातुमर्हतीत्यभ्यधाच्छ्रुतिः ॥ १८ ॥**

अन्वयः—तस्मात् स कूटस्थः आभासपुरुषः । तं विविच्य कूटस्थः अस्मि इति विज्ञातुं अर्हति । इति श्रुतिः अभ्यधात् ।

अर्थः—तस्मात् कूटस्थासह चिदाभास हा पुरुष होय. त्या कूटस्थाला चिदाभासाहून पृथक् करून 'मी कूटस्थ आहें' असें ज्ञान होणें शक्य आहे असें श्रुतीनें सांगितलें आहे. ॥ १८ ॥

विवरणः—ज्या अर्थीं कूटस्थ हेंच चिदाभासाचें स्वरूप आहे, त्या अर्थीं पुरुष या शब्दानें ज्याचा उल्लेख करितात तो कूटस्थासहवर्तमान चिदाभास होय. ह्मणून अधिष्ठानभूत कूटस्थाचें मिथ्याभूत अशा स्वतःहून विवेकानें पृथक्करण केल्यानें मी कूटस्थ आहें, असें ज्ञान होणें अशक्य नाहीं. हें सुचविण्याकरितां श्रुतीनें 'अस्मि' असें ह्मटलें आहे. ॥ १८ ॥

'आत्मानं चेत्,' इत्यादि प्रथम श्लोकांत निर्दिष्ट केलेल्या श्रुतींतील 'पूरुषः' व 'अस्मि' या दोन पदांचा अर्थ सांगतातः-

**असंदिग्धाविपर्यस्तबोधो देहात्मनीक्ष्यते ।**
**तद्वदत्रेति निर्णेतुमयमित्यभिधीयते ॥ १९ ॥**

**अन्वयः**—देहात्मनि असंदिग्धाविपर्यस्तबोधः यद्वत् ईक्ष्यते तद्वत् अत्र इति निर्णेतुं 'अयं' इति अभिधीयते.

**अर्थः—देहरूप आत्म्याविषयीं निःसंशय व विपर्यास न होतां जसें ज्ञान होत असल्याचें दिसतें, तसेंच या प्रत्यगात्म्याविषयीं ज्ञान झालें पाहिजे असा निर्णय करण्याकरितां 'अयं ह्म० हा' असें ह्मटलें आहे. ॥ १९ ॥**

**विवरणः**—**असंदिग्ध** ह्मणजे "हा घट आहे कीं अन्य कांहीं आहे' याप्रमाणें जसा लौकिक पदार्थाविषयीं संशय उत्पन्न होतो, त्याप्रमाणें "देही हा आत्मा आहे कीं अन्य कांहीं आहे" असा संशय उत्पन्न न होतां व **अविपर्यस्त**—ह्मणजे शुक्ति असतांना ती जशी हें रजत आहे असें वाटतें तसें देह असतांना तो इंद्रियें आहे किंवा पाषाण आहे असें वाटत नाहीं, तर प्राकृत पुरुषाला देह हाच आत्मा आहे ह्याविषयीं कधींच संशय येत नाहीं, त्याप्रमाणेंच या प्रत्यगात्म्याविषयींही संशयविपर्यरहित ज्ञान संपादन केलें पाहिजे, असा मुमुक्षूला निर्णय करितां यावा ह्मणून 'अयं' ह्मणजे हा प्रत्यक्ष भासणारा (स्वसंवेद्य) असें श्रुतीनें ह्मटलें आहे. सारांश मी ब्राह्मण, मी गोरा, मी विद्वान्, इत्यादि जसें देहाभिमानी प्राकृत कधीं विसरत नाहींत तसेंच कूटस्थ आत्म्याला कधीं न विसरणें व पूर्वोक्त सर्व खोटें आहे, असें समजणें हें मोक्षदायी ज्ञान होय. ॥ १९ ॥

अशा प्रकारचा बोधच मोक्षाचें साधन होय असें आतां उपदेशसाहस्रींतील आचार्यवाक्यानें ठरवितातः-

**देहात्मज्ञानवज्ज्ञानं देहात्मज्ञानबाधकम् ।**
**आत्मन्येव भवेद्यस्य स नेच्छन्नपि मुच्यते ॥ २० ॥**

**अन्वयः**—देहात्मज्ञानवत् आत्मनि एव देहात्मज्ञानबाधकं ज्ञानं यस्य भवेत् स नेच्छन् अपि मुच्यते ।

अर्थः—देह हा मी या ज्ञानाप्रमाणें आत्म्याविषयींच देहात्मज्ञानाचा बाध करणारें ज्ञान ज्याला होतें त्याची इच्छा नसली तरी तो मुक्त होतो. ॥ २० ॥

विवरणः—श्रीभाष्यकार ह्मणतात—प्राकृताला देह हाच आत्मा आहे असें ज्ञान जसें निःसंशय असतें. तसेंच–आत्मा देह नव्हे तर तो नित्य शुद्ध, बुद्ध, व मुक्त आहे असें पूर्वोक्त देहात्मभावनेचा नाश करणारें दृढ ज्ञान ज्या धन्य व कृतकृत्य भाग्यवानाला होतें त्याची मोक्षाविषयीं इच्छा नसली तरी तो मुक्त होतो. ह्मणजे अग्नीवर न समजतां जरी पाय पडला तरी तो जसा दाह करितोच त्याप्रमाणें हें पूर्वोक्त आत्मज्ञान झालें कीं त्याचें मोक्ष हें फळ अवश्य मिळतेंच. ॥ २० ॥

श्रुतिस्थ ' अयं ' या पदाचा आणखी दुसरा अभिप्राय सांगतात–

**अयमित्यपरोक्षत्वमुच्यते चेत्तदुच्यताम् ।**
**स्वयंप्रकाशचैतन्यमपरोक्षं सदा यतः ॥ २१ ॥**

अन्वयः—यतः स्वयंप्रकाशचैतन्यं सदा अपरोक्षं ततः अयं इति अपरोक्षत्वं उच्यते चेत् तर्हि तत् उच्यताम् ( तदस्माकं इष्टमेव )

अर्थः—ज्या अर्थी अन्यसाधनावाचून भासणारें चैतन्य सर्वदा अपरोक्ष आहे, त्या अर्थी ' हा ' असें याचें अपरोक्षत्व जर तूं ह्मणत असशील तर ( खुशाल ) ह्मण. ( त्यांत आमची कांहीं हानि नाहीं. ) ॥ २१ ॥

विवरणः—' हा घट आहे ' इत्यादि व्यावहारिक प्रयोगांतील हा या शब्दानें निर्दिष्ट वस्तु अपरोक्ष असते. ह्मणजे हा हें ज्याचें विशेषण आहे, असा घटादि पदार्थ प्रत्यक्ष दिसत असतो; ही गोष्ट सर्व विचक्षणांस ठाऊक आहे, त्याचप्रमाणेंच 'अयमस्मीति पूरुषः ' वाक्यांतील अयं शब्दाचा अर्थही प्रत्यक्ष असावयास पाहिजे असें जर तूं ह्मणशील तर तें आह्मांस इष्टच आहे. कारण स्वयंप्रकाश चैतन्य सदा अपरोक्ष आहे असें आह्मी श्रुतीच्या अनुरोधानें मानीत असतो. पण ' अयं ' ह्या शब्दामुळें घटाप्रमाणें किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या एकाद्या पदार्थाप्रमाणें आत्मा ज्ञेय होईल, अशी आशा करणें व्यर्थ आहे. ॥ २१ ॥

शंकाः—' हा आत्मा ' असें ह्मटल्यास त्याच्या ठायीं परोक्षत्व हा धर्मही रहातो असें वाटतें. कारण जो पदार्थ पूर्वी अज्ञात असून पुढें इंद्रियसंबंधामुळें ज्ञात

होतो त्यालाच प्रत्यक्ष ज्ञानकाळीं 'हा' असें ह्मणत असतात; हें सर्वांस ठाऊक आहे. पण आत्मा स्वयंप्रकाश व अपरोक्ष आहे असें तुह्मी वेदान्तसिद्धांताचें प्रतिपादन करीत असतांना क्षणोक्षणीं सांगतां! तेव्हां एकाच आत्म्याच्या ठायीं परोक्षत्व व अपरोक्षत्व किंवा ज्ञान व अज्ञान हे परस्परविरोधी धर्म कसे रहातील? **समाधानः**—या शंकेचें समाधान करणें मुळींच कठीण नाहीं! कसें ह्मणाल? तर पहाः—

**परोक्षमपरोक्षं च ज्ञानमज्ञानमित्यदः ।**
**नित्यापरोक्षरूपेऽपि द्वयं स्याद्दशमे यथा ॥ २२ ॥**

**अन्वयः**—यथा दशमे परोक्षं च अपरोक्षं तथा ज्ञानं च अज्ञानं इति अदः द्वयं नित्यापरोक्षरूपे अपि स्यात् ।

**अर्थः**—आपणांस सोडून इतरांस मोजणाऱ्या व आपल्यांतील दहावा मनुष्य नाहीं असें ह्मणणाऱ्या पुरुषाच्या ठायीं जसें ज्ञान व अज्ञान हीं दोन्हीं राहतात, त्याप्रमाणें नित्य अपरोक्षरूप आत्म्याच्या ठायीं परोक्ष व अपरोक्ष ज्ञान आणि अज्ञान हीं दोन्हीं रहातात. ॥ २२ ॥

**विवरणः**—दहाव्या पुरुषाच्या ठायीं ज्ञान व अज्ञान कसें असतें व तो स्वतःला कसा विसरतो इत्यादि प्रकार पुढच्या पांच श्लोकांत स्पष्ट होणार असल्यामुळें त्याचा येथें विस्तार करीत नाहीं. ॥ २२ ॥

'दशमे यथा'—असें म्हणून मागच्या श्लोकांत दशम ( दहाव्या ) चा दृष्टांत दिला आहे. पण त्याचें विस्तारपूर्वक वर्णन केलें नाहीं. यास्तव आतां त्या पूर्वोक्त दृष्टांताचें स्पष्टीकरण करितात.

**नवसंख्याहृतज्ञानो दशमो विभ्रमात्तदा ।**
**न वेत्ति दशमोऽस्मीति वीक्षमाणोऽपिताभव ॥ २३ ॥**

**अन्वयः**—नवसंख्याहृतज्ञानः दशमः तान् नव वीक्ष्यमाणः अपिः अहं दशमः अस्मि, इति तदा विभ्रमात् न वेत्ति ।

**अर्थः—नऊ या संख्येनें ज्याचें ज्ञान हरण केलें आहे असा दहावा मनुष्य त्या नवांस पहात असूनही, मी दहावा आहें असें त्या वेळीं भ्रमामुळें जाणत नाहीं. ॥ २३ ॥**

विवरणः—या विषयीं अशी आख्यायिका आहे. एकदा पृथ्वी प्रदक्षिणेच्या उद्देशानें प्रथमतः भारतवर्षांतील सर्व तीर्थांचें सेवन करण्याकरितां निघालेल्या दहा ब्राह्मणांनीं एके दिवशीं सायंकाळीं एका मोठ्या नदीचें उल्लंघन केलें. त्या पाण्यानें तुडुंब भरलेल्या नदीवर पूल नसल्यामुळें त्या सर्वांना पोहत पलीकडे जावें लागलें. मोठ्या प्रयासानें सायंकाळीं पलीकडे पोंचल्यावर आपल्यांतील कोणी नदीमध्यें बुडून मेला तर नाहीं ? असा संशय आल्यामुळें त्यांतील एक सर्वांस मोजूं लागला. पण स्वतःला सोडून इतरांस• मोजणाऱ्या त्या बिचाऱ्याचें, मीच दहावा आहें, हें ज्ञान नष्ट झालें; व त्यामुळें तोच जरी स्वतः त्यांतील दहावा मनुष्य होता, व आपल्यापुढें असलेल्या इतर नऊ सोबत्यांस जरी तो प्रत्यक्ष पहात होता, तरी भ्रम पडल्यामुळें त्यास मीच दहावा आहें, असें ज्ञान झालें नाहीं. तात्पर्य, अशाप्रकारें त्याला स्वतःचें अपरोक्ष ज्ञान जरी होतें, तरी त्याचा भ्रमामुळें जसा कांहीं नाशच झाला होता व त्यामुळें त्याला स्वतःचें भान राहिलें नाहीं. ॥ २३ ॥

ह्या प्रमाणें दृष्टान्तभूत दशम पुरुषास स्वतःचें नित्य अपरोक्ष ज्ञान असतांनाच अज्ञानाचाही अनुभव कसा येतो तें दाखवून त्याचा पुढें परिणाम कसा होतो तें आतां श्री भारतीतीर्थ दाखवितातः—

**न भाति नास्ति दशम इति स्वं दशमं तदा ।**
**मत्वा वक्ति तदज्ञानकृतमावरणं विदुः ॥ २४ ॥**

अन्वयः—तदा दशमः स्वं दशमं संतं दशमः न भाति ( अतः ) नास्ति इति मत्वा ( तथा ) वक्ति । अस्य यत्कारणं तत् अज्ञानकृतं आवरणं इति बुधाः विदुः ।

**अर्थः—सर्वांची गणना करिते वेळीं दहावा स्वतःच दहावा असतांना दहावा भासत नाहीं; अर्थात् तो नाहींच, असें मानून तसें ( निःशंकपणें ) बोलून दाखवितो. ह्या चमत्कारिक व्यवहाराचें जें कारण तेंच आवरणसंज्ञक अज्ञानाचें कार्य होय, असें शहाणे लोक समजतात. ॥ २४ ॥**

**विवरणः**—तुह्मां सर्वांस मीं मोजलें, पण मला तुम्हीं नऊजणच दिसत आहां. दहाव्याची काय वाट झाली, कांहीं समजत नाहीं. असें जें वाटणें, त्याला अज्ञानावरण ( अज्ञान+आवरण ) असें ह्मणतात. या आवरणाचा एका अपरोक्ष ज्ञानानेंच नाश होत असतो. तसेंच दहावा तुमच्यामध्यें नाहीं, कारण तो जर येथें असता तर तुह्मांप्रमाणें दिसला असता—या आवरणास असदावरण ( असत्+आवरण ) ह्मणतात. याचा परोक्ष ( केवल शाब्दिक ) ज्ञानानें ही बाध होत असतो. परम पूज्य अच्युतराय मोडकांनीं श्री रामकृष्णांचें व्याख्यान बरोबर नाहीं असें ह्मणून या श्लोकाचें अन्य रीतीनें विवरण केलें आहे. श्री रामकृष्णांच्या व्याख्यानाप्रमाणेंच मीं या श्लोकाचा अन्वय लिहिलेला असल्यामुळें त्या, व प्रस्तुतसमयीं संक्षेपतः देत असलेल्या या व्याख्यानांत काय फरक आहे तो बहुश्रुत व सूक्ष्मबुद्धि वाचकांस समजून येईल. "**तदा**—आपल्याहून निराळ्या अशा नऊ पुरुषांची गणना करिते वेळीं. **स्वं दशमं**—मी दहांची गणना करण्यास प्रवृत्त झालो आहें असें; **मत्वा**—जाणूनही—दहावा नाहीं इत्यादि प्रकारें बोलतो. यालाच पंडित अज्ञानकृत आवरण असें समजतात." पूर्वोक्त व्याख्यानाहून प्रस्तुत व्याख्यान अधिक डौलदार असून पूर्वव्याख्यानांतील स्वं, दशमं, संतं, या तीन पदांचा अन्वय कोणच्या पदाशीं कसा लावावयाचा, हेंही बरोबर समजत नाहीं. असो; तात्पर्य अपरोक्षज्ञानकालींही अज्ञान कसें भासतें व आपलें आवरणरूपी कार्य कसें करितें, हें येथें उत्तम प्रकारें दाखविलें आहे. ॥ २४ ॥

अज्ञानाचें दुसरें कार्य विक्षेप हें आहे. यास्तव प्रस्तुत दृष्टान्तामध्यें तें कसें होतें तें आतां दाखवितातः—

**नद्यां ममार दशम इति शोचन्प्ररोदिति ॥**
**अज्ञानकृतविक्षेपं रोदनादिं विदुर्बुधाः ॥ २५ ॥**

**अन्वयः**—दशमः नद्यां ममार इति शोचन् सः प्ररोदिति । बुधाः इमं रोदनादिं अज्ञानकृतविक्षेपं विदुः ।

**अर्थः—दहावा नदींत बडून मेला असें ह्मणून खेद करणारा (तो दहावा) रडतो. ज्ञानी लोक या रोदनादिकाला अज्ञानकृतविक्षेप समजतात. ॥ २५ ॥**

**विवरणः**—अज्ञानाचें पहिलें कार्य आवरण ह्मणजे वस्तूस आच्छादित करणें व दुसरें कार्य विक्षेप ह्मणजे ज्या वस्तूचें खरें रूप अज्ञानाच्या आवरण नामक प्रथम कार्यामुळें आच्छादित झालेलें असतें, तिचें भलत्याच प्रकारें भान होणें, हें होय. मंद

मोजून दाखविलें असतां मीच दहावा आहें असें त्यास प्रत्यक्ष ज्ञान होतें. व त्याबरोबर त्याला मोठा चमत्कार वाटून तो हंसूं लागतो. आपल्यांतील दहाव्याचा साक्षात्कार झाल्यावर तो पूर्वीप्रमाणें रडत नाहीं, हें उघड आहे. ॥ २७ ॥

ह्याप्रमाणें दृष्टान्तभूत दशमाविषयीं कोणत्या सात अवस्था होतात तें सांगून त्या दार्ष्टांतिक आत्म्याच्या ठायींही योजाव्या असें आतां सांगतात:—

**अज्ञानावृतिविक्षेपद्विविधज्ञानतृप्तयः ॥**
**शोकापगम इत्येते योजनीयाश्चिदात्मनि ॥ २८ ॥**

**अन्वयः**—अज्ञानावृतिविक्षेपद्विविधज्ञानतृप्तयः च शोकापगमः इति एते ( अध्यस्ताः अवस्थाविशेषाः ) चिदात्मनि योजनीयाः ।

**अर्थः—अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्ष व अपरोक्ष ज्ञान, तृप्ति व शोकाचा नाश हे आरोपित अवस्थाविशेष चिदात्माच्या ठायीं योजावे. ॥ २८ ॥**

**विवरणः**—भ्रमाच्या उत्पत्तीपासून त्याच्या अंतापर्यंत एकंदर सात अवस्था होत असतात. त्या कोणत्या व कशा होतात हें गेल्या पांच श्लोकांत क्रमानें सांगितलें आहे व येथें त्यांचा क्रमानें नामनिर्देश करून आत्मविषयक भ्रमामध्येंही त्यांची योजना करावी; असें ह्मटलें आहे. ॥ २८ ॥

गेल्या श्लोकांत सांगितलेल्या सात अवस्थांची आत्म्याच्या ठिकाणीं योजना कशी करावयाची तें स्वतः ग्रंथकारच आतां क्रमानें पुढच्या चार श्लोकांत दाखवितात:—

**संसारासक्तचित्तः संश्चिदाभासः कदाचन ॥**
**स्वयंप्रकाशकूटस्थं स्वतत्त्वं नैव वेत्त्ययम् ॥ २९ ॥**

**अन्वयः**—अयं चिदाभासः संसारासक्तचित्तः सन्ः कदाचन स्वयंप्रकाशकूटस्थं स्वतत्त्वं नैव वेत्ति ।

**अर्थः—हा चैतन्याभास ( जीव ) ज्याचें मन विषयसंपादनामध्यें आसक्त झालें आहे असा होत्साता कधींही स्वयंप्रकाश व निर्विकार असें आपलें यथार्थ रूप जाणीत नाहीं. ॥ २९ ॥**

**विवरणः**—या श्लोकांत आत्मविषयक अज्ञान दाखविलें आहे. चिदाभास ह्मणजे जीव. द्रव्यादि इष्टविषय कसे प्राप्त होतील या विवंचनेंत जो जीव पडलेला असतो त्याला सत्संग, गुरूपदेश व शास्त्रश्रवण याचा लाभ होत नाहीं. कारण त्या विचाऱ्यास इष्टार्जनापुढें फुरसतच मिळत नाहीं; आणि त्यामुळें स्वयंज्योतिरूप व निर्विकार असें आपलें तत्त्व त्याला समजत नाहीं. हेंच अज्ञान होय. या अज्ञानामुळेंच पुढच्या सहा अवस्था होत असतात. योगशास्त्रामध्येंही अविद्या ही उत्तरक्लेशांची भूमि आहे असें ह्मटलें आहे. ॥ २९ ॥

आतां आत्म्याचे ठायीं दोन प्रकारचें अविद्याकार्य कसे होतें तें सांगतातः—

**न भाति नास्ति कूटस्थ इति वक्ति प्रसंगतः ॥**
**कर्ता भोक्ताऽहमस्मीति विक्षेपं प्रतिपद्यते ॥ ३० ॥**

**अन्वयः**—प्रसंगतः कूटस्थः न भाति नास्ति इति वक्ति तथा अहं कर्ता च भोक्ता अस्मि इति विक्षेपं प्रतिपद्यते ।

**अर्थः**—चिदात्म्याविषयीं बोलण्याचा प्रसंग आला असतां कूटस्थ भासत नाहीं व नाहीं असें तो बोलतो. व मी कर्ता आणि भोक्ता आहें अशा विक्षेपाप्रत प्राप्त होतो. ॥ ३० ॥

**विवरणः**—ज्याच्या जो विषय नसतो त्याविषयीं तो मूढ असतो. व कोणीं प्रश्न केला असतां तो त्याविषयीं भलतेंच कांहीं तरी उत्तर देतो हें सर्वांस ठाऊक आहे. जे लोक अगदीं पशुवृत्ति असतात त्यांना जर आत्म्याविषयीं कोणीं प्रश्न केला तर अनात्मा हाच त्यांचा नेहमींचा विषय असल्यामुळें ते अगदीं अयोग्य उत्तर देतात. व त्यांतील प्रत्येक अनात्म्यास आत्मा समजून मी कर्ता व भोक्ता ( ह्मणजे देहेंद्रियादि साधनांच्या योगानें होणारें हरएक कृत्य करणारा व त्यांचें बरें वाईट फल भोगणारा ) आहें असें मानतो. हाच विक्षेप होय. ॥ ३० ॥

पुढें कांहीं अकल्पित योगानें अशा प्राकृत लोकांतील ज्या कोणा एकाद्याचा शास्त्र व सत्पुरुष यांच्याशीं संबंध होतो, त्याला आत्म्याचें परोक्ष ज्ञान होतें, व तदनंतर विचाराच्या योगानें त्यास कूटस्थ आत्म्याचा साक्षात्कार होतो, असें आतां सांगतातः—

**अस्ति कूटस्थ इत्यादौ परोक्षं वेत्ति वार्तया ॥**
**पश्चात्कूटस्थ एवास्मीत्येवं वेत्ति विचारतः ॥ ३१ ॥**

अन्वयः—आदौ वार्तया ' कूटस्थः अस्ति ' इति परोक्षं वेत्ति पश्चात् विचारतः कूटस्थः एव अहं अस्मि इति एवं वेत्ति ।

**अर्थः—प्रथमतः दुसऱ्याच्या सांगण्यावरून ' कूटस्थ आहे ' असें परोक्ष ज्ञान होतें व नंतर विचाराच्या योगानें ' कूटस्थच मी आहें ' असें तो जाणतो. ॥ ३१ ॥**

**विवरणः—परोक्ष** ह्मणजे साक्षात्कारासहित ज्ञान. उदाहरणार्थ एकाद्या विश्वासास पात्र असलेल्या मनुष्यानें ' हल्लीं येथें एक महाविद्वान् यति आले आहेत. अमुक स्थळीं रहातात ' असें सांगितलें असतां त्यावरून ऐकणारास यतिविषयीं जें ज्ञान होतें तें परोक्ष ज्ञान होय. व त्यांस पाहण्याच्या इच्छेनें ते जेथें रहात असतील तेथें जाऊन त्याचें स्वनेत्रांनीं दर्शन घेतलें असतां जें ज्ञान होतें तें अपरोक्ष किंवा साक्षात् ज्ञान होय. परोक्षज्ञानावांचून अपरोक्ष ज्ञान होत नाहीं. यास्तव प्रथमतः परोक्ष ज्ञानाकरितां प्रयत्न करून तें संपादून घ्यावें ह्मणजे तात्काळ पुढें गति होऊन अपरोक्ष ज्ञानही थोड्याच अवकाशांत होतें. कूटस्थ ह्मणजे निर्विकार. सुख, दुःख, लोभ, मोह, तृष्णा इत्यादि सर्व वृत्ति विकार होत. पण त्या आत्म्याच्या नव्हेत. बुद्धीच्या आहेत. तस्मात् आत्मा कूटस्थ असून माझें यथार्थ स्वरूप तो निर्विकार आत्माच आहे असा प्रत्यय येणें हें अपरोक्ष ज्ञान होय; व तें श्रवणादिकांच्या योगानें होणाऱ्या परोक्ष ज्ञानानंतर होत असतें. ॥ ३१ ॥

आतां या श्लोकांत क्रमानें प्राप्त होणाऱ्या पुढच्या दोन अवस्था दाखवितातः—

**कर्ता भोक्तेत्येवमादि शोकजातं प्रमुंचति ॥**
**कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव तुष्यति ॥ ३२ ॥**

अन्वयः—( ततः ) कर्ता भोक्ता इत्येवमादि शोकजातं प्रमुंचति ( अनंतरं च ) कृत्यं कृतं, प्रापणीयं प्राप्तं एव, इति तुष्यति ।

अर्थः—( तदनंतर ) मी कर्ता आहें, भोक्ता आहें, इत्यादि प्रकारचा सर्व शोक तो सोडतो ( व त्या नंतर ) मी कर्तव्यकर्म केलें व प्राप्त करून घेण्यास योग्य असें सर्व प्राप्त करून घेतलेंच असें ह्मणून संतुष्ट होतो. ॥ ३२ ॥

विवरणः—या श्लोकांत शोकाचा नाश व अव्याहत तृप्ति ह्या दोन अवस्था दाखविल्या आहेत. पण ह्या अवस्था अपरोक्ष ज्ञानानंतर प्राप्त होत असतात. अर्थात् अपरोक्ष ज्ञान हें या उभयविध अवस्थांचें कारण आहे. कारण हें कार्याच्या पूर्वी असावें लागतें. यास्तव परोक्षज्ञानद्वारा अपरोक्ष ज्ञान झालें असतां, फलभूत अशा ह्या अवस्था आपोआप प्राप्त होतात. पूर्वोक्त विविध ज्ञानाप्रमाणें याच्या करितां विशेष प्रयास करावा लागत नाहीं. आतां मी कर्ता व भोक्ता आहें असें समजण्यांत शोक तो काय होणार? असें कोणी ह्मणतील; कारण 'हाय! हाय!' इत्यादि शब्द उच्चारून मोठमोठ्यानें हृदयादिकांवर प्रहार करणें व आक्रोश करणें ह्मणजे शोक होय, असें बहुतेकांस माहित आहे, पण तें त्याचें ह्मणणें युक्त नाहीं. कारण 'सर्वं दुःखं[1] विवेकिनां' या न्यायानें व सर्व प्राण्यांच्या अनुभवावरूनही कर्तृत्वादि भाव दुःखदायी आहेत असें स्पष्ट होतें. कारण जेथें जेथें कर्तृत्वादि भाव तेथें तेथें अशांतिरूपी दुःख, असे या उभयतांचें साहचर्य ( व्याप्ति ) सर्वत्र प्रत्ययास येतें. "व्याप तितका संताप" असें व्यावहारिक लोकही ह्मणत असतात. 'मी कर्ता' या एका भावाबरोबर तदनुषंगी सर्व दोष मनुष्यामध्यें येऊन उभे रहातात. आणि दोष हें दुःखाचें बीज आहे असें अनेक साधुसंतही आह्मांस आज आपल्या वाणीच्या द्वारा सांगून राहिले आहेत. तस्मात् कर्ता, भोक्ता इत्यादि भाव दुःखरूप आहेत असें ह्मणणें अयोग्य नव्हे.

शोकजात सुटल्यावर साधकास निरतिशय तृप्तीचा लाभ होतो. जोंपर्यंत कोणाला कांहीं कर्तव्य असतें, किंवा कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें असतें, तोंपर्यंत त्याचें मन तृप्त होणें शक्य नाहीं; पण ह्या साधकाचा कर्तृभाव व भोक्तृभाव नष्ट झाल्यामुळें

---

१ विवेकी असतात त्यांना सृष्टींतील यच्चयावत् सर्व भाव दुःखकारक वाटतात. शरीराच्या इतर भागावर काठीच्या सामान्य प्रहारानेंही जितकें दुःख होत नाहीं त्याच्या शतपट दुःखें नेत्रामध्यें बारीकसा लोंकरीचा तंतु फिरविल्यानें होतें. याचें कारण, एक भाग राकट व दुसरा नाजुक हेंच आहे. ह्याच न्याय अविवेकी व विवेकी यांच्या दुःखाविषयी समजावा.

त्याला कर्तव्य व प्रापणीय असें कांहीं रहातच नाहीं. कारण कर्ता असेपर्यंत कर्तव्य व भोक्ता असेपर्यंत भोग्य असणार हें उघडच आहे; व 'निमित्ताचा नाश झाला असतां नैमित्तिकाचाही नाश होतो' असा सामान्य नियम आहे; आणि त्याला अनुसरून कर्तृत्वादि निमित्तें नष्ट झाल्यावर कर्तव्यादिक न राहणें हेंच उचित होय. पुढें कर्तव्यादि जीं अतृप्तीचीं कारणें यांचाच समूळ नाश झाल्यामुळें कार्यरूप अतृप्तीचा नाश होतो हें निराळें सांगण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. तात्पर्य, माझें सर्व कर्तव्य मी करून सोडलें आहे व प्राप्त करून घेण्यासारखें जें होतें तें प्राप्त करून घेतलें आहे अशी दृढभावना झाल्यावर तृप्ति हा त्याचा स्वभावच होऊन रहातो. याविषयीं विद्यानंदाख्य चवदाव्या प्रकरणांतही बरेंच विवेचन होणार आहे. ॥ ३२ ॥

ह्याप्रमाणें ह्या अज्ञानादि सात अवस्था आत्म्याच्या ठायीं कशा असतात हें दाखवून व त्यांचाच पुनः उल्लेख करून त्या कूटस्थ आत्म्याच्या नसून चिदाभासाच्या आहेत, असें सांगतात:—

**अज्ञानमावृतिस्तद्वद्विक्षेपश्च परोक्षधीः ॥**
**अपरोक्षमतिः शोकमोक्षस्तृप्तिर्निरंकुशा ॥ ३३ ॥**
**सप्तावस्था इमाः संति चिदाभासस्य तास्विमौ ॥**
**बंधमोक्षौ स्थितौ तत्र तिस्रो बंधकृतः स्मृतः ॥ ३४ ॥**

**अन्वयः**—अज्ञानं, आवृतिः तद्वत् विक्षेपः परोक्षधीः च अपरोक्षमतिः शोकमोक्षः तथा निरंकुशा तृप्तिः इति इमाः सप्त अवस्थाः चिदाभासस्य सन्ति । तासु इमौ बंधमोक्षौ स्थितौ । तत्र तिस्रः बंधकृतः स्मृताः ।

**अर्थः—अज्ञान, आवरण, विक्षेप, परोक्षज्ञान, अपरोक्षज्ञान, शोकापासून सुटका व अव्याहत तृप्ति अशा ह्या सात अवस्था चिदाभासा ( जीवा ) च्या आहेत. त्यांमध्येंच बंध व मोक्ष स्थित आहेत. त्यांतील तीन बंध करणाऱ्या आहेत. असें शास्त्रकारांनीं ह्मटलें आहे. ॥ ३३, ३४ ॥**

**विवरणः**—ह्या सातही अवस्था खुद्द आत्म्याच्या नव्हेत. कारण विकारशून्य आत्म्याच्या ह्या अवस्था आहेत असें जर ह्मटलें, तर तोही विकारी आहे असें ह्मणावें लागेल. पण तें शास्त्र व अनुभव यांच्या विरुद्ध आहे. यास्तव त्या चिदाभासाच्या

आहेत असें ह्मणावें लागतें. या सात अवस्थांचाच बंध व मोक्ष होतो, ह्मणजे यांतील अज्ञान, आवरण व विक्षेप ह्या तीन अवस्था बंधरूप व त्यांच्या पुढील चार अवस्था मोक्षरूप आहेत. ॥ ३३, ३४ ॥

आतां ह्यांतील तीन अवस्था बंध करणाऱ्या कशा हें दाखविण्याकरितां क्रमानें त्यांतील प्रत्येकीचें कार्य दाखवून स्वरूपही सांगतात:—

**न जानामीत्युदासीनव्यवहारस्य कारणम् ॥**
**विचारप्रागभावेन युक्तमज्ञानमीरितम् ॥ ३५ ॥**

**अन्वयः**—विचारप्रागभावेन युक्तं न जानामि इति उदासीन व्यवहारस्य यत् कारणं तत् अज्ञानं इति ईरितम् ।

**अर्थ:—विचारप्रागभावासह मी जाणीत नाहीं असें उदासीन व्यवहाराचें जें कारण तेंच अज्ञान होय असें सांगितलें आहे. ॥ ३५ ॥**

**विवरणः**—विचाराचा प्रागभाव ह्मणजे विचारास सुरवात होण्याच्या पूर्वींची अवस्था. अर्थात् विचारास सुरवात करण्याच्या पूर्वीं मी जाणत नाहीं असा जो कोणीही सामान्य मनुष्य आपल्या स्वरूपाविषयीं उदासीन शब्दव्यवहार करीत असतो याचें कारण अज्ञान हेंच आहे. या श्लोकाच्या स्पष्टीकरणार्थ अच्युतरायांनीं आपल्या टीकेंत एक कारिका दिली आहे तिचा अर्थासह येथें निर्देश करणें प्रशस्त वाटतें.

**" मम देहो मम प्राणो मम चित्तं च धीर्मम ।**
**सुखं ममेति यो वेत्ति स कस्त्वमिह नोत्तरम् ॥**

**अर्थः—माझा देह, माझा प्राण, माझें चित्त, माझी बुद्धि व माझें सुख असें जो जाणतो त्याला जर ' तूं कोण बाबा ' असा प्रश्न केला तर उत्तर देतां येत नाहीं. "**

तात्पर्य, सर्व प्रत्ययांचा स्वप्रकाशरूप व एक असा जो आश्रय त्याचें सामान्यतः भान जरी असलें, तरी तें विशेषतः नसणें हेंच अज्ञानाचें लक्षण होय. यावरून अज्ञान ह्मणजे ज्ञानाचा–अभाव नसून अनादि, भावरूप व अपरोक्षज्ञानानें बोधित होणारा असा स्वरूपज्ञानाचा प्रतिबंध होय–हेंही सहज सिद्ध झालें. ॥ ३५ ॥

आवृतीचें स्वरूप व तिचें कार्य सांगण्याकरितां हा पुढील श्लोक प्रवृत्त झाला आहे:—

**अमार्गेण विचार्याथ नास्ति नो भाति चेत्यसौ ॥**
**विपरीतव्यवहृतिरावृतेः कार्यमिष्यते ॥ ३६ ॥**

अन्वयः—अमार्गेण विचार्य अथ नास्ति च न भाति इति असौ विपरीतव्यवहृतिः आवृतेः कार्यं इष्यते ।

**अर्थः—भलत्याच मार्गानें विचार करून नंतर आत्मा नाहीं व भासत नाहीं, अशा प्रकारचा जो हा विपरीत व्यवहार तेंच आवरणाचें कार्य मानलेलें आहे. ॥ ३६ ॥**

**विवरणः**—उपनिषदादि आत्मविचारांचीं उत्तम व शास्त्रीय साधनें सोडून व बौद्धचार्वाकादि केवल तार्किकांच्या तर्कांचा अवलंब करून जे शुष्क तर्क करितात त्यांस, अभाव, आवरण व असत्त्वावरण यांच्या योगानें देहेंद्रियांहून भिन्न कूटस्थ सच्चिदानंद लक्षण व स्वप्रकाश असा आत्मा नाहींच, कारण तो भासत नाहीं, असें ज्ञान होतें. व त्याप्रमाणें ते निःशंकपणें बोलून दाखवितात. पण यांतील, त्यांनें अभान व असत्य वाटणें हें दोन प्रकारचें आवरण असून तसा व्यवहार करणें हें त्याचें कार्य आहे. ॥ ३६ ॥

विक्षेपाचें लक्षण व कार्य सांगण्याकरितां आतां हा प्रस्तुत श्लोक प्रवृत्त झाला आहे-

**देहद्वयचिदाभासरूपो विक्षेप ईरितः ॥**
**कर्तृत्वाद्यखिलः शोकः संसाराख्योऽस्य बंधकः ॥ ३७ ॥**

**अन्वयः**—देहद्वयचिदाभासरूपः विक्षेपः ईरितः । तथा बंधकः संसाराख्यः कर्तृत्वाद्यखिलः शोकः अस्य कार्यं अस्ति ।

**अर्थः—स्थूल व सूक्ष्म या दोन देहांनीं युक्त असा जो चिदाभास तोच विक्षेप होय असें म्हटलें आहे. व बद्ध करणारा आणि संसार हें ज्याला नाव आहे असा कर्तृत्वादि सर्व शोकच या विक्षेपाचें कार्य आहे. ॥ ३७ ॥**

**विवरणः—हात, पाय इत्यादिकांनीं युक्त असा हा अन्नमय संज्ञक स्थूल देह व पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच प्राण, मन आणि बुद्धि यांच्या योगानें होणारा सूक्ष्म देह अशा या दोन देहांनीं युक्त असा जो चैतन्याचा आभास तोच अज्ञानाचें**

दुसरें विक्षेप नामक कार्य होय. आतां या विक्षेपाचें कार्य कोणतें तेंही सांगतों. जीवाच्या बंधास कारण होणारा असा जो संसारसंज्ञक सर्व प्रकारचा शोक तेंच या चिदाभासरूप विक्षेपाचें कार्य होय. ॥ ३७ ॥

**शंका:**—चिदाभासाच्या सात अवस्था आहेत असें जें तुह्मीं पूर्वीं ह्मटलेंत तें अयुक्त आहे, असें प्रस्तुत श्लोकावरून ह्मणावें लागतें. कारण चिदाभास ह्मणजे विक्षेप असें तुह्मींच आतां सांगत आहां व पूर्वीं चवतिसाव्या श्लोकांत विक्षेपाच्या कारणरूप अशा ज्या अज्ञान व आवरण या दोन अवस्था त्याही चिदाभासाच्याच आहेत असें तुह्मींच बोलून गेलां. तेव्हां आतां यांतील खरें कोणतें? कारण, चिदाभास हाच विक्षेप असें जर मानलें, तर अज्ञानादिकांनीं त्यांच्या अवस्था होणें अशक्य आहे. **समाधान**—

**अज्ञानमावृतिश्चैते विक्षपात् प्राक्प्रसिध्यतः ॥**
**यद्यप्यथाप्यवस्थे ते विक्षेपस्यैव नात्मनः ॥ ३८ ॥**

**अन्वय:**—यद्यपि अज्ञानं च आवृतिः एते विक्षेपात् प्राक् प्रसिध्यतः । अथापि ते विक्षेपस्य एव अवस्थे न आत्मनः ।

**अर्थ:**—जरी अज्ञान व आवृति या दोन अवस्था विक्षेपाच्या पूर्वींच स्थित आहेत तरी त्या विक्षेपाच्याच अवस्था होत; आत्म्याच्या नव्हेत. ॥ ३८ ॥

**विवरण:**—अज्ञानाचें कार्य दोन प्रकारचें आवरण व त्याचें कार्य विक्षेप होय. अथवा आवरण व विक्षेप हीं दोहीं कार्यें अज्ञानाचींच आहेत असा कांहीं स्थळीं उल्लेख मिळत असल्यामुळें तसें जरी मानलें तरी आवरणावांचून विक्षेपाची उत्पत्ति कधींच होत नसल्यामुळें अज्ञान व आवरण हीं दोन्हीं विक्षेपाच्या पूर्वीं असणें युक्त आहे, हें खरें; पण तेवढ्यावरूनच त्या आत्म्याच्या अवस्था आहेत असें ह्मणण्याचें धैर्य करितां कामा नये. कारण आत्मा असंग आहे असें शेंकडों श्रुति व युक्ति सिद्ध करीत आहेत. यास्तव त्या अवस्था विक्षेपाच्याच आहेत असें ह्मणावें लागतें. ॥ ३८ ॥

**शंका:**—'आत्मा असंग आहे' असें श्रुति प्रतिपादन करिते; हें खरें. पण श्रुतीनें काय हवें तें सांगावें व आह्मी तें अंधाप्रमाणें किंवा अप्रबुद्धाप्रमाणें ऐकावें यांत पुरुषार्थ तो कोणता? अहो, अज्ञान व आवरणकालीं विक्षेपाचा जर मुळीं पत्ताच नाहीं, तर त्या त्याच्या अवस्था कशा होतील?

**समाधानः**—हा विक्षेप जर आज नवीन उत्पन्न होणारा असता, तर ही तुमची शंका बरोबर झाली असती; पण—

**विक्षेपोत्पत्तितः पूर्वमपि विक्षेपसंस्कृतिः ॥**
**अस्त्येव तदवस्थात्वमविरुद्धं ततस्तयोः ॥ ३९ ॥**

**अन्वयः**—विक्षेपोत्पत्तितः पूर्वं अपि विक्षेपसंस्कृतिः अस्ति एव ततः तयोः तदवस्थात्त्वं अविरुद्धम् ।

**अर्थः**—विक्षेपाच्या उत्पत्तीच्या पूर्वीही विक्षेपाचा संस्कार आहेच तस्मात् त्या दोन अवस्था त्याच्या आहेत अ हीं. ॥ ३९ ॥

**विवरणः**—स्थूल व सूक्ष्म देहांनीं विक्षेप जरी अज्ञानादि- कांचें कार्य आहे, तरी तो व्यक्त होण्याप ीं नवीन उत्पन्न झाला आहे असें नाहीं. तर तो पूर्वीही संस्काररूपानें होताच. **शंकाः**—पण विक्षेपाप्रमाणें अज्ञान व आवरण हीं संस्काररूपानें नव्हतीं ह्मणून तरी कशावरून? **समाधानः**— तीं नव्हतीं असें आह्मी कोठें ह्मणत आहों. अज्ञानादिकही पूर्वीं होतींच. पण 'बीज व वृक्ष' या न्यायानें तीं प्रवाहरूपानें अनादि आहेत. व त्यामुळें त्यांच्यामध्यें परस्पर कार्यकारणभाव येऊं शकतो. असंग आत्म्याच्या ह्या सात अवस्था आहेत असें ह्मणणें अयुक्त आहे, हें तर आह्मीं पूर्वीं सांगून चुकलोंच आहों. तस्मात् अज्ञान व आवरण ह्या संस्कारभूत विक्षेपाच्या अवस्था होऊं शकतात. ॥ ३९ ॥

**शंकाः**—अहो, पण इतकी जी खटपट करितां त्यापेक्षां त्या ब्रह्माच्याच अवस्था आहेत, असें ह्मटलेंत तर? कारण त्या ब्रह्माच्या ठिकाणीं आरोपित असल्यामुळें तसें ह्मणतां येण्यासारखें आहे. **समाधानः**—छेः! असें ह्मटल्यास अतिप्रसंग होईल. कसा ह्मणशील तर पहाः—

**ब्रह्मण्यारोपितत्त्वेन ब्रह्मावस्थे इमे इति ॥**
**न शंकनीयं सर्वासां ब्रह्मण्येवाधिरोपणात् ॥ ४० ॥**

**अन्वयः**—ब्रह्मणि आरोपितत्त्वेन इमे ब्रह्मावस्थे इति न शंकनीयम् । कुतः ब्रह्मणि सर्वासां एव अधिरोपणात् ।

अर्थः—ब्रह्माच्या ठायीं आरोपित असल्यामुळ ह्या त्याच्या अवस्था आहेत अशी शंका करूं नये, कारण ब्रह्माच्या ठिकाणीं सर्वच अवस्थांचा अध्यारोप आहे. ॥ ४० ॥

विवरणः—अज्ञान व आवरण या दोन अवस्था ब्रह्माच्या ठायीं आरोपित आहेत. यास्तव 'त्या त्याच्याच आहेत' असें ह्मणण्यास काय हरकत आहे? असें जर तूं ह्मणशील तर आह्मी तुला उलट असें विचारूं कीं विक्षेपादि पुढील पांच अवस्थाही ब्रह्माच्याच ठायीं आरोपित आहेत. तेव्हां त्याही त्याच्याच अवस्था आहेत, असें तरी कां ह्मणूं नये? व असें झाल्यावर परोक्ष व अपरोक्ष ज्ञान, शोक व मोक्ष, तृप्ति इत्यादि सर्व भाव ब्रह्माचेच होणार व त्यामुळें जीवाकरितां एकही अवस्था रहाणार नाहीं. तसेंच हा सर्व प्रकार श्रुति व अनुभव यांच्या विरुद्ध आहे. ॥ ४० ॥

आतां विक्षेपाच्या उत्पत्तीनंतर ज्या अवस्था प्राप्त होतात, त्या जीव व ब्रह्म या दोघांच्या व त्या पूर्वीच्या ज्या दोन अवस्था आहेत त्या केवल ब्रह्माच्या असें जरी ह्मटलें तरी तें फार वेळ टिकत नाहीं. कसें ह्मणशील तर पहाः—

**संसार्यहं विबुद्धोऽहं निःशोकस्तुष्ट इत्यपि ॥**
**जीवगा उत्तरावस्था भांति न ब्रह्मगा यदि ॥ ४१ ॥**
**तर्ह्यज्ञोऽहं ब्रह्मसत्त्वभाने मद्दृष्टितो न हि ॥**
**इति पूर्वे अवस्थे च भासेते जीवगे खलु ॥ ४२ ॥**

अन्वयः—यद्यपि अहं संसारी, अहं विबुद्धः, अहं निःशोकः, अहं तुष्टः, इति उत्तरावस्थाः जीवगाः भांति न ब्रह्मगाः तर्हि अहं अज्ञः मद्दृष्टितः ब्रह्मसत्त्वभाने न हि इति पूर्वे अवस्थे खलु जीवगे भासेते ।

अर्थः—जरी मी संसारी, मी ज्ञानी, मी सुखी व मी तृप्त अशा ह्या पुढच्या अवस्था जीवाच्या ठायीं भासतात व ब्रह्माच्या ठिकाणीं भासत नाहींत, तरी मी अज्ञ आहें, माझ्या दृष्टीनें ब्रह्माचें सत्त्व व भान होत नाहीं, अशा पूर्वीच्या दोन अवस्थाही जीवाच्या ठिकाणीं भासतात. ॥ ४१, ४२ ॥

विवरणः—ह्यांतील पहिल्या श्लोकांत शंकेचा अनुवाद करून दुसऱ्यांत तिचें सदोषत्व दाखविलें आहे. संसारी–कर्तृत्वादि धर्मवान्. विबुद्धः–तत्त्वसाक्षात्कारवान्.

निःशोकः—परोक्ष ज्ञानानें होणाऱ्या शोकाच्या क्षयानें युक्त. तुष्टः—संतोषवान्; ह्या विक्षेपाच्या पुढील चार अवस्था जीवाच्या आहेत. कारण, याला स्वानुभव हेंच प्रबल प्रमाण आहे. व यथार्थ अनुभवापेक्षां दुसरें कोणतेंही प्रमाण प्रबल नसतें, असें तुह्मांसही मान्य आहे. तेव्हां सर्व अवस्था ब्रह्माच्या ठिकाणीं जरी आरोपित असल्या तरी ह्या पुढच्या अवस्था जीवाच्या आहेत, असें स्पष्ट दिसतें व त्यामुळें ह्या ब्रह्माच्या नव्हेत व 'पहिल्या दोन अवस्थाही जीवाच्या आहेत' असें मानण्यास कांहीं प्रबल प्रमाण नसल्यामुळें ह्या ब्रह्माच्या आहेत, असें जरी ह्मटलें तरी तें बरोबर नव्हे. कारण, 'मी अज्ञ आहें' 'ब्रह्म आहे व तें भासतें' असें निदान मला तरी वाटत नाहीं. असेंही जीव स्वानुभवानें सांगत असतो व त्यामुळें ह्या जीवगत अवस्था आहेत असेंही स्पष्ट होतें. तात्पर्य ब्रह्माच्या ठिकाणीं आरोपित असल्यामुळें पहिल्या दोन अवस्था त्याच्या आहेत व बाकीच्या जीवाच्या आहेत, हें ह्मणणें निष्फळ होय. ॥ ४१, ४२ ॥

शंकाः—मग असें जर आहे, तर तुमच्या सर्वज्ञात्ममुनीश्वरांनीं संक्षेपशारीरकांत ब्रह्म अज्ञानाचें आश्रयस्थान आहे असें कसें ह्मटलें आहे? समाधानः—तसें ह्मणण्यांत त्यांचा कोणता अभिप्राय होता हें न समजल्यामुळें तूं ही शंका करीत आहेस. पण आतां त्याचें उत्तर ऐक—

**अज्ञानस्याश्रयो ब्रह्मेत्यधिष्ठानतया जगुः ॥**
**जीवावस्थात्वमज्ञानाभिमानित्वादवादिषम् ॥ ४३ ॥**

**अन्वयः**—ते 'अज्ञानस्य आश्रयः ब्रह्म' इति अधिष्ठानतया जगुः (किंतु अहं अत्र) अज्ञानाभिमानित्वात् (अज्ञानस्य) जीवावस्थात्वं अवादिषम् ।

**अर्थः—पूर्वीच्या आचार्यांनीं 'अज्ञानाचा आश्रय ब्रह्म आहे' असें जें ह्मटलें आहे, तें ब्रह्म त्याचें अधिष्ठान असल्यामुळ ह्मटलें आहे. (पण मी येथें) जीव अज्ञानाचा अभिमान बाळगीत असल्यामुळें अज्ञान ही त्याची अवस्था आहे असें ह्मटलें आहें. ॥ ४३ ॥**

**विवरणः**—संक्षेपशारीरककार व इतरही आचार्य यांचें ह्मणणें मला अक्षरशः मान्य आहे. व त्यामुळें मी त्यांच्या विरुद्ध असें येथें कांहीं एक सांगितलेलें नाहीं. कारण अज्ञानाचा आश्रय ब्रह्म आहे, असें त्यांनीं ह्मटलें आहे. व अज्ञान ही जीवाची

अवस्था आहे, असें मीं ह्मटलें आहे. सर्व प्रपंचाचें अधिष्ठान ब्रह्म असल्यामुळें त्याचें ह्मणणें जसें युक्त आहे, तसेंच ब्रह्म विकारशून्य असल्यामुळें व मी अज्ञ आहें असा प्रत्येकाचा यथार्थ अनुभव असल्यामुळें 'मी कर्ता आहें' इत्यादिकांप्रमाणें अज्ञानादि सर्वही त्याच्याच अवस्था आहेत. असें जें माझें ह्मणणें आहे, तेंही युक्तच आहे; शिवाय चाळीसाव्या श्लोकाच्या चवथ्या चरणांत मी त्यांच्या ह्मणण्याचा अक्षरशः स्वीकार केला आहे, हें लक्षांत आणलें कीं त्यांच्या व माझ्या प्रतिपादनांत मुळींच विरोध नाहीं, असें सहज समजेल. ॥ ४३ ॥

असो; ह्याप्रमाणें बध उत्पन्न करणाऱ्या तीन अवस्था दाखवून आतां मोक्षास कारण होणाऱ्या पुढील दोन अवस्थांचें प्रतिपादन करितात—

**ज्ञानद्वयेन नष्टेऽस्मिन्नज्ञाने तत्कृतावृतिः ॥**
**न भाति नास्ति चेत्येषा द्विविधाऽपि विनश्यति ॥ ४४ ॥**

अन्वयः—ज्ञानद्वयेन अस्मिन् अज्ञाने नष्टे सति न भाति च न अस्ति इति एषा द्विविधा अपि तत्कृता आवृतिः विनश्यति।

अर्थः—दोन प्रकारच्या ज्ञानानें हें अज्ञान नष्ट झालें असतां 'भासत नाहीं.' व 'नाहीं' असें जें हें दोन प्रकारचें त्या अज्ञानानें केलेलें आवरण तें नष्ट होतें. ॥ ४४ ॥

विवरणः—परोक्ष व अपरोक्ष असें दोन प्रकारचें ज्ञान आहे आणि पहिल्या ज्ञानानें असत्त्वावरण व दुसऱ्या ज्ञानानें अभानावरण नष्ट होत असतें असें मीं पूर्वी सांगितलें आहे. व पुढल्या श्लोकांत स्वतः ग्रंथकार सांगणार आहेत. पण येथें अगोदर ज्ञानानें अज्ञानाचा नाश व नंतर आवरणरूपी त्यांच्या कार्याचा नाश अशी परंपरा मात्र सुचविली आहे. कारणाचा नाश झाला असतां कार्याचा नाश होणें ही न्यायसिद्ध गोष्ट होय. ॥ ४४ ॥

आतां कोणत्या ज्ञानानें कोणत्या आवरणाची निवृत्ति होते. तें सांगतात—

**परोक्षज्ञानतो नश्येदसत्त्वावृतिहेतुता ॥**
**अपरोक्षज्ञाननाश्या ह्यभानावृतिहेतुता ॥ ४५ ॥**

---

१ हें सर्व परमपूज्य भारतीतीर्थांचें ह्मणणें आहे. विवरणकाराचें [illegible]हे.

अन्वयः—परोक्षज्ञानतः असत्त्वावृतिहेतुता नश्येत् । हि अभानावृतिहेतुता अपरोक्षज्ञाननाश्या अस्ति ।

**अर्थः—परोक्षज्ञानाच्या योगानें असत्वावरणाच्या कारणाचा नाश होतो व अभानावरणाचें कारण अपरोक्ष ज्ञानाच्या योगानें नाश पावणारें आहे. ॥ ४५ ॥**

विवरणः—अनेक जन्मार्जित सुकृताच्या योगानें सुबुद्धि होऊन जेव्हां प्राणी योग्य गुरूंच्या द्वारा शास्त्रांचा अभ्यास करूं लागतो; तेव्हां त्याला प्रथम ' कूटस्थ आत्मा आहे ' असें ज्ञान होतें व त्याच्या योगानें तो नाहीं असें जें विचारापूर्वी वाटत असतें, त्याच्या कारणाचा नाश होतो व पुढें निश्चयानें अभ्यास चालवून श्रवणादिकांच्या योगानें जेव्हां आत्मसाक्षात्कार होतो, तेव्हां " भासत नाहीं " या अभानावरणाच्या कारणाचा बोध होतो. तेव्हां केवल कार्याचा नाश होणें हा अत्यंत नाश नव्हे. तर कोणत्याही वस्तूचा कारणासह जेव्हां नाश होतो, तेव्हां तिचा ' अत्यंत नाश ' झाला असें ह्मणतात. यास्तव केवल आवरणाचा नाश होतो असें न न सांगतां त्याच्या कारणाचा नाश होतो असें ह्मटलें आहे. व कारणाच्या नाशानंतर कार्यनाश ह्मणून कांहीं रहात नाहीं. ॥ ४५ ॥

आतां ज्ञानाचें पहिलें फल सांगतात—

**अभानावरणे नष्टे जीवत्वारोपसंक्षयात् ॥**
**कर्तृत्वाद्यखिलः शोकः संसाराख्यो निवर्तते ॥ ४६ ॥**

अन्वयः—अभानावरणे नष्टे जीवत्वारोपसंक्षयात् संसाराख्यः कर्तृत्वाद्यखिलः शोकः निवर्तते ।

**अर्थः—अभानावरण नष्ट झालें असतां जीवत्वरूप आरोपाचाही क्षय होत असल्यामुळें संसारनामक कर्तृत्वादिरूप सर्व शोक निवृत्त होतो. ॥ ४६ ॥**

विवरणः—ज्ञानाच्या योगानें अज्ञानाचा बाध झाला असतां त्याच्या कार्याचा नाश होतो. त्याच्या अभानावरणरूप कार्याचा नाश झाला असतां मिथ्या प्रतीत होणारा जविभाव जातो व त्याची निवृत्ति झाल्यामुळें सर्व शोक नाहींसा होतो. असें याचें तात्पर्य समजावें. ॥ ४६ ॥

आतां याच्या पुढील अवस्था सांगतातः—

**निवृत्ते सर्वसंसारे नित्यमुक्तत्वभासनात् ॥**
**निरंकुशा भवेत्तृप्तिः पुनः शोकासमुद्भवात् ॥ ४७ ॥**

अन्वयः—सर्वसंसारे निवृत्ते सति नित्यमुक्तत्वभासनात् च पुनः शोकासमुद्भवात् निरंकुशा तृप्तिः भवेत् ।

अर्थः—सर्व संसाराची निवृत्ति झाली असतां नित्यमुक्तत्वाची प्रतीति येत असल्यामुळें व पुनरपि शोकाची उत्पत्ति होत नसल्यामुळें अव्याहत तृप्ति होते. ॥ ४७ ॥

विवरणः—पूर्वोक्त शोकाची निवृत्ति होतांच भाग्यवान् साधकास तात्काल नित्यमुक्तीचा लाभ होतो, व कारणासह शोकाची निवृत्ति झालेली असल्यामुळें त्यास तृप्ति प्राप्त होते. विषयांच्या भोगांपासून होणाऱ्या तृप्तीप्रमाणें ही तृप्ति इंद्रियजन्य नसल्यामुळें तिला पुनः कधींही व कोणींही प्रतिबंध करीत नाहीं. ॥ ४७ ॥

'आत्मानं चेत् विजानीयात्' इत्यादि श्रुतीचा अर्थ करण्याकरितां हें प्रकरण प्रवृत्त झालें आहे; पण मध्यें प्रसंगोपात्त शंकेचें निरसन करण्याकरितां ग्रंथकारांनीं थोडें विषयांतर केलें होतें. पण प्रकृत श्रुत्यर्थास उपयुक्त असें शंकानिरसन होतांच ते आतां पुनः पूर्वविषयाकडे वळतात—

**अपरोक्षज्ञानशोकनिवृत्त्याख्ये उभे इमे ॥**
**अवस्थे जीवगे ब्रूत आत्मानं चेदिति श्रुतिः ॥ ४८ ॥**

अन्वयः—'आत्मानं चेत्' इति श्रुतिः इमे अपरोक्षज्ञानशोकनिवृत्त्याख्ये उभे अवस्थे जीवगे ब्रूते ।

अर्थः—'आत्मानं चेत्' ही ( या प्रकरणाच्या प्रथम श्लोकांत प्रतिपादनार्थ घेतलेली ) श्रुति ह्या अपरोक्षज्ञान व शोकनिवृत्ति नामक दोन्ही अवस्था जीवाच्या आहेत असें सांगते. ॥ ४८ ॥

विवरणः—पूर्वोक्त सात अवस्थांतील पांचवी व सहावी अवस्था जीवगत आहे, हें या श्रुतीनें 'अयमस्मीति' व 'शरीरमनुसंज्वरेत्' या दोन वाक्यांनीं सांगितलें

आहे. अर्थात् हा मंत्र या दोन अवस्थांचें प्रतिपादन करण्याकरितांच प्रवृत्त झाला आहे. ॥ ४८ ॥

'अयं' या श्रुतिस्थ पदावरून त्याचें केवल अपरोक्ष ज्ञान मात्र होत असतें असें कोणास वाटेल म्हणून त्याचें आतां निरसन करितात--

**अयमित्यपरोक्षत्वमुक्तं तद्द्विविधं भवेत् ॥**
**विषयस्वप्रकाशत्वाद्धियाऽप्येवं तदीक्षणात् ॥ ४९ ॥**

अन्वय:--अयं इति यत् अपरोक्षत्वं उक्तं तत् विषयस्वप्रकाशत्वात् च धिया अपि एवं तदीक्षणात् द्विविधं भवेत्।

अर्थ:--'हा' असें जें अपरोक्षत्व सांगितलेलें आहे तें, चिद्रूपविषय स्वप्रकाश असल्यामुळें व बुद्धीच्या योगानें त्याचें स्वप्रकाशरूपानें ज्ञान होत असल्यामुळें दोन प्रकारचें आहे. ॥ ४९ ॥

विवरण:--'हा' या अपरोक्ष ज्ञानाचा विषय चिद्रूप आत्मा असल्यामुळें व तो स्वप्रकाश म्हणजे आपल्या व्यवहाराकरितां अन्य साधनांची अपेक्षा न ठेवणारा असल्यामुळें आणि बुद्धीही त्याचें स्वप्रकाशरूपानें ग्रहण करीत असल्यामुळें हें अपरोक्षत्व दोन प्रकारचें आहे. ॥ ४९ ॥

अपरोक्ष ज्ञानच जर दोन प्रकारचें आहे, तर परोक्ष ज्ञानाची वाट काय? कीं परोक्षज्ञान तुम्ही मानीतच नाहीं? असें कोणी विचारील म्हणून ग्रंथकार म्हणतात:-

**परोक्षज्ञानकालेऽपि विषयस्वप्रकाशता ॥**
**समा ब्रह्म स्वप्रकाशमस्तीत्येवं विबोधनात् ॥ ५० ॥**

अन्वय:--ब्रह्म स्वप्रकाशं अस्ति इति एवं विबोधनात् परोक्षज्ञानकाले अपि विषयस्वप्रकाशता समा अस्ति।

अर्थ:--ब्रह्म स्वप्रकाश आहे, असें ज्ञान होत असल्यामुळें परोक्षज्ञानसमयींही विषयाची स्वप्रकाशता सारखीच आहे. ॥ ५० ॥

विवरण:--स्वप्रकाशता हा जो ब्रह्माचा स्वरूपभूत धर्म आहे, तो नित्य असल्यामुळें कोणत्याही अवस्थेमध्यें त्याचा लोप होत नाहीं. व त्यामुळें तें नित्य अपरोक्षच आहे. पण--प्रतिबंधामुळें तसें भान न होतां जीवास 'ब्रह्म आहे' असें गुरु व

शास्त्र यांच्या द्वारा समजणें हें परोक्ष ज्ञान व त्याचा साक्षात्कार होणें हें अपरोक्ष ज्ञान होय–असें व्यवहारांत ह्मणण्याचा परिपाठ आहे," असा या श्लोकाचा भावार्थ दिसतो. ॥ ५० ॥

शंकाः—पण तें जर नित्य अपरोक्षच आहे तर त्याचें परोक्ष ज्ञान होतें, असें शास्त्रानें कसें ह्मटलें ?

समाधानः—हा शास्त्रीय उल्लेख जीवाच्या दृष्टीनें आहे. कसा ह्मणशील तर पहाः–

**अहं ब्रह्मेत्यनुल्लिख्य ब्रह्मास्तीत्येवमुल्लिखेत् ॥**
**परोक्षज्ञानमेतन्न भ्रांतं बाधानिरूपणात् ॥ ५१ ॥**

अन्वयः—' अहं ब्रह्म ' इति अनुल्लिख्य परोक्षज्ञानं ' ब्रह्म अस्ति ' इति एवं समुल्लिखेत् । एतत् बाधानिरूपणात् न भ्रांतम् ।

**अर्थः—परोक्ष ज्ञान ' मी ब्रह्म आहें ' असा उत्तम प्रत्यय न करितां ' ब्रह्म आहे ' एवढाच काय तो बोध करितें. व हा बोध भ्रामक नव्हे. कारण याचा बाध होत असल्याचें कोठें दिसत नाहीं. ॥ ५१ ॥**

विवरणः—परोक्ष ज्ञानानें ' मी ब्रह्म आहें ' असा बोध होत नाहीं, हें जरी खरें आहे, तरी ' ब्रह्म आहे ' असा बोध होतोच. व हें जें ज्ञान आहे, तें भ्रामक आहे असेंही ह्मणतां येणार नाहीं. कारण हें भ्रामक आहे असें जर कोणी ह्मणूं लागला, तर त्याला आह्मी असें विचारूं कीं तूं याला भ्रामक कां ह्मणतोस? त्याचा बाध होत असतो ह्मणून, कीं त्याचा प्रत्यय येत नाहीं ह्मणून, कीं साक्षात् ज्ञानास योग्य असलेल्या वस्तूचें परोक्ष ज्ञान झालें ह्मणून, कीं त्याच्या कांहीं भागाचें ग्रहण होत नाहीं ह्मणून ? यांतील प्रथम पक्ष तर संभवतच नाहीं कारण ' ब्रह्म आहे ' या ज्ञानाचा, दीर्घ काल विचार केल्यानंतरही बाध होत असल्याचें कोणाच्या प्रत्ययास येत नाहीं. अर्थात् बाध होत असल्यामुळें हें ज्ञान भ्रामक आहे, असें कोणासही ह्मणतां येणार नाहीं. ॥ ५१ ॥

कारणः–

**ब्रह्मनास्तीति मानं चेत् स्याद्बाध्येत तदा ध्रुवम् ॥**
**न चैवं प्रबलं मानं पश्यामोऽतो न बाध्यते ॥ ५२ ॥**

**अन्वयः**—' ब्रह्म नास्ति ' इति मानं स्यात् चेत् तदा ध्रुवं बाध्येत । च एवं प्रबलं मानं न पश्यामः अतः न बाध्यते ।

**अर्थः**—' ब्रह्म नाहीं ' असें जर कांहीं प्रमाण असेल तर त्याचा खचित बाध होईल. पण अशा प्रकारचें प्रबल प्रमाण आह्मांस दिसत नाहीं. यास्तव त्याचा बाध होत नाहीं. ॥ ५२ ॥

**विवरणः**—एकावन्नाव्या श्लोकाच्या विवरणांतच ह्या श्लोकांचें तात्पर्य येऊन गेलें आहे. ॥ ५२ ॥

पूर्वोक्त चार पक्षांतील दुसऱ्या पक्षाचें निरसन करितातः—

**व्यक्त्यनुल्लेखमात्रेण भ्रमत्वे स्वर्गधीरपि ॥**
**भ्रांतिः स्याद्व्यक्त्यनुल्लेखात्सामान्योल्लेखदर्शनात् ॥ ५३ ॥**

**अन्वयः**—व्यक्त्यनुल्लेखमात्रेण भ्रमत्वे स्वर्गधीः अपि व्यक्त्यनुल्लेखात् सामान्योल्लेखदर्शनात् भ्रांतिः स्यात् ।

**अर्थः**—पदार्थाचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं एवढ्याचवरून जर परोक्षज्ञानाला भ्रम ह्मणत असाल तर स्वर्गबुद्धिसुद्धां व्यक्तीचा उल्लेख होत नसल्यामुळें व सामान्य उल्लेखाचा प्रत्यय येत असल्यामुळें भ्रम होऊं लागेल. ॥ ५३ ॥

**विवरणः**—प्रत्यक्ष प्रत्यय येत नसल्यामुळें परोक्ष ज्ञान भ्रम आहे असें जर ह्मटलें तर ' स्वर्ग आहे ' हें ज्ञानही भ्रम आहे असें ह्मणावें लागेल. कारण स्वर्गाचेंही ज्ञान होत नसतें व वेदवाक्यांवरून त्याचें सामान्य ज्ञान मात्र झाल्याचें दिसतें. परंतु स्वर्गज्ञानास भ्रम ह्मणणें ह्मणजे वेदांचें प्रामाण्यच नाकारण्यासारखें असल्यामुळें परोक्षज्ञान भ्रम आहे, असें ह्मणणें ह्मणजे साहस करणेंच होय. ॥ ५३ ॥

आतां तृतीय पक्षाचें निराकरण करितातः—

**अपरोक्षत्वयोग्यस्य न परो मतिर्भ्रमः ॥**
**परोक्षमित्यनुल्लेखादर्थात्पारोक्ष्यसंभवात् ॥ ५४ ॥**

**अन्वयः**—अपरोक्षत्वयोग्यस्य परोक्षमतिः भ्रमः न कुतः ब्रह्म परोक्षं इति अनुल्लेखात् अर्थात् पारोक्ष्यसंभवात् ।

**अर्थ—साक्षात् ज्ञानास योग्य असलेल्या पदार्थाचें परोक्षज्ञान होणें हा भ्रम नव्हे. कारण ब्रह्म परोक्ष आहे असा प्रत्यय कधींच येत नाहीं. व हें ब्रह्म असा साक्षात्कार होत नसल्यामुळें अर्थात् त्याची परोक्षता संभवते. ॥ ५४ ॥**

**विवरण:**—अपरोक्षज्ञानास योग्य असलेल्या वस्तूचें परोक्ष ज्ञान झाल्यामुळें तो भ्रम आहे असें जर ह्मणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारण परोक्ष ज्ञान अपरोक्ष ज्ञानाचें कारण आहे असें आह्मीं पूर्वींच सांगितलें आहे. शिवाय स्वर्गाप्रमाणें ब्रह्म परोक्ष आहे; त्याचा इहलोकीं साक्षात्कार होण्यासारखा नाहीं. असें जर परोक्ष ज्ञानामुळें वाटलें असतें तर ती विपरीत भावना असल्यामुळें 'तो भ्रम आहे' असें आह्मीं कबूल केलें असतें. पण 'ब्रह्म आहे' असें जें प्रथम केवल शाब्दिक ज्ञान होत असतें, त्यांत आत्माच ब्रह्म आहे असा साक्षात्कार होत नसल्यामुळें व तशा प्रकारच्या साक्षात्काराची ब्रह्मामध्यें योग्यता असल्यामुळें अर्थात् तें ज्ञान परोक्ष आहे व त्याचें पुढें अपरोक्ष ज्ञानामध्यें पर्यवसान होणारें असल्यामुळें तो भ्रमही नव्हे ही गोष्ट सिद्ध होते. ॥ ५४ ॥

शेवटच्या पक्षाचें निराकरण करण्याकरितां ग्रंथकार ह्मणतातः—

**अंशागृहीतेर्भ्रांतिश्चेद् घटज्ञानं भ्रमो भवेत् ॥**
**निरंशास्यापि सांशत्वं व्यावर्त्यांशविभेदतः ॥ ५५ ॥**

**अन्वय:**—अंशागृहीतेः भ्रांतिः इति चेत् घटज्ञानं अपि भ्रमः भवेत् । व्यावर्त्यांशविभेदतः निरंशस्य अपि सांशत्वं भवेत् ।

**अर्थ:—कांहीं अंशांचें ग्रहण होत नसल्यामुळें परोक्षज्ञान भ्रम आहे असें जर ह्मटलें तर घटज्ञानही भ्रम होईल. व्यावर्त्य जी उपाधि तिच्या अंशामुळें स्वरूपांत भेद पडत असल्यामुळें निरंश ब्रह्माचे ठायींही अंशयुक्तता येते. ॥५५॥**

**विवरण:**—आतां ब्रह्म आहे या शाब्दिक ज्ञानांत ब्रह्माच्या अंशाचें जरी ग्रहण होत असलें, तरी त्यांत प्रत्यगात्म्याच्या अंशाचें ग्रहण होत नाहीं. ह्मणून तो भ्रम आहे असें जर ह्मटलें तर ज्या वेळीं आपण एकादा घट पहातों, किंवा असाच दुसरा एकादा पदार्थ पहातों, त्या वेळीं त्याच्या एका बाजूचेंच किंवा बाहेरच्या भागाचेंच प्रत्यक्ष ज्ञान होतें, तेव्हां अंशाचें ग्रहण न होणें हें कारण अशा ज्ञानामध्येंही असल्यामुळें

तोही भ्रम होय असें ह्मणावें लागेल. यास्तव कांहीं अंशाचें ग्रहण होत नाहीं ह्मणून तें ज्ञान भ्रम आहे हें ह्मणणें अयुक्तिक होय.

**शंकाः**—अहो पण घटादि पदार्थ सावयव असल्यामुळें त्यांच्या कांहीं अंशाचें ग्रहण होणें व कांहींचें न होणें ही गोष्ट संभवते. परंतु तुमचें ब्रह्म तर निरवयव आहे, तेव्हां त्याच्या अंशाचें अग्रहण होणें शक्य नाहीं.

**समाधानः**—परमार्थतः ब्रह्म निरंश आहे हें खरें पण ज्यांचा निषेध कर्तव्य आहे, अशा उपाधींच्या अंशामुळें त्याच्या ठायीं प्रातिभासिक सांशत्वही येतें. ॥५५॥

पूर्वश्लोकांत सुचविलेले दोन व्यावर्त्य अंश कोणते ते आतां सांगतातः—

**असत्त्वांशो निवर्तेत परोक्षज्ञानतस्तथा ॥**
**अभानांशनिवृत्तिः स्यादपरोक्षधिया कृता ॥ ५६ ॥**

**अन्वयः**—परोक्षज्ञानतः असत्त्वांशः निवर्तेत तथा अभानांशनिवृत्तिः अपरोक्षधिया कृता स्यात् ।

**अर्थः**—परोक्षज्ञानाच्या योगानें असत्त्वांशाची निवृत्ति होते व त्याचप्रमाणें अभानांशाची निवृत्ति अपरोक्ष ज्ञानाच्या योगानें होते. ॥ ५६ ॥

**विवरणः**—ह्या श्लोकाचें विस्तृत तात्पर्य पूर्वींच येऊन गेलें आहे. ॥ ५६ ॥

आतां हीच गोष्ट पूर्वोक्त दृष्टान्ताच्या योगानें दृढ करितातः—

**दशमोऽस्तीति विभ्रांतं परोक्षज्ञानमीक्ष्यते ॥**
**ब्रह्मास्तीत्यपि तद्वत्स्यादज्ञानावरणं समम् ॥ ५७ ॥**

**अन्वयः**—यथा 'दशमः अस्ति' इति परोक्षज्ञानं विभ्रान्तं ईक्ष्यते तद्वत् ब्रह्म अस्ति इति अपि स्यात् । अज्ञानावरणं तु समम् ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें 'दहावा आहे' हें परोक्षज्ञान भ्रांतिरहित आहे असें समजतात, त्याचप्रमाणें ब्रह्म आहे हेंही ज्ञान भ्रमशून्य होय. कारण अज्ञानकृत आवरण दोन्हीं ठिकाणीं सारखेंच असतें. ॥ ५७ ॥

**विवरणः**—'दहावा आहे' या आप्तानें उच्चारलेल्या वाक्यावरून होणारें परोक्षज्ञान भ्रम आहे, असें कोणीही समजत नाहीं. हेंचसें काय, पण एकाद्याची जर कांहीं वस्तु सांडली असली व तो अति कष्टी होऊन तिच्याकरितां सर्व घर धुंडकीत

असला आणि इतक्यांत कोणी विश्वासास पात्र असलेल्या मनुष्यानें तुमची ती वस्तु आहे, असें सांगितलें, तर त्याच्यावरून होणारें वस्तूच्या अस्तित्वाविषयींचें ज्ञान भ्रम आहे असें तो मुळींच समजत नाहीं. तर उलट मोठ्या उत्कंठेनें 'कोठें आहे?' असें विचारितो. ब्रह्म आहे, या ज्ञानाचाही असाच प्रकार आहे. कारण अज्ञानामुळें पडलेलें असत्त्वावरण दोन्हीं ठिकाणीं सारखेंच असून त्याची निवृत्ति करणें एवढेंच परोक्षज्ञानाचें काम असतें. ॥ ५७ ॥

असो; वाक्यावरून जसें परोक्षज्ञान होतें, तसेंच विचार केल्यानें अपरोक्षज्ञानही होतें, असें आतां दृष्टांत देऊन सांगतातः—

**आत्मा ब्रह्मेति वाक्यार्थे निःशेषेण विचारिते ॥**
**व्यक्तिरुल्लिख्यते यद्वत् दशमस्त्वमसीत्यतः ॥ ५८ ॥**

अन्वयः—यद्वत् दशमः त्वं असि इति अतः तद्वत् आत्मा ब्रह्म इति वाक्यार्थे निःशेषेण विचारिते सति व्यक्तिः उल्लिख्यते ।

अर्थः—ज्याप्रमाणें तूं दहावा आहेस या वाक्यावरून दहाव्या पुरुषाचा साक्षात्कार होतो; त्याप्रमाणें 'आत्मा ब्रह्म' या वाक्यांतल्या अर्थाचा पूर्णपणें विचार केला असतां त्याचा साक्षात्कार होतो. ॥ ५८ ॥

विवरणः—तूं दहावा आहेस या वाक्यावरून आपल्या दशमत्वाचा जसा दहाव्याकरितां रडणाऱ्यास प्रत्यक्ष बोध होतो, त्याप्रमाणेंच गुरूंच्या मुखानें व शास्त्रद्वारा 'हा आत्मा ब्रह्म आहे' असें वाक्य ऐकून त्याच्या मुख्य अर्थाचा युक्तिप्रयुक्तीनें विचार केल्यावर 'मीच ब्रह्म आहें' असें साधकास साक्षात् ज्ञान होतें. ह्मणजे प्रथम श्रवणद्वारा परोक्ष ज्ञान, नंतर मननानें निश्चय व निदिध्यासनानें साक्षात्कार हा वेदसिद्धान्त आबाधित ठरला. ॥ ५८ ॥

विचार व वाक्य यांच्या योगानें अपरोक्ष ज्ञान कसें होतें, तें आतां दाखवितातः—

**दशमः क इति प्रश्ने त्वमेवेति निराकृते ॥**
**गणयित्वा स्वेन सह स्वमेव दशमं स्मरेत् ॥ ५९ ॥**

अन्वयः—दशमः कः? इति प्रश्ने, त्वं एव इति निराकृते सति, स्वेन सह गणयित्वा स्वं एव दशमं स्मरेत् ।

**अर्थः**—दहावा कोण ? असा प्रश्न केला असतां व तूंच असें उत्तर मिळालें असतां आपल्यासह मोजून मीच दहावा असें त्यास स्मरण होतें. ॥ ५९ ॥

**विवरणः**—कोणीं करुणेनें ' तुमच्यांतील दहावा आहे. उगीच शोक करूं नको ' असें सांगितलें असतां ' कोठें आहे ? ' असा सहजच तो प्रश्न करितो व या प्रश्नाचें यथार्थ उत्तर देण्यास्तव ' तूंच दहावा आहेस ' असें तो कारुणिक ह्मणतो. हें त्याचें उत्तर ऐकून आश्चर्यचकित झालेला तो भ्रमिष्ट आपल्यासह इतरांस मोजतो. व शेवटीं ' अरे, दहावा तर मीच आहें ' असें हंसत हंसत ह्मणतो. ह्मणजे त्याला आपल्या दहावेपणाचें जें विस्मरण झालें होतें, तें नाहींसें होतें. ॥ ५९ ॥

' मीं दहावा आहें ' हें ज्ञानही भ्रम आहे, असें जर ह्मणावें, तर तेंही जुळत नाहीं असें आतां सांगतातः—

**दशमोऽस्मीति वाक्योत्था न धीरस्य विहन्यते ॥**
**आदिमध्यावसानेषु न नवत्त्वस्य संशयः ॥ ६० ॥**

**अन्वयः**—यतः नवत्त्वस्य आदिमध्यवसानेषु न संशयः, ततः अस्य दशमः अस्मि इति वाक्योत्था धीः न विहन्यते ।

**अर्थः**—ज्या अर्थी गणनेच्या आरंभीं, मध्यें व अंतीं नववेपणाचा संशय येत नाहीं, त्या अर्थीं याची मी दहावा आहें ही वाक्यजन्य बुद्धि कधींही बाधित होत नाहीं. ॥ ६० ॥

**विवरणः**—ज्याला पूर्वोक्त वाक्यापासून आपल्या दहावेपणाविषयीं निःसंशय ज्ञान झालें आहे, त्यास इतरांची गणना करीत असतां मी नववा आहें असा कधींच संशय येत नाहीं. व त्यामुळें वाक्यश्रवणानें होणारें ज्ञान केव्हांही मिथ्या ठरत नाहीं, तेव्हां तो भ्रम आहे, असें कसें ह्मणतां येईल ? ॥ ६० ॥

सर्व प्रकाराची दार्ष्टांतिकाचे ठायीं योजना करितातः—

**सदेवेत्यादिवाक्येन ब्रह्मसत्त्वं परोक्षतः ॥**
**गृहीत्वा तत्त्वमस्यादिवाक्याद्व्यक्तिं समुल्लिखेत् ॥ ६१ ॥**

**अन्वयः**—'सत् एव सोम्य' इत्यादिवाक्येन परोक्षतः ब्रह्मसत्त्वं गृहीत्वा, 'तत्त्वमसि' आदि वाक्यात् व्यक्तिं समुल्लिखेत् ।

**अर्थः—'सत् मात्र पूर्वी होतें' इत्यादि वाक्याच्या योगानें परोक्षपणें ब्रह्माचें सत्त्व जाणून, तत्त्वमसि ( ह्म. तें तूं आहेस ) यावरून साक्षात्कार करून घ्यावा. ॥ ६१ ॥**

**विवरणः**—'सदेव सोम्य' इत्यादि उद्दालक नामक पित्याच्या वाक्यावरून जगाचें कारण ब्रह्म आहे, अशी प्रथमतः श्वेतकेतूची परोक्ष भावना झाली. पुढें तें ब्रह्मच जीवरूपानें या जड पदार्थांत प्रविष्ट झालें आहे, असें युक्तीप्रयुक्तींच्या द्वारा त्यानें ठरविलें शेवटीं तें तूं आहेस या महा वाक्यावरून त्यास ब्रह्मसाक्षात्कार झाला असें छांन्दोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायांत सांगितलेलें आहे. तात्पर्य, श्वेतकेतूप्रमाणेंच आधुनिक साधकानेंही ज्ञान करून घ्यावें. ॥ ६१ ॥

आतां या सर्व विचाराचें फल सांगून आपल्या सिद्धांताचा उपसंहार करितात—

**आदिमध्यावसानेषु स्वस्य ब्रह्मत्वधीरियम् ॥**
**नैव व्यभिचरेत्तस्मादापरोक्ष्यं प्रतिष्ठितम् ॥ ६२ ॥**

**अन्वयः**—यस्मात् आदिमध्यावसानेषु इयं स्वस्य ब्रह्मत्वधीः न व्यभिचरेत् एव तस्मात् अस्याः आपरोक्ष्यम् प्रतिष्ठितम् ।

**अर्थः—ज्या अर्थी आदि, मध्य व अंत या अवस्थांमध्यें ' मी ब्रह्म आहें ' अशी बुद्धि व्यभिचरित होतच नाहीं, त्या अर्थी हिची अपरोक्षता दृढ होय. ॥ ६२ ॥**

**विवरणः**—पूर्वोक्त दृष्टान्ताप्रमाणें ' मी ब्रह्म आहें ' ही बुद्धि कधींच बाधित होत नसल्यामुळें आत्म्याचें अपरोक्षत्व सिद्ध होतें. ॥ ६२ ॥

ही गोष्ट केवळ छांदोग्योपनिषदावरूनच सिद्ध होते असें नाहीं. तर इतर श्रुतींकडे पाहिलें असतांही ती अबाधित ठरते. हें दाखविण्याकरितां तैत्तिरीयोपनिषदांतील भृगुवल्लीचा आधार देतात—

**जन्मादिकारणत्वाख्यलक्षणेन भृगुः पुरा ॥**
**पारोक्ष्येण गृहीत्वाऽथ विचाराद्व्यक्तिमैक्षत ॥ ६३ ॥**

**अन्वयः**—पुरा भृगुः जन्मादिकारणत्वाख्यलक्षणेन पारोक्ष्येण गृहीत्वा अथ विचारात् व्यक्तिं ऐक्षत ।

अर्थ:—पूर्वी भृगुनामक ऋषि ‘जन्मादिकांचें कारण’ इत्यादि लक्षणांवरून ब्रह्माचें परोक्षत: ग्रहण करून नंतर विचारानें तो त्यास साक्षात् जाणता झाला. ॥ ६३ ॥

विवरण:—वरुणाचा पुत्र भृगु शिष्यभावानें आपल्या पित्यापुढें गेला; व जिज्ञासेनें त्यास ह्मणाला ‘हे प्रभो, मला ब्रह्माचें स्मरण करून द्या.’ तें पुत्राचें वाक्य ऐकून ब्रह्मनिष्ठ वरुणमुनि फार संतुष्ट झाला, व तपश्चर्यापूर्वक तो त्यास ब्रह्मज्ञान सांगूं लागला. पण ब्रह्माचा साक्षात्कार केवळ वर्णनें ऐकून किंवा वाचून होण्यासारखा नसल्यामुळें त्यामध्यें पुत्रास प्रवृत्त करण्याकरितां त्यानें त्यास केवल ब्रह्माचें तटस्थ लक्षण सांगितलें. ब्रह्मलक्षण ऐकतांच भृगु एकांतांत बसून आपणापाशींच विचार करूं लागला. पुष्कळ प्रकारें विचार केल्यावर त्यास आनंदरूप आत्म्याचा साक्षात्कार झाला, अशी पूर्वोक्त भृगुवल्लींत आख्यायिका आहे. व तिच्यामध्यें या जगाच्या उत्पत्तीचें, स्थितीचें व नाशाचें जें कारण तें ब्रह्म—असें लक्षण ऐकून भृगूस पूर्वीं ज्या ब्रह्माचें परोक्ष ज्ञान झालें होतें, त्याचाच पुढें विचारानें साक्षात्कार झाला—असें सांगितलें आहे. तात्पर्य, पूर्वोक्त प्रतिपादनास ही श्रुतीही प्रमाण आहे. ॥ ६३ ॥

शंका:—पण त्या पूर्वोक्त आख्यायिकेंत वरुणानें ‘तूं ब्रह्म आहेस’ असें अपरोक्ष ज्ञान करून देणारें वाक्य आपल्या पुत्रास सांगितलेलें नाहीं. तेव्हां त्यावांचून त्याला आत्मसाक्षात्कार कसा झाला ?

समाधान:—

**यद्यपि त्वमसीत्यत्र वाक्यं नोचे भृगोः पिता ॥**
**तथाप्यन्नं प्राणमिति विचार्य स्थलमुक्तवान् ॥ ६४ ॥**

अन्वय:—यद्यपि भृगोः पिता अत्र ‘त्वं ( ब्रह्म ) असि’ इति वाक्यं न ऊचे तथापि अन्नं प्राणं इति विचार्य स्थलं उक्तवान् ।

अर्थ:—जरी भृगूच्या पित्यानें या आख्यायिकेंत ‘तूं ( ब्रह्म ) आहेस’ असें वाक्य उच्चारिलें नाहीं, तरी देह, प्राण असें ह्मणून त्यानें विचाराचें योग्य स्थल सांगितलेंच होतें. ॥ ६४ ॥

विवरण:—‘तें तूं आहेस’ असें वरुणानें सांगितलेलें नाहीं हें खरें, पण विचार कसा करावा. हें सुचविण्याकरितां त्यानें प्रथमतःच देह, प्राण, मन इत्यादि शब्दांनीं

पांच कोशांचा व चक्षु, श्रोत्र इत्यादि शब्दांनीं पांच ज्ञानेंद्रियांचा निर्देश करून हीं सर्व ज्ञानाचीं द्वारें आहेत, असें सांगितलें आहे. ॥ ६४ ॥

केवल अन्नमयादि कोशांचा निर्देश ऐकूनच भृगूस आत्मसाक्षात्कार कसा करून घेतां आला, तें आतां सांगतात—

**अन्नप्राणादिकोशेषु सुविचार्य पुनः पुनः ॥**
**आनन्दव्यक्तिमीक्षित्वा ब्रह्मलक्ष्माप्ययूयुजत् ॥ ६५ ॥**

**अन्वयः**—अन्नप्राणादि कोशेषु पुनः पुनः सुविचार्य आनंदव्यक्तिं ईक्षित्वा ब्रह्मलक्ष्म अपि ( प्रत्यगात्मनि ) अयूयुजत् ।

**अर्थः**—अन्नमयादि कोशांविषयीं वारंवार चांगला विचार करून आनंदरूप आत्म्याचा साक्षात्कार झाला असतां, त्याच्या ठायीं त्यानें ब्रह्माच्या लक्षणाची योजना केली. ॥ ६५ ॥

**विवरणः**—'शहाणा सुतानें स्वर्गास जातो' असें जें ह्मणतात त्याप्रमाणें जरा विचाराची दिशा समजतांच भृगु अन्नमय, प्राणमय, इत्यादि कोशांविषयां अहोरात्र विचार करूं लागला. व अन्नमयादि कोशच आत्मा आहे, असा त्याला प्रथम भ्रम झाला. पण पित्यानें सांगितलेलें सर्व लक्षण त्यांच्या ठायीं जुळत नसल्यामुळें त्यांना क्रमानें सोडीत व विचार करीत तो आंत आंत गेला व शेवटीं त्याला आनंदरूप आत्म्याचा साक्षात्कार झाला. तेव्हां त्यानें पूर्वोक्त ब्रह्मलक्षणाची त्याच्या ठायीं योजना केली. व ती बरोबर आहे, अशीही त्याची खात्री झाली. कारण आनंदापासून सर्व भूतांची उत्पत्ति, आनंदाच्या आश्रयानेंच स्थिति व आनंदामध्यें लय होत असतो, ही गोष्ट सूक्ष्मदृष्टि लोकांच्या अनुभवाची आहे. ॥ ६५ ॥

**शंकाः**—भृगूच्या पित्यानें त्यास ब्रह्माचें ( तटस्थ ) लक्षण सांगितलें होतें व त्यानें तर त्याची आत्म्याच्या ठायीं योजना केली आहे. तेव्हां हा त्याचा भ्रम नव्हे का ? कारण ब्रह्म तटस्थ ( निराळें राहणारें ) आहे व आत्मा शरीरस्थ आहे !

**समाधानः**—आह्मी ह्मणतों कीं भृगूला भ्रम झालेला नसून ब्रह्म तटस्थ आहे असें ह्मणणाऱ्या तुलाच तो झालेला आहे. कसा ह्मणशील तर पहा—

**सत्यं ज्ञानमनन्तं चेत्येवं ब्रह्मस्वलक्षणम् ॥**
**उक्त्वा गुहाहितत्वेन कोशेष्वेतत्प्रदर्शितम् ॥ ६६ ॥**

**अन्वयः**—'सत्यं ज्ञानं अनंतं च' इति ब्रह्मलक्षणं उक्त्वा एतत् गुहाहितत्त्वेन पंचकोशेषु प्रदर्शितम् ।

**अर्थः**—**सत्य, ज्ञान व अनंत असें ब्रह्माचें लक्षण सांगून 'हें गुहेंत राहणारें' या भावानें पांच कोशांमध्यें दाखविलें आहे. ॥ ६६ ॥**

**विवरणः**—आत्मा व ब्रह्म हीं भिन्न तत्त्वें आहेत असें समजण्यास श्रुत्यादिप्रमाणें नसतांना तसें समजणें हेंच भ्रमाचें लक्षण होय. पूर्वोक्त श्रुतींत तर ब्रह्म, सत्य, ज्ञान व अनंतरूप आहे असें सांगून 'अशा प्रकारचें ब्रह्म पंचकोशरूप गुहेंत गुप्त आहे' असें स्पष्ट ह्मटलें आहे. त्यावरून आत्मा व ब्रह्म भिन्न नाहींत असें स्पष्ट होतें. ॥ ६६ ॥

आतां छान्दोग्यांतील दुसऱ्या एका श्रुतीचें पर्यालोचन केल्यानेंही परोक्षज्ञान-पूर्वक अपरोक्षज्ञान होतें, असेंच ठरतें—असें सांगतातः—

**पारोक्ष्येण विबुध्येंद्रो य आत्मेत्यादिलक्षणात् ॥**
**अपरोक्षीकर्तुमिच्छंश्चतुर्वारं गुरुं ययौ ॥ ६७ ॥**

**अन्वयः**—'य आत्मा' इत्यादि लक्षणात् इंद्रः पारोक्ष्येण विबुध्य अपरोक्षीकर्तुं इच्छन् चतुर्वारं गुरुं ययौ ।

**अर्थः**—**'य आत्मा' इत्यादि श्रुतींत सांगितलेल्या लक्षणावरून इंद्र त्यास परोक्षतः जाणन अपरोक्षतः जाणण्याची इच्छा करून चार वेळ गुरूकडे गेला.**

**विवरणः**—छान्दोग्योपनिषदाच्या आठव्या अध्यायांत इंद्र व विरोचन आत्म-ज्ञानाकरितां प्रजापतीकडे गेले व दोघांनाही योग्यतेप्रमाणें भिन्न भिन्न आत्मज्ञान झालें अशी आख्यायिका आहे. तिच्यामध्यें प्रजापतीनें 'जो आत्मा पापशून्य, जरारहित, मरणधर्मातीत व शोकशून्य आहे' असें आत्म्याचें लक्षण सांगितलें आहे. तें ऐकतांच इंद्रास आत्म्याचें परोक्ष ज्ञान झालें, पण त्या परोक्ष ज्ञात आत्म्याचा साक्षात्कार झालेला नसल्यामुळें त्याकरितां इंद्र प्रजापतीकडे चार वेळ गेला. व एकशें एक वर्षें तप व विचार केल्यावर त्यास आत्मसाक्षात्कार झाला असें वर्णन आहे. त्यावरूनही "परोक्षज्ञानजन्य अपरोक्षज्ञान" ह्याच सिद्धांत दृढ होतो. ॥ ६७ ॥

प्रस्तुत प्रकरणीं ऐतरेय श्रुतीचेंही प्रमाण देतां येतें, कसें ह्मणशील तर पहाः—

**आत्मा वा इदमित्यादौ परोक्षं ब्रह्म लक्षितम् ॥**
**अध्यारोपापवादाभ्यां प्रज्ञानं ब्रह्म दर्शितम् ॥ ६८ ॥**

**अन्वयः**---'आत्मा वा इदं' इत्यादौ ब्रह्म परोक्षं लक्षितं (च अन्ते) अध्यारोपापवादाभ्यां प्रज्ञानं ब्रह्म दर्शितम्।

**अर्थः**— **'आत्मा वा इदं' असें ह्मणून प्रथमतः ब्रह्माचें परोक्ष लक्षण केलें (व शेवटीं) अध्यारोप आणि अपवाद यांच्या योगानें प्रज्ञान हेंच ब्रह्म आहे असें दाखविलें. ॥ ६८ ॥**

**विवरणः**---ऋग्वेदाच्या ऐतरेयोपनिषदांत आरंभीं 'पूर्वीं प्रसिद्ध असें हें सर्व नामरूपात्मक जगत् एक आत्माच असतें झालें. व्यापारयुक्त किंवा व्यापाररहित असें दुसरें कांहीं नव्हतें,' असें ह्मणून ब्रह्माचें लक्षण सांगितलें आहे. पुढें "मी लोकांस उत्पन्न करावें असा त्यानें विचार केला." असा आरंभ करून परमात्म्याच्या ठिकाणीं जगाचा आरोप कसा होतो तें दाखविलें. पुढें त्याचा निषेध करून व गर्भवासादि दुःख दाखवून वैराग्य उत्पन्न केल्यावर 'हा आत्मा कोण आहे, असा विचार करण्यास आरंभ केला आहे. व शेवटीं जगांत प्रज्ञानावांचून अन्य कोणतेंही तत्त्व सांपडत नसल्यामुळें 'प्रज्ञानच ब्रह्म आहे' असें सिद्ध केलें आहे.' अर्थात् प्रज्ञानरूप आत्माच ब्रह्म आहे. असें येथेंही व्यक्त होत असून परोक्षज्ञानपूर्वक अपरोक्षज्ञान होत असतें, असें स्पष्ट दाखविलें आहे. ॥ ६८ ॥

ह्याच न्याय इतर श्रुतींच्या ठिकाणीं कसा लागू करावयाचा तें आतां सांगतातः—

**अवान्तरेण वाक्येन परोक्षा ब्रम्हधीर्भवेत् ॥**
**सर्वत्रैव महावाक्यविचारादपरोक्षधीः ॥ ६९ ॥**

**अन्वयः**---सर्वत्र एव अवांतरेण वाक्येन परोक्षा ब्रह्मधीः च महावाक्यविचारात् अपरोक्षधीः भवेत्।

**अर्थः**—**सर्वेही श्रुतींमध्यें अवांतर वाक्यानें परोक्ष ब्रह्मज्ञान व महावाक्यांच्या विचारानें अपरोक्ष ज्ञान होतें. ॥ ६९ ॥**

**विवरणः**---जेवढीं ह्मणून उपनिषदें आहेत तेवढ्या सर्वांविषयीं हाच सामान्य नियम समजावा. अवांतर वाक्य ह्मणजे महावाक्याहून इतर वाक्य व महावाक्य ह्मणजे साक्षात् ब्रह्मात्मैक्यबोधक वाक्य होय. ॥ ६९ ॥

" महावाक्यांच्या विचारामुळें ब्रह्मात्मसाक्षात्कार होतो," असें जें तुह्मी वर ह्मटलें आहे, तें संप्रदायास सोडून आहे. कारण सिद्धांतलेश, सिद्धांतसूक्तिमंजिरी इत्यादि

ग्रंथकारांनीं ' आत्म्याचें श्रवण करावें ' या श्रवणविधानाचा विचार करितांना ' मननानें अपरोक्ष ज्ञान होतें ' असें विवरणकारांच्या मताचा आधार घेऊन सांगितलें आहे, असें कदाचित् कोणी ह्मणेल ह्मणून श्री भारतीतीर्थ ह्मणतात:--

**ब्रम्हापरोक्ष्यसिद्ध्यर्थं महावाक्यमितीरितम् ॥**
**वाक्यवृत्तावतो ब्रम्हापरोक्ष्ये विमतिर्न हि ॥ ७० ॥**

**अन्वय:**--वाक्यवृत्तौ ब्रह्मापरोक्ष्य सिद्ध्यर्थं महावाक्यं इति ईरितं अस्ति । अत: ब्रह्मापरोक्ष्ये विमतिः न हि अस्ति ।

**अर्थ:--वाक्यवृत्तीमध्यें-ब्रह्माचें अपरोक्षज्ञान सिद्ध होण्यास्तव महावाक्य आहे-असें सांगितलें आहे, यास्तव ब्रह्माच्या अपरोक्षतेविषयीं मतभेद नाहीं. ॥ ७० ॥**

**विवरण:**--श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या वाक्यवृत्ति नामक ग्रंथांत ब्रह्माच्या साक्षात्काराकरितां महावाक्य आहे. ह्मणजे त्याच्या विचारानेंच साक्षात्कार होत असतो; असें स्पष्टपणें ह्मटलें आहे. व हें संप्रदायप्रवर्तक मुख्य आचार्यांचेंच ह्मणणें असल्यामुळें त्याविषयीं मतभेद होणेंही शक्य नाहीं. आतां मननाच्या योगानें साक्षात्कार होतो असें जें क्वचित् ह्मटलेलें आढळतें, त्याचा तरी-महावाक्याच्या मननानें-ह्मणजे विचारानेंच साक्षात्कार होतो-असा अर्थ केला असतां मतभेदास जागाच राहात नाहीं. सारांश पूर्वोक्त गोष्ट सिद्ध आहे. ॥ ७० ॥

आतां वाक्यवृत्तींतील प्रस्तुत प्रकाराचें प्रतिपादन करणारे आठ श्लोक येथें घेतात:--

**आलम्बनतया भाति योऽस्मत्प्रत्ययशब्दयोः ॥**
**अन्तःकरणसंभिन्नबोधः स त्वम्पदाभिधः ॥ ७१ ॥**

**अन्वय:**--यः अंतःकरणसंभिन्नबोधः अस्मत्प्रत्ययशब्दयोः आलंबनतया भाति, सः त्वं पदाभिधः अस्ति ।

**अर्थ:--जो अंत:करणोपाधिक चिदात्मा अहंप्रत्यय व अहंशब्द याच्या आश्रयत्वानें भासतो, तो त्वंपदार्थ होय. ॥ ७१ ॥**

**विवरणः**—अहं—मी—असें जें प्रत्येकास वाटत असतें, तो अहंप्रत्यय व अहं हा
वतः शब्द या दोघांचा अंतःकरणोपाधिक चिदात्मा विषय होय. अर्थात् ' तत्त्वमसि '
ा वाक्यांतील त्वं पदाचा तोच अर्थ आहे. ह्मणजे घट हा पदार्थ जसा घट या
ाब्दाचा वाच्य असून घट हा शब्द त्याचा वाचक असतो, त्याप्रमाणें अंतःकरण ही
ापाधि आहे ज्याला, असा चिदात्मा त्वं शब्दाचा वाच्य व स्वतः त्वं शब्द हा
ााचा वाचक होय. ॥ ७१ ॥

आतां तत्पदाचा अर्थ सांगतात—

**मायोपाधिर्जगद्योनिः सर्वज्ञत्वादिलक्षणः ॥**
**पारोक्ष्यशबलः सत्याद्यात्मकस्तत्पदाभिधः ॥ ७२ ॥**

अन्वयः—यः मायोपाधिः जगद्योनिः सर्वज्ञत्वादि लक्षणः पारोक्ष्यशबलः सत्या-
ात्मकः सः तत्पदाभिधः अस्ति ।

**अर्थः—जो मायोपाधि, जगत्कारण, सर्वज्ञत्वादि लक्षणयुक्त, परोक्षत्वविशिष्ट
। सत्यादिरूप तो तत्पदाचा वाच्य होय. ॥ ७२ ॥**

**विवरणः**—ज्याची उपाधि माया आहे तो मायोपाधि. माया शुद्धसत्त्वप्रधान
ाहे व अनादि आहे. जो पदार्थ आपला धर्म दुसऱ्याच्या ठायीं आरोपित करितो
ो त्या दुसऱ्या पदार्थाचा उपाधि होतो. जासवंदीच्या फुलाजवळ स्फटिकमणि नेला
असतां तो लाल दिसूं लागतो. ह्मणजे तें फूल आपला लाल रंग स्फटिकाच्या ठिकाणीं
आरोपित करितें. आणि ह्मणूनच जासवंदीचें फूल स्फटिकाचा उपाधि होतो. तशीच
ााया ही आपला धर्म आत्म्याच्या ठिकाणीं आरोपित करीत असल्यामुळें त्याचा
उपाधि होय. आणि एवढ्याकरितांच त्यास मायोपाधि असें ह्मणतात. **जगद्योनि**—
उत्पत्तिशील जगाचें निमित्त व उपादान कारण. ब्रह्म प्रकृतियुक्त होऊन जगाचें
उपादान कारण व चैतन्यप्रधान होऊन निमित्त कारण होत असतें. मातीचा घट
ायार करणारा कुंभार त्या घटाचें निमित्त कारण व माती उपादान कारण होय.
ह बहुश्रुत वाचकांस ठाऊक आहेच. **सर्वज्ञत्वादिलक्षणः**—सर्वज्ञ, सर्वशक्ति,
सर्वकर्मा, सर्व गंध, इत्यादि प्रकारच्या लक्षणभूत शब्दांवरून ज्याचें ज्ञान होत
असतें असा. **पारोक्ष्यशबलः**—नित्य, अपरोक्ष व स्वप्रकाश असा जो प्रत्यगात्मा
याच्याहून ईश्वर भिन्न आहे, असें समजणें हेंच त्याचें शबलत्व आहे व त्यामुळेंच
ारोक्षत्वाच्या योगानें शबल असें त्यास ह्मटलें आहे. ह्याप्रमाणें चार पदांनीं तत्पदार्थाचें

तटस्थलक्षण सांगून आतां संक्षेपतः स्वरूपलक्षण सांगतात. **सत्याद्यात्मकः**—सत्य, ज्ञान, अनंत व आनंदरूप असा जो परमात्मा तोच 'तत्त्वमसि' या वाक्यांतील तत् पदाचा अर्थ होय. ॥ ७२ ॥

ह्याप्रमाणें वाक्यांतील मुख्य पदांचा अर्थ सांगून आतां वाक्याचा अर्थ कसा करावयाचा तें सांगतात—

**प्रत्यक्परोक्षतैकस्य सद्वितीयत्वपूर्णता ॥**
**विरुध्येते यतस्तस्माल्लक्षणा सम्प्रवर्तते ॥ ७३ ॥**

**अन्वयः**—यतः एकस्य प्रत्यक्परोक्षता सद्वितीयत्वपूर्णता विरुध्येते तस्मात् लक्षणा संप्रवर्तते।

**अर्थः**—ज्या अर्थी एकाची प्रत्यक्ता व परोक्षता आणि सद्वितीयता व पूर्णता विरुद्ध आहे, त्या अर्थी लक्षणा प्रवृत्त होते. ॥ ७३ ॥

**विवरणः**—पूर्वोक्त वाक्यांत असि हें तिसरें पद आहे व तें तत् व त्वं यांचें ऐक्य दाखवितें. ह्मणजे व्यवहारांत जसा 'तूं रामा आहेस, मीच राम आहें,' इत्यादि शब्दप्रयोग होतो, व त्यांतील तूं व रामा किंवा मी व राम यांचें ऐक्य 'आहेस' व 'आहें' यावरून व्यक्त होतें, त्याप्रमाणेंच येथेंही प्रकार होतो. पण एकाच पदार्थाच्या ठायीं परस्पर विरुद्ध असे दोन धर्म राहणें शक्य नाहीं. तत् व त्वं हे दोन शब्द तर असि पदानें द्योतित होणाऱ्या एका वस्तूच्या ठायीं क्रमानें परोक्षत्व व प्रत्यक्त्व आणि पूर्णत्व व सद्वितीयत्व हे धर्म दाखवितात. यास्तव या वाक्याचा लक्षणेनें अर्थ केला पाहिजे. कारण जेथें वाक्याच्या तात्पर्याची अनुपपत्ति होते ह्मणजे वाक्याचें तात्पर्य निर्दोषपणें जुळत नाहीं, तेथें लक्षणा प्रवृत्त होत असते. ॥ ७३ ॥

लक्षणा तीन प्रकारची असल्यामुळें त्यांतील कोणती लक्षणा येथें प्रवृत्त होते तें आतां सांगतात—

**तत्त्वमस्यादिवाक्येषु लक्षणा भागलक्षणा ॥**
**सोऽयमित्यादिवाक्यस्थपदयोरिव नापरा ॥ ७४ ॥**

**अन्वयः**—'सः अयं' इत्यादि वाक्यस्थपदयोः इव तत्त्वमस्यादिवाक्येषु भागलक्षणा लक्षणा न अपरा।

**अर्थः—' तो हा ' इत्यादि वाक्यांतील दोन पदप्रमाणें तत्त्वमसि इत्यादि वाक्यांमध्येंही भागलक्षणा नामक लक्षणा प्रवृत्त होते. दुसरी नाहीं. ॥ ७४ ॥**

विवरणः—' तो हा देवदत्त ' या वाक्यांतील तो व हा हीं दोन पदें परस्पर विरोधि आहेत. कारण तो या शब्दाचा अर्थ—दूरचा किंवा परोक्ष, असा आहे व हा याचा अर्थ जवळचा किंवा अपरोक्ष असा आहे. त्यामुळें त्या दोन्ही शब्दांचा देवदत्त नामक एका पुरुषाशीं अन्वय होऊं शकत नाहीं. यास्तव या स्थलीं भागत्याग किंवा जहदजहत् लक्षणेनें वाक्यार्थ करावा लागतो. पदांतील विरुद्ध धर्म सोडून देऊन समान धर्मांचा मुख्य व्यक्तीशीं अन्वय करणें, हीच जहदजहत् लक्षणा होय. तस्मात् ' सोऽयं ' या वाक्यांत जशी भागलक्षणा करून वाक्यार्थ करितात. त्याचप्रमाणें ' तत्त्वमसि ' या स्थळींही अर्थ करावा. कारण या वाक्यांत जहत् किंवा अजहत् यांपैकीं एकही लक्षणा संभवत नाहीं. ॥ ७४ ॥

जहत् व अजहत् लक्षणा येथें कां संभवत नाहीं तें आतां सांगतात—

**संसर्गो वा विशिष्टो वा वाक्यार्थो नात्र सम्मतः ॥**
**अखंडैकरसत्वेन वाक्यार्थो विदुषां मतः ॥ ७५ ॥**

अन्वयः—अत्र विदुषां संसर्गः वा विशिष्टः वा वाक्यार्थः न संमतः किंतु अखंडैकरसत्वेन वाक्यार्थः मतः ।

**अर्थः—या स्थळीं विद्वानांस संसर्ग किंवा विशिष्ट वाक्यार्थ संमत नाहीं, तर अखंड व एक रसत्वानें वाक्यार्थ संमत आहे. ॥ ७५ ॥**

विवरणः—' गाईस आण. ' या वाक्यांतील पदांच्या योगानें मुख्य अर्थाचाच बोध होतो व त्यामुळें त्यास संसर्गवाक्यार्थ ह्मणतात. कारण ज्या शब्दांचा जो अर्थ पूर्वी समजलेला असतो, त्या शब्दांचा तोच अर्थ ज्या वाक्यांत होतो, त्यास संसर्ग वाक्यार्थ ह्मणतात. प्रस्तुत उदाहरणांत ' गाय आण ' या शब्दांचा जो अर्थ पूर्वी समजला होता. तोच प्रस्तुत स्थळींही उपस्थित होत असल्यामुळें व त्याचा बाध होत नसल्यामुळें तो संसर्गवाक्यार्थ होय. निळें, मोठें व सुगंधि कमल या वाक्यांत निळें वगैरे तीन शब्द विशेषणरूप व त्यांनीं युक्त असें कमल विशेष्यरूप आहे. या वाक्याचा खरा अर्थ कमल एवढाच असून इतर शब्द त्यांमध्यें कांहीं विशेषता

आणीत आहेत व त्यामुळें या वाक्यार्थास विशिष्टवाक्यार्थ ह्मणतात. पण 'तत्त्वमसि' या महावाक्यांत हे दोन्ही अर्थ संभवत नाहींत. त्यामुळें विद्वान् लोक अखंड व एकरसवस्तुरूपानें वाक्यार्थ करितात. अखंडैकरसत्वेन:—स्वगत, स्वजातीय व विजातीय या तीन प्रकारच्या भेदांनीं रहित व प्रत्यगात्म्याहून निराळें नसलेलें असें ब्रह्म. ॥ ७५ ॥

अखंड व एकरसवाक्यार्थ कसा होतो, तो आतां दाखवितात—

**प्रत्यग्बोधो य आभाति सोऽद्वयानन्दलक्षणः ॥**
**अद्वयानन्दरूपश्च प्रत्यग्बोधैकलक्षणः ॥ ७६ ॥**

अन्वयः—यः प्रत्यग्बोधः आभाति सः अद्वयानन्दलक्षणः च अद्वयानन्दरूपः यः परमात्मा सः प्रत्यग्बोधैकलक्षणः अस्ति ।

अर्थ:—जो सर्वांच्या अंतर्यामीं राहाणारा चिदात्मा तो अद्वय व आनंद-लक्षण परमात्मा आहे; आणि जो अद्वयानन्दरूप परमात्मा तो प्रत्यग्बोधच आहे. ॥ ७६ ॥

विवरण:—जो प्रत्यगात्मा तोच जीवात्मा व जीवात्मा तोच प्रत्यगात्मा असा व्यतिहार या श्लोकांत दाखविला आहे. असा व्यतिहार दाखविल्यानें ज्यांचें परमार्थतः ऐक्य आहे, अशा दोन वस्तूंतील भेद निश्चयपूर्वक नष्ट होतो. मांडूक्योपनिषदाच्या आठव्या मंत्रांतही 'ॐकाराच्या ज्या मात्रा तेच आत्म्याचे पाद व जे पाद त्याच मात्रा' असें ह्मणून व्यतिहारपद्धतीनें प्रणव व त्याचा वाच्य ईश्वर यांचें ऐक्य दाखविलें आहे. प्रत्यक् ह्मणजे सर्वांतर्यामी चिदात्मा, तो पंचकोशांचा प्रकाशक आहे. अशा प्रकारें भासतो व तो सर्व अवस्थांचा साक्षी असल्यामुळें निर्विकार आहे. कोणत्याही प्राण्याला ह्याच्या इतकी दुसरी प्रियकर वस्तु नसल्यामुळें व हा अद्वयादि लक्षण असल्याचें श्रुति अनेक प्रकारें सांगत असल्यामुळें, हा परमात्माच आहे. त्याचप्रमाणें अद्वैत ब्रह्मलक्षण जो परमात्मा तोही चिदानंदरूप प्रत्यगात्माच आहे. सारांश, निरुपाधिक जीवात्मा व निरुपाधिक ईश्वर यांचें वस्तुतः ऐक्यच होय. ॥ ७६ ॥

या व्यतिहारपद्धतीनें आत्म्याच्या अखंडत्वाचें ज्ञान झालें असतां काय होतें तें आतां सांगतात:—

इत्थमन्योन्यतादात्म्यप्रतिपत्तिर्यदा भवेत् ॥
अब्रह्मत्वं त्वमर्थस्य व्यावर्तेत तदैव हि ॥ ७७ ॥

अन्वयः—इत्थं अन्योन्यतादात्म्यप्रतिपत्तिः यदा भवेत् तदा एव हि त्वमर्थस्य अब्रह्मत्वं व्यावर्तेत ।

अर्थः—ह्याप्रमाणें परस्परांचें ऐक्य आहे, असें ज्ञान जेव्हां होतें, तेव्हांच त्वंपदार्थाचें अब्रह्मत्व निवृत्त होतें. ॥ ७७ ॥

विवरणः—प्रत्यगात्मा व परमात्मा यांचें परस्पर ऐक्य आहे असें जेव्हां ज्ञान होतें, जेव्हां त्वं पदाचा लक्ष्य अर्थ जो प्रत्यगात्मा, तो ब्रह्म नव्हे अशी जी मूढांची समजूत असते ती एकदम निवृत्त होते. कारण 'प्रत्येक शरीरांत जीवात्मा भिन्न आहे' हें मत केवळ तर्करूप व मूढपुरुषानुभवरूप आहे! पण अंतर्वृत्ति ज्ञानी पुरुषांस जेव्हां त्या मताचा बाध होतो असें दिसतें, तेव्हां ते एक क्षणभरही त्याचा स्वीकार करीत नाहींत. ॥ ७७ ॥

या सिद्धांतावर एक साधारण शंका येण्यासारखी आहे. यास्तव तिचा येथें उल्लेख करून समाधान करितातः—

तदर्थस्य च पारोक्ष्यं यद्येवं किं ततः शृणु ॥
पूर्णानंदैकरूपेण प्रत्यग्बोधोऽवतिष्ठते ॥ ७८ ॥

अन्वयः—तदर्थस्य पारोक्ष्यं च निवर्तेत । यदि एवं ततः किं । शृणु । प्रत्यग्बोधः पूर्णानंदैकरूपेण अवतिष्ठते ।

अर्थः—(त्याचप्रमाणें) तत् पदाचा लक्ष्यार्थ जो परमात्मा, त्याचें परोक्षत्वही निवृत्त होतें. पण असें झाल्यानें लाभ काय? सांगतों, ऐक. त्यानंतर प्रत्यग्बोध पूर्ण आनंदरूपानें अवशिष्ट रहातो. ॥ ७८ ॥

विवरणः—त्वं पदाच्या लक्ष्यार्थाचें अब्रह्मत्व व तत्पदाच्या लक्ष्यार्थाचें परोक्षत्व हीं दोन्हीं ऐक्य ज्ञानानें निवृत्त होतात. पण असें झाल्यापासून लाभ तो कोणता? अशी कोणी शंका विचारील; कारण, प्रत्यगात्मा ब्रह्मरूप आहे व परमात्मा परोक्ष नाहीं, असें सिद्ध झाल्यापासून जर काहीं लाभ असता, तर त्याची सिद्धि करण्यांत काहीं प्रयोजन

आहे असें ह्मणतां आलें असतें. यास्तव ग्रंथकार सांगतात कीं पूर्वोक्त प्रकार घडून आल्यावर प्रत्यगात्मा पूर्ण आनंदरूप होऊन राहतो. अर्थात् परोक्षत्व, अब्रह्मत्व इत्यादि समजुतींबरोबर त्याचे दुसरेही औपाधिक धर्म नष्ट होऊन जातात व तो कैवल्यावस्थेंत राहतो. ह्मणजे त्यास येथेंच परम पुरुषार्थाची प्राप्ति होते. ॥ ७८ ॥

शंका:—ज्यांचा विचार केला आहे, अशा महावाक्यांच्या योगानेंच जर अद्वैत-ब्रह्मात्मैक्यबोध होत असेल तर श्रुतीनें श्रवणादिकांचें विधान कशाकरितां केलें आहे ? व ज्या अर्थी श्रवणादि वेदोक्त आहे, त्या अर्थी वाक्यापासून परोक्षज्ञानच उत्पन्न होतें असें ह्मणावें लागतें. समाधानः—वाहवा !

**एवं सति महावाक्यात्परोक्षज्ञानमीर्यते ॥**
**यैस्तेषां शास्त्रसिद्धांतविज्ञानं शोभतेतराम् ॥ ७९ ॥**

अन्वय:—एवं सति यैः महावाक्यात् परोक्षज्ञानं ईर्यते तेषां शास्त्रसिद्धान्तज्ञानं शोभतेतराम् ।

अर्थ—असें असतांही जें महावाक्यापासून परोक्षज्ञान होतें असें ह्मणतात त्यांचें शास्त्रसिद्धान्तज्ञान फार शोभतें ! ॥ ७९ ॥

विवरणः—महावाक्यापासून विचारानंतर: अपरोक्ष ज्ञान कसें होतें तें एवढा वेळ सांगितलें. व तो सिद्धांत सप्रमाण सिद्ध केला असतांही 'वाक्यापासून परोक्ष ज्ञानच होणें शक्य आहे. अपरोक्ष ज्ञान होणें शक्य नाहीं' असें जे ह्मणतात, त्यांस आह्मी एवढेंच सांगतों कीं, तुमचें हें शास्त्रीय ज्ञान तुह्मालाच शोभतें. तें तुमच्या पाशींच राहूं दे. इतरांना त्याचा कांहीं उपयोग नाहीं. कारण तुह्मी शास्त्रपरिचयशून्य आहां, असें ज्ञाते तुमच्या बोलण्यावरूनच ओळखतील व त्यामुळें ते तुमच्या वाऱ्यासही उभे रहाणार नाहींत. ॥ ७९ ॥

'वाक्यावरून परोक्षज्ञान होतें' हें आमचें ह्मणणें अनुभवसिद्ध आहे असें कदाचित् वादी ह्मणेल, ह्मणून ग्रंथकार ह्मणतात:—

**आस्तां शास्त्रस्य सिद्धांतो युक्त्या वाक्यात्परोक्षधीः ॥**
**स्वर्गादिवाक्यवन्नैवं दशमे व्यभिचारतः ॥ ८० ॥**

अन्वयः—शास्त्रस्य सिद्धांतः आस्तां। 'स्वर्गादिवाक्यवत् वाक्यात् परोक्षधीः' इति युक्त्या सिद्धं इति चेत् एवं न। इति कुतः। दशमे व्यभिचारतः।

अर्थः—शास्त्राचा सिद्धांत असो, पण स्वर्गादि वाक्याप्रमाणें वाक्यावरून परोक्षज्ञान होतें असें अनुमानानें सिद्ध होतें, असें जर ह्मणशील तर तें बरोबर नाहीं. कारण (तूं) दशम (आहेस) या वाक्यांत त्या अनुमानाचा व्यभिचार होत असतो. ॥ ८० ॥

विवरणः—वादी ह्मणतो कीं, अनुमानावरून ही गोष्ट सिद्ध होते. कशी ह्मणाल पहाः—वाक्य केवळ परोक्षज्ञानच करून देत असतें. कारण तें वाक्य आहे ह्मणून. ह्म० —जें जें वाक्य तें तें परोक्षज्ञान करून देणारें—अशी व्याप्ति मिळत असल्यामुळें; याला उदाहरण—स्वर्गकामो ज्योतिष्टोमेन यजेत ह्म० ज्याला स्वर्गाची इच्छा असेल त्यानें ज्योतिष्टोम यज्ञ करावा—या वाक्याप्रमाणें. या वाक्यावरून स्वर्गाविषयीं व स्वर्गाच्या साधनाविषयीं परोक्षज्ञान होत असतें. प्रत्यक्ष नव्हे. अर्थात् आमचें ह्मणणें युक्तिसिद्ध आहे. असें बोलून वादी स्वस्थ झाला असतां सिद्धान्ती ह्मणतातः—हें तुमचें अनुमान व्यभिचारि आहे. कारण 'तूंच दहावा आहेस' असें आप्तवचन ऐकतांच भ्रमिष्टास आपल्या दहावेपणाचा साक्षात्कार होत असल्याचें वर सविस्तर दाखविलें आहे. तस्मात् तुमचें अनुमान दुष्ट (दोषयुक्त) आहे. ॥ ८० ॥

शिवाय—

स्वतोऽपरोक्षजीवस्य ब्रह्मत्वमभिवाञ्छतः ॥
नश्येत्सिद्धपरोक्षत्वमिति युक्तिर्महत्यहो ॥ ८१ ॥

अन्वयः—ब्रह्मत्वं अभिवाञ्छतः स्वतः अपरोक्षजीवस्य सिद्धपरोक्षत्वं नश्येत् इति अहो महती युक्तिः।

अर्थः—ब्रह्मत्वाची इच्छा करणाऱ्या व स्वतः अपरोक्ष (असलेल्या) जीवाचें पूर्वी सिद्ध असलेलें अपरोक्षत्वच नष्ट होणें ही खरोखर फारच मोठी युक्ति होय! ॥ ८१ ॥

विवरणः—अनुमानाची कास धरणाऱ्या वाद्याचा या व पुढच्या श्लोकांत उपहास केला आहे. जीव स्वतः अपरोक्ष आहे हें कोणासही सांगण्याची आवश्यकता नाहीं.

पण आपल्या कल्याणाकरितां जर त्यानें ब्रह्मभावाची इच्छा केली, तर त्याचें पहिलें स्वभावसिद्ध असलेलें अपरोक्षत्वही नाहींसें होतें असें ज्या उत्तम युक्तीवरून ठरतें, तिची स्तुति करावी तितकी थोडीच होय ! ॥ ८१ ॥

कारणः—वाद्या रे, वाद्या,

> वृद्धिमिष्टवतो मूलमपि नष्टमितीदृशम् ॥
> लौकिकं वचनं सार्थं संपन्नं त्वत्प्रसादतः ॥ ८२ ॥

अन्वयः—वृद्धिं इष्टवतः मूलं अपि नष्टं इति ईदृशं लौकिकं वचनं त्वत्प्रसादतः सार्थं संपन्नम् ।

अर्थः—‘व्याजाची इच्छा करण्याचें मुद्दलही नष्ट झालें’ अशा प्रकारचें लौकिक वचन तुझ्या कृपेनें सार्थ झालें. ॥ ८२ ॥

विवरणः—व्यवहारामध्यें ‘सावकारानें कुळापासून उगीच कसें तरी व्याज ओढण्याची हांव धरूं नये, कारण तसें केल्यास एकादे वेळीं मुद्दलही जाण्याची वेळ येते’ असें सुचविण्याकरितां प्रस्तुत म्हण प्रचलित झाली आहे. तिच्या अनुरोधानेंच हा तुझा सिद्धांत ठरला, असें सिद्धांती वाद्यास सांगत आहेत. कारण मोठ्या लाभाच्या आशेनें ब्रह्म होण्याची एकाद्यानें इच्छा करावी, व त्यांत प्रवृत्त होतांच त्याची सहज अपरोक्षताही जावी ! पण हा न्यायाचा प्रकार नव्हे. ॥ ८२ ॥

सिद्धांत्याच्या उपहासावर वादी शंका घेतोः—

> अंतःकरणसंभिन्नबोधो जीवोऽपरोक्षताम् ॥
> अर्हत्युपाधिसद्भावान्न तु ब्रह्मानुपाधितः ॥ ८३ ॥

अन्वयः—अंतःकरणसंभिन्नबोधः जीवः उपाधिसद्भावात् अपरोक्षतां अर्हति किं तु ब्रह्म अनुपाधितः न अर्हति ।

अर्थः—बुद्धियुक्त चैतन्यरूप जीव असल्यामुळें म्हणजे उपाधि विद्यमान असल्यामुळें तो अपरोक्षतेस योग्य आहे. पण ब्रह्म उपाधिरहित असल्यामुळें (अपरोक्षतेस) योग्य नाहीं. ॥ ८३ ॥

विवरणः—जीव कार्योपाधि आहे; ईश्वर कारणोपाधि आहे; व ब्रह्म निरुपाधिक आहे; असें श्रुति सांगत असल्यामुळें बुद्धियुक्त चैतन्य हाच जीव होय असें ठरतें.

व त्यामुळें अपरोक्षत्व हा धर्म त्याचें ठायीं रहातो. पण ब्रह्म निरुपाधिक असल्यामुळें तें अपरोक्ष होऊं शकणार नाहीं. कारण अपरोक्षज्ञानास अंतःकरणाची अत्यंत आवश्यकता आहे. ॥ ८३ ॥

या शंकेचें सिद्धांती आतां समाधान करितातः—

**नैवं ब्रह्मत्वबोधस्य सोपाधिविषयत्वतः ॥**
**यावद्विदेहकैवल्यमुपाधेरनिवारणात् ॥ ८४ ॥**

अन्वयः—ब्रह्मत्वबोधस्य सोपाधिविषयत्वतः च विदेहकैवल्यं यावत् उपाधेः अनिवारणात् एवं न।

अर्थः—ब्रह्मत्वज्ञान सोपाधिविषयक असल्यामुळें व विदेहकैवल्य प्राप्त होई तों उपाधीचें निवारण करितां येत नसल्यामुळें असें होत नाहीं. ॥८४॥

विवरणः—जीवाचें जें ब्रह्मरूपताज्ञान आहे तें सोपाधिवस्तुविषयक असल्यामुळें त्याचा विषय जें ब्रह्म तेंही सोपाधिक होय. कारण ज्ञेय सोपाधिक असल्यावांचून ज्ञान सोपाधिवस्तुविषयक होऊं शकणार नाहीं. व देहसंबंध असेपर्यंत अथवा विदेहमुक्तीचा लाभ होई तोंपर्यंत उपाधीचें निवारण होत नाहीं, असा विद्वानांचा अनुभव आहे. तस्मात् मी ब्रह्म आहें, हें ज्ञान व त्याचा विषय हीं दोन्ही सोपाधिक आहेत. ॥ ८४ ॥

वादीः—मग असें जर आहे, तर वार्तिककारांनीं कांहीं तरी खोटेंच सांगितलें आहे असें ह्मटलें पाहिजे. कारण त्यांच्या एका वार्तिकांत 'ब्रह्मावांचून अन्य जर एकादा सत्य पदार्थ असता, तर ब्रह्म शब्दाचा अर्थच दुर्लभ झाला असता; यास्तव ब्रह्म अव्यावृत्त व अनुगत आहे असें ह्मटलें आहे' असें ह्मटलेलें आढळतें. व त्यावरून तें निरुपाधिकच आहे असा बोध होतो. समाधानः—त्यांच्या त्या ह्मणण्याचें तात्पर्य तुला समजलें नाहीं. कसें ह्मणशील तर सांगतोंः—

**अंतःकरणसाहित्यराहित्याभ्यां विशिष्यते ॥**
**उपाधिर्जीवभावस्य ब्रह्मतायाश्च नान्यथा ॥ ८५ ॥**

अन्वयः—जीवभावस्य च ब्रह्मतायाः उपाधिः अंतःकरणसाहित्यराहित्याभ्यां विशिष्यते न अन्यथा।

अर्थः—जीवभाव व ब्रह्मभाव यांची उपाधि अंतःकरणासह राहणें व त्यांच्यावांचून असणें, या दोन प्रकारानेंच भिन्न होते. दुसऱ्या कशानेंही नाहीं. ॥ ८५ ॥

विवरणः—अंतःकरणासह राहणें हीच जीवत्वाची उपाधि व अंतःकरणावांचून असणें हाच ब्रह्मत्वाची उपाधि होय. अर्थात्—या अद्वैत शास्त्रांत ब्रह्म शब्दाचा अर्थच दुर्लभ होईल—असें जें परमपूज्य सुरेश्वराचार्यांनीं ह्मटलें आहे त्याचा भाव 'सर्व द्वैताच्या अभावानें युक्त असें चैतन्य ह्मणजेच ब्रह्म होय,' असा ठरतो. व त्यामुळें प्रस्तुत श्लोकाशीं त्यांच्या वार्तिकाचा विरोध येत नाहीं. कारण चैतन्यानें अंतःकरणावाचून असणें ह्मणजे सर्व द्वैताभावानें युक्त असणेंच होय. ॥ ८५ ॥

वादीः—जे विद्यमान पदार्थ असतात, तेच दुसऱ्यांची उपाधि होतात, असा व्यावहारिक अनुभव आहे. व आत्म्याच्या साक्षित्वादिकाची उपाधि अविद्यादिक आहे, असा तुमचा सिद्धांतही आहे. यास्तव अंतःकरण राहित्य ह्मणजे अंतःकरणाचा अभाव ब्रह्माची उपाधि होणें शक्य नाहीं. सिद्धांतीः—असें कां ह्मणतोसः—

यथा विधिरुपाधिः स्यात्प्रतिषेधस्तथा न किम् ॥
सुवर्णलोहभेदेन शृंखलात्वं न भिद्यते ॥ ८६ ॥

अन्वयः—यथा विधिः उपाधिः स्यात्, तथा प्रतिषेधः न किं ? सुवर्णलोहभेदेन शृंखलात्वं न भिद्यते ।

अर्थः—जसा भावरूप अंतःकरणसंबंध उपाधि होते, तसा अंतःकरणवियोग उपाधि नाहीं का होणार ? सुवर्ण व लोह यांच्या भिन्नत्वाच्या योगानें शृंखलात्वामध्यें भेद पडत नाहीं. ॥ ८६ ॥

विवरणः—या श्लोकांत विधि ह्मणजे भाव व प्रतिषेध ह्मणजे अभाव असें समजावें. जसा भाव उपाधि होतो तसाच अभाव ही होतो. यास्कांनीं जे सहा भाव विकार सांगितले आहेत, त्यांत विनाशाची ही गणना आहे, व त्यावरून अभावही उपाधि होऊं शकतो असें ठरतें. याविषयीं शृंखलेचा दृष्टांत येथें दिला आहे. शृंखला ह्मणजे बेडी. ती ज्याच्या पायांत असेल त्याची गति बंद होणें हें तिचें कार्य होय. व तेवढें तिनें केलें कीं तिच्या स्वरूपाकडे कोणीही

पाहत नाहीं. ह्मणजे ती सोन्याची असो, की चांदीची असो, की लोखंडाची असो; तिला पुरुषगतिनिरोधक शृंखलाच ह्मणतात. पेशवाईत सखाराम बापूस दोन तीन वेळ कैदेंत पडावें लागलें. व त्यांच्या पायांत नेहमीं चांदीची बेडी ठोकीत असत. पण तिचा त्यांना लोखंडाच्या बेडीपेक्षां कांहीं अधिक लाभ होत असेल, असें कोणी ह्मणूं शकेल का ? तात्पर्य उपाधि कशीही कां असेना, ती वस्तूमध्यें जोंपर्यंत कांहीं तरी भेद पाडीत असते, तोंपर्यंत ती उपाधीच होय. ॥ ८६ ॥

आतां ' अभावरूप निषेध उपाधि होते, हें ह्मणणें संप्रदायास सोडून आहे, असें ही ह्मणतां येणार नाहीं. कारण परम पूज्य आचार्यांनींच, विधि व निषेध हे दोन्ही ब्रह्मबोधाचे उपाय आहेत, असें सांगितलें आहे. ' असें सांगतातः—

**अतद्व्यावृत्तिरूपेण साक्षाद्विधिमुखेन च ॥**
**वेदान्तानां प्रवृत्तिः स्याद्द्विधेत्याचार्यभाषितम् ॥ ८७ ॥**

अन्वयः—अतद्व्यावृत्तिरूपेण च साक्षाद्विधिमुखेन इति वेदान्तानां द्विधा प्रवृत्तिः स्यात् इति आचार्यभाषितं अस्ति ।

अर्थः—ब्रह्माचे जे धर्म नव्हेत त्यांची व्यावृत्ति करून व सत्यादि साक्षात् शब्दाचें विधान करून, अशी वेदांताची दोन प्रकारची प्रवृत्ति होते, असें आचार्यांचें वचन आहे. ॥ ८७ ॥

विवरणः—आचार्यांनीं बृहद्वाक्यवृत्ति नामक ग्रंथामध्यें ही प्रस्तुत गोष्ट स्पष्टपणें सांगितली आहे. अतद्व्यावृत्ति० इत्यादि येथें जो पूर्वार्ध दिसत आहे; तो स्वतः आचार्यकृत असून उत्तरार्ध श्रीभारतीतीर्थ मुनिप्रणीत आहे. अज्ञानादि जे ब्रह्माचे धर्म नव्हेत त्यांची ' नेति नेति ' इत्यादि वाक्यांनीं निवृत्ति करणें ही वेदान्तांची निषेधरूप प्रवृत्ति व सत्यं, ज्ञानं, अनंतं, आनंदं इत्यादि जे साक्षात् ब्रह्मस्वरूपाचें प्रतिपादन करणारे शब्द आहेत त्यांचा प्रयोग करणें, ही विधानरूप प्रवृत्ति होय. ह्या दोन्ही प्रकारच्या प्रवृत्तीनें ब्रह्मप्रतिपादन होत असतें. सारांश, हें आचार्यांचेंच मत असल्यामुळें संप्रदायास सोडून आहे, असें कोणासही ह्मणतां येणार नाहीं. ॥ ८७ ॥

या पूर्वोक्त प्रतिपादनावर शंका घेऊन समाधान करितात:—

**अहमर्थपरित्यागादहं ब्रह्मेति धीः कुतः ॥**
**नैवमंशस्य हि त्यागो भागलक्षणयोदितः ॥ ८८ ॥**

अन्वय:—अहमर्थ परित्यागात् अहं ब्रह्म इति धीः कुतः । न एवं । हि भागलक्षणया अंशस्य त्यागः उदितः ।

अर्थ:—अहं या शब्दाच्या अर्थाचा परित्याग केल्यामुळें 'अहं ब्रह्म' असें ज्ञान कोठून होणार? असें तूं ह्मणशील पण तें बरोबर नव्हे. कारण भागलक्षणेनें अंशाचा त्याग करावा असें पूर्वींच सांगितलेलें आहे. ॥ ८८ ॥

विवरण:—ब्रह्माचे जे धर्म नव्हेत त्यांचा त्याग करावयाचा असें ह्मटल्यास अहं शब्दाचा अर्थ जो कूटस्थ आत्मा त्याचाही त्याग करावा लागणार व कूटस्थाचा त्याग केल्यावर 'मी ब्रह्म आहें' असें ज्ञान कसें होईल? अशी येथें वादी शंका करीत आहे. पण सिद्धान्ती ह्मणतात कीं, ही तुझी शंका अयुक्त आहे. कारण, अहदजहत् लक्षणेनें अहं शब्दाचा जो अर्थ आहे त्यांतील जडांशाचा मात्र त्याग करावा, असें आह्मी पूर्वी सांगितलें आहे. त्यामुळें कूटस्थाचा त्याग करण्याचा प्रसंग येत नसून त्याच्या शुद्ध स्वरूपाचें ब्रह्माशीं ऐक्य आहे, असें ज्ञान होणें शक्य आहे. ॥ ८८ ॥

अहं शब्दाच्या अर्थातील जडांशाचा त्याग केला असतां बोध कसा होतो, तें आतां येथें दाखवितात—

**अंतःकरणसंत्यागादवशिष्टे चिदात्मनि ॥**
**अहं ब्रह्मेति वाक्येन ब्रह्मत्वं साक्षिणीक्ष्यते ॥ ८९ ॥**

अन्वय:—अंतःकरणसंत्यागात् अवशिष्टे साक्षिणि चिदात्मनि 'अहं ब्रह्म' इति वाक्येन ब्रह्मत्वं ईक्ष्यते ।

अर्थ:—अंतःकरणाचा पूर्णपणें त्याग केल्यावर अवशिष्ट रहाणाऱ्या साक्षी चिदात्म्याच्या ठायीं 'मी ब्रह्म आहें' या वाक्याच्या योगानें ब्रह्मत्व पाहिलें जातें. ॥ ८९ ॥

विवरण:—अहं शब्दाच्या अर्थांत अंतःकरण हाच जडांश आहे; व तो जडांश असल्यामुळेंच आत्म्याचा धर्म नव्हे हें उघड आहे. यास्तव पूर्वोक्त लक्षणेनें त्याचा त्याग केला असतां अंतःकरणावांचून राहणारें जें साक्षि चैतन्य तेंच ब्रह्म होय असा महा भाग्यवान् पुरुषास साक्षात्कार होतो. या साक्षात्काराचें निमित्त 'मी ब्रह्म आहें' हें महावाक्यच आहे. ॥ ८९ ॥

आतां पुनः पूर्वोक्त प्रकाराचेंच प्रतिपादन करितातः—

स्वप्रकाशोऽपि साक्ष्येव धीवृत्त्या व्याप्यतेऽन्यवत् ॥
फलव्याप्यत्वमेवास्य शास्त्रकृद्भिर्निवारितम् ॥ ९० ॥

अन्वय:—साक्षी स्वप्रकाशः अपि धीवृत्त्या अन्यवत् व्याप्यते एव । शास्त्रकृद्भिः अस्य फलव्याप्यत्वं एव निवारितं अस्ति ।

अर्थ:—साक्षी जरी स्वप्रकाश असला, तरी घटादिकांप्रमाणें बुद्धिवृत्ती-कडून व्यापिला जातोच. शास्त्रकारांनीं याच्या फलव्याप्तेचें मात्र निवारण केलें आहे. ॥ ९० ॥

विवरण:—साक्षी चिदात्मा स्वयंप्रकाश आहे, हें खरें. पण अज्ञानकृत आव-रणाचें निवारण करण्याकरितां बुद्धिवृत्तीची आवश्यकता आहे. व त्यामुळें तत्त्वम-स्यादि वाक्यांच्या विचारानें उत्पन्न होणारी जी शेवटची शुद्ध बुद्धिवृत्ति ती या अवशिष्ट राहणाऱ्या साक्षी चैतन्यास व्यापून सोडते. कशी व्यापून टाकिते म्हणून कोणी म्हणेल, म्हणून भारतीतीर्थांनीं येथें ' अन्यवत् ' असा दृष्टान्त दिला आहे. म्हणजे घटादि जड पदार्थांचें अज्ञानावरण नष्ट करून जशी बुद्धिवृत्ति त्यांस व्यापते, त्याप्रमाणें या साक्षीसही ती व्यापून सोडते.

शंका:—स्वप्रकाश आत्म्यासही जर बुद्धि वृत्ति घटादिकांप्रमाणें व्यापीत असेल, तर तो आत्मा घटादिकांप्रमाणें जड आहे, असें म्हणण्यास तरी काय हरकत आहे ?

समाधान:—साक्षिलक्षण असें जें हें ब्रह्म आहे तें अंतःकरणवृत्तिव्याप्य आहे. फलव्याप्य मात्र नाहीं. असें पूर्वीच्या सूत्रकारादि आचार्यांनीं म्हटलें आहे. फल म्हणजे अंतःकरणवृत्तीमध्यें प्रतिबिंबित होणारा चिदाभास. त्याच्या योगानें घटादि जड पदार्थ व्यापिले जातात. म्हणून त्यांस फलव्याप्य म्हटलें आहे. पण कूटस्थ

आत्मा स्वप्रकाश असल्यामुळें त्याला हें फल व्यापीत नाहीं. पण 'मी स्वप्रकाश ब्रह्म आहें' असें ज्ञान होण्यास बुद्धिवृत्तीची अपेक्षा आहे. यास्तव साक्षी आत्मा वृत्तिव्याप्य आहे व फलव्याप्य मात्र नाहीं; असा सिद्धांत ठरला. ॥ ९० ॥

वादी:—या तुमच्या पूर्व प्रतिपादनावरून घटादि पदार्थ वृत्तिव्याप्य व असावे असें भासतें, यास्तव खरा प्रकार काय आहे तो स्पष्टपणें सांगितल्यास बरें होईल.

सिद्धान्ती:—तुला भासतें ह्मणून जें तूं ह्मणतोस, तें खरेंच आहे. भास नव्हे. कसा ह्मणशील तर पहाः—

**बुद्धितत्स्थचिदाभासौ द्वावपि व्याप्नुतो घटम् ॥**
**तत्राज्ञानं धिया नश्येदाभासेन घटः स्फुरेत् ॥ ९१ ॥**

अन्वयः—द्वौ अपि बुद्धितत्स्थचिदाभासौ घटं व्याप्नुतः । तत्र धिया अज्ञानं नश्येत् च आभासेन घटः स्फुरेत् ।

अर्थः—बुद्धि व बुद्धिस्थचिदाभास असे दोन्ही घटास व्यापितात. त्यांतील बुद्धीच्या योगानें अज्ञान नष्ट होतें व आभासाच्या योगानें घट स्फुरतो. ॥९१॥

विवरण:—'नैयायिकांच्या मताप्रमाणें पाहिलें असतां इंद्रियें व विषय यांच्या सन्निकर्षापासून होणारें ज्ञान प्रत्यक्ष; परामर्शापासून होणारें ज्ञान अनुमान; इत्यादि ठरतें, हें खरें. पण ती ज्ञानाची सामान्य व्याख्या आहे. व ज्ञानामध्यें सूक्ष्म व सूक्ष्मतर भेद असल्यामुळें ज्ञानविशेषस्थळींही तीच लागू पडेल, असें ह्मणणें अयुक्त होय' असा भाव मनामध्यें धरून श्रीभारतीतीर्थ ह्मणतात—बुद्धिवृत्ति व बुद्धिवृत्तिस्थ चिदाभास हीं दोन्हीं जडविषयास व्यापतात. पण 'अशा प्रकारें दोन प्रकारच्या व्याप्तीचें ग्रहण करण्याचें कारण काय?' असें कोणी विचारतील ह्मणून उत्तरार्धांत त्याचें कारण सांगतात—प्रमाणभूत बुद्धिवृत्तीच्या योगान ज्या पदार्थाशीं तिचा संयोग झाला असेल, त्या पदार्थाविषयींचें अज्ञान नष्ट होतें आणि त्या वृत्तींतील चैतन्याच्या आभासानें घटाचें स्फुरण होतें. कारण घट स्वतः जड असल्यामुळें त्याचें स्फुरण [ भान ] दुसऱ्या स्फुरणवान् पदार्थावांचून होणें शक्य नाहीं. यास्तव कोणत्याही जड पदार्थाचें ज्ञान होण्यास बुद्धिवृत्ति व तिच्यांतील आभास यांची आवश्यकता आहे असें स्पष्ट झालें. ॥ ९१ ॥

वादीः—मग असें जर आहे तर घटादि जड पदार्थांच्या ज्ञानाप्रमाणें ब्रह्माच्या ज्ञानाअही या दोन प्रकारच्या व्याप्तीची आवश्यकता आहे, असें कां ह्मणत नाहीं?

सिद्धान्तीः—ब्रह्म व घटादि पदार्थ यांच्या ज्ञानांमध्यें थोडा फरक आहे. कसा ह्मणून ह्मणशील तर सांगतों, ऐकः—

**ब्रह्मण्यज्ञाननाशाय वृत्तिव्याप्तिरपेक्षिता ॥**

**स्वयंस्फुरणरूपत्वान्नाभास उपयुज्यते ॥ ९२ ॥**

अन्वयः—अज्ञाननाशाय ब्रह्मणि वृत्तिव्याप्तिः अपेक्षिता । किं तु स्वयंस्फुरण-रूपत्वात् आभासः न उपयुज्यते ।

अर्थः—अज्ञानाच्या नाशार्थ ब्रह्माच्या ठायीं वृत्ति व्याप्ति अपेक्षित आहे; पण तें स्वतः स्फुरणरूप असल्यामुळें तेथें आभासाचा कांहीं उपयोग नाहीं. ॥

विवरणः—प्रत्यगात्मा व ब्रह्म यांचें ऐक्य आहे. अशा प्रकारचें जें ज्ञान तें स्वरूपाच्या अज्ञानामुळें आवृत्त झालेलें ( झांकलेलें ) असतें; व त्या अज्ञानावरणाची निवृत्ति करण्यास्तव महावाक्याच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या बुद्धिवृत्तीची अपेक्षा असते. यास्तव आत्मसाक्षात्कारास बुद्धिवृत्तीची अपेक्षा आहे. पण साक्षी स्वतः स्फुरणरूप असल्यामुळें जड पदार्थांप्रमाणें त्याच्या स्फुरणास चिदाभासाच्या उसन्या स्फुरणाची अपेक्षा नसते. जेथें जेथें बुद्धिवृत्ति जाते, तेथें तेथें तोही जातो हें खरें; पण त्याचा स्फुरणरूप पदार्थांच्या ठायीं कांहीं उपयोग होत नाहीं, असा याचा भावार्थ समजावा. ॥ ९२ ॥

पूर्वोक्त सिद्धांत दृष्टान्त देऊन सिद्ध करितातः—

**चक्षुर्दीपावपेक्ष्येते घटादेर्दर्शने यथा ॥**

**न दीपदर्शने किं तु चक्षुरेकमपेक्ष्यते ॥ ९३ ॥**

अन्वयः—यथा घटादेः दर्शने चक्षुर्दीपौ अपेक्ष्येते तथा दीपदर्शने न । किं तु एकं चक्षुः अपेक्ष्यते ।

अर्थः—जशी घटादि पदार्थांच्या दर्शनास नेत्र व दीप या दोघांची अपेक्षा असते तशी दीपदर्शनास नसते. तर एका चक्षूचीच अपेक्षा असते. ॥ ९३ ॥

विवरण:—अंधकारांत असलेले घटादि पदार्थ ज्याला पाहावयाचे असतात, तो दीप व नेत्र या दोन्ही साधनांची अपेक्षा करितो. कारण दिव्याच्या योगानें अंधकाराचा नाश झाल्यावर नेत्र पदार्थास पाहूं शकतात. पण दिवा पाहातांना तो अंधकारावृत नसल्यामुळें नुस्त्या डोळ्यांनींच त्याचें दर्शन होतें. व हाच प्रकार ब्रह्मज्ञानाविषयींही समजावा. या दृष्टांतांतील नेत्र, दीप व अज्ञान यांच्या ठायीं क्रमानें दार्ष्टांतिकांतील बुद्धिवृत्ति, आभास व अस्फुरण घ्यावें म्हणजे कांहीं शंका रहाणार नाहीं. ॥ ९३ ॥

वादी:—ब्रह्माच्या ठायीं फलव्याप्ति जरी तुम्ही न मानलीत तरी ती अवश्य येईलच. कारण वृत्तीच्या बरोबर चिदाभास जात असल्यामुळें, ज्या ज्या पदार्थांस ती व्यापील त्याला त्याला तो आभासही व्यापिल्यावांचून रहाणार नाहीं.

सिद्धान्ती:—तूं म्हणतोस तें खरें. पण त्या आभासाच्या व्याप्तीचा स्वयंप्रकाश पदार्थाचे ठायीं कांहीं उपयोग होत नाहीं. कसा म्हणून विचारशील तर दृष्टांत देऊन सांगतों, ऐक:—

**स्थितोऽप्यसौ चिदाभासो ब्रह्मण्येकीभवेत्परम् ॥**
**न तु ब्रह्मण्यतिशयं फलं कुर्याद्घटादिवत् ॥ ९४ ॥**

अन्वय:—अयं चिदाभास: स्थित: अपि ब्रह्मणि परं एकीभवेत् तु घटादिवत् ब्रह्मणि अतिशयं फलं न कुर्यात् ।

अर्थ:—हा चिदाभास जरी असला तरीही तो ब्रह्मामध्यें अगदीं मिळून जातो. तो घटादि पदार्थांप्रमाणें ब्रह्माच्या ठायीं अतिशयाख्य फळ उत्पन्न करीत नाहीं. ॥ ९४ ॥

विवरण:—वृत्तीच्या बरोबर चिदाभासही पदार्थापर्यंत जातो. पण स्वयंप्रकाश ब्रह्माच्या ठायीं त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. याला उदाहरण:—मध्यान्हसमयीं प्रखर उन्हामध्यें जर कोणीं एखादा दिवा लावून ठेविला, तर त्याचा त्या उन्हापुढें प्रकाश पडून तो उन्हाच्या ज्ञानास साह्य करील का? कधींही नाहीं. पण तेंच तो दीप अंधकार पसरला आहे, तेथें न्या. म्हणजे तो आपला प्रभाव कसा दाखविते हें समजेल. अथवा आरशामध्यें सूर्याचें प्रतिबिंब घेऊन त्याचे किरण जेथें

अंधकार आहे अशा एकाद्या अंधार कोठडींत पाडा; ह्मणजे तें प्रतिबिंब अंधकारास हटवून तेथील पदार्थ व्यक्त करीत आहे असें तुह्मांस दिसेल. पण तेंच प्रतिबिंब सूर्याच्या समोर पाडा ह्मणजे तें निस्तेज होऊन सूर्याच्या प्रखर प्रकाशांत मिळून गेलें आहे असें दिसेल. त्याच्यामुळें सूर्यामध्यें काहीइतका तरी फरक पडला आहे असें तुह्मांस ह्मणतां येणार नाहीं. प्रस्तुत स्थळींही हाच न्याय लागू होतो. ह्मणजे ब्रह्माकार बुद्धिवृत्तीमध्येंही स्वभावतः रहाणारा चिदाभास, ब्रह्माच्या समोर जातांच तदाकार होऊन जातो. व ब्रह्माच्या स्वरूपांत यत्किंचित्‌ही फरक पाडण्याचें त्याच्यामध्यें सामर्थ्य नसतें. ॥ ९४ ॥

ह्या आमच्या ह्मणण्यास श्रुतींचाही आधार आहे, असें आतां दाखवितात:–

**अप्रमेयमनादिं चेत्यत्र श्रुत्येदमीरितम् ॥**
**मनसैवेदमाप्तव्यमिति धीव्याप्यता श्रुता ॥ ९५ ॥**

अन्वय:—अप्रमेयं अनादिं च इत्यत्र श्रुत्या इदं ईरितं अस्ति तथा मनसा एव इदं आप्तव्यं इति धीव्याप्यता श्रुता अस्ति ।

अर्थ:—'तें अप्रमेय व अनादि आहे.' या स्थळीं श्रुतीनें फलव्याप्तिराहित्य व 'मनानेंच तें ग्रहण करितां येण्यासारखें आहे.' असें सांगून त्याची बुद्धिव्याप्यता सांगितली आहे. ॥ ९५ ॥

विवरण:—अमृतबिंदु नामक उपनिषदामध्यें एक मंत्र आहे तो, असा:–

'निर्विकल्पमनंतं च हेतुदृष्टान्तवर्जितम् । अप्रमेयमनादिं च यज्ज्ञात्वा मुच्यते बुधः'

याचें तात्पर्य:–विकल्परहित, अनंत, हेतु व दृष्टान्त यांनीं शून्य, अप्रमेय व अनादि असें जें ब्रह्म, त्याचा साक्षात्कार झाला असतां ज्ञानी मुक्त होतो. या स्थळीं ब्रह्म प्रमाणशून्य असल्यामुळें फलव्याप्तिरहित आहे असें व्यक्त होतें. त्याचप्रमाणें कठोपनिषदांत "मनसैवेदमाप्तव्यं नेह नानास्ति किंचन" असें वचन आहे. व त्याचा भावार्थ–मनानेंच हें ग्रहण करितां येण्यासारखें आहे. या सृष्टींत द्वैत मुळींच नाहीं–असा आहे. या वचनावरून महावाक्यजन्य शुद्ध बुद्धिवृत्तीच्या योगानें ब्रह्म व्याप्त होतें, असें ठरतें. ॥ ९५ ॥

असो; ह्याप्रमाणें वादग्रस्त विषयाची समाप्ति करून आतां पुनरपि या श्लोकांत—प्रकरणाच्या आरंभीं जी श्रुति घेतली होती तिच्या पूर्वार्धाचा अर्थ अपरोक्ष ज्ञान हाच आहे, असें एवढा वेळ होऊन गेलेल्या ग्रंथानें सिद्ध केलें. व शब्दाच्या योगानें अपरोक्ष ज्ञान होतें असेंही ठरविलें, असें सांगतातः—

**आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति वाक्यतः ॥**
**ब्रह्मात्मव्यक्तिमुल्लिख्य यो बोधः सोऽभिधीयते ॥ ९६ ॥**

अन्वयः—' आत्मानं चेद्विजानीयादयमस्मि ' इति वाक्यतः ब्रह्मात्मव्यक्तिं उल्लिख्य यः बोधः जायते सः अनेन अभिधीयते ।

अर्थः—' आत्मानं........अस्मि ' या वाक्यावरून सत्यादि लक्षण ब्रह्मच आत्मा आहे, असें आत्मस्वरूप जाणून जो बोध उत्पन्न होतो, तोच या वाक्यानें सांगितला जात आहे. ॥ ९६ ॥

विवरणः—श्रुतिवाक्यांचें श्रवण होऊन त्याविषयीं योग्य दिशेनें विचार केला असतां ब्रह्मात्मसाक्षात्कार होतो ह्मणजे 'मीच ब्रह्म आहें' असें साधकास निश्चयपूर्वक समजतें. ह्याप्रमाणें होणारा जो वाक्यजन्य अपरोक्ष बोध, त्याचेंच या श्रुतीनें प्रतिपादन केलें आहे. ह्मणजे प्रस्तुत श्रुतीचा अशा प्रकारचा बोध. हाच अर्थ होय. ॥ ९६ ॥

वादीः—वाक्याच्या श्रवणावरूनच जर अपरोक्ष साक्षात्कार होत असेल तर व्यासादिकांनीं श्रवणादिकांची आवृत्ति करावयास जें सांगितलें आहे, तें व्यर्थच होय; असें ह्मणावें लागतें. समाधानः—असें नव्हे. आवृत्ति करण्याचें कारण काय आहे तें सांगतों. ऐकः—

**अस्तु बोधोऽपरोक्षोऽत्र महावाक्यात्तथाऽप्यसौ ॥**
**न दृढः श्रवणादीनामाचार्यैः पुनरीरणात् ॥ ९७ ॥**

अन्वयः—अत्र महावाक्यात् अपरोक्षः बोधः अस्तु तथापि असौ दृढः न भवति आचार्यैः श्रवणादीनां पुनः ईरणात् ।

अर्थः—या ब्रह्मात्मविषयामध्यें महावाक्यावरून अपरोक्ष बोध होतो, तरी पण तो दृढ होत नसतो. एवढ्याकरितां आचार्यांनीं श्रवणादिकांचें पुनरपि विधान केलें आहे. ॥ ९७ ॥

विवरणः—श्रीमत् वेदव्यास, श्रीमत् शंकराचार्य इत्यादि पूज्य व सर्वज्ञ पुरुषांनीं श्रवणादि मुख्य साधनांची पुनः पुनः आवृत्ति करण्याविषयीं जें सांगितलें आहे, तें वाक्यावरून एकदा झालेलें अपरोक्ष ज्ञान दृढ होण्याकरितां होय. कारण अपरोक्ष ज्ञान जर दृढ न झालें, तर अन्त्य कालीं इंद्रियादि व्याकुळ झालीं असतां इष्ट अन्त्य मति उत्पन्न होणार नाहीं; व त्यामुळें इष्ट सिद्ध होणार नाहीं; या ग्रंथाच्या द्वितीय प्रकरणाच्या १०६ व्या श्लोकामध्यें विद्यारण्यांनीं जें सांगितलें आहे कीं–'त्यानें कोणत्याही अवस्थेंत जरी प्राण सोडले तरी गेलेली भ्रांति पुनः येत नाहीं' त्यांच्याशीं ह्या श्लोकाचा विरोध आहे, असें कोणास वाटेल, परंतु तें बरोबर नाहीं; कारण बोध दृढ झाल्यावांचून भ्रांतीचा अत्यंत नाश होणें शक्य नाहीं. व जोंपर्यंत तिचा सकारण नाश झाला नाहीं, तोंपर्यंत तिची सामग्री जमली असतां ती पुनः उत्पन्न होणार नाहीं, हें म्हणणेंही युक्त नाहीं, तस्मात् ब्रह्मात्मैक्य बोध दृढ झाला पाहिजे. त्यावांचून परम पुरुषार्थाची प्राप्ति होणें कठिण आहे. ॥ ९७ ॥

आचार्यांनीं प्रस्तुत विधान कोठें केलें आहे असें कोणी विचारील म्हणून त्यांचें बृहद्वाक्यवृत्तींतील एक वचन येथें देतात.—

अहं ब्रह्मेति वाक्यार्थबोधो यावद्दृढीभवेत् ॥
शमादिसहितस्तावदभ्यसेच्छ्रवणादिकम् ॥ ९८ ॥

अन्वयः—यावत् 'अहं ब्रह्म' इति वाक्यार्थ बोधः दृढीभवेत् तावत् शमादिसहितः सन् श्रवणादिकं अभ्यसेत् ।

अर्थः—'मी ब्रह्म आहें' असा वाक्यार्थबोध दृढ होई तोंपर्यंत साधकानें शमादि युक्त होऊन श्रवणादिकांचा अभ्यास करावा. ॥ ९८ ॥

विवरणः—ज्या व्युत्पन्न पुरुषांस शब्दार्थ समजूं लागतो, तेही उदरभरणार्थ यावज्जीव श्रवणादिक करीत असतात. पण त्यांत त्यांचा हेतु अन्य असल्यामुळें त्यांस त्यांचें फल मिळत नाहीं, यास्तव साधकानें शमादि संपन्न राहूनच ज्ञान दृढ होण्यास्तव श्रवणादिक करावें, असा याचा भावार्थ होय. ॥ ९८ ॥

१ येथें श्रवणाचा अर्थ व्याख्यान असा करावा.

वादी:—ह्मणजे वाक्यार्थज्ञानाचा अनिश्चय होण्यास कांहीं निमित्त आहे कीं काय ?

सिद्धांती:—होय.

**बाढं सन्ति ह्यदार्ढ्यस्य हेतवः श्रुत्यनेकता ॥**
**असंभाव्यत्वमर्थस्य विपरीता च भावना ॥ ९९ ॥**

अन्वय:—हि श्रुत्यनेकता, अर्थस्य असंभाव्यत्वं, च विपरीता भावना इति अदार्ढ्यस्य हेतवः बाढं सन्ति ( अतः दार्ढ्याय श्रवणादिकं आवर्तनीयम्। )

अर्थ:—ज्या अर्थी श्रुतींची अनेकता, त्यांच्या अर्थाचें असंभवनीयत्व व विपरीत भावना असे अदृढतेचे अनेक हेतु आहेत, ( त्या अर्थी दृढतेकरितां श्रवणादिकांची आवृत्ति करावी. ) ॥ ९९ ॥

विवरण:—जरी साधकानें 'मी ब्रह्म आहें' इत्यादि वाक्यें ऐकलीं तरी श्रुति असंख्य असल्यामुळें व त्या परस्पर विरुद्ध अर्थ प्रतिपादन करीत आहेत असें सामान्यत: वाटण्याचा संभव असल्यामुळें, वरील वाक्याविषयीं साधक साशंक होतो, हें अनिश्चयाचें पहिलें कारण. पूर्वोक्त वाक्यासारखीं वाक्यें जो अर्थ दाखवितात तो अलौकिक असल्यामुळें व्यावहारिक प्रत्यक्ष ज्ञानाच्या विरुद्ध आहे, असा भास होतो व त्यामुळें तो अर्थ असंभवनीय आहे असें तो ह्मणतो, हें दुसरें; शिवाय मी कर्ता, मी विद्वान, इत्यादि प्रकारची विपरीत भावना तर बिचाऱ्या प्राण्याच्या मागें हात धुवून लागलीच आहे. सारांश, ज्ञान दृढ न होण्यास असे अनेक हेतु असल्यामुळें तें अपरोक्ष ज्ञान दृढ होण्यास्तव श्रवणादि साधनांची सतत आवृत्ति करीत असावें, असा याचा भावार्थ होय. ॥ ९९ ॥

ह्याप्रमाणें अपरोक्ष ज्ञान दृढ न होण्यास तीन कारणें आहेत, असें सांगून प्रथमकारणाची निवृत्ति होण्यास्तव सतत श्रवण करण्याविषयीं विधान करितात:—

**शाखाभेदात्कामभेदाच्छ्रुतं कर्मान्यथान्यथा ॥**
**एवमत्रापि मा शंकीत्यतः श्रवणमाचरेत् ॥ १०० ॥**

अन्वय:—शाखाभेदात् कामभेदात् कर्म अन्यथा अन्यथा श्रुतं। एवं अत्र अपि इति मा शंकि इति असौ श्रवणं आचरेत्।

अर्थः—शाखाभेद व कामभेद यांच्या योगानें कर्मे निरनिराळ्या प्रकारचें श्रुत आहे तसेंच येथेंही असेल, अशी साधकास शंका येऊं नये ह्मणून त्यानें श्रवण करावें. ॥ १०० ॥

विवरणः—कर्मकांडामध्यें शाखाभेदप्रयुक्त व कामभेद प्रयुक्त भिन्न भिन्न कर्मे सांगितलेलें आढळतें. तसाच प्रकार या ज्ञानकांडांत असल्यामुळें श्रुति भिन्न भिन्न उपदेश करीत आहे, असें साधकास वाटेल, पण तें बरोबर नाहीं. कारण कामना भिन्न भिन्न असल्यामुळें कर्म भिन्न भिन्न होणें साहजिक आहे. त्याचप्रमाणें शाखाभेदामुळेंही कर्मामध्यें अंतर पडणें शक्य आहे. पण ज्ञानाची तशी गोष्ट नाहीं. कारण 'ज्ञान वस्तुतंत्र आहे. प्रमाणतंत्र नव्हे' असें भाष्यकारांनीं शारीरकांत ह्मटलें आहे. यास्तव साधकानें श्रुतीच्या अनेकत्वामुळें उत्पन्न होणारा अनिश्चय घालविण्याकरितां वारंवार श्रवण करावें. ॥ १०० ॥

आतां श्रवण ह्मणजे काय तें सांगतात:—

वेदांतानामशेषाणामादिमध्यावसानतः ॥
ब्रह्मात्मन्येव तात्पर्यमिति धीः श्रवणं भवेत् ॥ १ ॥

अन्वयः—अशेषाणां वेदान्तानां आदिमध्यावसानतः ब्रह्मात्मनि एव तात्पर्यं इति धीः श्रवणं भवेत् ।

अर्थः—सर्व वेदान्तांचें, आरंभ, मध्य व अंत यांच्या योगानें, ब्रह्मात्म्यामध्येंच तात्पर्य आहे अशी बुद्धि हेंच श्रवण होय. ॥ १ ॥

विवरणः—चारी वेदांचीं जीं उपनिषदें आहेत, त्या सर्वांचें तात्पर्य ब्रह्म व आत्मा यांच्या ऐक्यप्रतिपादनामध्यें आहे, असें उपक्रमोपसंहार, अभ्यास, फल इत्यादि तात्पर्यबोधक चिन्हांवरून ठरविणें हेंच श्रवण होय. याच्या योगानें श्रुति अनेक आहेत व त्या अनेक प्रकारचा बोध करीत आहेत, ही भावना नष्ट होते; आणि सर्व श्रुतींचें साक्षात् किंवा परंपरेनें ब्रह्मात्मैक्यामध्येंच तात्पर्य आहे, असा दृढ निश्चय होतो. ॥ १०१ ॥

अशा प्रकारचें श्रवण कोठें सांगितलेलें आहे तें आतां सांगतात:—

**समन्वयाध्याय एतत्सूक्तं धीस्वास्थ्यकारिभिः ॥**
**तर्कैः संभावनाऽर्थस्य द्वितीयाध्याय ईरिता ॥ २ ॥**

अन्वय:—एतत् समन्वयाध्याये सूक्तं अस्ति। द्वितीयाध्याये धीस्वास्थ्यकारिभिः तर्कैः अर्थस्य संभावना ईरिता।

**अर्थ:—हें उत्तरमीमांसेच्या समन्वय नामक प्रथम अध्यायांत उत्तम प्रकारें सांगितलें आहे. दुसऱ्या अध्यायांत बुद्धीचें समाधान करविणाऱ्या तर्कांच्या योगानें शास्त्रार्थाची संभावना सांगितली आहे. ॥ १०२ ॥**

विवरण:—उत्तरमीमांसा ह्मणजे वेदान्त शास्त्र. त्याचे चार अध्याय असून प्रत्येक अध्यायाचे चार पाद आहेत. प्रथम अध्यायास समन्वयाध्याय, दुसऱ्यास अविरोधाख्याध्याय, तिसऱ्यास साधनाध्याय व चवथ्यास फलाध्याय असें ह्मणतात. पहिल्या अध्यायांत सर्व उपनिषद्वाक्यांचा समन्वय केला आहे. दुसऱ्यांत श्रुतिप्रोक्त अर्थ तर्कांनेंही सिद्ध होतो व त्याचा कोणत्याही स्मृतीशीं विरोध नाहीं, असें दाखविलें आहे. तिसऱ्यांत वैराग्यादि साधनें व चौथ्यांत अनेकविध फल सांगितलें आहे. यास्तव ज्याला पूर्वोक्त श्रवण पाहिजे असेल त्यानें समन्वयाध्यायाचा अभ्यास करावा. कारण श्रीमद्व्यास, श्रीमच्छंकराचार्य इत्यादि पूज्य पुरुषांनीं त्याचा तेथें उत्तम प्रकारें उल्लेख केला आहे. व दुसऱ्या अध्यायांत श्रुतिसिद्ध अर्थ संभवतो असें दाखविलें आहे. कारण अनेक तर्क करण्याचीच ज्यांस संवय आहे त्यांच्या बुद्धीचें समाधान तर्कांवांचून होणार नाहीं. असें जाणून पूर्वोक्त आचार्यांनींही श्रुतीला अनुकूल असे तर्क करण्याची दिशा दाखविली आहे. सारांश, अशा प्रकारच्या ग्रंथावलोकनानें श्रुति अनेक प्रकार सांगत आहे, ही शंका निवृत्त होते. ॥ १०२ ॥

आतां प्रथमत: दोन प्रकारच्या भावनेचा निर्देश करितात:—

**बहुजन्मदृढाभ्यासाद्देहादिष्वात्मधीः क्षणात् ॥**
**पुनः पुनरुदेत्येवं जगत्सत्यत्वधीरपि ॥ ३ ॥**

अन्वय:—बहुजन्मदृढाभ्यासात् देहादिषु आत्मधीः क्षणात् उदेति। एवं जगत्सत्यत्वधीः अपि पुनः पुनः उदेति।

अर्थः—अनेक जन्मींच्या दृढ अभ्यासामुळें देहादिकांच्यां ठायीं तत्क्षणीं आत्मबुद्धि उत्पन्न होते. त्याचप्रमाणें जग सत्य आहे, ही बुद्धिही पुनः पुनः उत्पन्न होते. ॥ १०३ ॥

विवरणः—विपरीत भावना दोन प्रकारची असते. एक साधनविपरीतभावना व दुसरी फलविपरीतभावना. व ही दोन प्रकारची भावनाच या श्लोकांत दाखविली आहे. देहच आत्मा आहे त्याहून अन्य व देहादिकांचा चिन्मात्र साक्षी असा दुसरा कोणी नाहीं, असें वाटणें ही पहिली व हें द्वैतच सत्य आहे, ब्रह्मानंदलक्षण कैवल्य नव्हे, ही दुसरी भावना होय. ॥ १०३ ॥

आतां या उभयविध भावनांच्या निवृत्तीचा उपाय सांगतातः—

**विपरीता भावनेयमैकाग्र्यात्सा निवर्तते ॥**
**तत्त्वोपदेशात्प्रागेव भवत्येतदुपासनात् ॥ ४ ॥**

अन्वयः—या इयं विपरीता भावना सा ऐकाग्र्यात् निवर्तते । एतत् तत्त्वोपदेशात् प्राक् एव उपासनात् भवति ।

अर्थः—ही जी विपरीत भावना आहे ती ऐकाग्र्याच्या योगानें निवृत्त होते. व हें एकाग्र्य तत्त्वोपदेशाच्या पूर्वीच उपासनेच्या योगानें होतें. ॥ १०४ ॥

विवरणः—चित्ताच्या एकाग्रतेचा निर्देश श्रीविद्यारण्यांनीं द्वितीय प्रकरणाच्या बहात्तर व त्र्याहात्तर श्लोकांत केला आहे. चित्त एकाग्र झालें असतां पूर्वोक्त दोन्ही प्रकारची विपरीत भावना नष्ट होते. पण चित्ताचें ऐकाग्र्य कसें होईल ? असें कोणी विचारतील म्हणून ग्रंथकार सांगतात कीं, सगुण व निर्गुण ब्रह्म, दहर, प्रतीक इत्यादि ज्या अनेक प्रकारच्या उपासना आहेत. त्यांतील कोणतीही एकादी उपासना करून तिच्या द्वारा चित्ताची एकाकार वृत्ति संपादन करण्याकरितां पुनः पुनः प्रयत्न केला असतां तत्त्वज्ञानाचा उपदेश होण्यापूर्वीच चित्तैकाग्र्य होतें. सारांश, चित्तैकाग्र्याच्या योगानें पूर्वोक्त विपरीत भावना नष्ट होतात. ॥ १०४ ॥

पण असें होतेंच म्हणून कशावरून असें कोणी विचारील म्हणून श्री भारतीतीर्थ म्हणतातः—

**उपास्तयोऽत एवात्र ब्रह्मशास्त्रेऽपि चिंतिताः ॥**
**प्रागनभ्यासिनः पश्चाद्ब्रह्माभ्यासेन तद्भवेत् ॥ ५ ॥**

अन्वयः—अतः एव अत्र ब्रह्मशास्त्रे उपास्तयः अपि चिंतिताः । प्राग् अनभ्यासिनः पश्चात् ब्रह्माभ्यासेन तत् भवेत् ।

**अर्थः—एवढ्याकरितां या ब्रह्मशास्त्रामध्यें उपासनांचाही विचार केला आहे. जे पूर्वी अभ्यास करीत नाहींत, त्यांच्या चित्ताचें ऐकाग्र्य मागून ब्रह्माभ्यासानें होतें. ॥ १०५ ॥**

विवरणः—या ब्रह्मशास्त्रामध्यें ( शारीरकांत ) तिसऱ्या अध्यायांत उपासनांचा विचार केला आहे. त्यावरून पूर्वोक्त प्रकार सिद्ध होतो. ब्रह्मज्ञानामध्यें प्रवृत्त होण्यापूर्वी ज्यांनीं उपासना केलेली नसते त्यांच्या चित्ताचें ऐकाग्र्य तत्त्वोपदेशानंतर ब्रह्मज्ञानाच्या अभ्यासानें होतें. विद्येचा अधिकारी दोन प्रकारचा असतो. ज्यानें उपासना केली आहे असा एक व ज्यानें ती केलेली नाहीं असा दुसरा. त्यांतील उपास्य देवतेचा साक्षात्कार होईतों उपासना करून जर अधिकारी पुरुष ज्ञानामध्यें प्रवृत्त झाला, तर त्याचा वासनाक्षय व मनोनाश दृढ झालेला असल्यामुळें ज्ञानानंतर त्याचा विद्वत्संन्यास व जीवनमुक्ति हीं आपोआप सिद्ध होतात, व शास्त्रास मान्य असलेला असा हाच मुख्य अधिकारी होय. पण आज काल अशा प्रकारचे अधिकारी फारसे आढळत नाहींत. प्रायः उपासना केल्यावांचून केवल उत्सुकतेनें विद्येमध्यें प्रवृत्त होणारेच फार. ते तात्कालिक वासनाक्षय व मनोनाश संपादन करून श्रवणादि साधनांमध्यें निमग्न होतात. श्रवणादि साधनांचा दृढ अभ्यास झाल्यानें त्यांनाही अज्ञानादिकांच्या नाशानंतर तत्त्वज्ञान होतें. व त्यास बाध करणाऱ्या अज्ञानादिकांची पुनः उत्पत्ति होत नसल्यामुळें तें ज्ञान पुनरपि शिथिलही होत नाहीं; हें सर्व खरें. पण वासनाक्षय व मनोनाश यांविषयीं त्यांचा दृढ अभ्यास झालेला नसल्यामुळें प्रारब्धकर्मवशात् त्यांची वारंवार निर्वृत्ति होते. ( ह्मणजे वासना उत्पन्न होते व मन चंचल होतें. ) व त्यामुळें ज्ञानानंतर वासनादि क्षयाविषयीं सतत प्रयत्न न केल्यास असल्या संन्याशांस जीवन्मुक्तीचा लाभ होत नाहीं. वास्तव आधुनिक संन्याशांस तत्त्वज्ञानानंतरही ब्रह्मचिंतन सतत केलें पाहिजे. त्यावांचून त्यांच्या चित्ताचें ऐकाग्र्य होणार नाहीं. ॥ १०५ ॥

ब्रह्मचिंतन सतत कसें करावें, तें आतां सांगतातः—

**तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् ॥**
**एतदेकपरत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ॥ ६ ॥**

अन्वयः—तच्चिंतनं तत्कथनं अन्योन्यं तत्प्रबोधनं च एतदेकपरत्वं बुधाः ब्रह्माभ्यासं विदुः।

अर्थः—त्याचें चिंतन, त्याचें वर्णन, परस्पर त्याचाच उपदेश, व (ह्याप्रमाणें) केवल त्याच्यामध्येंच तल्लीन होऊन राहणें, यास ज्ञानी ब्रह्माभ्यास असें ह्मणतात. ॥ १०६ ॥

विवरणः—एकांतांत बसून गुरुमुखानें ज्याचें श्रवण झालें आहे, अशा ब्रह्माचेंच चिंतन करणें; त्याचेंच कीर्तन करीत असणें, बरोबरीचा कोणी भेटला असतां एकमेकांस त्याचाच बोध करणें व ह्याप्रमाणें केवल ब्रह्ममय होऊन राहणें, हाच ब्रह्माभ्यास होय. ह्मणजे ज्याप्रमाणें एकादा विषयी पुरुष विषयमय होऊन जातो व त्यास त्या इष्ट विषयापुढें दुसरें कांहीं सुचत नाहीं, त्याप्रमाणें साधकानें ब्रह्ममय होऊन राहावें व अन्नादि अति अवश्य पदार्थही नीरस आहेत असें समजावें. ही अवस्था प्राप्त झाली असतां जरी तो संन्यासकाळीं दुसऱ्या प्रकारचा (गौण) अधिकारी असला, तरी ज्ञानानंतर उत्तम सिद्ध होतो. ह्मणजे त्याच्या चित्ताचें निश्चल ऐकाग्र्य होतें. १०६

केवल ब्रह्मपर होऊन कसें राहावें तें स्पष्ट करितातः—

**तमेवधीरो विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत ब्राह्मणः ॥**
**नानुध्यायाद्बहूञ्छब्दान्वाचो विग्लापनं हि तत् ॥ ७ ॥**

अन्वयः—धीरः ब्राह्मणः तं एव विज्ञाय प्रज्ञां कुर्वीत। बहून् शब्दान् न अनुध्यायात्। हि तत् वाचः विग्लापनं अस्ति।

अर्थः—धीर मुमुक्षूनें त्यालाच जाणून चित्तैकाग्र्य करून ध्यावें. पुष्कळ शब्दांचें अध्ययन करूं नये. कारण बहुत अध्ययन वाणीस शिथिल करितें.

विवरणः—धीरः—ब्रह्मचर्यादिकांच्या योगानें युक्त. ब्राह्मणः—ब्रह्म होण्याची इच्छा करणारा मुमुक्षु. तं एव—अखंड आत्म्यालाच; विज्ञाय—निःसंशय साक्षात्कार

करून घेऊन; प्रज्ञां कुर्वीत–ब्रह्म व आत्मा यांचें ऐक्य आहे अशा प्रकारच्या ज्ञानाच्या प्रवाहानें भरलेलें चित्ताचें ऐकाग्र्य संपादन करावें. उगीच अनेक शब्द घोकीत बसूं नये. कारण असंख्य शब्दांचें स्मरण केल्यानें मन थकतें व असंख्य शब्द घोकीत बसल्यानें वाणी थकते. यास्तव एकाच तत्त्वाचें सतत अनुसंधान करीत राहावें. ॥ १०७ ॥

गेला श्लोक श्रुतिरूप होता. यास्तव तें ऐकाग्र्याविषयीं श्रौत प्रमाण झालें. आतां स्मृतिप्रमाण देतातः—

अनन्याश्चिंतयन्तो मां ये जनाः पर्युपासते ॥
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ ८ ॥

अन्वयः—अनन्याः चिंतयन्तः ये जनाः मां पर्युपासते तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं अहं वहामि ।

अर्थः—अनन्य होऊन चिंतन करणारे जे लोक माझी उपासना करितात, त्या नित्य योग्यांचा योगक्षेम मी चालवितों. ॥ १०८ ॥

विवरणः—अनन्याः–मी ब्रह्म आहें असें समजून व मद्रूप होऊन जे माझें चिंतन करितात व पर्युपासते—सर्व काल माझीच उपासना करितात त्या माझ्या स्वरूपांत तल्लीन होऊन राहणाऱ्या माझ्या भक्तांचा योगक्षेम कसा चालेल याविषयीं मी काळजी वाहातों. योग—जें प्राप्त नाहीं त्याची प्राप्ति व क्षेम—जें प्राप्त आहे त्याचें रक्षण. हा श्लोक भगवद्गीतेंतील आहे हें बहुश्रुत वाचकांच्या ध्यानांत येईलच.

तात्पर्य.—

इतिश्रुतिस्मृती नित्यमात्मन्येकाग्रतां धियः ॥
विधत्तो विपरीताया भावनायाः क्षयाय हि ॥ ९ ॥

अन्वय—इति श्रुतिस्मृती विपरीतायाः भावनायाः क्षयाय हि आत्मनि धियः एकाग्रतां नित्यं विधत्तः ।

अर्थः—याप्रमाणें श्रुति व स्मृति विपरीत भावनेच्या क्षयाकरितां आत्म्याच्या ठायीं बुद्धीच्या एकाग्रतेचें नित्य विधान करितात. ॥ १०९ ॥

विवरण:—दोन प्रकारच्या विपरीत भावनेचा क्षय होण्यास्तव चित्ताचें ऐकाग्र्य संपादिलें पाहिजे असें जें पूर्वी म्हटलें होतें, तेंच येथें श्रुति व स्मृति यांचें प्रमाण देऊन दृढ केलें आहे. ॥ १०९ ॥

देहच आत्मा आहे व द्वैत सत्य आहे अशा प्रकारच्या सामान्य समजुतीस विपरीत भावाना ह्मणण्याचें कारण काय असें कोणी विचारील ह्मणून या श्लोकांत विपरीत भावनेचें लक्षण सांगतात:—

**यद्यथा वर्तते तस्य तत्त्वं हित्वाऽन्यथात्वधीः ॥**
**विपरीता भावना स्यात्पित्रादावरिधीर्यथा ॥ ११० ॥**

अन्वयः—यत् यथा वर्तते तस्य तत्त्वं हित्वा अन्यथात्वधीः विपरीता भावना । यथा पित्रादौ अरिधीः ।

अर्थ:—जें जसें असतें त्याचें तें तत्त्व सोडून त्याविषयीं अन्यथा बुद्धि करणें ही विपरीत भावना होय. अशी पिता, माता इत्यादिकांच्या ठायीं शत्रुबुद्धि. ॥ ११० ॥

विवरण:—शिंप, दोरी इत्यादि पदार्थ शिंप, दोरी इत्यादि प्रकारचेच असतात. अर्थात् तेंच त्यांचें तत्त्व होय. पण तें सोडून त्यांविषयीं रजत, सर्प इत्यादि कल्पना करणें ही विपरीत भावना होय. तसेंच पिता, माता, इत्यादि पुत्राचे शत्रु नव्हेत हें कोणीही सांगेल, पण त्यांच्या ठायीं कृतघ्नपणें शत्रुत्वाची कल्पना करणें, हा अन्यथाभाव होय व त्यामुळें ती विपरीत भावना आहे. ॥ ११० ॥

आतां हें लक्षण आत्म्याच्या ठायीं योजून दाखवितात:—

**आत्मा देहादिभिन्नोऽयं मिथ्या चेदं जगत्तयोः ॥**
**देहाद्यात्मत्वसत्यत्वधीर्विपर्ययभावना ॥ ११ ॥**

अन्वय:—देहादिभिन्नः अयं आत्मा च इदं मिथ्या जगत् तयोः देहाद्यात्मत्व-सत्यत्वधीः विपर्ययभावना अस्ति ।

अर्थ—देहादिकांहून भिन्न असा हा आत्मा व हें मिथ्या जगत् यांच्या-ठायीं देहादिरूपत्व व सत्यत्वबुद्धि करणें हीच विपरीत भावना होय. ॥ १११ ॥

विवरण:—शास्त्र व आत्मानुभवी पुरुष यांच्या दृष्टीनें पाहिलें असतां आत्मा देहाहून भिन्न व हें जग मिथ्या आहे, असें निःसंशय समजतें. अर्थात् तीच वस्तुस्थिति होय. पण शास्त्रादिकांच्या दृष्टीनें न पाहतां जो या मायिक दुष्ट दृष्टीनें पहातो, त्यास देह हाच आत्मा व जग सत्य आहे असें भान होतें. आत्मा व जग यांविषयीं हीच विपरीत भावना होय. जगांतील बहुतेक प्राणी हिच्या तडाख्यांत सांपडलेले असतात. व त्यामुळें आत्म्याचें यथार्थज्ञान ज्याला झालें आहे असा महापुण्यवान् पुरुष क्वचि-त्च आढळतो. नाहींच म्हटलें तरी चालेल. ॥ १११ ॥

आतां या विपरीत भावनेच्या नाशार्थ कोणता उपाय करावा, तें सांगतात:—

**तत्त्वभावनया नश्येत्साऽतो देहातिरिक्तताम् ॥**
**आत्मनो भावयेत्तद्वन्मिथ्यात्वं जगतोऽनिशम् ॥ १२ ॥**

अन्वय:—यतः सा तत्त्वभावनया नश्येत् अतः आत्मनः देहातिरिक्ततां तद्वत् जगतः मिथ्यात्वं अनिशं भावयेत् ।

अर्थ:—ज्या अर्थी ती ( विपरीत भावना ) तत्त्वचिंतनानें नष्ट होते, त्या अर्थी आत्म्याची देहातिरिक्तता व तसेंच जगाचें मिथ्यात्व यांची सतत भावना करावी. ॥ ११२ ॥

विवरण:—विपरीत भावनेच्या नाशाचा उपाय यथार्थ भावना होय. यास्तव आत्मा देहाहून भिन्न, नित्य, चिद्घन, व आनंदमय आहे अशी व जगत् कांहीं काल भासणारें व त्यामुळेंच अनित्य आहे अशी भावना केल्यानें पूर्वोक्त भावना नष्ट होणें शक्य आहे, म्हणून तिचा नाश व्हावा अशी ज्याची इच्छा असेल, त्यानें आत्मा व जगत् यांविषयीं यथार्थ भावना सतत करीत राहावें. ॥ ११२ ॥

गेल्या श्लोकांत यथार्थ भावना करण्याविषयीं सांगितलें आहे. पण ती कांहीं विशेष नियमपूर्वक करावी लागते कीं कशीही केली तरी चालेल, अशी आतां या श्लोकांत शंका घेतात:—

**किं मन्त्रजपवन्मूर्तिध्यानवद्वाऽऽत्मभेदधीः ॥**
**जगन्मिथ्यात्वधीश्चात्र व्यावर्त्या स्यादुतान्यथा ॥ १३ ॥**

अन्वयः—किं अत्र मंत्रजपवत् वा मूर्तिध्यानवत् आत्मभेदधीः च जगन्मिथ्यात्वधीः व्यावर्त्या स्यात् उत अन्यथा ।

अर्थ:—या स्थळीं मंत्राच्या जपाप्रमाणें किंवा मूर्तीच्या ध्यानाप्रमाणें आत्मभेदबुद्धि व जगन्मिथ्यात्व बुद्धि वारंवार धरावयास पाहिजे कीं त्याहून निराळया प्रकारानें ? ॥ ११३ ॥

विवरण:—प्रातःसंध्येची उपासना करीत असतां प्रतिदिनीं हजार जप करावा. असा मंत्राच्या जपाविषयीं नियम आढळतो. त्याप्रमाणेंच या पूर्वोक्त भावनेची अमुक वेळ भावना करावी असा कांहीं नियम आहे कीं काय ? तसेंच पतंजलींनीं योगदर्शनांत अंतःकरणाची एकाग्रता करण्याविषयीं नियम सांगितला आहे. व इतर भक्तिप्रधान ग्रंथांत रोज पहांटे ब्राह्ममुहूर्तावर उठून भगवानाचें ध्यान करण्याविषयीं सांगितलेलें असतें. त्याप्रमाणें ही भावनाही करणें अवश्य आहे कीं कसें ? किंवा हिला कांहीं नियमच नाहीं ? हा सर्व श्लोक प्रश्नरूप आहे, व भावना कोणत्या प्रकारें करावी हें सर्वांस समजावें हा त्याचा उद्देश आहे. ॥ ११३ ॥

पूर्वोक्त प्रश्नाचें आतां उत्तर देतात:—

अन्यथेति विजानीहि दृष्टार्थत्वेन भुक्तिवत् ॥
बुभुक्षुर्जपवद्भुंक्ते न कश्चिन्नियतः क्वचित् ॥ ११४ ॥

अन्वयः—भुक्तिवत् दृष्टार्थत्वेन अन्यथा इति विजानीहि । कश्चित् बुभुक्षुः जपवत् नियतः सन् कदाचित् न भुंक्ते ।

अर्थ:—भोजनाप्रमाणें याला दृष्टार्थत्व असल्यामुळें 'अन्य प्रकारें' असें समज. एकादा पुरुष नियमयुक्त होऊन जशीं जपादिक कर्में करतो, तसा अति भुकेलेला पुरुष नियमयुक्त होऊन भोजन करीत नाहीं. ॥ ११४ ॥

विवरण:—भोजनाचें तृप्ति हें फल दृष्ट आहे. दृष्ट ह्मणजे अनुभवास येणारें. भोजनाबरोबर क्षुधानिवृत्ति होऊन अंतरात्म्याची तृप्ति कशी होत असते, हें सर्वांस ठाऊक आहे. आत्म्याच्या यथार्थ ज्ञानाचें व अनुसंधानाचेंही असेंच दृष्ट फल आहे. व त्यामुळें त्याच्याविषयीं जपाप्रमाणें व ध्यानाप्रमाणें नियम नाहींत. ज्या कर्मांचें अदृष्ट फळ असतें त्याच्याकरितां विशेष नियम पाळावे लागतात. आतां भोजनावि-

वगैरे शास्त्रानें नियम सांगितलेले आहेत हें खरें पण ते उपासमर झाल्यामुळें व्याकुळ होऊन पडलेल्या मनुष्याकरितां नव्हेत. कारण अन्न पुढें असतां तो नियमांचें उल्लंघन करूनही तें खाऊन सोडण्यास कमी करणार नाहीं. व तरीही तृप्ति हें भोजनाचें फल त्यास मिळेल. यास्तव ज्या कर्माचें दृष्ट फल असतें, त्यास नियम नकोत. हें येथें सिद्ध झालें. ॥ ११४ ॥

कारण—

**अश्नाति वा न वाऽश्नाति भुंक्ते वा स्वेच्छयाऽन्यथा ॥**
**येन केन प्रकारेण क्षुधामपनिनीषति ॥ १५ ॥**

अन्वयः—अश्नाति वा न अश्नाति वा स्वेच्छया अन्यथा भुंक्ते वा । एवं येन केन प्रकारेण क्षुधां अपनिनीषति ।

अर्थः—प्राणी खातो किंवा खात नाहीं; किंवा आपल्या इच्छेप्रमाणें ( नक्तादिव्रतें ) करून भोजन करितो. सारांश, कशीबशी आपली क्षुधा घालविण्याची तो इच्छा करितो. ॥ ११५ ॥

विवरण:—भोजनाचा प्रकार जपादिकांहून अगदीं भिन्न आहे. कारण मनुष्य अन्न असलें तर खातो, नसलें तर अन्य कामांत आपलें मन लावून तो आपला वेळ घालवितो. किंवा सकाळीं, दुपारीं, रात्रीं किंवा निजून, बसून, उठून इत्यादि प्रकारें अथवा नक्तादि शास्त्रोक्त व्रतें करून भोजन करितो. ह्मणजे भोजन करण्यांत प्राण्यांची क्षुधानिवृत्ति हाच एक उद्देश असतो व तो कसेंही जरी भोजन केलें तरी साधतो. तसंच प्रस्तुत दार्ष्टांतिकांतही दृष्टफलक आत्मभावना कशीही जरी केली, तरी तिचा निश्चित परिणाम अवश्य होतोच. ॥ ११५ ॥

पण जपादिकांची स्थिति तशी नाहीं.—

**नियमेन जपं कुर्यादकृतौ प्रत्यवायतः ॥**
**अन्यथाकरणेऽनर्थः स्वरवर्णविपर्ययात् ॥ १६ ॥**

अन्वयः—अकृतौ प्रत्यवायतः जपं नियमेन कुर्यात् । स्वरवर्णविपर्ययात् अन्यथाकरणे अनर्थः ।

**अर्थः—(जप नियमानें) न केल्यास प्रत्यवायप्राप्ति होत असते, यास्तव जप नियमानें करावा. व स्वर आणि वर्ण यांचा विपर्यास झाल्यास मोठा दोष लागत असल्यामुळें त्याचें अन्यथा अनुष्ठान करण्यानें अनर्थ ओढवतो.**

विवरणः—प्रातःकालीं व संध्याकालीं सावित्रीमंत्राचा हजार जप करावा; तो सूर्याभिमुख उभें राहून करावा; स्नान केल्यावांचून करूं नये; इत्यादि जे जपाचे अनेक नियम आहेत. ते न पाळल्यास मोठा दोष लागत असतो. बरें ज्याच्यापासून दोष लागण्याची एवढी भीति, तें कर्म मुळींच न केलें तर? असें कोणी म्हणेल, पण तें बरोबर नाहीं. कारण नित्य कर्म मुळींच न करण्यापासून लागणारा दोष तर फारच मोठा आहे. यास्तव नित्य कर्म अवश्य करावें. व तें अन्यथा (अशास्त्रीय प्रकारें) होणार नाहीं याविषयीं काळजी घ्यावी. कारण पाणिनीय शीक्षेमध्यें मंत्र म्हणतांना भलभलतेच स्वर किंवा वर्ण म्हटल्यास किंवा मुळींच न म्हटल्यास मोठा अनर्थ ओढवतो असें सांगितलें आहे. सारांश, जप, ध्यान इत्यादि कर्म अदृष्टफलक असल्यामुळें त्यांच्याकरितां नियम आहेत व ते यथाशक्ति अवश्य पाळिलेच पाहिजेत.

असो; ह्याप्रमाणें दृष्टांताचें व्याख्यान करून आतां तेंच दार्ष्टांतिकांच्या ठायीं योजून दाखवितातः—

> **क्षुधेव दृष्टबाधाकृद्विपरीता च भावना ॥**
> **जेया केनाप्युपायेन नास्त्यत्रानुष्टितेः क्रमः ॥ १७ ॥**

अन्वयः—च विपरीता भावना क्षुधा इव दृष्टबाधाकृत् अस्ति । अतः सा केन अपि उपायेन जेया अत्र अनुष्ठितेः क्रमः नास्ति ।

**अर्थः—विपरीत भावना ही क्षुधेप्रमाणें प्रत्यक्ष पीडा करणारी आहे. यास्तव ती कोणत्याही उपायानें जिंकलीच पाहिजे. येथें अनुष्ठानाचा क्रम नाहीं.**

विवरणः—देहास आत्मा समजणें व जग नित्य आहे असा आग्रह धरणें, हीच विपरीत भावना होय. हें पूर्वी स्पष्टपणें सांगितलें आहेच. ही भावना अति दुःखदायी आहे. व त्यामुळें भुकेप्रमाणेंच तिची पीडा प्रत्यक्ष आहे. आतां ही विपरीत भावनाच दुःख देते असें जरी प्राकृत मनुष्यांना कळत नाहीं, तरी, दुःख होतें, हा व्यवहार बरा नव्हे, इत्यादि त्यांना वाटतेंच. व कारणाचें ज्ञान नसलें म्हणजे तें

वाढीलें होतें, असाही कोठें नियम नाहीं. यास्तव अंतर्शानी माहात्म्यांनीं निश्चित केलेल्या सिद्धांताचाच अंगीकार करणें उचित होय. तात्पर्य, विपरीत भावनेचें भुके- प्रमाणें दृष्ट फल आहे. व तें दुःखरूप असल्यामुळें कोणत्याही उपायानें त्याला हटविलेंच पाहिजे. त्याविषयीं विशेष असा कोणताही नियम करितां येण्यासारखा नाहीं.

प्रश्न:—बरें, तर मग तिला कोणत्या उपायानें जिंकावें ?

**उपायः पूर्वमेवोक्तस्तच्चिंताकथनादिकः ॥**
**एतदेकपरत्वेऽपि निर्बंधो ध्यानवन्न हि ॥ १८ ॥**

अन्वय:—तच्चिंताकथनादिकः उपायः पूर्वं एव उक्तः । एतदेकपरत्वे अपि ध्यानवत् निर्बंधः न हि अस्ति ।

**अर्थ:—त्याचें चिंतन, त्याचें कथन, इत्यादि उपाय पूर्वींच सांगितला आहे. त्यांत तदेकपरत्व असें जरी म्हटलें आहे, तरी ध्यानाप्रमाणें निर्बंध नाहीं. ॥ ११८ ॥**

**विवरण:**—पूर्वी एकशें सहाव्या श्लोकांत विपरित भावनेचा नाश करणारा उपाय सांगितलेला आहे. व तो सततनत्त्वानुसंधान-हाच आहे. आतां या पूर्वोक्त श्लोकांत केवल तत्पर होऊन राहण्याविषयींही सांगितलें आहे, हें खरें. पण ध्याना- प्रमाणें त्याला विशेष असा कांहीं निर्बंध आहे, असें समजूं नये. ध्यानास कोणता निर्बंध आहे, हें पुढच्या श्लोकांतच स्पष्ट होणार आहे. यास्तव येथें विस्तार करीत नाहीं.

आतां ध्यानाचा निर्बंध सांगतात:—

**मूर्तिप्रत्ययसांतत्यमन्यानंतरितं धियः ॥**
**ध्यानं तत्रातिनिर्बंधो मनसश्चंचलात्मनः ॥ १९ ॥**

अन्वय:—धियः अन्यानंतरितं मूर्तिप्रत्ययसांतत्यं ध्यानं । तत्र चंचलात्मनः मनसः अतिनिर्बंधः ।

**अर्थ:—बुद्धीचें अन्य प्रत्ययाच्या योगानें अन्यवहित असें मूर्तिविषयक प्रत्ययाचें सातत्य म्हणजे ध्यान होय. ध्यानाचे वेळीं चंचल अशा मनाचा मोठा निरोध करावा लागतो. ॥ ११९ ॥**

**विवरण:**—ज्या ध्येय पदार्थाचें ध्यान कर्तव्य असेल त्याच्या ठायीं अन्य प्रत्यय-शून्य अशा बुद्धीचें तद्रूपतेनें सतत रहाणें ह्मणजे एका ध्येयावांचून अंतःकरणांत दुसरें कशाचेंही स्फुरण न होणें हेंच ध्यान होय. पण मन अति चंचल असल्यामुळें त्याच्या निरोधाकरितां मोठीच खटपट करावी लागते. ह्मणजे अरण्यामध्यें आजन्म स्वैर फिरण्याची ज्यांना संवय झालेली असते, अशा हत्तीसारख्या प्राण्यांस पकड-ण्याकरितां जशी अश्रांत मेहनत करावी लागते, तशीच या असंख्य जन्म स्वैर प्रचार करावयास संवकलेल्या मनाचा निरोध करण्याकरितांही अश्रांत मेहनत करावी लागून, अकल्पित युक्त्या योजाव्या लागतात. या श्लोकांत सगुण पदार्थाचेंच ज्ञान होणें शक्य आहे, हें सुचविण्याकरितां मूर्ति हा शब्द योजला आहे. ॥ ११९ ॥

मन अति चंचल आहे याविषयीं प्रमाण—

**चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ॥**
**तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ १२० ॥**

अन्वय:—हे कृष्ण, मनः चंचलं, प्रमाथि, बलवत् च दृढं अस्ति हि । अहं तस्य निग्रहं वायोः इव सुदुष्करं मन्ये ।

**अर्थ:—हे भगवन्, मन हें चंचल, व्याकुल करणारें, समर्थ, व दृढ आहे, हें प्रसिद्धच आहे. यास्तव त्याचा निग्रह करणें वायूच्या मोटेप्रमाणें अति दुर्घट आहे, असें मी समजतों. ॥ १२० ॥**

**विवरण:**—हें भगवद्गीतेंतील वाक्य आहे, हें गीतेचा नित्यपाठ करणारांस अ-वगत आहेच. साहाव्या अध्यायांत भगवानानें अर्जुनास मनाचा निरोध करण्या-विषयीं उपदेश केला असतां अर्जुनानें ही शंका विचारिली आहे. व वायूची मोट बांधणें जितकें कठिण तितकेंच किंवा त्याहून कांकणभर अधिक कठिण असें हें संयमन आहे, असें आपलें मत दिलें आहे. हरिणादि प्राणी अति चंचल असतात, पण त्यांचाही निग्रह करितां येतो. तसाच या चंचल मनाचाही निग्रह करितां येईल असें कोणास वाटेल, ह्मणून अर्जुनानें आपल्या वाक्यांत मनास तीन विशेषणें दिलीं आहेत. प्रमाथि–पुरुषास व्याकुळ करून सोडणारें, किंवा त्यास कामी बनवून विवे-कशून्य करणारें; बलवत्–अति समर्थ, ज्याचा निग्रह करितां येणें शक्य नाहीं.

दृढं—ज्या विषयामध्यें तें आसक्त झालें असेल तेथून त्याला काढून घेतां येणें अशक्य आहे. व त्यामुळेंच तें वज्रासारखें दृढ होय. ॥ १२० ॥

मनाचा निग्रह अति कठिण आहे; याविषयीं आणखी एक प्रमाण देतातः—

अप्यब्धिपानान्महतः सुमेरून्मूलनादपि ॥
अपि वह्न्यशनात्साधो विषमश्चित्तनिग्रहः ॥ २१ ॥

अन्वयः—हे साधो, महतः अब्धिपानात् अपि सुमेरून्मूलनात् अपि, वह्न्यशनात् अपि चित्तनिग्रहः विषमः अस्ति ।

अर्थः—हे साधो, मोठ्या समुद्राच्या प्राशनाहूनही, सुमेरु पर्वताच्या उन्मूलनाहूनही व अग्निभक्षणाहूनही हा चित्तनिग्रह कठिण आहे. ॥ १२१ ॥

विवरणः—हें वाक्य योगवासिष्ठांतील असून तें रामास उद्देशून श्रीवसिष्ठांनीं उच्चारिलेलें आहे. अगस्तिमुनीनें सात समुद्रांचें प्राशन केलें; असें पौराणिक वचन आहे. यास्तव प्रलयकालीं सर्व सृष्टि जलमय होऊन जो एक अपार समुद्र होत असतो, त्याचें प्राशन करणें कठिण आहे, हें सुचविण्याकरितां महतः हें विशेषण प्रवृत्त झालें आहे. पण सृष्टिकालीं विधाता तें सर्व जल शोषून टाकीत असतो असाही निर्देश आहे. यास्तव जलप्राशनाहूनही जरा कठिण दृष्टान्त देतात. देवांचें वसतिस्थान असा जो सुवर्ण पर्वत त्याला कोसळून पाडणें हें तर पूर्व कृत्याहूनही कठिण आहे. कारण सर्व सृष्टि जलमय झाल्यावरही सुमेरु जलांत बुडून राहतो. असा पुष्कळ स्थळीं उल्लेख आढळतो. पण श्रीरामानें शिवधनुष्याच्या भंगसमयीं त्यालाही खालीं पाडिलें, असा क्वचित् आधार मिळतो. यास्तव त्याहूनही कठिण अशा अग्निभक्षणाचा निर्देश केला. पण भगवान् कृष्णानें अग्नीही गिळून टाकिल्याचें प्रसिद्ध आहे. यास्तव श्री वसिष्ठ म्हणतात कीं, पूर्वोक्त तीन कठिण कृत्यांहूनही चित्तजय अति कठिण आहे. व खरोखरच वस्तुस्थिति अशी असल्यामुळें सिद्ध पुरुष दुर्मिळ झाले आहेत. आम्हां कलियुगांतील पुरुषांच्या नशिबीं अशा सज्जनांचें दर्शन नाहींच घडलें तरी चालेल. ॥ १२२ ॥

सारांशः-

**कथनादौ न निर्बंधः शृंखलाबद्धदेहवत् ॥**
**किं त्वनंतेतिहासाद्यैर्विनोदो नाट्यवद्धियः ॥ २२ ॥**

अन्वयः—शृंखलाबद्धदेहवत् कथनादौ निर्बंधः न। किं तु नाट्यवत् धियः अनंतेतिहासाद्यैः विनोदः भवति ।

**अर्थः**—शृंखलेनें देह बद्ध झाला असतां जसें दुःख होतें, तसें (आत्म्याच्या) कथनादिकांमध्यें दुःख होत नाहीं. तर नाचगाण्याप्रमाणें बुद्धीचा अनेक इतिहासादिकांच्या योगानें विनोद होतो. ॥ १२२ ॥

**विवरण:**—जो कैदेंत पडलेला असतो, त्यानें पळून जाऊं नये ह्मणून त्याच्या हातापायांत बेड्या ठोकलेल्या असतात, त्यामुळें त्याचा देह परतंत्र व कोणतीही क्रिया करण्याविषयीं असमर्थ झालेला असतो. पण हा आत्मचिंतनादि करणारा पुरुष दृष्टांतांतील कैद्याप्रमाणें प्रतिबद्ध झालेला नसतो. त्यामुळें त्याला आत्मचिंतन, आत्मकथन, एकमेकांस आत्मबोध, इत्यादि प्रकार स्वतंत्रपणें व स्वेच्छेप्रमाणें करितां येतात. शंकाः—अहो, पण त्याला जर कांहींच निर्बंध नाहीं असें ह्मटलें, तर आपण होऊन त्रास सोसण्यास व आत्मकथनादि करण्यास तो कसा प्रवृत्त होईल? कारण त्यांतसुद्धां कष्ट आहेत. व कोणीही स्वतंत्र पुरुष आपण होऊन क्लेश सहन करण्यास तयार होईल अशी आशा करणें व्यर्थ आहे. **समाधानः**—ही गोष्ट खरी आहे. पण आत्मकथनादि क्रिया करितांना साधकास मुळीं कष्टच होत नाहींत. उलट त्याचें मन त्या कथनादिकांमध्यें तल्लीन होऊन राहातें. अर्थात् इतिहासादिकांच्या कथनानें त्यांच्या मनास कष्ट न होतां तें अधिक प्रसन्न होतें. ॥ १२२ ॥

**शंकाः**—कथा ही साक्षात् श्रमदायी क्रिया आहे असें व्यावहारिक कथकांकडे पाहिलें असतां आह्मांस वाटतें व त्यांच्या तोंडूनही असाच प्रकार आह्मी ऐकितों. तेव्हां आत्म्याचें कथन करण्यांत कष्ट नाहींत असें कसें ह्मणतां येईल?

**समाधानः**—ही तूं व्यावहारिक सामान्य कथकांची गोष्ट सांगितलीस. पण प्रस्तुत स्थळीं तिचा कांहीं उपयोग नाहीं. कारण ते बिचारे उदरंभरी कथक उसना आव आणून ओरडतां ओरडतां कसे बरें थकणार नाहींत? आह्मी ज्या कथनाचा

येथें निर्देश केला आहे, तें सामान्य कार्तन नसून परमानंदाच्या अनुभवाचें अगदीं अंतरंग साधन आहे. त्यास शास्त्रांत निदिध्यासन असें ह्मणतात. व त्यामुळें त्या मुख्य साधकास साधनसमयीं कष्टाचा भासही होत नाहीं. हें कसें होतें ह्मणून ह्मणशील तर ऐकः—

**चिदेवात्मा जगन्मिथ्येत्यत्र पर्यवसानतः ॥**
**निदिध्यासनविक्षेपो नेतिहासादिभिर्भवेत् ॥ २३ ॥**

**अन्वयः**— इतिहासादिभिः चित् एव आत्मा जगत् मिथ्या इति अत्र पर्यवसानतः निदिध्यासनविक्षेपः न स्यात् ।

**अर्थः**—इतिहासादिकांच्या योगानें 'चैतन्यच आत्मा, व जग मिथ्या' या सिद्धान्तामध्यें पर्यवसान होत असल्यामुळें त्याच्या योगानें निदिध्यासनामध्यें विक्षेप होत नाहीं. ॥ १२३ ॥

**विवरण:**— गेल्या श्लोकांत इतिहासादिकांच्या योगानें चित्तविनोद होतो ह्मणून सांगितलें आहे. यास्तव, इतिहासादिकांमुळें निदिध्यासनांत विक्षेप कसा होत नाहीं तेंच येथ मुख्यतः सांगावयास पाहिजे आहे. हें मनांत आणून ग्रंथकार ह्मणतात:— तत्त्वज्ञानामध्ये मनोरंजनार्थ कथानकाची योजना करून ज्यांमध्यें तत्त्वज्ञान सुलभ केलेलें असतें, त्या ग्रंथास इतिहास ग्रंथ असें ह्मणतात. बृहद्योगवासिष्ठ, मोक्षधर्म, सूतसंहिता, इत्यादि ग्रंथ या इतिहासग्रंथांचीं उत्कृष्ट उदाहरणें होत. अशा प्रकारच्या ग्रंथाचें परिशीलन केल्यानें चैतन्यच आत्मा व जग मिथ्या ( कांहीं वेळ टिकणारें ) आहे, असेंच ज्ञान होत असल्यामुळें तें निदिध्यासनामध्यें ( तदेकपरत्वामध्यें ) विक्षेप उत्पन्न करीत नाहीं. व रमणीय कथांच्या योगानें ते ग्रंथ परिपूर्ण असल्यामुळें त्यांच्या परिशीलनापासून किंवा त्यांचें सतत व्याख्यान केल्यानेंही कथकास कष्ट होत नाहींत. कोणतीही अप्रिय क्रिया करितांना कष्ट होतात व प्रिय कर्मे एकसारखें करीत असलें तरी त्यापासून शीण वाटत नाहींत, ही गोष्ट बहुतेक सर्वांच्या अनुभवाची आहे. ॥ १२३ ॥

**प्रिय कर्म करितांना मुळींच कष्ट होत नाहींत असें जर सामान्यतः समजलें, तर इतिहासादि परिशीलनाप्रमाणेंच इतर धंदे करण्यास तरी काय हरकत आहे ? असें कोणी विचाराल ह्मणून श्री भारतीतीर्थ ह्मणतात—**

**कृषिवाणिज्यसेवादौ काव्यतर्कादिकेषु च ॥**
**विक्षिप्यते प्रवृत्त्या धीस्तैस्तत्त्वस्मृत्यसंभवात् ॥ २४ ॥**

**अन्वयः**—कृषिवाणिज्यसेवादौ च काव्यतर्कादिकेषु प्रवृत्त्या धीः विक्षिप्यते। कुतः तैः तत्त्वस्मृत्यसंभवात्।

**अर्थः—शेतकी, व्यापार, सेवा इत्यादि यांच्यामध्यें प्रवृत्ति केल्यानें बुद्धि विक्षिप्त होते. कारण त्यांच्या योगानें तत्त्वाचें स्मरण होणें असंभवनीय आहे.**

विवरणः—ज्याला ज्या कर्माची संवय झालेली असते त्याला तें प्रिय वाटत असतें, असा अबाधित अनुभव आहे व त्यामुळें मनुष्यास सेवेसारखीं साक्षात् नरक-रूप कर्मेंही प्रिय वाटतात हें खरें; पण तशा प्रकारच्या कर्मांत प्रवृत्त झाल्यानें बुद्धि विक्षिप्त होत असते. व तत्त्वाचें स्मरण न झाल्यामुळें तसें होणें साहजिकही आहे. पण इतिहासादिकांमध्यें तत्वाचें विस्मरण होत नसून उलट त्याच्या योगानें तत्त्वस्मरण सतत होऊं लागतें. सेवादिकर्मांच्या योगानें जसें मन विक्षिप्त होतें, तसेंच तें काव्यें, तर्क इत्यादि मनास कल्पित करणाऱ्या ग्रंथसमूहाच्या परिशीलनानेंही होतें. यास्तव त्यांचाही सर्वथैव त्याग करावा. ॥ १२४ ॥

शंकाः—सेवा इत्यादि कर्में करीत असतांना जसें तत्त्वाचें विस्मरण होतें, तसें भोज-नादि करितांनाही होणें शक्य आहे. तेव्हां सततानुसंधान सुटूं नये म्हणून सेवादिकांप्रमाणें भोजनाचाही त्याग करावयास पाहिजे ! समाधानः—छे; असें नाहीं कारण,

**अनुसंदधतैवात्र भोजनादौ प्रवर्तितुम् ॥**
**शक्यतेऽत्यंतविक्षेपाभावादाशु पुनः स्मृतेः ॥ २५ ॥**

**अन्वयः**—अनुसंदधता एव भोजनादौ प्रवर्तितुं शक्यते। कुतः पुनः आशु स्मृतेः अत्यंतविक्षेपाभावात्।

**अर्थः—अनुसंधान करीत असतांनाच या भोजनादिकांचे ठायीं प्रवृत्त होतां येतें. कारण पुनरपि लागलेंच स्मरण होत असल्यामुळें अत्यंत विक्षेप होऊं शकत नाहीं. ॥ १२५ ॥**

**विवरण:**—शरीर हें सर्व धर्मानुष्ठानाचें आद्य साधन आहे. यास्तव त्यांचें रक्षण केलेंच पाहिजे. व तें तर भोजनावांचून होणें शक्य नाहीं. भोजनाप्रमाणेंच मलविसर्जनादि कृत्येंही शरीरसंरक्षणाचीं साधनें होत. तसेंच ब्राह्मणादि वर्णास उचित अशीं नित्य कर्मेंही निदान लोकसंग्रहार्थ अवश्य होत. 'नित्य कर्माचा संन्यास होत नाहीं' असें भगवद्वचनही आहे. यास्तव भोजनादि अवश्य कर्में सोडून चालणार नाहीं. शिवाय हीं कर्में आत्मानुसंधान करीत असतांनाही होऊं शकतात. व जरी कदाचित् अशा समयीं क्षणभर आत्म्याचें विस्मरण झालें तरी पुनरपि तत्काल त्याचें स्मरण होत असल्यामुळें तीं कर्में सेवा इत्यादि कर्मांप्रमाणें आत्मानुसंधानांत दृढ विक्षेप करूं शकत नाहींत. यास्तव भोजनादि कर्में सोडून अनर्थांत पडण्याची कोणाही मुमुक्षुस आवश्यकता नाहीं. ॥ १२५ ॥

वादी:—अहो पण त्या समयीं तत्वाचें विस्मरण तरी होतें ना ? सिद्धांती:—होय होतें. पण त्यापासून साधकाची कोणत्याही प्रकारें हानि होत नाहीं. कारण:–

तत्वविस्मृतिमात्रान्नानर्थः किं तु विपर्ययात् ॥
विपर्येतुं न कालोऽस्ति झटिति स्मरतः क्वचित् ॥ २६ ॥

**अन्वय:**—तत्वविस्मृतिमात्रात् अनर्थः न भवति । किं तु विपर्ययात् भवति । झटिति स्मरतः विपर्येतुं क्वचित् कालः न अस्ति ।

**अर्थ:**—केवल तत्त्वाच्या विस्मरणामुळेंच अनर्थ ओढवत नाहीं; तर तत्त्वाचा विपर्यास केल्यामुळें तो ओढवतो. पण लागलेंच तत्त्वस्मरण करणाऱ्या पुरुषास तत्त्वाचा विपर्यास करण्यास अवकाशच मिळत नाहीं. ॥ १२६ ॥

**विवरण:**—क्वचित् ( एकादे वेळीं ) तत्वानुसंधान सुटल्यास फार तर निदिध्यासनाचा विच्छेद होईल. यापलीकडे कांहीं हानि होत नाहीं. पण तत्त्वाचा विपर्यास केल्यानें मोठ्या अनर्थांत पडावें लागतें. यास्तव विपर्यास न होतां भोजनादि अवश्य कर्में करीत असतांना जर नुस्तें तत्त्वाचें विस्मरणच होत असलें तर तें पतकरेल. आतां तत्वाचें विस्मरण झाल्यानंतर हळुहळु विपर्यासही होईल, असें कदाचित् तूं म्हणशील पण तें बरोबर नाहीं. कारण, भोजनादिकर्मांचा काल अगदीं थोडा असतो. सतत व तत्वानुसंधान करणें हा साधकाचा जवळ जवळ स्वभावच

झालेला असतो. त्यामुळें तो जरी क्षणभर तत्त्वास विसरला, तरी त्यास त्याची लागलीच स्मृति होते व तो पुनः भोजनादि करीत असतांच तत्त्वानुसंधान करूं लागतो. अर्थात् विस्मृतीनंतर कांहीं वेळानें होणारा जो विपर्यास त्यास अवकाशच मिळत नाहीं. ॥ १२६ ॥

प्रश्नः—मग हाच न्याय काव्यतर्कादि ग्रंथांच्या ठायींही कां लागू करीत नाहीं ? उत्तरः—

**तत्त्वस्मृतेरवसरो नास्त्यन्याभ्यासशालिनः ॥**
**प्रत्युताभ्यासघातित्वाद्बलात्तत्त्वमुपेक्ष्यते ॥ २७ ॥**

अन्वयः—अन्याभ्यासशालिनः तत्त्वस्मृतेः अवसरः नास्ति । प्रत्युत तत्त्वं अभ्यासघातित्वात् बलात् उपेक्ष्यते ।

अर्थः—तर्कादि अन्य शास्त्रांचा अभ्यास करणाऱ्यांच्या तत्त्वस्मृतीस अवकाश मिळत नाहीं. शिवाय तत्त्व हें अभ्यासास विघातक असल्यामुळें तें बलात्कारामुळें उपेक्षिलें जातें. ॥ १२७ ॥

विवरणः—तर्क, व्याकरण, काव्य इत्यादि शास्त्रें मनास विकारयुक्त करीत असतात. पण त्यापासूनही सामान्यतः विद्यानंद होत असल्यामुळें विद्यार्थी मनापासून त्यांचा अभ्यास करूं लागतो. व ह्याप्रमाणें एकदा तो आवडीनें त्यांत प्रवृत्त झाला कीं त्यास तत्त्वानुसंधान करण्यास फुरसत मिळेनाशी होते. कारण व्यावहारिक अनेक कृत्यें केल्यावर जो कांहीं थोडाफार अवकाश मिळेल, तो त्या प्रियशास्त्राच्या परिशीलनांत घालविण्याकडे त्याच्या मनाचा कल झालेला असतो. तर्कादिशास्त्रांचें अध्ययन करणारांकडून तत्त्वानुसंधान न होण्याचें हें एक कारण. व दुसरें असें कीं, तत्त्वानुसंधान व तर्कादिशास्त्रें यांमध्यें मोठा विरोध आहे. कारण स्वतः तत्त्व हेंच शास्त्राभ्यासाचा विघात करीत असतें. ह्मणजे अनात्मविषयक शास्त्रांचें अध्ययन करणें हें केवल श्रमदायी आहे; विद्वत्तेचा अभिमान वाढविणारें आहे; व त्यामुळें मुख्य लाभापासून हटावणारें आहे, असें साधकास शिकवितें. यास्तव अन्यशास्त्रांमध्यें अथवा व्यवहारामध्यें ज्यांची रुचि असते, ते या तत्त्वाचा मुद्दाम त्याग करितात. व्यवहारपटु आईबाप आपला पुत्र ईश्वरभक्त किंवा धार्मिक होत आहे असें समजल्यास कसे कष्टी होत असतात, हें सामान्यतः कोठेंही पाहावयास मिळण्यासारखें आहे. तर्क-

व्याकरणादि शास्त्रांत निष्णात असलेले गुरुही आपल्या शिष्याच्या मनांत रूपावलीच्या प्रथम पाठाबरोबरच तत्वानुसंधानाच्या द्वेषाचें बीज पेरून ठेवीत असतात, असा प्रस्तुत लेखकाचा तरी निदान अनुभव आहे. सारांश, इतर शास्त्रांत गढून गेलेल्या लोकांच्या हातून तत्त्वानुसंधान होणें शक्य नाहीं. ॥ १२७ ॥

गेल्या तीनचार श्लोकांवरून भोजनादि आवश्यक क्रिया तत्त्वानुसंधानाच्या विरोधी नाहींत व तर्कादिशास्त्राभ्यास विरोधि आहे, एवढें ठरलें असतां आतां या श्लोकांत तर्कादिकांच्या अभ्यासाविषयीं वैदिक निषेध आहे, हें सांगण्याकरितां श्रुतिप्रमाण देतातः—

तमेवैकं विजानीथ ह्यन्या वाचो विमुञ्चथ ॥
इति श्रुतं तथाऽन्यत्र वाचो विग्लापनं त्विति ॥ २८ ॥

**अन्वयः**—तं एव विजानीथ हि अन्याः वाचः विमुञ्चथ इति तथा अन्यत्र तु वाचः विग्लापनं इति श्रुतम् ।

**अर्थः**—'त्याच एकास जाणा. व दुसऱ्या वाचा (वाचेचे विषय) टाका' असें व त्याचप्रमाणें दुसऱ्या स्थळीं 'तें तर वाणीस शिणविणारें आहे' असें श्रुतीनें सांगितलेलें आहे. ॥ १२८ ॥

**विवरणः**—या श्लोकांत यजुर्वेद व आथर्वण वेद यांतील श्रुतींचें प्रमाण दिलें आहे. त्या दोन्ही श्रुतींचें तात्पर्य—ज्यांत तत्त्वानुसंधान नाहीं असें इतर अध्ययन सोडावें. कारण तें वाणीस केवळ शीण देत असतें.—असें आहे. ॥ १२८ ॥

**वादीः**—तत्त्वानुसंधानातिरिक्त भोजनादि क्रिया जशा तुह्मी करितां तसेंच आह्मी शास्त्राध्ययनही करणार. **सिद्धान्तीः**—

आहारादि त्यजन्नैव जीवेच्छास्त्रांतरं त्यजन् ॥
किं न जीवसि येनैवं करोष्यत्र दुराग्रहम् ॥ २९ ॥

**अन्वयः**—आहारादि त्यजन् न एव जीवेत् शास्त्रांतरं त्यजन् तु जीवेत् । त्वं न जीवसि किं ? येन अत्र एवं आग्रहं करोषि ।

अर्थः—आहारादि सोडणारा जीवंत राहात नाहीं. पण शास्त्र सोडणारा जिवंत रहातो. तूं ( शास्त्राभ्यासावांचून ) जीवंत राहूं शकत नाहींस का? मग याविषयीं तूं एवढा आग्रह कां करीत आहेस. ॥ १२९ ॥

विवरण:—आहारादि अत्यंत अवश्य कृत्यांविषयीं शास्त्रानें जी अनुज्ञा दिली आहे त्यांत कांहीं तात्पर्य आहे. व तर्कादिकांच्या अभ्यासाचा जो निषेध केला आहे तोही सहेतुक आहे, कसा ह्मणून विचारशील तर सांगतों:—शरीरसंरक्षणार्थ अत्यंत अवश्य अशीं जीं भोजनादि कृत्यें आहेत तीं न केल्यास मरणच येईल. यास्तव शास्त्रानें त्याची अनुज्ञा दिली आहे. पण शास्त्राभ्यासाची तशी स्थिति नाहीं. त्यावांचूनही मनुष्य जिवंत राहून आत्मानुसंधान करूं शकतो. आत्मानुसंधानापासून मिळणारें फल शास्त्राभ्यासापासून मिळणाऱ्या फलापेक्षां किती तरी पटीनें अधिक आहे. ज्याचें फल क्षुद्र आहे, अशा एकाद्या कृत्यापासून मनुष्यास सोडवून त्याच्यापेक्षां हजारो पटीनें अधिक फल ज्यामध्यें मिळत असेल, अशा एकाद्या कृत्यांत त्यास प्रवृत्त करणें हें पाप आहे, असें व्यवहारांतही कोणी समजत नाहीं. यास्तव शास्त्रानें जो तर्कादि निरुपयोगी शास्त्रांच्या यावज्जीव अभ्यासाचा निषेध केला आहे, तो योग्यच होय. बरें पण तुला तरी शास्त्राभ्यासाविषयीं एवढा आग्रह कां? त्यावांचून तुला जिवंत राहातां येत नाहीं का? ॥ १२९ ॥

वादीः— बरें माझी एक गोष्ट राहूं दे एकीकडे; पण जनकादि तत्त्वज्ञानी पुरुष राज्यादि अन्य कृत्यें करीत होते कीं नाहीं? मग तुमच्या शास्त्रानें त्यांना कां अडविलें नाहीं? कीं आपलींहीं शास्त्रें माझ्यासारख्या गरिबांकरितांच आहेत?

सिद्धान्तीः—

**जनकादेः कथं राज्यमिति चेद्दृढबोधतः ॥**
**तथा तवापि चेत्तर्कं पठ यद्वा कृषिं कुरु ॥ १३० ॥**

अन्वयः—जनकादेः राज्यं कथं इति चेत् दृढबोधतः ( इति वयं ब्रूमः ) तथा तव अपि चेत् तर्हि तर्कं पठ यद्वा कृषिं कुरु।

**अर्थ:—जनकादिकांनीं राज्य कसें केलें? असें जर विचारशील तर दृढ बोधामुळें (असें आम्ही उत्तर देतों) तसाच जर तुलाही दृढबोध झाला असेल तर तर्क शिक, कीं शेतकी कर. (कांहीं केलेंस तरी तत्वहानि नाहीं.) ॥१३०॥**

विवरण:—जनकादि माहात्मे सामान्य ज्ञानी नसून महाज्ञानी होते, हें तुलाही मान्य आहे. वास्तव ते विधिनिषेधातीत होते असेंही ह्मणतां येण्यासारखें आहे. ते श्रेष्ठ पुरुष असल्यामुळें लोकसंग्रहार्थ त्यांना कर्म कर्तव्य होतें, ह्मणून आह्मी असें ह्मणतों कीं, आत्मसाक्षात्कार दृढ झाला असतां शरीरेंद्रियांच्या यागानें होणाऱ्या कोणत्याहि कर्माचा परिणाम अंत:स्थितीवर होत नाहीं. व त्यामुळेंच जनकादिकांचें राज्यादिकर्म त्यांच्या तत्त्वानुसंधानास विघातक होत नसे. तूंहि जर त्या स्थितीस पोंचलेला असशील तर तर्काचें अध्ययन कर किंवा शेतांत जाऊन शेती कर. मग शास्त्राचें कांहीं ह्मणणें नाहीं. तात्पर्य, दृढ बोध होई तों विधिनिषेध प्रवृत्त होत असतात. ॥ १३० ॥

आतां तत्त्वज्ञानामुळें सर्व मिथ्या आहे अशी भावना झाल्यावर इतर व्यवसायामध्यें ज्ञान्याची प्रवृत्ति होणेंच शक्य नाहीं, असें कदाचित् कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार सांगतात:—

**मिथ्यात्ववासनादार्ढ्ये प्रारब्धक्षयकांक्षया ॥**
**अक्लिश्यंतः प्रवर्तन्ते स्वस्वकर्मानुसारतः ॥ ३१ ॥**

अन्वय:—मिथ्यात्ववासनादार्ढ्ये (सति) प्रारब्धक्षयकांक्षया अक्लिश्यन्तः स्वस्वकर्मानुसारतः प्रवर्तन्ते ।

**अर्थ:—मिथ्यात्ववासना दृढ झाली असतांही प्रारब्धकर्माचा क्षय व्हावा ह्मणून खिन्न न होतां ज्ञानी आपल्या कर्मानुरूप प्रवृत्त होतात. ॥ १३१ ॥**

विवरण:—सर्व जग परमार्थत: मिथ्या आहे, अशी दृढ भावना झाली असतां वस्तुत: ज्ञान्याची कोणत्याही बऱ्या वाईट कृत्यांत प्रवृत्ति होणें शक्य नाहीं. पण प्रारब्ध कर्माचा भोगावांचून क्षय होणें अशक्य असल्यामुळें तीं क्षीण व्हावीं ह्मणून तदनुरूप ज्ञानी पुरुष कर्मामध्यें प्रवृत्त होतो, पण अज्ञानी प्राकृतांप्रमाणें तो पाप कर्माचें अनिष्ट फल भोगीत असतां खिन्न किंवा सुकृताचें इष्ट फल भोगीत असतां

प्रसन्न होत नाहीं. अथवा कोणतीही प्रवृत्ति कष्टकर असते, हें जरी खरें आहे, तरी या पूर्वोक्त ज्ञान्यास प्राक्तन कर्माप्रमाणें प्रवृत्ति करीत असतां, कोणत्याही प्रकारचे कष्ट होत नाहींत. ।। १३१ ।।

शंकाः—मग असें जर आहे तर ज्ञान्याची प्रवृत्ति अनाचारामध्येंही होईल समाधानः–

**अतिप्रसंगो मा शंक्यः स्वकर्मवशवर्तिनाम् ।।**
**अस्तु वा केन शक्येत कर्म वारयितुं वद ।। ३२ ।।**

अन्वयः—स्वकर्मवशवर्तिनां अतिप्रसंगः मा शंक्यः । वा सः अस्तु । कर्म केन वारयितुं शक्येत? वद ।

अर्थः—आपल्या कर्माच्या आधीन होऊन राहाणाऱ्याचा अतिप्रसंग होईल अशी शंका करणें योग्य नव्हे; किंवा तो होईना ? कर्माचें कोण निवारण करणार आहे ? सांग. ।। १३२ ।।

विवरणः—धर्माच्या योगानें ज्ञान होतें असा सिद्धांत आहे. अर्थात् अनेक जन्मार्जित सुकृतानेंच कोणत्याही साधकास ज्ञान होत असतें, असें म्हटलें पाहिजे. मग अशा पुण्यवान् पुरुषाच्या हातून अनाचार होईल ही शंका योग्य होईल का ? कधींही नाहीं. श्रीसुरेश्वराचार्यादि सर्व आचार्यांनीं “ ज्याचें यथेष्टाचरण होत असेल तो ज्ञानीच नव्हे. ” असें म्हटलें आहे. व व्यवहारांतही अशा ज्ञानाभिमानी पुरुषांचा छि: थु: होत असते, असा सर्वत्र अनुभव आहे. तस्मात् अनाचार हें अज्ञानाचें लक्षण असून सदाचार हेंच ज्ञानाचें लक्षण होय, अथवा कांहीं प्रबल दुष्कृत्यांमुळें जर एकाद्याचें अशुद्ध वर्तन होत असलें, तर त्याचें निवारण करण्यास कोण समर्थ आहे ? कारण कर्माचें निवारण होणें अशक्य आहे, पण त्या अशुद्ध वर्तनामुळें साधकाच्या ज्ञानास कांहीं तरी बाध आल्यावांचून रहाणार नाहीं. ।। १३२ ।।

प्रारब्धकर्माचें जर कोणाच्यानेंही उल्लंघन करवत नाहीं, तर ज्ञानी व अज्ञानी यांच्यामध्यें फरक. तो काय ? असें कोणी विचारील, म्हणून म्हणतातः—

ज्ञानिनोऽज्ञानिनश्चात्र समे प्रारब्धकर्मणि ॥
न क्लेशो ज्ञानिनो धैर्यान्मूढः क्लिश्यत्यधैर्यतः ॥ ३३ ॥

अन्वयः—अत्र ज्ञानिनः च अज्ञानिनः प्रारब्धकर्मणि समे सति ज्ञानिनः धैर्यात् न क्लेशः मूढः तु अधैर्यात् क्लिश्यति ।

अर्थः—ज्ञानी व अज्ञानी या दोघांनाही प्रारब्ध कर्म सारखेंच असतांही ज्ञान्यास धैर्यामुळें क्लेश होत नाहींत व अज्ञानी अधैर्यामुळें क्लेश भोगितो. १३३

विवरणः—प्रारब्ध कर्माचें उल्लंघन कोणीहि करीत नाहीं; हें तर खरेंच. पण ज्ञानी व अज्ञानी यांच्या समजुतींत फरक असल्यामुळें त्याच्या स्थितींतही फरक पडतो. ज्ञानी पुरुष प्रारब्ध कर्माचें फल भोगींत असतांना होणारे क्लेश धैर्यानें सहन करितो. व अज्ञानी अधीर असल्यामुळें क्लेशांच्या योगानें व्याकुळ होतो. ॥ १३३ ॥

हीच गोष्ट आतां दृष्टान्त देऊन स्पष्ट करितातः—

मार्गे गंत्रोर्द्वयोः श्रांतौ समायामप्यदूरताम् ॥
जानन्धैर्याद्द्रुतं गच्छेदन्यास्तिष्ठति दीनधीः ॥ ३४ ॥

अन्वयः—मार्गे गंत्रोः द्वयोः श्रांतौ समायां अपि अदूरतां जानन् धैर्यात् द्रुतं गच्छेत् अन्यः तु दीन धीः सन् तिष्ठति ।

अर्थः—मार्गानें जाणाऱ्या दोघांचे श्रम जरी सारखेच असले तरी (आपलें इष्टस्थळ )जवळ आहे असें जाणणारा धैर्यानें त्वरित जातो व दुसरा ( न जाणणारा ) दीन होऊन मध्येंच बसतो. ॥ १३४ ॥

विवरणः—दोन वाटसरू एका विवक्षित गांवास जात असतां चालतांना दोघेही सारखेच थकतात. किंवा दोघांनाही सारखीच वाट चालावयाची असल्यामुळें त्यापासून होणारे श्रम सारखेच असतात. पण आपणास ज्या गांवीं जावयाचें आहे तो आतां येथून अगदी जवळ आहे, असें जो जाणत असतो तो वाटेंत बसत नाहीं. तर तसाच झिडकेनें पुढ जातो. व ज्यास गांव जवळ आहे हें ठाऊक नसतें तो बिचारा बसत

बसत हाय, हुय करीत अजून किती लांब जावयाचें आहे कोण जाणे, असें म्हणत रस्त्यांतच रहातो. म्हणजे दोघांच्या समजुतीमध्यें फरक असल्यामुळें क्लेशामध्येंही फरक पडतो हें निर्विवाद होय. ॥ १३४ ॥

असो; ह्याप्रमाणें प्रथमश्लोकांत प्रतिपादनार्थ घेतलेल्या श्रुतीच्या पूर्वार्धाचें प्रतिपादन करून आतां उत्तरार्धाचें व्याख्यान आरंभतातः—

साक्षात्कृतात्मधीः सम्यगविपर्ययबाधितः ॥
किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनुसंज्वरेत् ॥ ३५ ॥

अन्वयः—सम्यक् साक्षात्कृतात्म धीः च अविपर्ययबाधितः किं इच्छन् कस्य कामाय शरीरं अनुसंज्वरेत् ।

अर्थ—उत्तम प्रकारें आत्मसाक्षात्कार झाला अशी बुद्धि ज्याला आहे व जो विपर्ययानें बाधित झालेला नाहीं, असा ज्ञानी कशाची इच्छा करून कोणच्या कामाकरितां शरीराविषयीं दुःखी होईल. ॥ १३५ ॥

विवरणः—आत्मानुभवानें पूर्ण अशी ज्याची बुद्धि आहे. व ज्याला मी 'देह आहें' किंवा 'मी दुःखी आहें' किंवा 'मी शहाणा आहें' अशा प्रकारचा विपरीत बोध कधींच होत नाहीं, तो शरीर दुःखी हातांच 'मी दुःखी आहें' इत्यादि प्रकारें समजून कशाकरितां ताप भोगाल ? ताप भोगण्याचें कारणच नष्ट झाल्यामुळें त्याला तो भोगावा लागणार नाहीं, हें उघड आहे. आत्म्याच्या अज्ञानामुळें प्राणी 'देहादिकच मी आहें.' अशी भावना करितो; नंतर देहादिरूप आत्म्याच्या उणीवा भरून काढण्याकरितां अनेक इच्छा करून अनेक प्रकारें दुःख भोगीत असतो; असा अबाधित नियम आहे. पण आत्मसाक्षात्कार ज्याला झालेला असतो, त्याला स्वतःमध्यें कोणतीच उणीव भासत नसल्यामुळें तो कशाचाही इच्छा करीत नाहीं व दुःखीही होत नाहीं. ॥ १३५ ॥

म्हणजे या पूर्वोक्त श्रुतीच्या अर्थानें तात्पर्य असें:—

जगन्मिथ्यात्वधीभावादाक्षिप्तौ काम्यकामुकौ ॥
तयोरभावे संतापः शाम्येन्निःस्नेहदीपवत् ॥ ३६ ॥

**अन्वय**—जगन्मिथ्यात्वधीभावात् काम्यकामुकौ आक्षिप्तौ स्तः। च तयोः अभावे संतापः निःस्नेहदीपवत् शाम्येत्।

अर्थ—जग मिथ्या आहे अशी बुद्धि झाल्यामुळें काम्य पदार्थ व कामुक प्राणी या दोघांचाही निरास होतो. व त्यांचा अभाव झाला असतां संताप तैलरहित दीपाप्रमाणें शांत होतो. ॥ १३६ ॥

**विवरण**:—या जाग्रत् सृष्टीचा इतर अवस्थेंत बाध होत असतो, यास्तव तो जाग्रदवस्थेंत बाधित होणाऱ्या स्वप्नसृष्टीप्रमाणें बाध्य आहे; असा एकदा सूक्ष्म विचाराच्या योगानें निश्चय झाला कीं, काम्य विषय व कामुक भोक्ता यांची स्थितिच होत नाहीं. ह्मणजे त्या निश्चयी पुरुषाच्या व्यवहारांत त्यांना थाराच मिळत नाहीं. कारण जगाच्या सत्यत्वावर त्यांचें अस्तित्व असतें. आणि जगच मिथ्या ठरल्यावर त्यांची स्थिति कशी होणार? असो; भोग्य आणि भोक्ता यांचा एकदा अशा प्रकारें बाध झाला कीं, त्यांच्याकरितां होणारा संतापही आपोआप नष्ट होतो. ह्मणजे दिव्यांतील तेल संपलें असतां जसा तो दिवा आपोआप विझतो, त्याप्रमाणें संतापास पुष्टि देणारे विषयादि बाधित झाले असतां तोही बाधित होतो. ॥ १३६ ॥

**शंका**:—मिथ्यापदार्थांशीं व्यवहार होत नाहीं, हें तुमचें ह्मणणें आह्मांस रुचत नाहीं. कारण चित्रासारख्या शुद्ध कल्पनामय पदार्थांशीं देखील विनोद करणारे लोक पुष्कळ आहेत. समाधानः—

**गंधर्वपत्तने किंचिन्नैंद्रजालिकनिर्मितम् ॥**
**जानन्कामयते किंतु जिहासति हसन्निदम् ॥ ३७ ॥**

**अन्वय**:—गंधर्वपत्तने इदं ऐंद्रजालिकनिर्मितं इति जानन् किंचित् न कामयते। किंतु हसन् सन् जिहासति।

**अर्थ**—गंधर्वनगरांतील ही वस्तु मायेनें उत्पन्न केलेली आहे, असें जाणणारा पुरुष तिचीही इच्छा करीत नाहीं. परंतु (त्या वस्तूस पाहून) हसणारा असा तो तिचा त्याग करण्याची इच्छा करितो. ॥ १३७ ॥

विवरण:—गंधर्व ही देवता आहे ज्याची अशा मंत्राच्या योगानें गारुड्यानें क्षुब्ध केलेल्या मायेनें निर्माण केलेल्या नगरांत, त्याचा खेळ पाहणाऱ्या लोकांस अनेक पदार्थ दिसतात. पण ते सर्व मायिक आहेत असें त्यांस निश्चयानें ठाऊक असल्यामुळें ते त्यांतील एकाद्याचीही इच्छा करीत नाहींत. तर उलट 'हें सर्व कपट आहे' असें जाणून ते आश्चर्यपूर्वक हंसतात व त्याचा अव्हेर करण्याची इच्छा करितात. ह्मणजे मनोरंजनार्थ जरी ते त्याच्याकडे पहात असले, तरी त्यांचा भोग घेण्याची इच्छा करीत नाहींत. व त्यामुळें त्यांच्यापासून त्यांना संतापहि होत नाहीं. ॥ १३७ ॥

आतां ह्याच दृष्टांत दार्ष्टान्तिकाचे ठायीं योजितातः—

**आपातरमणीयेषु भोगेष्वेवं विचारवान् ॥**
**नानुरज्यति किंत्वेतान्दोषदृष्ट्या जिहासति ॥ ३८ ॥**

अन्वय:—एवं आपातरमणीयेषु भोगेषु विचारवान् न अनुरज्यति । किंतु दोषदृष्ट्या एतान् जिहासति ।

अर्थ—त्याचप्रमाणें सकृद्दर्शनीं रमणीय वाटणाऱ्या भोगांच्या ठिकाणीं विचारवान् आसक्त होत नाहीं. परंतु दोषदृष्टीनें त्यांस सोडण्याची इच्छा करितो. ॥ १३८ ॥

विवरण:—पात ह्मणजे विनाश ( ह्म. विचारजन्य बाध ). तो होईतों रमणीय वाटणारे असे जे माळा, चंदन, स्त्रिया इत्यादि विषय त्यांच्याठायीं विवेकी पुरुष कधींच अनुरक्त होत नाहीं. तर ते नाशिवंत आहेत, बंधोत्पादक आहेत, दुःखदायी आहेत इत्यादि त्यांच्या ठिकाणच्या दोषांकडे दृष्टि देऊन त्यांचा अव्हेर करण्याची इच्छा करितो. ॥ १३८ ॥

आतां विषयांच्या ठायीं दोषदर्शन कसें करावें. तें स्वतः ग्रंथकार सांगतात.

**अर्थानामर्जने क्लेशस्तथैव परिपालने ॥**
**नाशे दुःखं व्यये दुःखं धिगर्थान्क्लेशकारिणः ॥ ३९ ॥**

अन्वय:—अर्थानां अर्जने क्लेशः तथा एव परिपालने क्लेशः । नाशे दुःखं, व्यये दुःखं, अतः क्लेशकारिणः अर्थान् धिक् ।

अर्थः—विषयांचें अर्जन करीत असतां क्लेश, तसेंच त्यांचें रक्षण करितांनाही क्लेश; नाश झाला असतां दुःख, क्षय होऊं लागला असतांही दुःख, वास्तव त्या क्लेशकारी विषयांस धिक्कार असो ! ॥ १३९ ॥

विवरण:—विषयसंपादन करणें अति कष्टकर आहे. त्यांचें संरक्षण तर त्याहूनही विकट आहे. त्यांचा नाश झाला असतां दुःखास पारावार नाहींसा होतो. त्यांचा कांहीं निमित्तांच्या योगानें क्षय होऊं लागला असतांही अपरिमित दुःख सहन करावें लागतें. तस्मात् अशा प्रकारच्या सतत दुःख देणाऱ्या विषयांस धिक्कार असो ! असें ह्या श्लोकानें तात्पर्य होय. हा श्लोक बृहद्योगवासिष्ठांतील आहे. व उत्तम अधिकाऱ्यानें विषयांचे ठायीं दोषदर्शन कसें करावें हें यांत सांगितलें आहे. ॥ १३९॥

आतां विषय अशुभ कसे असतात ? तें दाखवितातः—

मांसपांचालिकायास्तु यंत्रलोलेऽगपंजरे ॥
स्नाय्वस्थिग्रंथिशालिन्याः स्त्रियाः किमिव शोभनम् ॥ १४० ॥

अन्वयः—स्नाय्वस्थिग्रंथिशालिन्याः तु मांसपांचालिकायाः स्त्रियाः यंत्रलोले अंगपंजरे किं शोभनं इव अस्ति ।

अर्थः—स्नायु, अस्थि, ग्रंथि इत्यादिकांनीं युक्त अशी जी मासांची पुतळी स्त्री तिच्या शरीरांत सुंदर ( पवित्र ) असें काय आहे ? ॥ १४० ॥

विवरण:—पांचालिका–पुतळी, किंवा वस्त्रादिकांच्या योगानें तयार केलेली बाहुली. यंत्रलोले–कळसूत्री बाहुलीप्रमाणें गारुडी कळ दाबून प्रेरणा करील त्याप्रमाणें चेष्टा करणाऱ्या; अंगपंजरे–अंगरूप पिंजऱ्यांत. पिंजरा असा पोपटास बद्ध करून ठेवितो, त्याप्रमाणें पुरुषाच्या मनास स्त्रीशरीर बद्ध करीत असतें. पंजरे हा योग्य शब्द येथें घातला आहे. स्नायु–शिरा. अस्थि–हाडें. ग्रंथि–स्तनादि मांसाचे गोळे. सारांश, ह्या अमंगल पदार्थांनीं भरलेल्या स्त्रीशरीरांत सुंदरता ती कोठें राहाणार ! स्त्रीशरीरांस पाहून पुरुष अति लंपट होत असल्यामुळें त्यांचीच येथें विशेषतः निंदा केली आहे. बाकी स्त्री व पुरुष या उभयतांचीही शरीरें सारखींच. हा श्लोकही योगवासिष्ठांतलाच आहे. ॥ १४० ॥

सारांशः—

एवमादिषु शास्त्रेषु दोषाः सम्यक् प्रपंचिताः ॥
विमृशन्ननिशं तानि कथं दुःखेषु मज्जति ॥ ४१ ॥

अन्वयः—एवमादिषु शास्त्रेषु दोषाः सम्यक् प्रपंचिताः सन्ति । तानि अनिशं विमृशन् दुःखेषु कथं मज्जति ।

अर्थः—या प्रकारें शास्त्रांमध्यें दोष उत्तम प्रकारें दाखविले आहेत. त्या शास्त्रांचें सतत परिशीलन करणारा पुरुष दुःखामध्यें कसा मग्न होईल ?

विवरणः—ह्या प्रकारेंच श्रुतिस्मृतिपुराणांमध्यें अनेक स्थळीं विषयांची विस्तृत निंदा आढळते. व त्यामुळें शास्त्राचें परिशीलन करणाऱ्या पुरुषांच्या विषयप्रवृत्तीस प्रतिबंध होतो. कारण ज्याला विषय दुःखमय आहेत असें समजतें, तो त्यांस आलिंगन देण्याची इच्छा कधीं तरी करील काय ? ॥ १४१ ॥

विषय दोषयुक्त आहेत असें समजल्यावर प्राण्याची त्यांच्या ठायीं प्रवृत्ति होत नाहीं. याविषयीं एक सामान्य दृष्टान्त देतात:—

क्षुधया पीड्यमानोऽपि न विषं ह्यत्तुमिच्छति ॥
मिष्टान्नध्वस्ततृट् जानन्नामूढस्तज्जिघत्सति ॥ ४२ ॥

अन्वयः—हि क्षुधया पीड्यमानः अपि विषं अत्तुं न इच्छति अमूढः मिष्टान्नध्वस्ततृट् जानन् तत् जिघत्सति ।

अर्थः—क्षुधेनें व्याकुल होणारा पुरुषही विष खाण्याची इच्छा करीत नाहीं. मग मिष्टान्नाच्या योगानें ज्याची क्षुधा शांत झाली आहे, असा विवेकी पुरुष समजून उमजून तें खाण्याची इच्छा करीत नाहीं, हें काय सांगावें.

विवरणः—एकाद्याचे प्राण क्षुधेनें व्याकुळ होऊन जरी शरीर सोडून जाऊं लागले, तरी विष खाऊन क्षुधा शांत करून घ्यावी असें तो कधींही मनांत आणीत नाहीं व आणणारही नाहीं. कारण विष खाल्ल्यानें प्राणरक्षण होणें शक्य नाहीं असें त्याला ठाऊक असतें. ही सामान्य मनुष्याची गोष्ट झाली. व बुभुक्षित सामान्य मनुष्यही जर विष खाऊन जीव वांचविण्याचें मनांत आणीत नाहीं, तर मिष्टान्न भोक्-

नाच्या योगानें तृप्त झालेला शाहाणा मनुष्य तें खाईल हें संभवतें तरी का ? कधींच नाहीं. तात्पर्य, विषय विषरूप आहेत असें ज्याला निश्चयपूर्वक कळून चुकलें आहे, असा साधकही जर त्यांस मोठ्या निग्रहानें सोडूं शकतो, तर आत्मसाक्षात्कार झाल्यामुळें ज्यांची निःसीम तृप्ति झाली आहे, तो त्यांच्याकडे ढुंकूनही पहाणार नाहीं हें काय सांगावें ? ॥ १४२ ॥

प्रारब्धकर्म अति प्रबल असल्यामुळें ज्ञान्यासही भोगेच्छा होईल. अशी शंका घेऊन समाधान करतातः—

**प्रारब्धकर्मप्राबल्याद्भोगेष्विच्छा भवेद्यदि ॥**
**क्लिश्यन्नेव तदाऽप्येष भुंक्ते विष्टिगृहीतवत् ॥ ४३ ॥**

अन्वयः—यदि प्रारब्धकर्मप्राबल्यात् भोगेषु इच्छा भवेत् तदा अपि एष विष्टिगृहीतवत् क्लिश्यन् एव भुंक्ते ।

अर्थः—जरी प्रारब्ध कर्मांच्या प्राबल्यामुळें भोगांविषयीं इच्छा होत असली तरीही हा ( ज्ञानी ) वेठीस धरलेल्या बेगाऱ्याप्रमाणें कष्टी होऊन भोग भोगतो. ॥ १४३ ॥

विवरण:—प्रारब्धकर्म अति प्रबल आहे. यास्तव ज्ञानी त्याचें उल्लंघन करू शकत नाहीं. व त्यामुळें जरी त्यास इच्छा होत असली तरी तो इष्ट भोगांचा उपभोग घेत असतांना फार कष्टी होतो. कसा कष्टी होतो, याविषयीं दृष्टान्त—एखादा सरकारी अधिकारी यावयाचा असतां त्याचें काम करण्याकरितां कांहीं नोकर नाखुशीनें पकडले जातात, व सरकारापुढें इलाज नाहीं असें समजून मोठ्या दुःखानें ते काम करीत असतात. हा प्रकार मोठ्या शहरांपेक्षां खेड्यापाड्यांतून विशेष पाहावयास सांपडतो. सारांश या दृष्टान्ताप्रमाणें ज्ञानी पुरुष मोठ्या असंतोषानें विषयसेवन करीत असतात. ॥ १४३ ॥

ते कसे कष्टी होत असतात तें आतां सांगतातः—

**भुंजाना वा अपि बुधाः श्रद्धावंतः कुटुंबिनः ॥**
**नाद्यापि कर्म नश्छिन्नमिति क्लिश्यंति संततम् ॥ ४४ ॥**

अन्वयः— भद्धावन्तः कुटुंबिनः वा बुधाः भुंजानाः अपि नः कर्म अद्यापि न क्षिणं इति सततं क्लिश्यन्ति ।

अर्थः—श्रद्धावान् गृहस्थ किंवा ज्ञानी ( प्रारब्धकर्मामुळें प्राप्त झालेले भोग ) भोगीत असतांनाही 'आमचें कर्म अजून नष्ट झालें नाहीं' असें ह्मणून एकसारखे कष्टी होत असतात. ॥ १४४ ॥

विवरण:—कोणी ज्ञानी असो, कीं श्रद्धायुक्त होऊन यथाशास्त्र आश्रमाचरण करणारा असो, त्याला कर्म भोगावेंच लागतें. पण तो कर्मभोगांस कंटाळलेला असतो व त्यामुळें एकाद्या अनर्थांत पडलेल्या सज्जनाप्रमाणें "देवा, मी यांतून केव्हां बरें मुक्त होईन," असें त्यांतील प्रत्येक प्रतिक्षणीं ह्मणत असतो. तात्पर्य; त्यांना उत्तम भोगांपासून प्राकृतांप्रमाणें सुख न होतां उलट दुःख होत असतें. व त्यामुळें ते त्यांतून सुटण्याची वाट पाहात असतात. ॥ १४४ ॥

अशा प्रकारें जर त्यांना खरोखरीच ताप होत असेल, तर ते ज्ञानी किंवा मुमुक्षु कसले? कारण प्रारब्धप्राप्त स्थिति सहन करण्याचें धैर्य त्यांच्यामध्यें नसतें असें यावरून स्पष्ट होतें. अशी कोणी शंका घेतील, ह्मणून ग्रंथकार ह्मणतातः—

नायं क्लेशोऽत्र संसारतापः किं तु विरक्तता ॥
भ्रांतिज्ञाननिदानो हि तापः सांसारिकः स्मृतः ॥ ४५ ॥

अन्वय:—अय क्लेशः संसारतापः न किं तु अत्र विरक्तता अस्ति । हि सांसारिकः तापः भ्रांतिज्ञाननिदानः स्मृतः ।

अर्थः—हा क्लेश संसारताप नव्हे तर संसाराविषयीं विरक्ति होय. कारण संसाराचा जो ताप असतो, त्याचें कारण भ्रांतिज्ञान असतें, असें सांगितलेलें आहे. ॥ १४५ ॥

विवरण:—संसारांत जो संताप होत असतो, तो भ्रममूलक ज्ञानामुळें होतो. ह्मणजे वस्तुतः आत्मा नित्य व त्याहून इतर सर्व अनित्य, असा खरा प्रकार असतांनाही त्याच्या विपरीत समजूत करून घेऊन जो संसार करूं लागतो, त्यास पदोपदीं दुःख भोगावें लागतें. यावरून सांसारिक संतापाचें कारण भ्रमज्ञान ( विपरीत भावना ) आहे हें उघड होय. ज्ञानी पुरुषाचा भ्रम तर पूर्वीच कधीं निघून गेलेला

असतो. व त्यामुळें त्यास संताप होण्याचें कारणच राहात नाहीं. यास्तव पूर्वश्लोकांत दाखविलेला जो असंतोष तें वैराग्य होय, असेंच ह्मणणें युक्त आहे. ॥ १४५ ॥

वादी:—पण तें वैराग्य आहे असें ठरविण्यास आणखी कांहीं प्रबल निमित्त आहे काय? सिद्धांती—होय; हा असंतोष विवेकजन्य आहे. कशावरून तें सांगतों:—

**विवेकेन परिक्लिश्यन्नल्पभोगेन तृप्यति ॥**
**अन्यथाऽनंतभोगेपि नैव तृप्यति कर्हिचित् ॥ ४६ ॥**

**अन्वय:**—विवेकेन परिक्लिश्यन् पुरुष: अल्पभोगेन तृप्यति। अन्यथा अनंत भोगे अपि स: कर्हिचित् न तृप्यति एव।

**अर्थ:**—विवेकाच्या योगानें खिन्न होणारा पुरुष थोड्याशा भोगानेंच तृप्त होतो. नाहींतर असंख्य भोग भोगूनही तो कधींच तृप्त होत नाहीं. ॥ १४६ ॥

**विवरण:**—ज्ञानी पुरुषास जो सांसारिक भोगांचा कंटाळा आलेला असतो, तो विवेकामुळें होय. कारण तसें जर नसतें, तर भोगसमयीं त्यास क्लेश झाले नसते. व उलट प्राकृताप्रमाणें तो विषयांत निमग्न होऊन राहाता. पण वस्तुस्थिति तशी आढळत नाहीं. विवेकी पुरुष दु:ख व सुख या दोघांनींहीं थोड्याशा अवकाशांतच कंटाळतो असा सर्वत्र अनुभव आहे. यास्तव विवेकजन्य संताप ह्मणजे विरक्तीच होय हें निर्विवाद झालें. ॥ १४६ ॥

उपभोगाच्या योगानें तृष्णा शांत होत नाहीं, याविषयीं मनूचें वचन प्रमाण देतात:—

**न जातु काम: कामानामुपभोगेन शाम्यति ॥**
**हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ ४७ ॥**

**अन्वय:**—काम: कामानां उपभोगेन न जातु शाम्यति किं तु हविषा कृष्णवर्त्मा इव भूय: एव अभिवर्धते।

**अर्थ:**—तृष्णा ही इष्ट विषयांच्या उपभोगानें कधींही शांत होत नाहीं. तर हविर्भागाच्या योगानें जसा अग्नि त्याप्रमाणें ती पुन: अधिकच वाढते. ॥ १४७ ॥

**विवरण:**—या श्लोकांत मनुमहाराजांनीं सामान्य सिद्धान्त सांगितला आहे. कोणी जर ह्मणेल कीं तृष्णेची शांति करण्यास्तव इष्ट विषयांचा एकदा मनमुराद

भोग घेऊन नंतर त्यास मी सोडीन; तर तें अशक्य आहे. कारण अग्नीवर तुपासारख्या उत्तेजक पदार्थांची धार धरिल्यास तो जसा विझत नाहीं व उलट अधिकच प्रदीप्त होतो, त्याप्रमाणें विषयांच्या अधिकाधिक सेवनानें विषयतृष्णा अधिकाधिक वाढत जाते. यास्तव विवेकजन्य विरक्तीच्या योगानें तृष्णानिरोध करणें हाच एक विषयांतून सुटण्याचा उपाय आहे. ॥ १४७ ॥

विषयांचें स्वरूप ओळखून विवेकपूर्वक त्यांचा भोग घेतला असतां थोडक्यांत तृप्ति होते असें आतां दृष्टांत देऊन व्यक्त करितातः—

**परिज्ञायोपभुक्तो हि भोगो भवति तुष्टये ॥**
**विज्ञाय सेवितश्चोरो मैत्रीमेति न चोरताम् ॥ ४८ ॥**

अन्वयः—यथा चोरः विज्ञाय सेवितः मैत्रीं एति न चोरताम् तथा परिज्ञाय उपभुक्तः भोगः तुष्टये भवति ।

**अर्थः—ज्याप्रमाणें चोरास ओळखून त्याची संगति केली असतां तो मित्र होतो, चोर राहात नाहीं, त्याप्रमाणें ओळखून ज्यांचा भोग घेतला आहे असा भोग तृप्तीला कारण होतो. ॥ १४८ ॥**

विवरणः—व्यवहारांत चोराशीं संगति करावयाची असल्यास त्याचें खरें स्वरूप ओळखून जो त्याची संगति धरितो, त्याला त्याच्यापासून कोणत्याही प्रकारें इजा पोंचत नाहीं; तर उलट तो त्याचा जणुंकाय हितकर्ता मित्र होतो. ह्मणजे मी ज्याच्याशीं संगति करीत आहें तो भला मनुष्य नसून महा लबाड व चोर आहे असें समजल्यावर कोणीही झाला तरी आपल्या वस्तुविषयीं सावध रहातो. व त्यामुळें त्यास चोराच्या संगतीचें कडु फल चाखावें लागत नाहीं. तसेंच विषय कोणत्या योग्यतेचे आहेत हें ज्यास समजतें व त्यांचें खरें स्वरूप ओळखून जो त्यांचा भोग घेतो, तो अगदीं थोड्या अवकाशांत तृप्त होतो. ॥ १४८ ॥

विवेकी पुरुषाची थोड्याशा भोगानें तृप्ति होण्याचें आणखी एक कारण आहे. कोणतें ह्मणाल तर सांगतों.

**मनसो निगृहीतस्य लीलाभोगोऽल्पकोऽपि यः ॥**
**तमेवालब्धविस्तारं क्लिष्टत्वाद्बहु मन्यते ॥ ४९ ॥**

**अन्वयः**—निगृहीतस्य मनसः अल्पकः अपि यः लीलभोगः तं एव क्लिष्टत्वात् अलब्धविस्तारं बहु मन्यते ।

अर्थः—निरुद्ध मनाचा जो अल्प असाही सहजसिद्ध भोग त्यासच मन क्लेशयुक्त झाल्यामुळें अनंत संकल्परूप न होतां बहु मानतें. ॥ १४९ ॥

विवरणः—पूर्वोक्त रीत्या ऐक्यानुसंधान केल्यामुळें मन निरुद्ध होतें म्हणजे त्याचा विषयांविषयीं जें त्याचें चांचल्य तें नष्ट होतें. व मन निश्चल झाल्यावर प्रयत्नावांचून ( यदृच्छेनें ) प्राप्त होणारा जो थोडासाही भोग त्याला मिळतो, तोच पुष्कळ आहे असें त्यास वाटतें. म्हणजे सर्वदा एकांतवासांत रहाण्याची ज्याला संवय झाली आहे, त्यास जशी दहा पांच पळें कोणाची उपाधि झाली असतांही ती फार मोठी वाटते, तसाच हा प्रकार होतो. कारण निश्चल मनास अल्प भोगापासूनही कष्ट होतात व त्यामुळें तें प्राकृतांच्या मनाप्रमाणें अनेक संकल्पांच्या योगानें विस्तृत होत नाहीं. ॥ १४९ ॥

याविषयीं दृष्टांतः—

**बद्धमुक्तो महीपालो ग्राममात्रेण तुष्यति ॥**
**परैर्न बद्धो नाक्रांतो न राष्ट्रं बहु मन्यते ॥ १५० ॥**

अन्वयः—बद्धमुक्तः महीपालः ग्राममात्रेण तुष्यति । किं तु परैः न बद्धः न अपि आक्रांतः राष्ट्रं बहु न मन्यते ।

अर्थः—ज्याला पूर्वी बद्ध करून नंतर मुक्त केलें आहे असा राजा केवल एका गांवानेंच संतुष्ट होतो. पण ज्याला शत्रूंनीं बद्धही केलें नाहीं व व्यापिलेंही नाहीं तो सर्व राष्ट्रही पुष्कळ आहे असें समजत नाहीं. ॥ १५० ॥

विवरणः—शत्रूनें ज्यास पराजित करून आपल्या अंकित केलें आहे व कैद्याप्रमाणें अटकेंत टाकलें आहे असा एकदा अभागी राजा शत्रूनें कृपाकरून सोडून देऊन एकादा लहानसा गांव जरी दिला तरी प्रसन्न होतो. कारण सर्वस्व जेथें नष्ट झालें होतें तेथें एकादा गांवही कांहीं थोडा नव्हे. पण तेंच एकाद्या भाग्यवान् व निष्कंटक सार्वभौम राज्याचा उपभोग घेणाऱ्या राजास त्याचें विस्तृत राज्यही

थोडेंच वाटतें. याला अगदीं आधुनिक दृष्टांत पाहिजे असल्यास आपल्या सांप्रतकालच्या राजांचा व समर्थ इंग्रज सरकारचाच घ्यावा. ॥ १५० ॥

पण याविषयींही शंका येते ती अशी:—

**विवेके जाग्रति सति दोषदर्शनलक्षणे ॥**
**कथमारब्धकर्मापि भोगेच्छां जनयिष्यति ॥ ५१ ॥**

अन्वयः—दोषदर्शनलक्षणे विवेके जाग्रति सति आरब्धकर्म अपि भोगेच्छां कथं जनयिष्यति ?

अर्थः—अहो, पण दोषनिरीक्षणरूप विवेक जागृत असतांना प्रारब्ध कर्म तरी भोगाविषयीं इच्छा कशी उत्पन्न करील ? ॥ १५१ ॥

विवरणः—विषय हे दोषी आहेत असा त्यांच्याविषयीं नित्य विचार करून त्यांच्या दोषांचें निरीक्षण करावयास लागले असतां भोगेच्छा हलु हलु कमी होते व विवेक पूर्ण झाला कीं, ती समूळ नष्ट होते असा नियम आहे. तेव्हां दोषदर्शनरूप विवेक जागत असतां प्रारब्धकर्मभोगेच्छा कशी उत्पन्न करील ? कारण ती अविवेकामुळें होणारी आहे, असें तुह्मीही हजार वेळां सांगितलें आहे. प्रारब्धकर्मामध्यें असें काय मोठें सामर्थ्य आहे कीं ज्याच्या योगानें तें विवेकासही हटवून आपलें कार्य करितें ?

या शंकाचें आतां समाधान करितातः—

**नैष दोषो यतोऽनेकविधं प्रारब्धमीक्ष्यते ॥**
**इच्छाऽनिच्छा परेच्छा च प्रारब्धं त्रिविधं स्मृतम् ॥ ५२ ॥**

अन्वयः—यतः अनेकविधं प्रारब्धं ईक्ष्यते अतः एषः दोषः न अस्ति । इच्छा अनिच्छा च परेच्छा इति त्रिविधं प्रारब्धं स्मृतं अस्ति ।

अर्थः—ज्याअर्थी अनेक प्रकारचें प्रारब्ध आढळतें त्याअर्थी हा दोष नाहीं. इच्छा, अनिच्छा, व परेच्छा असें तीन प्रकारचें प्रारब्ध सांगितलेलें आहे. ॥ १५२ ॥

विवरणः—प्रारब्धकर्म जर एकाच प्रकारचें असतें तर पूर्वोक्त शंका सयुक्तिक झाली असती; व विवेक विद्यमान असतां भोगेच्छा उत्पन्न होणें दुर्घट झालें असतें.

पण वस्तुस्थिति तशी नाहीं. कारण प्रारब्धकर्म परस्पर विरोधि असें अनेक प्रकारचें फल देत असतें, असें आढळतें. व त्यामुळें तें कर्मच अनेकविध आहे असा निश्चय होतो. शास्त्रज्ञांनीं इच्छा प्रारब्ध, अनिच्छा प्रारब्ध व परेच्छा प्रारब्ध असें त्रिविध प्रारब्धकर्म सांगितलें आहे. या प्रत्येकाचें स्पष्टीकरण यापुढें मूळ ग्रंथांतच होणार असल्यामुळें त्याचा येथें विस्तार करीत नाहीं. ॥ १५२ ॥

इच्छा प्रारब्ध कोणतें तें सांगतातः—

**अपथ्यसेविनश्चोरा राजदाररता अपि ॥**
**जानंत एव स्वानर्थमिच्छंत्यारब्धकर्मतः ॥ ५३ ॥**

अन्वयः—अपथ्यसेविनः चोराः राजदाररताः अपि जानंतः एव आरब्धकर्मतः स्वानर्थं इच्छन्ति ।

**अर्थः—कुपथ्य करणारे, चोर, व राजस्त्रीशीं रत होणारे (परिणाम) जाणत असतांनाही प्रारब्धकर्माधीन होऊन आपल्या अनर्थाची इच्छा करितात. १५३**

विवरणः—रोग्यास कुपथ्य केल्यास मरावें लागेल हें ठाऊक असतें, चोरास दुसऱ्यांचीं घर फोडल्यास कैदेंत पडावें लागेल हें ठाऊक असतें, राजाच्या स्त्रीशीं अयोग्य संबंध करणारास ही गोष्ट राजास समजली असतां आपल्या मस्तकाचे तुकडे उडतील हें ठाऊक असतें, तरी ते त्या त्या अनर्थकर कृत्यांत प्रवृत्त होतात. या स्वेच्छा प्रवृत्तिचें कारण इच्छा प्रारब्धच होय; असें म्हणावें लागतें. कारण त्यावांचून शाहाण्याच्या हातून अशीं कृत्यें होणें शक्य नाहीं. भीमानें विषमिश्रित मोदक भक्षण करणे, श्रीकृष्णानें लोणी चोरणें, चंद्रानें गुरुस्त्रीशीं गमन करणें, इत्यादि इच्छाप्रारब्धाचीं पौराणिक उदाहरणें होत. ॥ १५३ ॥

या इच्छेचा निरोध होणें अशक्य आहे, असें आतां प्रमाणाचा निर्देश करून सांगतातः—

**न चात्रैतद्वारयितुमीश्वरेणापि शक्यते ॥**
**यत ईश्वर एवाह गीतायामर्जुनं प्रति ॥ ५४ ॥**

अन्वयः—च अत्र ईश्वरेण अपि एतत् वारयितुं न शक्यते । यतः गीतायां अर्जुनं प्रति ईश्वरः एव आह ।

**अर्थः**—आणि या लोकीं ईश्वराच्या हातूनही याचें निवारण होणें, शक्य नाहीं. कारण गीतेमध्यें अर्जुनास ईश्वर असेंच ह्मणाला आहे. ॥ १५४ ॥

**विवरण:**—मोठा सामर्थ्यवान् पुरुषही या इच्छेच्या मूलभूत प्रारब्धाचें निवारण करण्यास समर्थ नाहीं. फार काय, पण साक्षात् भगवन्तांनींही अर्जुनास असेंच सांगितलें आहे. ॥ १५४ ॥

भगवन्ताचें मूल वाक्यच येथें घेतातः—

**सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ॥**
**प्रकृतिं यांति भुतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ५५ ॥**

**अन्वयः**—ज्ञानवान् अपि स्वस्याः प्रकृतेः सदृशं चेष्टते । भूतानि प्रकृतिं यांति । निग्रहः किं करिष्यति ।

**अर्थः**—विवेकीही आपल्या प्रकृतीप्रमाणें चेष्टा करितो. सर्वभूतें स्वभावावर जातात. तेथें माझा ( किंवा अन्य कोणाचाही ) नियम काय करणार ? ॥ १५५ ॥

**विवरणः**—पूर्वकर्माप्रमाणें बनलेल्या आपल्या स्वभावाचें अतिक्रमण ज्ञान्यासही करितां येत नाहीं. सृष्टींत जेवढीं स्थिरचर भूत आहेत तेवढीं सर्व आपापल्या स्वभावानुरूप कर्में आचरीत असतात. व त्यामुळें कोणताही नियम किंवा इंद्रियनिग्रह प्रकृतीस स्ववश करूं शकत नाहीं. गीतेच्या तिसऱ्या अध्यायांत हा श्लोक आहे हें गीतापाठकांस सहज समजेल. ॥ १५५ ॥

अवश्य होणाऱ्या गोष्टी चुकत नाहींत असें आता सोदाहरण सांगतातः—

**अवश्यंभाविभावानां प्रतीकारो भवेद्यदि ॥**
**तदा दुःखैर्न लिप्येरन्नलरामयुधिष्ठिराः ॥ ५६ ॥**

**अन्वयः**—यदि अवश्यंभाविभावानां प्रतीकारः भवेत् तदा नलरामयुधिष्ठिराः दुःखैः न लिंपेरन् ।

**अर्थः**—अवश्य होणाऱ्या दुःखादिकांचा जर निरास करितां आला असता, तर नल, राम व युधिष्ठिर हे दुःखांनीं लिप्त झाले नसते. ॥ १५६ ॥

**विवरण:**—प्रारब्ध कर्मामुळें प्राप्त होणाऱ्या भोगांस अवश्य होणारे भोग असें ह्मणतात. कारण त्यांचा कोणत्याही उपायानें निरास होत नाहीं. व तो जर होणें शक्य असतें, तर नलासारखे ज्ञानी, समर्थ व दूरदर्शी राजे अनर्थांत कां पडले असते ? या श्लोकांत ज्या तीन सत्पुरुषांचा निर्देश केला आहे, त्यांतील पहिला व तिसरा द्यूतामुळें अनर्थ विपत्तींत पडला व मधला श्रीराम सुवर्णमृगाच्या मागें लागल्यामुळें संकटांत पडला. पण त्या सर्वांनांही आपण ज्या कृत्यांत प्रवृत्त होत आहों तें संकटाचें माहेरघर आहे असें समजण्याइतकें ज्ञान होतें. परंतु दैवयोगामुळें त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अर्थात् दैवगति अनुल्लंघनीय आहे. ॥ १५६ ॥

शंका:—मग असा जर खरा प्रकार आहे, तर ईश्वराच्या ठायीं ईश्वरत्व तरी कोठून रहाणार? कारण प्रारब्धाचें निवारण करण्यास तोही आमच्याप्रमाणें असमर्थच आहे. समाधान:—

**न चेश्वरत्वमीशस्य हीयते तावता यतः ॥**
**अवश्यंभाविताऽप्येषामीश्वरेणैव निर्मिता ॥ ५७ ॥**

**अन्वय:**—यतः एषां अवश्यंभाविता अपि ईश्वरेण एव निर्मिता ततः तावता ईश्वरस्य ईश्वरत्वं न हीयते ।

**अर्थ:**—ज्याअर्थी यांचें अवश्यंभावित्वही ईश्वरानेंच निर्माण केलें आहे, त्याअर्थी तेवढ्यामुळें ईश्वराचें ईश्वरत्व कमी होत नाहीं. ॥ १५७ ॥

**विवरण:**—प्रारब्धकर्माचें उल्लंघन ईश्वरासही करितां येत नाहीं, हें खरें, पण 'प्राण्याच्या अफाट संचित कर्मांतील हें इतकेंच या जन्माचें कारण आहे' असें तरी ठरविणारा ईश्वरच होय कीं नव्हे ? मग झालें तर; एवढा ज्याचा अधिकार आहे, त्याला एखाद्या न्यायी राजाप्रमाणें आपल्याच नियमाचें उल्लंघन न करितां आल्यास त्यापासून त्याच्याकडे हीनत्व येत नसून उच्चत्वच येतें. ॥ १५७ ॥

याप्रमाणें इच्छाप्रारब्धाचा उपसंहार करून अनिच्छाप्रारब्धाच्या वर्णनास आरंभ करितात:—

**प्रश्नोत्तराभ्यामेवैतद्गम्यतेऽर्जुनकृष्णयोः ॥**
**अनिच्छापूर्वकं चास्ति प्रारब्धमिति तच्छृणु ॥ ५८ ॥**

अन्वयः—अर्जुनकृष्णयोः प्रश्नोत्तराभ्यां एव अनिच्छापूर्वकं प्रारब्धं अस्ति इति एतत् अवगम्यते-तत् शृणु ।

अर्थः—अर्जुनाचा प्रश्न व श्रीकृष्णाचें उत्तर यांवरूनही अनिच्छाप्रारब्ध आहे, असें समजतें कसें तें ऐक. ॥ १५८ ॥

विवरण:—अनिच्छा प्रारब्ध आहे ही गोष्ट कृष्णार्जुनसंवादरूप प्रमाणाच्या द्वाराच सिद्ध करण्याकरितां स्वामी येथें आरंभ करीत आहेत. ॥ १५८ ॥

श्रीमद्भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायांत अर्जुनानें श्रीकृष्णास असा प्रश्न केला आहे:—

**अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ॥**

**अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ५९ ॥**

अन्वयः—हे वार्ष्णेय, अनिच्छन् अपि बलात् नियोजितः इव केन प्रयुक्तः सन् अयं पुरुषः पापं चरति।

अर्थः—हे भगवन्, इच्छा नसतांनाही बलात्कारानें नियुक्त केल्याप्रमाणें कोणाकडून प्रेरित होत्साता हा पुरुष पाप करितो. ॥ १५९ ॥

विवरण:—इच्छेवांचून कोणाचीही कोणत्याही कामांत प्रवृत्ति होत नाहीं, असा सामान्य नियम आहे. पण इच्छा नसतांना बलात्कारानें जसें एकाद्यास कांहीं करावयास लावावें त्याप्रमाणें प्राण्यास त्याच्या त्याच्या इच्छेविरुद्ध पाप करावयास कोण लावितो? असा या प्रश्नाचा भावार्थ समजावा. ॥ १५९ ॥

यावर भगवानाचें उत्तर:—

**काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ॥**

**महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ १६० ॥**

अन्वयः—एषः कामः । क्रोधः अपि एषः एव। अयं महाशनः, महापाप्मा, रजोगुणसमुद्भवः अस्ति । एनं इह वैरिणं विद्धि ।

अर्थः—हा काम आहे, क्रोधही हाच होय. हा मोठा अधाशी व पापी काम रजोगुणापासून उत्पन्न झालेला आहे. याला येथें वैरी समज. ॥ १६० ॥

**विवरणः**—मनुष्याची पापामध्यें प्रवृत्ति करविणारा काम आहे. काम ह्मण विषयाभिलाष. यास जरा कोठें प्रतिबंध झाला कीं हा लागलाच क्रोध हो याची तृप्ति कधींच होत नाहीं. व त्यामुळें हा महापापी आहे. याची उत्पत्ति र गुणापासून होते. या लोकीं हा काम ह्मणजे एक मोठा शत्रु आहे असें प्रत्येक समजलें पाहिजे. ॥ १६० ॥

अशाच प्रकारचें भगवन्तांचें आणखी एक वाक्य उदाहरणार्थ घेतातः—

**स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ॥**
**कर्तुं नेच्छसि यन्मोहात् करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६१ ॥**

अन्वयः—हे कौंतेय, स्वभावजेन स्वेन कर्मणा निबद्धः त्वं यत् मोहात् कर्तुं इच्छसि तत् अवशः अपि करिष्यसि ।

**अर्थः**—हे कुंतिपुत्रा, स्वभावापासून उत्पन्न झालेल्या आपल्या कर्मांच्य योगानें अति बद्ध झालेला तूं मोहामुळें जें करण्याची इच्छा करीत नाह आहेस, तें त्या स्वभावाच्या आधीन होऊनही करशील. ॥ १६१ ॥

विवरणः—या अर्जुना, प्रारब्धप्राप्त कर्मांमुळें परतंत्र झालेला जो तूं त्या तुल इच्छेविरुद्धही आचरण करावें लागेल, कारण तू स्वतंत्र नाहींस. जे स्वतंत्र असतात तेच कांहीं करण्यास न करण्यास, किंवा काय हवें तें करण्यास समर्थ असतात. ॥ १६१ ॥

आतां परेच्छा प्रारब्धाचें वर्णन करितातः—

**नानिच्छंतो न चेच्छंतः परदाक्षिण्यसंयुताः ॥**
**सुखदुःखे भजंत्येतत्परेच्छापूर्वकर्म हि ॥ ६२ ॥**

अन्वयः—न अनिच्छन्तः न च इच्छन्तः किं तु परदाक्षिण्यसंयुताः सुखदुःखे भजन्ति । एतत् परेच्छापूर्वकर्म हि ।

**अर्थः**—निरिच्छ आहेत असेंही नाहीं व इच्छा करितात असेंही नाहीं, पण दुसऱ्याच्या सामर्थ्यामुळें प्रेरित होत्सातें कोणी दुःख व सुख भोगितात, हेंच परेच्छा प्रारब्ध कर्म होय. ॥ १६२ ॥

विवरण:—कोणी इच्छेच्या आधीन होऊन पाप करितात व कोणी विषयाभिलाषानें प्रेरित होत्साते इच्छेविरुद्ध पापाचरण करितात, असें पूर्वी सांगितलें आहे. पण परेच्छाप्रारब्धामध्यें यांतील एकही प्रकार होत नाहीं. तर दुसऱ्या कोणाच्या सामर्थ्यामुळें जीवास सुखदुःख भोगावें लागतें. याविषयीं हरिश्चंद्र राजाचें उत्तम उदाहरण आहे. कारण वसिष्ठांच्या अनुग्रहामुळें त्यास सुख व विश्वामित्राच्या क्रोधामुळें अत्यंत क्लेश झाले, हें सुप्रसिद्ध आहे. ॥ १६२ ॥

'असें जर आहे, तर " किमिच्छन् कस्य कामाय० " इत्यादि श्रुतीनें कांहीं तरी सांगितलें असें ह्मणावयास पाहिजे.' असें कोणी ह्मणेल ह्मणून 'किमिच्छन्' याचा गूढार्थ व्यक्त करितातः—

**कथं तर्हि किमिच्छन्नित्येवमिच्छा निषिध्यते ॥**
**नेच्छानिषेधः किं त्विच्छाबाधो भर्जितबीजवत् ॥ ६३ ॥**

अन्वय:—कथं तर्हि 'किमिच्छन्' इत्येवं इच्छा निषिध्यते ? अयं इच्छानिषेधः न किं तु भर्जितबीजवत् इच्छाबाधः अस्ति ।

अर्थ:—तर मग 'कशाची इच्छा करून' इत्यादि प्रकारें इच्छेचा निषेध कसा केला जात आहे ? (उत्तर) हा इच्छेचा निषेध नसून भाजलेल्या बीजाप्रमाणें तिचा बाध होय. ॥ १६३ ॥

विवरण:—श्रुतीमध्यें 'किमिच्छन्' असें जें ह्मटलें आहे त्यावरून इच्छेचा निषेध केला आहे असें ह्मणतां येणार नाहीं. कारण तो साक्षात् निषेध नसून केवल आक्षेप आहे. आक्षेपामध्यें निषेधार्थी उत्तर गुप्त असतें, हें खरें; पण तो प्रत्यक्ष निषेध नसल्यामुळें त्याचा अन्य तऱ्हेनेंही अर्थ होतो. वास्तव या आक्षेपाचें तात्पर्य निषेधामध्यें नसून इच्छेच्या नियमित प्रवृत्तीचा बाध करण्यांत आहे. ह्मणजे जीवन्मुक्त पुरुषाची इच्छा भाजलेल्या बीजाप्रमाणें आपलें संपूर्ण कार्य करण्यास असमर्थ असते व त्यामुळें ती प्राकृत पुरुषाच्या इच्छेप्रमाणें मुख्य प्रवृत्तीस कारण होत नाहीं, असा याचा गूढ अर्थ समजावा. ॥ १६३ ॥

पूर्वोक्त दृष्टांतच या श्लोकांत अधिक स्पष्ट करितातः—

**भर्जितानि तु बीजानि संत्यकार्यकराणि च ॥**
**विद्वदिच्छा तथेष्टव्याऽसत्त्वबोधान्न कार्यकृत् ॥ ६४ ॥**

अन्वयः—यथा भर्जितानि बीजानि अकार्यकराणि सन्ति तथा विद्वदिच्छा एष्टव्या । सा असत्त्वबोधात् न कार्यकृत् ।

अर्थः—ज्याप्रमाणें भाजलेलें बीं अंकुर उत्पन्न करीत नाहीं, त्याप्रमाणें विद्वानाची इच्छा समजावी; ( ह्मणजे ) ज्याची इच्छा करावयाची, तो पदार्थ असत् आहे असें समजल्यामुळें ती आपलें कार्य करावयास समर्थ नसते.

विवरणः—भाजलेलें कोणतेंही बीज अंकुर उत्पन्न करूं शकत नाहीं. कारण त्यास अग्नीचा संस्कार झाल्यामुळें त्याची अंकुरोत्पादक शक्ति नष्ट होत असते. ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे, अशा पुरुषाच्या विषयतृष्णेचीही तीच अवस्था होते. ह्मणजे तिला ज्ञानरूप अग्नीचा संस्कार झाल्यामुळें तीही बीजाप्रमाणें निःसत्व होते. ह्मणूनच भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत ' ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात् कुरुते ह्म० ज्ञानाग्नि सर्व कर्मे भस्म करून सोडतो ' असें ह्मटलें आहे. तात्पर्य ज्याची मी इच्छा करीत आहें, तो विषय असत्य ( कांहीं काल भासणारा ) आहे, असें समजल्यावर सहजच ती इच्छा आपलें अर्थरूप कार्य करण्यास समर्थ होत नाहीं.

वादीः—तर मग स्वकार्यास अयोग्य असलेल्या त्या इच्छेचा अंगीकार करण्यांत तरी काय तात्पर्य ? सिद्धान्तीः—या तुझ्या प्रश्नाचें सदृष्टान्त उत्तर देतों. ऐक—

दग्धबीजमरोहेऽपि भक्षणायोपयुज्यते ॥
विद्वदिच्छाऽप्यल्पभोगं कुर्यान्न व्यसनं बहु ॥ ६५ ॥

अन्वयः—अरोहे अपि दग्धबीजं भक्षणाय उपयुज्यते । तथा विद्वदिच्छा अपि अल्पभोगं कुर्यात् बहु व्यसनं न कुर्यात् ।

अर्थः—अंकुर जरी न आला तरी भाजलेलें बीज खाण्याच्या उपयोगीं असतें. तशीच विद्वानाची इच्छाही अल्पभोग घेते, पण फार दुःख देत नाहीं.

विवरणः—भाजलेल्या धान्याचें शेत उगवत नाहीं, तथापि त्याला जसें कोणी टाकून देत नाहीं, तर त्याचा क्षुधानिवृत्तीकडे उपयोग करितात, त्याप्रमाणें विद्वानाची प्रारब्धकर्मजन्य इच्छा त्याला संसाररूपी अनर्थांत पाडण्याविषयीं जरी समर्थ नसली, तरी अल्पभोगाच्या योगानें त्याच्या प्रारब्धाचा क्षय करण्यास समर्थ असते. वास्तव आम्ही तिचा अंगीकार करितों. ॥ १६५ ॥

वादीः—अहो, पण त्याला संसाररूपी मुख्य अनर्थांत जरी पडावें न लागलें, तरी भोगद्वारा विपत्तींत पडावें लागणारच. व त्यामुळें कर्म असेपर्यंत भोग व भोग असेपर्यंत त्याच्यापासून होणारें सुखदुःख यांचा परिहार कोणालाही करितां येणें शक्य नाहीं. सिद्धान्तीः—हें तुझें ह्मणणें व्यावहारिक पुरुषाविषयीं अगदीं बरोबर आहे; पण व्यवहारातीत ज्ञान्याविषयीं अगदीं बरोबर नाहीं. कारणः—

भोगेन चरितार्थत्वात्प्रारब्धं कर्म हीयते ॥
भोक्तृव्यसत्यता भ्रांत्या व्यसनं तत्र जायते ॥ ६६ ॥

अन्वयः—प्रारब्धं कर्म भोगेन चरितार्थत्वात् हीयते । च तत्र भोक्तृव्यसत्यता-भ्रांत्या व्यसनं जायते ।

अर्थः—प्रारब्धकर्म भोगाच्या योगानें सफल होत असल्यामुळें (भोगा-नंतर) तें क्षीण होतें. व त्या भोग्यांविषयीं सत्यताभ्रम झाल्यामुळें दुःख होतें. ॥ १६६ ॥

विवरणः—भोगाचें निमित्त प्रारब्ध आहे. यास्तव तें जीवास सुख, दुःख व त्याचें अधिष्ठान देह हीं देतें व एवढें केलें कीं, त्याचें काम संपलें. प्रारब्धकर्म याच्या पलीकडे कांहींएक करण्यास समर्थ नसतें. त्यामुळें ज्ञान्यास सुख दुःख व त्यांना अनुरूप असा देह यांची प्राप्ति जरी प्रारब्धामुळें होत असली तरी त्यांच्या योगानें प्राकृताप्रमाणें त्यांस अनर्थांत पडावें लागत नाहीं कारण ज्यांचा भोग घ्यावयाचा आहे ते पदार्थ नित्य आहेत असें समजल्यामुळेंच साधारण प्राण्यांस अनर्थ प्राप्त होत असतो. तस्मात् भोगांचा परिहार जरी कोणालाही करितां न आला तरी भोग्य पदार्थ अनित्य आहेत अशा दृढभावनेच्या योगानें ज्ञानी अनर्थांत पडत नाहीं. ॥ ६६ ॥

वादीः—पण भोग नित्य आहेत असा भ्रम सर्वांनाच कोठें होतो? द्रव्यादि पदार्थ आपल्याबरोबर परलोकीं येणार नाहींत. हा देह केव्हां ना केव्हां नष्ट होणार आहे, इत्यादि गोष्टी बहुतेकांस ठाऊक असतात. सिद्धान्तीः—हें खरें; पण बहुतेकांस जें नुसतें समजतें, त्यांतील एकाद्यासच उमजतें. देहादि सर्व अनित्य आहे, हें जरी सामान्यतः सर्व जाणत असले, तरी त्यांना नित्यताभ्रम होतोच. कसा ह्मणशील तर पहाः—

**मा विनश्यत्वयं भोगो वर्धतामुत्तरोत्तरम् ॥**
**मा विघ्नाः प्रतिबध्नंतु धन्योऽस्म्यस्मादिति भ्रमः ॥ ६७ ॥**

अन्वयः—अयं भोगः मा विनश्यतु । किं तु उत्तरोत्तरं वर्धताम् । विघ्नाः मा प्रतिबध्नन्तु । अहं अस्मात् धन्यः अस्मि इति भ्रमः ( सर्वत्र दृश्यते )।

अर्थः—हा भोग नष्ट न होवो. तर उत्तरोत्तर याची वृद्धि होवो. विघ्नें यास प्रतिबंध न करोत. मी यांच्या योगानें धन्य आहें. असा भ्रम ( सर्वत्र दिसतो ). ॥ १६७ ॥

विवरणः—बहुतेक सर्व प्राण्यांस भोग सत्य आहेत असा नकळत भ्रम कसा होतो ते येथे दाखविलें आहे. सांप्रतकालीं वेदांत शास्त्राचें अवलंबन करून "सर्व मिथ्या आहे" असें ह्मणणारे व लोकांस तसा उपदेश करणारे विद्वान पुष्कळ आढळतात. पण ते सर्व भ्रमिष्ट असतात असें त्यांच्या स्वतःच्या आचरणावरूनच कसें ओळखावें, हे जर कोणास शिकावयाचें असेल तर त्यांना या श्लोकाचें पुष्कळ साह्य होईल. सारांश, या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें ज्याची ज्याची भावना असेल तो तो प्रत्यक्ष ब्रह्मदेव असला तरी भ्रान्तच होय. ॥ १६७ ॥

खरा जो ज्ञानी आहे. तो या भ्रमाचा कोणत्या उपायानें निरास करितो, तें आतां सांगतात:—

**यदभावि न तद्भावि भावि चेन्न तदन्यथा ॥**
**इति चिंताविषघ्नोऽयं बोधो भ्रमनिवर्तकः ॥ ६८ ॥**

अन्वयः—यत् अभावि तत् न भावि । भावि चेत् तत् न अन्यथा । इति चिंताविषघ्नः अयं बोधः भ्रमनिवर्तकः अस्ति ।

अर्थः—जें न होणारें तें होणार नाहीं. व जें होणार असेल तें चुकणार नाहीं. अशा प्रकारचा हा चिंतारूपी विषाचा नाश करणारा बोध भ्रमाचें निवारण करणारा आहे. ॥ १६८ ॥

विवरणः—प्रारब्धकर्म दुर्लंघ्य असल्यामुळें त्याचें निवारण कोणत्याही उपायानें होणार नाहीं. असें ज्यास पूर्णपणें समजलेलें असतें तो "माझें कल्याण कधीं

होईल; मी या यातनेंतून कधीं सुटेन? " इत्यादि प्रकारें चिंता करून त्या चितारूपी अग्नींत जळून जात नाहीं. यास्तव अशा प्रकारचा बोधच भ्रमाचें निरसन करणारा आहे, यांत कांहीं शंका नाहीं. ॥ १६८ ॥

प्रश्न:—पण ज्ञानी व अज्ञानी असे दोघेही जर एकसारखेच भोग भोगीत असतात तर एकानें अनर्थांत पडूं नये व दुसऱ्यानें पडावें असें कां होतें? उत्तर:—

**समेऽपि भोगे व्यसनं भ्रांतो गच्छेन्न बुद्धवान् ॥**
**अशक्यार्थस्य संकल्पाद्भ्रांतस्य व्यसनं बहु ॥ १६९ ॥**

अन्वय:—भोगे समे सति अपि भ्रांतः व्यसनं गच्छेत् न बुद्धवान्। अशक्यार्थस्य संकल्पात् भ्रांतस्य बहु व्यसनं भवति।

**अर्थ:—भोग सारखाच असतांनाही भ्रमिष्ट संकटांत पडतो व ज्ञानी पडत नाहीं. कारण, अशक्य गोष्टींचा संकल्प केल्यामुळें भ्रमिष्टास अनेक संकटें भोगावीं लागतात. ॥ १६९ ॥**

विवरण:—ज्याला आत्मसाक्षात्कार झालेला नाहीं, व जो जीव जगत् इत्यादि सर्व नित्य आहे असें मानीत असतो, त्याला भ्रांत असें म्हटलें आहे. व त्याच्यावर अनेक संकटें येऊन पडत असतात, कारण तो जी कधींही न होणारी गोष्ट ती व्हावी अशी इच्छा करांत असतो, पण ज्याला आत्मसाक्षात्कार झाला आहे. व त्यामुळें जो हें सर्व अनात्मजात असत् आहे, असें जाणत असतो, त्यास पूर्वोक्त प्राकृताप्रमाणें संकटांत पडावें लागत नाहीं. तात्पर्य; हे भोग्य पदार्थ कधींही नष्ट न व्हावेत, व मीही अजरामर होऊन राहावें, असा विचार करणें हेंच अनर्थाचें मूळ आहे. ॥ १६९ ॥

तर मग तत्त्वज्ञान्यास भोगांचा अनुभव कसा कसा होतो? असें कोणी विचारील म्हणून श्री भारतीतीर्थ म्हणतात:—

**मायामयत्वं भोगस्य बुद्ध्वाऽऽस्थामुपसंहरन् ॥**
**भुंजानोऽपि न संकल्पं कुरुते व्यसनं कुतः ॥ १७० ॥**

अन्वय:—भोगस्य मायामयत्वं बुद्ध्वा आस्थां उपसंहरन् ज्ञानी भुंजानः सन् अपि संकल्पं न कुरुते। व्यसनं कुतः?

अर्थः—भोग मायामय आहेत असें जाणून त्यांच्या विषयींची प्रीति कमी करणारा ज्ञानी भोग जरी भोगीत असला, तरी संकल्प करीत नाहीं. मग त्याच्यावर संकट कोठून येणार? ॥ १७० ॥

विवरणः—सर्व जग मिथ्या आहे असें एकदां निश्चयपूर्वक समजलें कीं ज्ञानी पुरुष विषयांविषयींची प्रीति सोडतो व ते विषयच अप्रिय झाल्यामुळें तो त्यांचा भोग मोठ्या नाखुषानें घेतो. अर्थात् विषयोपभोग त्यास इतरांप्रमाणें आनंद देत नाहींत. व त्यामुळें ते मला पुष्कळ दिवस मिळावे असें तो मनांतही आणीत नाहीं. मग त्याच्यावर विषयामुळें संकट कसें ओढवणार ? ॥ १७० ॥

पूर्व श्लोकांत सांगितलेली गोष्टच पुनः अधिक स्पष्ट करितातः—

**स्वप्नेन्द्रजालसदृशमचिंत्यरचनात्मकम् ॥**
**दृष्टनष्टं जगत्पश्यन कथं तत्रानुरज्यति ॥ ७१ ॥**

अन्वयः—स्वप्नेंद्रजालसदृशं अचिन्त्यरचनात्मकं दृष्टनष्टं जगत् पश्यन् तत्र कथं अनुरज्यति ।

अर्थः—स्वप्न व इंद्रजाल याप्रमाणें असणारें, ज्याची रचना अचिन्त्य आहे व जें क्षणभंगुर आहे अशा जगास पहाणारा ज्ञानी त्यामध्यें कसा बरें अनुरक्त होईल. ॥ १७१ ॥

विवरणः—अद्वैत शास्त्रामध्यें भिन्न योग्यतेच्या अधिकाऱ्यांकरितां दोन वाद प्रचलित आहेत. एक दृष्टिसृष्टिवाद व दुसरा सृष्टिदृष्टिवाद; हे दोन्ही वाद सर्व आचार्यांस मान्य आहेत. यांतील प्रथम वादांत एक दृश्यसत्ता व दुसरी दृक्सत्ता अशा दोन सत्ता मानिल्या आहेत व त्यांतील पहिली प्रातिभासिक सत्ता व दुसरी पारमार्थिक सत्ता होय असें ह्मटलें आहे. दृश्य सत्ता ह्मणजे ज्ञात होणाऱ्या पदार्थांची सत्ता व दृक्सत्ता ह्मणजे स्वरूपभूत ज्ञानाची सत्ता होय. सत्ता तीन प्रकारची असते. एक पारमार्थिक, दुसरी व्यावहारिक व तिसरी प्रातिभासिक किंवा प्रातीतिक. जिचा तिन्हीं कालीं बाध होत नाहीं ती पारमार्थिक सत्ता होय. जशी ब्रह्मसत्ता. जिचा केवल जागृतीरूप व्यवहारांत बाध होत नाहीं, पण स्वप्न, सुषुप्ति, मूर्छा व समाधि या अवस्थेंत बाध होतो, ती व्यावहारिक सत्ता होय. जशी घटसत्ता. अधिष्ठानाचें

यथार्थ ज्ञान झालें असतां, जी नष्ट होत असते ती प्रातिभासिक अथवा प्रातीतिक सत्ता होय; जशी शुक्तीच्या ठायीं भासलेल्या रजताची सत्ता. व्यावहारिकसत्तायुक्त जे पदार्थ असतात, त्यांची खरी खरी निवृत्ति केवल एका आत्मसाक्षात्कारावस्थेंत मात्र होत असते. त्यामुळें ते सर्वही पदार्थ प्रातिभासिक सत्तायुक्तच आहेत. कारण-त्यांचें अधिष्ठान जें ब्रह्म त्याचें ज्ञान झालें असतां ते सर्व बाधित होत असल्यामुळें पूर्वोक्त प्रातिभासिक सत्तेचें लक्षण यांच्या ठायींही आहे. ह्मणून दृष्टिसृष्टिवादाच्या दृष्टीनें येथें स्वप्नाचा दृष्टांत दिला आहे. सृष्टिदृष्टि वादामध्यें शुक्तीवर भासणाऱ्या रूप्याच्या प्रातिभासिक सत्तेहून ब्रह्मावर भासणारी आकाशादिकांची सत्ता भिन्न मानली आहे व त्यामुळें जग व्यावहारिक सत्तायुक्त आहे, असें ह्मणावें लागतें. या वादाच्या दृष्टीनें इंद्रजालाचा दृष्टान्त दिला आहे. कारण स्वप्नादि भासापेक्षां मंत्राच्या योगानें क्षुब्ध झालेल्या मायेच्या योगानें भासणारें गंधर्वनगर कांहींसें निराळ्या प्रकारच्या सत्तेनें युक्त असतें. असो; जग हें स्वप्न व इंद्रजालाप्रमाणें आहे हें सिद्ध करण्याकरितां येथें अचिन्त्यरूप व दृष्टनष्ट असे दोन हेतु दिले आहेत. या जगाची रचना कोणीं, केव्हां व कशी केली, याविषयीं केवळ विचारही करितां येत नाहीं. श्रीमच्छंकराचार्यांनींही शारीरक भाष्यांत " मनसाप्यचिंत्यरचनारूपस्य " ह्मणजे " मनानें अचिन्त्य अशी रचना हेंच रूप आहे ज्याचें " असें या जगाला विशेषण दिलें आहे. दृष्टनष्टं-ह्मणजे विजेप्रमाणें दिसतें न दिसतें तों नष्ट होणारें अर्थात् क्षणभंगुर. सारांश; अशा प्रकारच्या जगाकडे पाहणारा पुरुष त्याच्या ठायीं आसक्त कसा बरें होईल ? १७१

द्विविध अधिकाऱ्यांकरितां दोन भिन्न मतें कोणतीं आहेत व श्लोकांतील दोन दृष्टांतांपैकीं पहिला कोणाकरितां आहे व दुसरा कोणाकरितां आहे हें पूर्वश्लोकाच्या विवरणांत सांगितलें आहे. आतां या श्लोकांत प्रथम अधिकाऱ्यांकरितां दिलेला जो स्वप्नदृष्टांत त्याचें अनुसंधान करावें, असें सांगतातः—

**स्वस्वप्नमापरोक्ष्येण दृष्ट्वा पश्यन् स्वजागरम् ॥**
**चिंतयेदप्रमत्तः सन्नुभावनुदिनं मुहुः ॥ ७२ ॥**

अन्वयः—स्वस्वप्नं आपरोक्ष्येण दृष्ट्वा स्वजागरं पश्यन् अप्रमत्तः सन् उभौ अपि अनुदिनं मुहुः चिंतयेत् ।

**अर्थ—आपलें स्वप्न साक्षात् पाहून आपली जाग्रदवस्था पाहणाऱ्या पुरुषानें सावध होऊन त्या उभयतांविषयीं नित्य वारंवार चिंतन करावें. ॥ १७२ ॥**

विवरण:—स्वप्न व जाग्रद् या दोन्ही अवस्थांचा द्रष्टा एकच आहे हें पूर्वीच सिद्ध झालें आहे. यास्तव ग्रंथकार येथें ह्मणतात कीं आपलें स्वप्न प्रत्यक्षपणें पाहून आपली जाग्रदावस्था पाहणाऱ्या पुरुषानें सूक्ष्म विचार करावा. ह्मणजे त्यास—दोन्ही अवस्था परस्परें व्यावृत्त होणाऱ्या आहेत. व यास्तव दोन्ही मिथ्या आहेत—असें समजेल. याच गोष्टीचें त्यानें चिंतन करावें, ह्मणजे पुनरपि स्वप्नापेक्षां जाग्रत् निराळ्या प्रकारची अवस्था आहे. असा भ्रम होणार नाहीं. ॥ १७२ ॥

पण असा भ्रम न झाल्यापासून तरी काय लाभ आहे ? असें कोणी ह्मणेल ह्मणून श्रीभारतीतीर्थ ह्मणतात:—

चिरं तयोः सर्वसाम्यमनुसंधाय जागरे ॥
सत्यत्वबुद्धिं संत्यज्य नानुरज्यति पूर्ववत् ॥ ७३ ॥

अन्वय:—तयोः सर्वसाम्यं चिरं अनुसंधाय जागरे सत्यत्वबुद्धिं संत्यज्य असौ पूर्ववत् तस्मिन् न अनुरज्यति ।

अर्थ:—त्या दोन्ही अवस्था सर्वप्रकारें सत्य आहेत असें चिरकाल अनुसंधान करून व जाग्रदवस्थेविषयींची जी सत्यताबुद्धि तिचा पूर्णपणें त्याग करून हा पूर्वीप्रमाणें जाग्रदवस्थेंत आसक्त होत नाहीं. ॥ १७३ ॥

विवरण:—पूर्व श्लोकाच्या विवरणांत सांगितल्याप्रमाणें दोन्ही अवस्था एकसारख्याच आहेत. वस्तुत: त्यांच्यामध्यें कोणत्याही प्रकारचा फरक नाहीं. दीर्घकाळ चिंतन केलें असतां, जाग्रदवस्था खरी आहे, हिचा कधींही बाध होणें शक्य नाहीं, अशा प्रकारची जी सामान्यबुद्धि ती नष्ट होते, व ही अवस्थासुद्धां स्वप्नाप्रमाणें क्षणभंगुर आहे, असा दृढ निश्चय होतो. असें झालें असतां, जाग्रत् सत्य आहे अशी जेव्हां समजूत होती, त्या वेळीं जसा हा पुरुष तिच्या ठायीं आसक्त होऊन राहात होता तसा आतां आसक्त होत नाहीं; तिच्या विषयींची प्रीति सर्वथैव टाकितो. या दोन्ही अवस्था जर एकमेकांसारख्याच आहेत तर त्या भिन्न कां भासतात ! असा जर कोणास संशय असला, तर त्यानें या ग्रंथाच्या प्रथम प्रकरणाचा ' तथा स्वप्नेऽत्र ' हा चवथा श्लोक पहावा. ॥ १७३ ॥

१ जाग्रत्समयीं स्वप्न न भासणें व स्वप्नकालीं जाग्रत् न भासणें हीच परस्पर व्यावृत्ति होय.

आतां दुसऱ्या प्रकारचे जे अधिकारी असतात त्यांनींही 'हें इंद्रजाल आहे' असें चिंतन करावें, असें या श्लोकांत विधान करावयाचें आहे. पण–हें जग मायिक आहे असें समजल्यावर सुखदुःखसाक्षात्काररूप प्रारब्धभोग कसा होणार! कारण, हें जग मायिक आहे ही चित्तवृत्ति, व मी सुखी आहे, दुःखी आहें, इत्यादि वृत्ति परस्पर विरोधी असल्यामुळें एकाच कालीं राहूं शकणार नाहींत. अशी शंका येण्यासारखी आहे. यास्तव तिचें निरसन करून प्रस्तुत विधान करितातः—

**इंद्रजालमिदं द्वैतमचिंत्यरचनात्वतः ॥**
**इत्यविस्मरतो हानिः का वा प्रारब्धभोगतः ॥ ७४ ॥**

अन्वयः—अचिन्त्यरचनात्वतः इदं द्वैतं इंद्रजालं अस्ति इति अविस्मरतः प्रारब्धभोगतः का वा हानिः।

अर्थः—याची अचिन्त्य रचना असल्यामुळें हें द्वैत इंद्रजाल आहे. असें न विसरणाऱ्याची प्रारब्धभोगांच्या योगानें कोणती हानि होणार? ॥ १७४ ॥

विवरणः—जीव व ईश्वर यांचा भेद, जीवांचा परस्पर भेद, जीव व जगत् यांचा भेद, इत्यादि भेदांनीं युक्त असें हें द्वैत, गारुडाप्रमाणें मिथ्यात्वशालि आहे. कारण त्याच्या रचनेविषयीं नुसतें मननही करितां येत नाहीं. व जें जें अशा प्रकारें अचिन्त्य असतें, तें तें गौडबंगाल असतें, असा नियम आहे, असें अनुमान करून त्याच्या द्वारा होणाऱ्या ज्ञानाला न विसरतां जर कोणी प्रारब्धभोग भोगीत असला तर त्यापासून त्याची काय हानि होणार आहे?–एकाच समयीं दोन वृत्ति उत्पन्न होऊं शकत नाहींत–हें तार्किकांचें मत आहे. व तें अनुभवाच्या (व श्रुतीच्याही) विरुद्ध असल्यामुळें वेदान्त्यांस मान्य नाहीं. कारण माझ्या पायाला एका सुंदर स्त्रीनें स्पर्श केला आहे व त्यामुळें मला सुख होत आहे, नेत्रांनीं तिचें मुखकमल पाहून माझ्या मनास आल्हाद वाटत आहे, मनामध्यें 'हरि हरि' असें ईश्वरचिंतन करीत असल्यामुळें माझा अंतरात्मा या समयीं फार तृप्त होत आहे; पण मस्तकामध्यें जरा वेदना होत असल्यामुळें मला किंचित् अस्वस्थता वाटत आहे, अशा एकाच कालीं अनेक वृत्ति उत्पन्न होत असतात, असें आपण पहातों. तस्मात् जग म्हणजे एक गौडबंगाल आहे, ही समजूत व प्रारब्धप्राप्त भोग यांचें एकाच कालीं अस्तित्व होऊं शकतें. ॥ १७४ ॥

आतां दोन वृत्ति एकाच समयीं अंतःकरणांत राहूं शकत नाहींत, असें जें ह्मणणें आहे तें विरोधी पदार्थांविषयीं बरोबर आहे; व ज्यांचा समान विषय असतो, त्यांच्यामध्येंच विरोध असतो. पण प्रस्तुत प्रकार तसा नाहीं. कसा ह्मणशील तर पहा:—

**निर्बंधस्तत्त्वविद्याया इंद्रजालत्वसंस्मृतौ ॥**
**प्रारब्धस्याग्रहो भोगे जीवस्य सुखदुःखयोः ॥ ७५ ॥**

अन्वय:—तत्त्वविद्यायाः इंद्रजालत्वसंस्मृतौ निर्बंधः । प्रारब्धस्य तु जीवस्य सुखदुःखयोः भोगे आग्रहः ।

अर्थ:—तत्त्वज्ञानाचा इंद्रजालतेच्या स्मरणाविषयीं आग्रह आहे व प्रारब्धाचा जीवाच्या सुखदुःख भोगांविषयीं आग्रह आहे. ॥ १७५ ॥

विवरण:—सर्व द्वैत इंद्रजालरूप आहे असें नित्य ध्यानांत ठेवणें हेंच तत्त्वविद्येचें कार्य आहे. ती याच्यापेक्षां अन्य कांहीं इच्छित नाहीं. तसेंच प्रारब्धकर्म हें जीवांस दुःखादि भोग देण्यापर्यंतच प्रयत्न करीत असतें. सुखादुःखादि भोगांहून दुसरें कोणतेंही काम करण्याची त्याची इच्छा नसते. अर्थात् तत्त्वज्ञान व प्रारब्ध यांचा विषय एक नसल्यामुळें त्यांच्यामध्यें परस्पर विरोध येत नाहीं. सारांश, एकाच कालीं या दोन्ही वृत्ति अंतःकरणांत राहूं शकतात. ॥ १७५ ॥

तात्पर्य:—

**विद्यारब्धे विरुध्येते न भिन्नविषयत्वः ॥**
**जानद्भिरप्यैन्द्रजालविनोदो दृश्यते खलु ॥ ७६ ॥**

अन्वय:—भिन्नविषयत्वतः विद्यारब्धे न विरुध्येते । जानद्भिः अपि ऐंद्रजालविनोदः दृश्यते खलु ।

अर्थ:—विषय भिन्न असल्यामुळें आत्मज्ञान व प्रारब्धकर्म यांच्यामध्यें विरोध नाहीं. हें इंद्रजाल आहे, असें जाणणारेही त्याचा चमत्कार पाहात असतात हे प्रसिद्ध आहे. ॥ १७६ ॥

विवरण:—ज्ञान व प्रारब्धकर्म यांमध्यें विरोध नसतो, याविषयीं अनुभवरूप दृष्टांत देतात. गारुडी किंवा जादुगार जो खेळ करून दाखवीत असतो तो सर्व मिथ्या

आहे, असें जाणत असतांनाही मोठमोठे लोक त्याच्याकडे मोठ्या आश्चर्यानें पाहात असतात असें आह्मी नेहमीं पाह्मतों. प्रस्तुत शतकामध्येंही दारोदार भीक मागत हिंडणाऱ्या गारुड्यांचा अनादर करणारे ज्ञानीही प्रो० कमलाकांतासारख्या नाटकगृहांत जादू करणाऱ्या गारुड्याच्या मागें कसे लागतात, हें बहुतेक सर्वांस ठाऊक आहेच.

आत्मज्ञान व प्रारब्ध यांच्यामध्येंही विरोध आला असता. पण तो कव्हां?—

**जगत्सत्यत्वमापाद्य प्रारब्धं भोजयेद्यदि ॥**

**सदा विरोधि विद्याया भोगमात्रान्न सत्यता ॥ ७७ ॥**

**अन्वयः**—यदि प्रारब्धं जगत्सत्यत्वं आपाद्य भोजयेत् तर्हि तत् विद्यायाः सदा विरोधि स्यात्। किं तु भोगमात्रात् सत्यता न भवति।

**अर्थः**—जर प्रारब्धकर्म जग सत्य आहे असें ठरवून भोग भोगवितें, तर तें विद्येच्या सर्वदा विरोधि होतें. पण केवळ भोगामुळें जगाचें सत्यत्व ठरत नाहीं. ॥ १७७ ॥

**विवरण**:—प्रारब्धकर्म प्राण्यास केवळ भोग देण्याचें सोडून जग सत्य आहे, असें जर शिकवूं लागतें तर मात्र तें—जग मिथ्या आहे व आत्माच सत्य आहे—या तत्त्वज्ञानाच्या विरोधि आहे असें झालें असतें. पण तें हा असा अव्यारेपु व्यापार करीत नाहीं. शिवाय केवळ भोग होत असल्यामुळेंच जग सत्य आहे, असेंही ठरणें शक्य नाहीं. ॥ १७७ ॥

**वादीः**—तुह्मी जें ह्मणतां तें मी सर्व समजलों; पण जग सत्य आहे असें समजल्यावांचून त्यांतील पदार्थांच्या द्वारा प्रारब्धकर्मामुळें भोग कसा मिळेल! **सिद्धान्तीः**—या प्रश्नाचें उत्तर आह्मी नुकेंच ह्मणजे 'जानन्निरप्यैन्द्रजाल०' इत्यादि एकशें शाहात्तराव्या श्लोकाच्या उत्तरार्धांत दिलें आहे. **वादीः**—पण तें संशय उत्पन्न करणारें आहे. कारण त्या श्लोकांत दृश्यते ह्मणजे चमत्कार पाहिला जातो, असें ह्मणून पाहणें या धातूचा प्रयोग केला आहे. पण त्यावरून ते भोग घेतात असें सिद्ध होणें अशक्य आहे. **सिद्धान्तीः**—खरें आहे आणखी एक उत्तम दृष्टान्त देतों. ऐक.—

**अनूनो जायते भोगः कल्पितैः स्वप्नवस्तुभिः ॥**

**जाग्रद्वस्तुभिरप्येवमसत्यैर्भोग इष्यताम् ॥ ७८ ॥**

अन्वयः—कल्पितैः स्वप्नवस्तुभिः अनूनः भोगः जायते । एवं असत्यैः अपि जाग्रद्वस्तुभिः भोगः इष्यताम् ।

अर्थ:—संकल्परूप अशा स्वप्नांतील वस्तूंच्या योगानेंही पूर्ण भोग होतो. त्याचप्रमाणें असत्य अशा जाग्रदवस्थेंतील वस्तूंच्या योगानेंही भोग होतो, असें समजावें. ॥ १७८ ॥

विवरण:—मिथ्या पदार्थांच्या योगानें भोग होणें शक्य नाहीं असें वाद्याचें ह्मणणें होतें व त्याचें समाधान करण्याकरितां हा श्लोक प्रवृत्त झाला आहे. स्वप्नांत भासणारे पदार्थ व्यावहारिक सत्य नाहींत, तर ते केवल स्वप्न पाहाणाऱ्या पुरुषाच्या कल्पनारूप आहेत; हें उघड आहे. पण असल्या मनोमय पदार्थांच्या योगानेंही स्वप्न पाहाणाऱ्यास सुखदुःखादि भोग मिळतात. व ते जागृतींतील भोगांहून कमी असतात असेंही नाहीं. तेव्हां सत्य पदार्थांवांचून भोग होत नाहींत, हें ह्मणणें व्यर्थ आहे. सारांश, स्वप्नाप्रमाणेंच जागृतींतही असत्य पदार्थांच्या योगानेंच प्राण्यास भोग घडतात असें समजणें निर्दोष आहे. ॥ १७८ ॥

प्रश्न:–प्रारब्ध व तत्त्वज्ञान यांचा जर विरोध नाहीं, असें समजलें, तर 'सर्व कर्में क्षीण होतात ' ही मुंडकश्रुति व त्याप्रमाणें, ज्ञानाग्नि सर्व कर्में भस्म करून सोडतो ' ही स्मृति अप्रमाण ठरते. कारण या श्रुतिस्मृतींवरून प्रारब्ध व ज्ञान यांमध्यें विरोध उत्पन्न झालाच पाहिजे, असें सूचित होतें. उत्तरः—तुझें ह्मणण अगदीं बरोबर आहे. पण तें येथें पूर्णपणें लागू पडत नाहीं. कसें ह्मणशील तर पहा:—

**यदि विद्याऽपन्हुवीत जगत्प्रारब्धघातिनी ॥**
**तदा स्यान्न तु मायात्वबोधेन तदपन्हवः ॥ ७९ ॥**

अन्वयः—यदि विद्या जगत् अपह्नुवीत तर्हि सा प्रारब्धघातिनी स्यात् । किं तु मायात्वबोधेन तदपह्नवः न भवति ।

अर्थ:—जर विद्या जगाचा बाध करती तर ती प्रारब्धघातिनी झाली असती. पण जग मायामय आहे अशा ज्ञानानें त्याचा बाध होत नसतो.

विवरण:—रज्जूच्या ठायीं भासलेल्या सर्पाचा रज्जुज्ञानानें निषेध झाला असतां जसा सर्वथैव बाध होतो, तसा जर आत्मज्ञानाच्या योगानें जगाचा बाध होता तर आत्मज्ञान प्रारब्धाचा घात करणारें आहे, असें आह्मी निःशंकपणें ह्मटलें असतें. पण

जग मायामय आहे एवढ्या बोधानें त्याचा रज्जूवर भासलेल्या सर्पाप्रमाणें बाध होत असतो, असा कोणाचाही अनुभव नाहीं व शास्त्रही असें सांगत नाहीं. एवढ्याकरितां व्यावहारिक सत्ता प्रातिभाषिक सत्तेहून निराळी मानिली आहे. आतां मुंडकादिश्रुतीमध्यें 'सर्वे कर्मे' असें जें ह्मटलें आहे त्याचा अर्थ भाष्यकारांनीं प्रारब्धकर्मावाचून इतर अनेकजन्मकृत संचितकर्मे व ज्ञानानंतर घडणारीं क्रियमाण कर्मे असा केला आहे. तेव्हां सर्व शब्दामुळें त्यांत प्रारब्धाचा अंतर्भाव होतो, असें ह्मणतां येत नाहीं. ॥ १७९ ॥

हीच गोष्ट आतां पूर्वोक्त दृष्टान्तद्वारा स्पष्ट करून दाखवितात:—

**अनपन्हुत्य लोकास्तदिंद्रजालमिदं त्विति ॥**
**जानन्त्येवानपन्हुत्य भोगं मायात्वधीस्तथा ॥ १८० ॥**

अन्वय:—लोका: तत् अनपन्हुत्य इदं तु इंद्रजालं इति जानन्ति एव । तथा भोगं अनपन्हुत्य मायात्वधी: भवति ।

अर्थ:—लोक त्या इंद्रजालरूपाचा निरास न करितां 'हें तर इंद्रजाळ आहे' असें जाणतात. त्याचप्रमाणें भोगांचा निरास न करितां जग मायामय आहे, अशी बुद्धि होते. ॥ १८० ॥

विवरण:—जादुगार जादूकरून कांहीं विचित्र सृष्टि निर्माण करितो. व पुनरपि तिचा उपसंहार करणेंही त्याच्याच हातीं असतें. त्यामुळें त्याच्याकडे जे पाहात असतात ते जरी हें सर्व गोडबंगाल आहे, खरें नव्हे, असें जाणत असले तरी त्यांना त्याचा निरास करितां येत नाहीं. त्याचप्रमाणें जग मिथ्या आहे असें जरी ज्ञान झालें तरी ईश्वरानें निश्चित केलेल्या प्रारब्धामुळें प्राप्त होणाऱ्या दु:खादि साक्षात्काराचा निरास कोणाही जीवास करितां येत नाहीं. सारांश, भोग्यपदार्थरूप जगाचा अपलाप जरी न झाला, तरी तें मायामय आहे असें ज्ञान होणें शक्य आहे. ॥ १८० ॥

वादी:—हा तुमचा सिद्धांत खरा मानल्यास अनेक श्रुतींशीं विरोध येतो. कसा ह्मणाल सांगतों:—

**यत्र त्वस्य जगत्स्वात्मा पश्येत्कस्तत्र केन किम् ॥**
**किं जिघ्रेत् किं वदेद्वेति श्रुतौ तु बहु घोषितम् ॥ ८१ ॥**

अन्वयः—यत्र तु जगत् अस्य स्वात्मा भवति तत्र कः केन किं पश्येत् किं जिघ्रेत् किं वदेत् वा इति श्रुतौ तु बहु घोषितम् अस्ति ।

अर्थ:—ज्या वेळीं जग ह्या पुरुषांचा स्वात्मा होतो, त्या वेळीं कोण कशाच्या योगानें व काय पहाणार ? काय हुंगणार ? काय बोलणार ? असा श्रुतिमध्यें तर पुष्कळ घोष केला आहे. ॥ १८१ ॥

विवरण:—आत्म्याहून अन्य, सर्व मिथ्या आहे व आत्माच सर्वांचें अधिष्ठान असल्यामुळें तें आत्मरूपच आहे, असें कोणत्याही पुरुषास साक्षात् ज्ञान होतें, तेव्हां आत्म्याहून भिन्न असं कांहींच नसल्यामुळें त्याला द्वैतविषयक ज्ञान होणें शक्य नसतें. कारण कर्ता, कर्म, करण इत्यादि क्रियेचीं साधनें आहेत; पण ऐक्यज्ञानानें त्या सर्वांचाच लय झाल्यावर ज्ञानरूप क्रिया कशी होणार ? कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् ? ह्मणजे, अर्जुना, तो पुरुष कोणास कसा मारील व कोणास कसा मारवील ? अशी स्मृतिही आहे. तस्मात् या श्रुतीस्मृतींप्रमाणें पाहिलें असतां आत्मज्ञान्यास जगाचें भान होणें शक्य नाहीं. ॥ १८१ ॥

सिद्धान्ती:—पण अशी श्रुति व स्मृति असली ह्मणून काय झालें ? वादी:—

तेन द्वैतमपन्हुत्य विद्योदेति न चान्यथा ॥
तथा च विदुषो भोगः कथं स्यादिति चेच्छृणु ॥ ८२ ॥

अन्वयः—तेन द्वैतं अपह्नुत्य विद्या उदेति च न अन्यथा (इति सिद्धं) तथा च विदुषः भोगः कथं स्यात् इति चेत् शृणु ।

अर्थ:—तस्मात् द्वैताचा निरास करून विद्या उत्पन्न होते व त्यावांचून नाहीं. ( हें सिद्ध झालें. ) तेव्हां विद्वानास भोग कसा होणार ? (सिद्धान्ती:—) असें जर ह्मणशील तर ऐक. ॥ १८२ ॥

विवरण:—श्रुतीनें असा घोष केलेला असल्यामुळें द्वैताचा निषेध झाल्यावांचून आत्मसाक्षात्कार होत नाहीं, असें ठरलें. अर्थात् विद्वानास भोग घडणें शक्य नाहीं. वाद्याचें हें सर्व ह्मणणें ऐकून घेऊन सिद्धान्ती ह्मणतात कीं, तूं ज्या श्रुतिचा निर्देश केला आहेस ती श्रुति जीवन्मुक्त पुरुषाविषयीं नाहीं. कारण स्वतः सूत्रकारांनींच तिचा अन्य विषय दाखविला आहे. कोणता व कोठें ह्मणून ह्मणशील तर सांगतों ऐक–

सुषुप्तिविषया मुक्तिविषया वा श्रुतिस्त्विति ॥
उक्तं स्वाप्ययसंपत्त्योरितिसूत्रे ह्यतिस्फुटम् ॥ ८३ ॥

अन्वयः—स्वाप्ययसंपत्त्योः इति सूत्रे श्रुतिः तु सुषुप्तिविषया मुक्तिविषया वा इति हि अति स्फुटं उक्तम् ।

अर्थः—स्वाप्ययसंपत्त्योः ० ( ब्र. मी. अ. ४, पा. ४. सूत्र १६. ) या सूत्रांत प्रस्तुत श्रुति निद्राविषयक किंवा मुक्तिविषयक आहे, असें अति स्पष्टपणें सांगितलें आहे. ॥ १८३ ॥

विवरणः—स्वाप्यय० इत्यादि सूत्राचा अर्थ असाः—तत् केन कं विजानीयात् इत्यादि श्रुतीचा अर्थ क्वचित् सुषुप्तिपर व क्वचित् मुक्त अवस्थापर लागतो. कारण प्रत्यक्ष श्रुतीनेंच तसें व्यक्त केलें आहे. यास्तव पूर्वोक्त व तशाच प्रकारच्या दुसऱ्याही विशेष विज्ञानाचा बाध करणाऱ्या श्रुति सुषुप्ति व विदेहमुक्तावस्थापर लागत असल्यामुळें द्वैताचा निषेध झाल्यावांचून जीवन्मुक्तावस्था प्राप्त होणें शक्य नाहीं. असें ह्मणणें अयोग्य आहे. ॥ १८३ ॥

पण पूर्वोक्त श्रुति सर्व मुक्त पुरुषांच्या अवस्थेचें वर्णन करीत असते. केवळ विदेहमुक्ताच्याच अवस्थेचें वर्णन करिते असें नाहीं, असें ह्मटल्यास काय हानि होणार आहे ? उत्तरः—

अन्यथा याज्ञवल्क्यादेराचार्यत्वं न संभवेत् ॥
द्वैतदृष्टावविद्वत्ता द्वैतादृष्टौ न वाग्वदेत् ॥ ८४ ॥

अन्वयः—अन्यथा याज्ञवल्क्यादेः आचार्यत्वं न संभवेत् । द्वैतदृष्टौ अविद्वत्ता च द्वैतादृष्टौ वाक् न वदेत् ।

अर्थः—असें जर न मानलें तर याज्ञवल्क्यादि आचार्यांचें आचार्यत्वच संभवणार नाहीं. कारण द्वैत पाहिल्यास त्यांची अविद्वत्ता सिद्ध होणार व न पाहिल्यास त्यांची वाणीच बोलूं शकणार नाहीं. ॥ १८४ ॥

विवरणः—जो जो ह्मणून मुक्त झाला, मग तो जीवन्मुक्त असो कीं विदेह मुक्त असो, त्याला द्वैताचें भान होतां कामा नये, असें जर ह्मटलें तर याज्ञवल्क्यासारखे

ब्रह्मनिष्ठ पुरुष जनकादिकांसारख्या उत्तम मुमुक्षूंचे आचार्य झाले, हें म्हणणें संभवतें नाहीं. कारण त्यांना द्वैतमय जगाचें भान होत होतें, असें जर मानलें, तर ते अविद्वान् होते व त्यामुळें गुरु होण्यास अपात्र होते असें म्हणावें लागेल. बरें, ते ज्ञानी होते व त्यामुळें द्वैताचें त्यांस भानच होत नव्हतें असें जर म्हणावें तर त्यांचा प्रसिद्ध वाद, जनकाचें आचार्यत्व पतकरून त्यास केलेला उपदेश, इत्यादि संभवत नाहीं; शिवाय ज्ञानी होणें म्हणजे सर्व व्यवहारास मुकणेंच होय, असें जर मानलें, तर गुरुशिष्य-परंपरेचा विच्छेद झाल्यामुळें ज्ञानसंप्रदाय अव्याहत चालणें शक्य नाहीं. तात्पर्य, आम्ही म्हटल्याप्रमाणें पूर्वोक्त श्रुतींचा अर्थ न केल्यास अनेक अनिष्ट प्रसंग येतात. ॥ १८४ ॥

"याज्ञवल्क्यादिकांचें आचार्यत्व संभवत नाहीं; म्हणून श्रुतीचा कांहीं तरी अर्थ करणें चांगलें नाहीं. यापेक्षां परोक्षज्ञानसमयीं आचार्य होऊन त्यांना उपदेश केला, व अपरोक्ष ज्ञानकाळीं श्रुतीनें सांगितल्याप्रमाणें त्यांनाही द्वैताचें अभानच झालें, अशी कल्पना करणें जास्त सयुक्तिक दिसतें. शिवाय कठोपनिष-दाच्या 'यदा पंचावतिष्ठन्ते' इत्यादि श्रुतीमध्यें ज्या अवस्थेंत बुद्धीसह सर्व ज्ञानें-द्रियांचे व्यापार बंद होतात, त्या अवस्थेस परमगति असें म्हणतात—असें सांगितलें आहे. भवगद्गीतेंतही असा उल्लेख आहे. असंप्रज्ञात समाधीचें वर्णन करितांना श्रीपातंजलींनींही 'ऋतंभरा तत्र प्रज्ञा' या समाधिपादस्थ सूत्रांत 'विकल्परहित सत्यवस्तूचा आश्रय करणारी' असें योग्याच्या बुद्धीचें वर्णन केलें आहे. तस्मात् ज्ञानरूप जी निर्विकल्पसमाधि तिच्यामध्यें द्वैतभान होणें शक्य नाहीं." इत्यादि प्रकारें शंका घेऊन ग्रंथकार तिचें निरसन करितातः—

निर्विकल्पसमाधौ तु द्वैतादर्शनहेतुतः ॥
सैवापरोक्षविद्येति चेत्सुषुप्तिस्तथा न किम् ॥ ८५ ॥

अन्वयः—निर्विकल्पसमाधौ तु द्वैतादर्शनहेतुतः सा एव अपरोक्षविद्या इति चेत् सुषुप्तिः तथा न किम् ।

अर्थः—निर्विकल्पसमाधीमध्यें द्वैताचें अभान होत असल्यामुळें तीच अपरोक्षविद्या होय असें जर म्हटलें, तर सुषुप्ति तशी नाहीं काय? ॥ १८५ ॥

विवरणः—सर्व विकल्परहित अशी जी निर्विकल्प समाधि तिच्यामध्यें द्वैताची प्रतीति होणें अशक्य आहे व त्यामुळें तीच अपरोक्ष विद्या होय असें जर ह्मटलें, तर सुषुप्तीमध्येंही द्वैताची प्रतीति होत नसल्यामुळें तीही अपरोक्ष विद्या होय असें ह्मणावें लागेल. पण तें सिद्धान्ताच्या विरुद्ध आहे. यास्तव केवल द्वैताची अप्रतीति एवढाच एक आत्मसाक्षात्काराविषयीं हेतु घेऊन न बसतां अन्यही कांहीं गोष्टी पाहिल्या पाहिजेत. त्यावांचून विस्तृत शास्त्राची एकवाक्यता निर्दोषपणें होणार नाहीं. ॥१८५॥

पुनरपि सुषुप्तीविषयीं शंका घेऊन समाधान करितातः—

**आत्मतत्त्वं न जानाति सुप्तौ यदि तदा त्वया ॥**
**आत्मधीरेव विद्येति वाच्यं न द्वैतविस्मृतिः ॥ ८६ ॥**

अन्वयः—यदि सुप्तौ आत्मतत्त्वं न जानाति तदा त्वया आत्मधीः एव विद्या इति वाच्यं न द्वैतविस्मृतिः ।

अर्थः—गाढ निद्राकालीं आत्मतत्त्व जाणत नाहीं (असें जर ह्मणशील) तर आत्मसाक्षात्कार हीच विद्या होय, असें ह्मणणें तुला योग्य आहे. द्वैताचें विस्मरण ह्मणजे आत्मज्ञान असें ह्मणणें योग्य नाहीं. ॥ १८६ ॥

विवरणः—सुषुप्तीमध्यें द्वैताचें विस्मरण होतें पण आत्मसाक्षात्कार होत नाहीं, हें सुप्रसिद्ध आहे. त्यामुळें सुषुप्ती ज्ञानावस्था नव्हे असें एकदा ह्मटलें कीं लागलेंच द्वैताच्या विस्मरणाचा व आत्मसाक्षात्काराचा कांहीं संबंध नाहीं असेंही कबूल करावें लागतें. कारण जेथें जेथें आत्मसाक्षात्कार आहे, तेथें तेथें द्वैताचें विस्मरण अशी व्याप्ति (साहचर्य) दिसत नाहीं. पण उलट जेथें जेथें आत्मसाक्षात्कार तेथें तेथें आत्मज्ञान अशी मात्र व्याप्ति मिळते. तस्मात् आत्मा व अनात्मा यांचा विवेकपूर्वक जो आत्मसाक्षात्कार तीच आत्मविद्या होय. ॥ १८६ ॥

**उभयं मिलितं विद्या यदि तर्हि घटादयः ॥**
**अर्धविद्याभाजिनः स्युः सकलद्वैतविस्मृतेः ॥ ८७ ॥**

अन्वयः—यदि उभयं मिलितं विद्या तर्हि घटादयः सकलद्वैतविस्मृतेः अर्धविद्याभाजिनः स्युः ।

**अर्थः—जर दोन्ही मिळून विद्या असें ह्मटलें, तर घटादि सर्व जड पदार्थही द्वैतास विसरत असल्यामुळें अर्ध्या विद्येस पात्र होतील. ॥ १८७ ॥**

**विवरणः**—या श्लोकांत विचार न करितां कांहींतरी बोलणाऱ्या वाद्याची थट्टा केली आहे. द्वैताचें विस्मरण व आत्मसाक्षात्कार या दोघांस मिळून विद्या ह्मटलें तर काय होईल? असें वाद्याचें ह्मणणें आहे. पण त्यावर सिद्धान्ती ह्मणतात कीं, द्वैताचें विस्मरण हेंही एक विद्येचें अंग आहे असें जर ह्मटलें, तर जेथें जेथें द्वैत विस्मरण आढळेल तेथें येथें अर्धी विद्या आहे, असेंही ह्मणावें लागेल. व त्यामुळें दगडा-सारखे पदार्थही अर्धे ज्ञानी आहेत असें होईल. ॥ १८७ ॥

फार काय पण द्वैताच्या विस्मरणाविषयीं आग्रह धरून बसणाऱ्या तुझ्यापेक्षां ते जड पदार्थच अधिक ज्ञानी आहेत, असेंही ह्मणणें भाग पडेल. कसें ह्मणशील तर पहाः—

**मशकध्वनिमुख्यानां विक्षेपाणां बहुत्वतः ॥**
**तव विद्या तथा न स्याद्घटादीनां यथा दृढा ॥ ८८ ॥**

**अन्वयः**—मशकध्वनिमुख्यानां विक्षेपाणां बहुत्वतः यथा घटादीनां दृढा विद्या अस्ति तथा तव न स्यात् ।

**अर्थः—चिलटांचा आवाज इत्यादि असंख्य विक्षेप असल्यामुळें जशी घटादिकांची विद्या दृढ असेल, तशी तुझी असणार नाहीं. ॥ १८८ ॥**

**विवरणः**—जड पदार्थांस विक्षेप होणें मुळींच अशक्य असल्यामुळें त्यांचें द्वैताचें विस्मरण जितकें दृढ होऊन राहील, तितकें तुझें होणार नाहीं. कारण तूं द्वैताचें विस्मरण व्हावें ह्मणून ज्या ज्या एकांत स्थळीं जाऊन बसशील, तेथें तेथें चिलटें, पिसा, अंतःकरणांतील गूढ संस्कार इत्यादिकांच्या योगानें तुझ्या चित्तास विक्षेप होईल. अर्थात् तुझें द्वैतविस्मरण दगडाच्या द्वैतविस्मरणाइतकें दृढ होणार नाहीं; व त्यामुळें दगडाप्रमाणें तूं अर्धा ज्ञानीही नाहींस, असें ह्मणावें लागेल. ॥ १८८ ॥

असो; याप्रमाणें सिद्धान्त्यांच्या कोटीचा ऐकून निरुत्तर झालेला वादी किंवा शिष्य सिद्धान्त्यांच्या मताचा स्वीकार कसा करितो व ते त्याचा गौरव कसा करितात. हें या श्लोकांत दाखवितातः—

**आत्मधीरेव विद्येति यदि तर्हि सुखी भव ॥**
**दुष्टचित्तं निरुंध्याचेन्निरुंद्धि त्वं यथासुखम् ॥ ८९ ॥**

**अन्वयः**—यदि आत्मधीः एव विद्या इति ( वदसि ) तर्हि सुखी भव । दुष्ट-चित्तं निरुंध्यात् चेत् त्वं तत् यथासुखं निरुंद्धि ।

**अर्थः**—आत्मसाक्षात्कार हीच विद्या असें जर ह्मणत असशील, तर आह्मी तुला ' सुखी हो ' असा आशीर्वाद देतों. पण दुष्ट चित्ताचा निरोध करावयास पाहिजे, असें जर ह्मणत असलास, तर तूं त्याचा खुशाल निरोध कर.

विवरणः—ज्ञानी पुरुष अज्ञान्यांशीं जे वाद करीत असतात, त्यांत अज्ञान्यांनीं आपले दुष्ट विचार सोडून सज्ञानी व्हावें, असा त्यांचा हेतु असतो. पण प्राण्याचे पूर्वसंस्कार बलवत्तर असल्यामुळें त्यांना नेहमींच यश येतें असें नाहीं; पण जेव्हां एकादे वेळीं यश येतें, तेव्हां त्यांना समाधान वाटणें साहजिक आहे. तोच प्रकार या श्लोकांत दाखविला आहे. आमचें श्रेष्ठ मत जर तुला मान्य होत असेल, तर तूं आनंदानें या जगांत वास कर. ह्मणजे या मताच्या अवलंबनानें तुला जगामध्यें दुःख आहे असें भानही होणार नाहीं. हा आशीर्वाद होय. आतां दुष्टचित्ताचें दमन करण्याकरितां त्याचा निरोध केलाच पाहिजे एवढाच जर तुझा हट्ट असला तर चित्तनिग्रह आह्मांसही मान्य असल्यामुळें तो करण्याविषयीं आमची तुला पूर्णमुभा आहे. तात्पर्य विद्येचा द्वैतविस्मरणाशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नाहीं. आतां द्वैताचें विस्मरण जर दैववशात् होत असलें तर तें दुधांत साखर पडल्याप्रमाणेंच असल्यामुळें आह्मांस मान्य आहे. ॥ १८९ ॥

चित्तनिरोध तुह्मांस इष्ट कसा, ह्मणून जर ह्मणशील तर सांगतोः—

**तदिष्टमेष्टव्यमायामयत्वस्य समीक्षणात् ॥**
**इच्छन्नप्यज्ञवन्नेच्छेत्किमिच्छन्निति हि श्रुतम् ॥ १९० ॥**

**अन्वयः**—एष्टव्यमायामयत्वस्य समीक्षणात् तत् इष्टम् । इच्छन् अपि अज्ञवत् न इच्छेत् । अतः किमिच्छन् इति हि श्रुतम् ।

**अर्थः**—ज्याची इच्छा करावयाची तें सर्व जग मायामय आहे असें ज्ञान असल्यामुळें जरी मनुष्य इच्छा करीत असला, तरी अज्ञाप्रमाणें इच्छा करीत नाहीं. एवढ्याकरितांच " किं इच्छन् " असें श्रुतीमध्यें ह्मटलें आहे.

**विवरण:**—चित्ताचे दोष नाहींसे व्हावेत हें आम्हांसही इष्ट आहे; कारण त्यांवांचून जग मायामय आहे हें चांगलेंसें समजणार नाहीं. व तें समजल्यावांचून अद्वितीय आत्म्याचा साक्षात्कार होणार नाहीं. एकदा आत्मसाक्षात्कार झाला कीं मग प्रारब्धाधीन होऊन जरी ज्ञानी इच्छा करीत असला, तरी ती अज्ञ पुरुषाच्या इच्छेप्रमाणे तीव्र असणार नाहीं. तात्पर्य; पूर्वोक्त श्रुतानें 'किमिच्छन्' या पदांनीं प्रस्तुत प्रकारच सुचविला आहे. ॥ १९० ॥

आम्ही जी ज्ञान्याच्या इच्छेचा व्यवस्था केली आहे ती केवळ श्रुतिसंमत आहे, एवढेंच नव्हे, तर श्रीसुरेश्वराचार्यांच्या द्विविध वार्तिकांशींही सगत आहे, असें आतां सांगतात:—

रागो लिंगमबोधस्य सन्तु रागादयो बुधे ॥
इति शास्त्रद्वयं सार्थमेवं सत्यविरोधतः ॥ ९१ ॥

**अन्वय:**—एवं सति 'रागो लिंगमबोधस्य' च 'सन्तु रागादयो बुधे' इति शास्त्रद्वयं अविरोधतः सार्थं स्यात् ।

**अर्थ:**—असें मानलें असतां 'राग हें अज्ञानाचें चिन्ह आहे' व 'ज्ञानीपुरुषामध्यें राग खुशाल असोत' अशीं दोन्हीं शास्त्रवचनें विरोध न येतां सार्थ होतात. ॥ १९१ ॥

**विवरण:**—वार्तिककारांनीं नैष्कर्म्यसिद्धिनामक ग्रंथांत विषयाभिलाष हें अज्ञानाचें चिन्ह होय असें म्हटलें आहे. त्याचें मूलवचन असें आहे:—

रागो लिंगमबोधस्य चित्तव्यायामभूमिषु ।
कुतः शाद्वलता तस्य यस्याग्निः कोटरे तरोः ॥ १ ॥

**अर्थ:**—चित्ताचा, शब्दादि विषयांविषयीं अभिलाष असणें, हेंच अज्ञानाचें चिन्ह आहे. ज्या तरूच्या ढोलीमध्यें अग्नि आहे, त्याला हिरवेपणा कोठून असणार? ॥ १ ॥

या वचनावरून ज्याच्या हृदयांत अति अभिलाष तो अज्ञानी असें स्पष्ट होतें. पण बृहदारण्यक भाष्यावरील वार्तिकांत असें एक वार्तिक आढळतें—

शास्त्रार्थस्य समाप्तत्वान्मुक्तिः स्यात्तावता मितेः ।
रागादयः संतु कामं न तद्भावोऽपराध्यति ॥ १५३९ ॥

**अर्थः—मिति म्हणजे महावाक्यापासून होणारें ज्ञान; त्याच्या योगानें कार्याची समाप्ति झाल्यामुळें मुक्ति होते. मग ज्ञान्यामध्यें राग खुशाल असोत. त्यांचें अस्तित्व मुक्तीस बाध करीत नाहीं. ॥ १९३१ ॥**

या वचनांत ज्ञानी पुरुषाचे ठायीं जरी अभिलाष असला तरी चालेल, असेंही स्पष्ट म्हटलें आहे. हीं दोन्हीं वचनें एकाच ग्रंथकाराचीं असल्यामुळें व तो ग्रंथकार साधारण मनुष्य नसून श्रीमच्छंकराचार्यांचा पट्ट शिष्य श्रीसुरेश्वराचार्य असल्यामळें अननुसधानामुळें असा प्रमाद घडला असेल असेंही म्हणण्याची सोय नाहीं. अर्थात् त्या दोन्हीं वचनांचा अविरोध दाखविला पाहिजे व तो आम्ही केलेल्या व्यवस्थेनेंच सिद्ध होत आहे. ॥ ९१ ॥

ह्याप्रमाणें ' किमिच्छन् ' याचा अभिप्राय सांगून आतां ' कस्य कामाय ' या शब्दांचा अभिप्राय सांगतातः—

**जगन्मिथ्यात्ववत्स्वात्मासंगत्वस्य समीक्षणात् ॥**
**कस्य कामायेति वचो भोक्त्रभावविवक्षया ॥ ९२ ॥**

**अन्वयः**—जगन्मिथ्यात्ववत् स्वात्मासंगत्वस्य समीक्षणात् भोक्त्रभावविवक्षया 'कस्य कामाय ' इति वचः अस्ति ।

**अर्थः—जगाच्या मिथ्यात्वाप्रमाणें आत्माहि असंग आहे, असें पूर्णपणें समजल्यामुळें, भोक्त्याचा अभाव होतो हें सांगण्याकरितां ' कस्य कामाय ' म्हणजे कोणाच्या कामाकरितां हें वचन आहे. ॥ १९२ ॥**

**विवरणः**—जग क्षणिक आहे व त्यामुळें तें इंद्रजालप्रमाणें व स्वप्नाप्रमाणें आसक्ति ठेवण्यास अयोग्य आहे, असें अनेक श्रुति व सांख्यादि शास्त्रें सांगत असल्यामुळें आत्मा असंग आहे असें ज्ञान झालें असतां आत्मा भोक्ता आहे हें म्हणणेंच अयुक्त ठरतें. हा खरा प्रकार सांगण्याकरितांच ' कोणाच्या कामाकरितां ' असें श्रुतीनें म्हटलें आहे. ॥ ९२ ॥

**वादीः**—तो भोक्ता नाहीं हें म्हणणें सयुक्तिक नव्हे. कारण स्वतः श्रुतीनेंच आत्म्याच्या भोक्तृत्वाचें वर्णन केलें आहे. कोठें म्हणाल तर सांगतों—

**पतिजायादिकं सर्वं तत्तद्भोगाय नेच्छति ॥**
**किंत्वात्मभोगार्थमिति श्रुतावुद्घोषितं बहु ॥ ९३ ॥**

अन्वय:—पतिजायादिकं सर्वं तत्तद्भोगाय न इच्छति किंतु आत्मभोगार्थं इति श्रुतौ बहु उद्घोषितम् ।

अर्थ:—पति, पत्नी, इत्यादिक सर्व त्यांच्या त्यांच्या भोगाकरितां इच्छा करीत नाहींत तर आपल्या भोगाकरितां त्यांची त्यांची इच्छा करितात. असें श्रुतींत पुष्कळ ठिकाणीं स्पष्टपणें सांगितलें आहे. ।। १९३ ।।

विवरण:—बृहदारण्यकांत "पतीच्या कामाकरितां पति प्रिय होत नाहीं, तर स्वतःच्या कामाकरितां तो प्रिय होत असतो" इत्यादि प्रकारें परोपरीनें प्रस्तुत गोष्टीचें विवेचन केलें आहे. व त्यावरून आत्मा भोक्ता आहे, असें स्पष्ट होतें. व हें श्रुतीनें केलेलें वर्णन सांख्यशास्त्रानुकूलही आहे. ॥ १९३ ॥

सिद्धांती:—

**किं कूटस्थश्चिदाभासोऽथ वा किंवोभयात्मकः ॥**
**भोक्ता तत्र न कूटस्थोऽसंगत्वाद्भोक्तृतां व्रजेत् ॥ ९४ ॥**

अन्वय:—किं कूटस्थः अथवा चिदाभासः किंवा उभयात्मकः ? । तत्र असंगत्वात् कूटस्थः न भोक्तृतां व्रजेत् ।

अर्थ:—भोक्ता कूटस्थ, कीं चिदाभास, किं उभयरूप ? यांपैकीं असंग त्यामुळें कूटस्थ भोक्ता होऊं शकत नाहीं. ।। १९४ ।।

विवरण:—आत्मा भोक्ता आहे असें जें तूं म्हणत आहेस तें बरोबर नाहीं कारण केवल आत्मा भोक्ता आहे एवढें म्हटल्यानेंच त्याची सिद्धि होणें शक्य नाहीं. यास्तव आम्ही तुला असें विचारतों कीं भोक्ता कोण ? कूटस्थ भोक्ता, कीं जीव भोक्ता, कीं कूटस्थ व चिदाभास मिळून भोक्ता ? यांतील कूटस्थ तर भोक्ता होऊं शकणार नाहीं. कारण तो असंग आहे. जो असंग असतो तो भोक्ता होणें शक्य नाहीं. कारण असंगत्व व भोक्तृत्व यांचा परस्पर विरोध आहे. ॥ १९४ ॥

भोक्तृत्व व असंगत्व यांच्यामध्यें विरोध कसा येतो ? म्हणून जर विचारशील तर सांगतों:-

**सुखदुःखाभिमानाख्यो विकारो भोग उच्यते ॥**
**कूटस्थश्च विकारी चेत्येतन्न व्याहतं कथम् ॥ ९५ ॥**

अन्वयः—सुखदुःखाभिमानाख्यः विकारः भोगः इति उच्यते। तथा च कूटस्थः च विकारी च इति एतत् वचः कथं न व्याहतम् ।

अर्थः—सुखदुःखाभिमानसंज्ञक जो विकार तोच भोग होय, असें ह्मटलें आहे. तेव्हां कूटस्थ व विकारी हें वचन व्याहत कसें होणार नाहीं? ॥१९५॥

विवरण:—भोग ह्मणजे काय? मी सुखी आहें, दुःखी आहें, इत्यादि प्रकारें सुखादिकांच्या ठायीं अभिमान ठेवणें हाच भोग होय. पण तो अभिमानरूप असल्यामुळें विकार आहे. व कूटस्थ या शब्दाचा अर्थ 'निर्विकार' असा आहे. तेव्हां आत्मा कूटस्थ व भोक्ता (ह्मणजे विकारयुक्त) आहे असें ह्मटल्यास त्या ह्मणण्यावर व्याघात हा दोष कसा येणार नाहीं? ॥ १९५ ॥

आतां विकारी जो चिदाभास त्यास भोक्तृता आहे असें जर ह्मणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारणः—

**विकारिबुद्ध्यधीनत्वादाभासे विकृतावपि ॥**
**निरधिष्ठानविभ्रांतिः केवला न हि तिष्ठति ॥ ९६ ॥**

अन्वयः—विकारिबुद्ध्यधीनत्वात् आभासे विकृतौ अपि केवला निरधिष्ठानविभ्रांतिः न हि तिष्ठति ।

अर्थः—विकार पावणाऱ्या बुद्धीच्या आधीन असल्यामुळें आभासाच्या ठायीं जरी विकार होत असला, तरी अधिष्ठानावांचून केवळ भ्रांति कधींच राहूं शकत नाहीं. ॥ १९६ ॥

विवरण:—चिदाभास विकारी आहे यांत कांहीं शंका नाहीं. कारण तो बुद्धिरूप उपाधीच्या आधीन असतो. ह्मणजे आरशांत दिसणारें कोणत्याही पदार्थाचें प्रतिबिंब जसें आरशाच्या आधीन असतें, त्याचप्रमाणें प्रतिबिंबरूप असा हा चिदाभास बुद्धीच्या आधीन असतो. स्वतः बुद्धी तर विकार पावणारी आहे. कारण अनेक वृत्ति हाच तिचा विकार होय. दृष्टान्तांतील उपाधिभूत आरसा हालविला असतां किंवा वांकडा केला असतां, पदार्थाच्या समोरून काढून घेतला असतां किंवा तो अगदीं स्थिर धरिला असतां, जसें त्यांतील प्रतिबिंब क्रमानें हालूं लागतें; वांकडें होतें; नाहींसें होतें, किंवा निश्चल होतें, त्याचप्रमाणें बुद्धीमध्यें जसा जसा विकार होतो, तसा तसा तो चिदाभासाच्या ठायींही येतो. वास्तव, तो विकार आहे असें ह्मणणें वावगें

नाहीं. पण चिदाभास ही स्वतः भ्रांति असल्यामुळें ती अधिष्ठानावांचून कोणत्याही अवस्थेंत राहूं शकत नाहीं. चिदाभास ही भ्रांति कशी असें जर विचाराल तर सांगतों:—बुद्धि स्वतः जड आहे. तेव्हां चैतन्य हा तिचा धर्म नव्हे, हें उघड आहे. पण तो तिचा धर्म असल्यासारखा भास होतो. अर्थात् तो भ्रम होय; यथार्थ ज्ञान नव्हे. शिवाय चैतन्याभास या नांवामध्येंच भ्रमरूप अर्थ आहे. सारांश, भ्रमरूप चिदाभास जरी विकारी असला, तरी स्वतंत्र नाहीं. व त्यामुळें तो भोक्ता होऊं शकत नाहीं. ॥ १९६ ॥

तेव्हां आतां भोक्ता उभयात्मक आहे, असें ह्मणणें भाग पडतें. पण तेंही लौकिक आहे, पारमार्थिक नव्हे, असें आतां सांगतात:—

**उभयात्मक एवातो लोके भोक्ता निगद्यते ॥**
**तादृगात्मानमारभ्य कूटस्थः शेषितः श्रुतौ ॥ ९७ ॥**

अन्वय:—अतः लोके उभयात्मकः एव भोक्ता निगद्यते । किं तु तादृगात्मानं आरभ्य श्रुतौ कूटस्थः शेषितः अस्ति ।

**अर्थ:—यास्तव व्यवहारामध्यें कूटस्थ व चिदात्मारूपच भोक्ता आहे असें ह्मणतात. पण तसल्या आत्म्याचा अनुवाद करून श्रुतीमध्यें कूटस्थास पृथक् करून दाखविलें आहे. ॥ १९७ ॥**

**विवरण:**—केवळ कूटस्थ भोक्ता आहे असें किंवा केवल चिदाभास भोक्ता आहे, असें ह्मणणें अयुक्त होय. हें गेल्या दोन श्लोकांत सांगितलें व त्यामुळें एक तिसरा पक्ष अवशिष्ट राहिला. कूटस्थ व चिदाभास हा उभयरूप भोक्ता आहे असें ह्मणणें व्यावहारिक रीत्या खरें आहे, पण पारमार्थिक दृष्टया सत्य नाहीं. कारण बृहदारण्यकांत सर्व अनात्मजाताचें निरसन करून एकट्या कूटस्थ आत्म्यास मात्र राखिलें आहे. त्यावरून चैतन्यरूप आत्मा मात्र सत्य व तदितर सर्व असत्य ( कांहीं काल भासणारें ) असें सिद्ध होतें. तस्मात् परमार्थतः भोक्ता कोणी नाहीं. ॥ १९७ ॥

ग्रंथकारांनीं येथें कांहीं तरी सांगितलें आहे. असें कोणास वाटूं नये ह्मणून ते बृहदारण्यकांतील पूर्वोक्त श्रुतीचा अर्थतः निर्देश करितात:—

**आत्मा कतम इत्युक्ते याज्ञवल्क्यो विबोधयन् ॥**
**विज्ञानमयमारभ्यासंगं तं पर्यशेषयत् ॥ ९८ ॥**

अन्वयः—आत्मा कतमः इति उक्ते सति याज्ञवल्क्यः विबोधयन् सन् विज्ञानमयं आरभ्य तं असंगं पर्यशेषयत्।

अर्थः—'आत्मा कोणाचा' असें जनकानें विचारिलें असतां व याज्ञवल्क्य त्यास उपदेश करीत असतां विज्ञानमयापासून आरंभ करून (सर्वांचें निरसन केल्यावर) त्यांनीं त्या असंग आत्म्यास अवशिष्ट ठेविलें. ॥ १९८ ॥

विवरणः—या कार्यकारणसमूहरूप शरीरांत जे अनेक पदार्थ आहेत, त्यांतील आत्मा कोणता? असा जनकानें प्रश्न केला असतां त्याच्या याज्ञवल्क्य नामक ब्रह्मनिष्ठ गुरूनें विज्ञानमयादि सर्वांचा निरास करून ह्मणजे यांतील एकही आत्मा नव्हे असें सांगून, सर्व अनात्मजाताचा बाध केल्यावर बाधाची सीमा होऊन राहणारा कूटस्थच असंग व शुद्ध आत्मा आहे, असा त्यास बोध केला. बृहदारण्यकाच्या चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या ब्राह्मणाच्या सहाव्या मंत्रांत प्रस्तुत प्रश्नोत्तर आहे. तस्मात् हें आमचें सांगणें कल्पित आहे, असें कोणीं समजूं नये. ॥ १९८ ॥

केवल यजुर्वेदाच्या या वाजसनेयी ब्राह्मणामध्येंच असें वर्णन आहे असें नाहीं, तर ऐतरेयादि इतर श्रुतींमध्येंही तसा उल्लेख आहे. असें आतां सांगतातः—

**कोऽयमात्मेत्येवमादौ सर्वत्रात्मविचारतः॥**
**उभयात्मकमारभ्य कूटस्थः शेष्यते श्रुतौ॥ ९९॥**

अन्वयः—कः अयं आत्मा इति एवं आदौ सर्वत्र आत्मविचारतः उभयात्मकं आरभ्य श्रुतौ कूटस्थः शेष्यते।

अर्थः—'कोऽयमात्मा' इत्यादि प्रकारें प्रथमतः सर्व ठिकाणीं आत्म्याचा विचार चालला असतां, उपाधिरूप आत्म्यापासून आरंभ करून श्रुतीमध्यें शेवटीं कूटस्थाचें वर्णन केलें आहे. ॥ १९९ ॥

विवरणः—ज्याची आह्मांस साक्षात् उपासना करावयाची आहे, तो हा आत्मा कोण? अशा अर्थाची श्रुति ऐतरेयोपनिषदाच्या पांचव्या खंडाच्या अगदीं आरंभींच आहे. व या सर्व खंडांत आत्म्याविषयीं विचार करून शेवटीं 'प्रज्ञानं ब्रह्म' असें ठरविलें आहे. असेंच दुसऱ्याही अनेक श्रुतींमध्यें वर्णन आहे. तस्मात् परमार्थतः आत्मा असंग व अभोक्ता आहे व उभयात्मक भोक्ता असें जें ह्मणणें आहे, तें व्यावहारिक ह्मणजे परमार्थतः मिथ्याच आहे, असें ह्मणणें दृढ झालें. ॥ १९९ ॥

मग असें जर आहे, तर जीवास मी खरा भोक्ता आहें असें कसें वाटतें? असें कोणी विचारील, ह्मणून सांगतात:—

**कूटस्थसत्यतां स्वस्मिन्नध्यस्यात्माऽविवेकतः ॥**
**तात्त्विकीं भोक्तृतां मत्वा न कदाचिज्जिहासति ॥ २०० ॥**

अन्वयः—आत्माविवेकतः कूटस्थसत्यतां स्वस्मिन् अध्यस्य भोक्तृतां तात्त्विकीं मत्वा ( भोगं ) कदाचित् न जिहासति ।

**अर्थः—आत्म्याच्या अविवेकामुळें कूटस्थाच्या सत्यतेचा आपल्या ठायीं अध्यास करून व भोक्तेपणा खरा आहे असें मानून, जीव भोगास सोडण्याची मुळींच इच्छा करीत नाहीं. ॥ २०० ॥**

विवरण:—हा सर्व स्वाज्ञानाचा खेळ आहे. आत्म्याचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें त्यानें सत्यत्व जीव आपल्याकडे घेतो. पण हा त्याचा मोठाच अपराध आहे. व त्यामुळेंच त्याला संसाररूपी प्रायश्चित्त भोगावें लागतें. ' मी सत्य आहें ' असा एकदा भ्रम झाला कीं आपला भोक्तेपणाही सत्यच आहे, असें त्यास वाटतें व तदनंतर भोगांचा त्याग करणें ह्मणजे प्राणास संकट होय, असें वाटणें साहजिक आहे. सारांश, आत्म्याचें यथार्थ ज्ञान नसणें हेंच या सर्व अनर्थाचें कारण आहे. ॥ २०० ॥

तर मग स्वतःच्या कामाकरितां प्रत्येकास विषय प्रिय होतात या श्रुतिवाक्याची काय व्यवस्था करणार? असें कोणी विचारितील ह्मणून ग्रंथकार ह्मणतात:—

**भोक्ता स्वस्यैव भोगाय पतिजायादिमिच्छति ॥**
**एष लौकिकवृत्तांतः श्रुत्या सम्यगनूदितः ॥ १ ॥**

अन्वयः—भोक्ता स्वस्य एव भोगाय पतिजायादिं इच्छति इति एषः लौकिकवृत्तांतः श्रुत्या सम्यक् अनूदितः ।

**अर्थः—भोक्ता आपल्याच भोगाकरितां पति, स्त्री इत्यादिकांची इच्छा करितो. हा लौकिकवृत्तान्त श्रुतीनें उत्तम प्रकारें सांगितला आहे. ॥ २०१ ॥**

**विवरण—बृहदारण्यकस्थ प्रस्तुत श्रुति लौकिकवृत्तान्त सांगत आहे. तेव्हां त्यावरून भोक्ता नित्य आहे, अशी कल्पना करणें व्यर्थ होय. ॥ २०१ ॥**

पण श्रुतीनें लौकिक मिथ्या स्थितीचा अनुवाद कशाकरितां केला आहे ! हें आतां सांगतातः—

**भोग्यानां भोक्तृशेषत्वान्मा भोग्येष्वनुरज्यताम् ॥**
**भोक्तर्येव प्रधानेऽतोऽनुरागं तं विधित्सति ॥ २ ॥**

**अन्वयः**—भोग्यांना भोक्तृशेषत्वात् भोग्येषु मा अनुरज्यताम् । अतः प्रधाने भोक्तरि एव तं अनुरागं विधित्सति ।

**अर्थः**—भोग्य जे विषय ते भोक्त्याच्या उपभोगाचे उपाय ( साधनें ) असल्यामुळें त्यांच्या ठायीं प्रीति ठेवूं नये. तर मुख्य जो भोक्ता त्याच्याच ठायीं ती प्रीति करावी, असें विधान करण्याची श्रुति इच्छा करीत आहे.

**विवरणः**—विषय भोगांचीं साधनें आहेत. व साधनें मुख्य नसतात असा सामान्य नियम आहे. यास्तव त्यांचा भोग घेणाराच मुख्य होय हें निर्विवाद आहे. तरी प्रत्येक साधकानें गौण पदार्थांच्या ठायीं प्रीति न ठेवितां मेहमीं आत्म्याच्या ठायींच ती ठेवावी. कारण तोच मुख्य भोक्ता आहे. जीव मुख्य भोक्ता नव्हे. वस्तुतः आत्मा भोक्ताही नव्हे, हें खरें; पण प्रौढवादाचा[1] अंगीकार करून येथें त्यास भोक्ता ह्मटलें आहे. सारांश, प्राकृतांची विषयाच्या ठायीं जी प्रीति असते, तीच तेथून काढून आत्म्याच्या ठायीं लावावी, असें पूर्वोक्त श्रुतीस सांगावयाचें आहे. ॥ २०२ ॥

याविषयीं पुराणवाक्याचेंही प्रमाण देतातः—

**या प्रीतिरविवेकानां विषयेष्वनपायिनी ॥**
**त्वामनुस्मरतः सा मे हृदयान्माप सर्पतु ॥ ३ ॥**

**अन्वयः**—हे माप, अविवेकानां विषयेषु या अनपायिनी प्रीतिः अस्ति सा त्वां अनुस्मरतः मे हृदयात् सर्पतु ।

**अर्थः**—हे लक्ष्मीपते, प्राकृत पुरुषांची विषयांच्या ठायीं जी दृढ प्रीति असते, तसली प्रीति तुझें चिंतन करणाऱ्या माझ्या हृदयांतून जावो. ॥ २०३ ॥

---

१ प्रौढवाद ह्मणजे मुख्य शास्त्रार्थ सोडून कांहीं इष्ट हेतु साधण्याकरितां हट्टानें एकादें विधान करणें.

**विवरणः**—हें प्रल्हादाचें वचन आहे. व " विषयी लोकांचे ठायीं जशी दृढ विषयप्रीति असते, तशीच ती माझे ठायींही आहे. पण, हे प्रभो, मी तुझें सतत चिंतन करीत असतों. यास्तव ती दुष्ट विषयप्रीति माझ्या अंतःकरणांतून निघून जावो. " अशी त्यानें या श्लोकांत ईश्वराची प्रार्थना केली आहे. याचा कोणी असाही अर्थ करितातः—अज्ञानी लोकांची विषयांचे ठायीं जशी दृढ प्रीति असते, तशीच माझी तुझे ठायीं आहे, यास्तव हे प्रभो, तुझें चिंतन करणाऱ्या माझ्या हृदयांतून ती नाहींशी न होवो. अर्थात् ती सतत अशीच राहो. ॥ २०३ ॥

तात्पर्यः—

**इतिन्यायेन सर्वस्माद्भोग्यजाताद्विरक्तधीः ॥**
**उपसंहृत्य तां प्रीतिं भोक्तर्येनं बुभुत्सते ॥ ४ ॥**

**अन्वयः**—इति न्यायेन सर्वस्मात् भोग्यजातात् विरक्तधीः तां प्रीतिं भोक्तरि उपसंहृत्य एनं बुभुत्सते ।

**अर्थः—या न्यायानें सर्व भोग्यजातापासून ज्याची बुद्धि विरक्त होऊन फिरली आहे, असा तो पुरुष त्या प्रीतीचा भोक्त्याच्या ठायीं उपसंहार करून आत्म्यास जाणण्याची इच्छा करितो. ॥ २०४ ॥**

**विवरणः**—या पुराणोक्त न्यायानें स्त्री पुत्रादि सर्व भोग्य पदार्थांविषयीं ज्याची बुद्धि विरक्त झाली आहे असा भाग्यशाली पुरुष विषयप्रीतीचा भोक्त्याच्या ठायीं लय करून ह्मणजे प्रीतीचा सर्व ओघ भोक्त्याकडे कळवून त्या मुख्य भोक्त्यासच जाणण्याची दृढ इच्छा करितो. पूर्वोक्त सर्व विवेचनाचें हें फल होय. ॥ २०४ ॥

अशा प्रकारच्या प्रीतीचें आतां स्वरूप सांगतातः—

**स्रक्चंदनवधूवस्त्रसुवर्णादिषु पामरः ॥**
**अप्रमत्तो यथा तद्वन्न प्रमाद्यति भोक्तरि ॥ २०५ ॥**

**अन्वयः**—पामरः स्रक्चंदनवधूवस्त्रसुवर्णादिषु यथा अप्रमत्तः भवति तद्वत् मुमुक्षुः भोक्तरि न प्रमाद्यति ।

**अर्थः—प्राकृत मनुष्य माळा, चंदन, स्त्री, वस्त्रें, सुवर्ण इत्यादिकांविषयीं जसा सावध असतो, तसाच मुमुक्षु भोक्त्याविषयीं सावध राहतो. ॥ २०५ ॥**

विवरण:—सामान्य मनुष्य विषयरूप वस्तूंविषयीं कसा सावध असतो हें कोठेंही पहावयास मिळण्यासारखें आहे. तो डोळ्यांत तेल घालून अहोरात्र इष्ट वस्तूंचें रक्षण करीत असल्याचें विचारी मनुष्यास सहज दिसतें. व अशा मनुष्याची व्यवहारांत प्रौढीही होत असते. या प्राकृताप्रमाणेंच मुमुक्षुही मुख्य भोक्ता जो आत्मा त्याच्याविषयीं सदा सावध असतो. व एक क्षणभरही त्यास विसरत नाहीं. सारांश, आत्म्याचें अनवधान न होणें हेंच पूर्वोक्त प्रीतीचें स्वरूप होय. ॥ २०५ ॥

मुमुक्षु आत्म्याविषयीं कसा सावध असतो, हें आतां अनेक दृष्टान्तांच्या योगानें पुढील तीन श्लोकांत सांगतातः—

काव्यनाटकतर्कादिमभ्यस्यति निरंतरम् ॥
विजिगीषुर्यथा तद्वन्मुमुक्षुः स्वं विचारयेत् ॥ ६ ॥

अन्वयः—यथा विजिगीषुः काव्यनाटकतर्कादीन् निरंतरं अभ्यस्यति तद्वत् मुमुक्षुः स्वं विचारयेत् ।

अर्थः—जसा प्रतिवाद्यास जिंकण्याची इच्छा करणारा पुरुष काव्य, नाटक, तर्क इत्यादिकांचा सतत अभ्यास करितो, त्याप्रमाणें मुमुक्षूनें आत्म्याचा विचार करावा. ॥ २०६ ॥

विवरण:—पंडितांच्या सभेमध्यें बसून ज्याला इतरांस निरुत्तर करावयाचें असतें, त्यास काव्यादि शास्त्रांचा अभ्यास निरंतर करावा लागतो, हें सर्व प्रसिद्ध आहे. त्या विचाऱ्यास भोजनादि अवश्य कर्मांत जाणारा कालही व्यर्थ गेला, असें वाटत असतें. मुमुक्षूनेंही कालाविषयीं अशीच काळजी वाहावी; एक क्षणही फुकट जाऊं न देतां सतत आत्मचिंतन करीत राहावें. या श्लोकांत मुमुक्षूनें आत्मचिंतन सतत कसें करावें, हें व्यवहारांतील उत्तम विद्यार्थ्यांच्या दृष्टान्तानें व्यक्त केलें आहे.

जपयागोपासनादि कुरुते श्रद्धया यथा ॥
स्वर्गादिवांछया तद्वच्छ्रद्दध्यात्स्वे मुमुक्षया ॥ ७ ॥

अन्वयः—यथा स्वर्गादिवाञ्छया जपयागोपासनादि श्रद्धया कुरुते तद्वत् मुमुक्षया स्वे श्रद्दध्यात् ।

अर्थः—ज्याप्रमाणें पुरुष स्वर्गादिकाच्या इच्छेनें जप, यज्ञ, उपासना इत्यादि श्रद्धेनें करितो, त्याप्रमाणें मुक्त होण्याच्या इच्छेनें आत्म्याच्या ठायीं श्रद्धा ठेवावी. ॥ २०७ ॥

विवरणः—जसा एकादा स्वर्गाची इच्छा करणारा पुरुष गायत्र्यादि मंत्रांचा उपांशु किंवा मानसिक जप, चतुर्मास्यादि याग, संध्यावंदनादिरूप ध्यान व त्याच-प्रमाणें स्वर्गप्राप्ति करून देणारे दुसरेही अनेक उपाय मोठ्या आस्थेनें करितो, त्याप्र-माणें मुमुक्षूनेंही आत्म्याच्या ठायीं पूर्ण आस्था ठेवावी. आत्म्याच्या साक्षात्कारानें मोक्ष निश्चित मिळेल असा दृढ विश्वास ठेविणें, हीच आत्म्याविषयींची आस्था होय.

चित्तैकाग्र्यं यथा योगी महायासेन साधयेत् ॥
अणिमादिप्रेप्सयैवं विविच्यात् स्वं मुमुक्षया ॥ ८ ॥

अन्वयः—यथा योगी अणिमादिप्रेप्सया महायासेन चित्तैकाग्र्यं साधयेत् एवं मुमुक्षया स्वं विविच्यात् ।

अर्थः—ज्याप्रमाणें योगी अणिमादि सिद्धींच्या इच्छेनें मोठ्या प्रयासानें चित्ताचें एकाग्र्य संपादन करितो, त्याप्रमाणें मुमुक्षूनें मुक्त होण्याच्या इच्छेनें आत्मविवेचन करावें. ॥ २०८ ॥

विवरणः—अणिमादि अष्टसिद्धि प्राप्त व्हाव्या ह्मणून योगी शरीरास कसा कष्ट देत असतो, हें सर्वश्रुत आहे. मुमुक्षूस तसे कष्ट करण्याचें जरी फारसें कारण नसलें तरी आत्मविवेचनार्थ कांहीं मुख्य शारीरिक नियम त्यासही पाळावे लागतातच. यास्तव ते पाळून साधकानें आत्मानात्मविवेक करावा. असो, अनात्मविषयक सर्व कायिक, वाचिक व मानसिक व्यापार सोडून मुमुक्षूनें तत्वज्ञान दृढ होण्यास्तव अद्वै-तात्मपर होऊन राहावें, असें या तिन्ही श्लोकांतील दृष्टान्तांचें तात्पर्य होय. ॥२०८॥

अद्वैत जो आत्मा, तत्पर होऊन राहिल्यानें तत्त्वज्ञान दृढ होईलच असा कांहीं नियम नाहीं, असें कोणी ह्मणेल, ह्मणून आचार्य पूर्वींच दृष्टान्तपूर्वक त्याचें उत्तर देऊन ठेवितातः—

कौशलानि विवर्धन्ते तेषामभ्यासपाटवात् ॥
यथा तद्वद्विवेकोऽस्याप्यभ्यासाद्विशदायते ॥ ९ ॥

अन्वयः—यथा तेषां अभ्यासपाटवत् कौशल्यानि विवर्धन्ते तद्वत् अस्य अपि विवेकः अभ्यासात् विशदायते ।

अर्थः—ज्याप्रमाणें त्यांची काव्यादिकांच्या अभ्यासपटुत्वामुळें कुशलता वाढते, त्याप्रमाणें याचाही विवेक अभ्यासामुळें स्पष्ट होतो. ॥ २०९ ॥

विवरणः—सतत दीर्घकाल अभ्यास केल्यामुळें जिंकण्याची इच्छा करणारा, स्वर्गाची इच्छा करणारा इत्यादि तो तो पुरुष आपापल्या विषयांमध्यें जसा निपुण होऊन जातो, त्याप्रमाणें हा आत्मानात्मविवेकीही सतत अभ्यासामुळें तत्त्वविवेचनांत तरबेज होऊन जातो. ह्मणजे—द्वैत असत्य आहे व अद्वैत सत्य आहे, हें त्याच्या हार्दी खिळून जातें. ॥ २०९ ॥

त्याप्रमाणें एकदा विवेक स्पष्ट झाला कीं—

**विविंचता भोक्तृतत्त्वं जाग्रदादिष्वसंगता ॥**
**अन्वयव्यतिरेकाभ्यां साक्षिण्यध्यवसीयते ॥ २१० ॥**

अन्वयः—अन्वयव्यतिरेकाभ्यां भोक्तृत्त्वं विविंचता जाग्रदादिषु साक्षिणि असंगता अध्यवसीयते ।

अर्थः—अन्वय व व्यतिरेक यांच्या योगानें भोक्त्याच्या यथार्थस्वरूपाचें विवेचन करणाऱ्या पुरुषाकडून जाग्रदादि अवस्थेंत साक्षीच्या ठायीं असणाऱ्या असंगतेचा निश्चय केला जातो. ॥ २०९ ॥

विवरणः—अन्वय व व्यतिरेक ह्मणजे काय हें पहिल्या भागांतच स्पष्ट करून दाखविलें आहे. विवेक करितांना या दोन उपायांचा चांगला उपयोग होतो. यांच्या योगानें भोक्त्याचें एकदा यथार्थ स्वरूप समजलें कीं जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति, मूर्च्छा, मरण, व समाधि या अवस्थेमध्यें साक्षी असंगच असतो असा साधकास दृढ बोध होतो. व त्यामुळें तो सृष्टि, स्थिति व प्रलय या कालींही असंगच असला पाहिजे, असेंही अबाधित अनुमान होतें. सारांश, दीर्घकाल अभ्यास केल्यामुळें विवेक स्पष्ट झाला असतां हा प्रस्तुत अवर्णनीय लाभ होतो. ॥ २१० ॥

आतां पूर्वोक्त उपायभूत अन्वयव्यतिरेकांची योजना कशी करावी, तें दाखवितात:—

**यत्र यद्दृश्यते द्रष्ट्रा जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु ॥**
**तत्रैव तन्नेतरत्रेत्यनुभूतिर्हि संमता ॥ २११ ॥**

अन्वयः—द्रष्टा जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु यत्र यत् दृश्यते तत् तत्र एव न इतरत्र इति अनुभूतिः संमता हि ।

अर्थः—साक्षीकडून जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति यांतील ज्या अवस्थेंत जें पाहिलें जातें, तें त्या अवस्थेंतच असतें. दुसऱ्या अवस्थेंत नसतें. असा अनुभव सर्वसंमत आहे, हें प्रसिद्ध आहे. ॥ २११ ॥

विवरण—साक्षी हा, देहादि साधनें व विषय हीं निरनिराळ्या अवस्थेंत निरनिराळीं पाहातो. म्हणजे जाग्रतींतील देह व घर, स्त्री, पुत्र, मित्र, द्रव्य, इत्यादि भिन्न व स्वप्नांतील भिन्न. त्यांची एकाच अवस्थेंत कधीं पुनः प्रतीति नाहीं. सुषुप्तींत तर या दोन्ही अवस्थांहून अगदीं विलक्षण असाच कांहीं अनुभव येतो. व त्याचीही दुसऱ्या कोणत्याही अवस्थेंत प्रतीति येत नाहीं. शिवाय हा प्रकार अप्रसिद्ध आहे, असेंही नाहीं; कारण तो आबालवृद्धांस ठाऊक आहे. पण साक्षी आत्म्याची स्थिति तशी नाहीं. तो प्रत्येक अवस्थेमध्यें त्या त्या अवस्थेंतील निरनिराळ्या पदार्थांस पाहात असतो. तस्मात आत्म्याचें सर्वदा अस्तित्व आणि अवस्था व त्यांतील विषय यांचें कांहीं काल अस्तित्व सिद्ध झालें. व त्यामुळे आत्मा असंग, नित्य व केवल साक्षी आहे, असें आणि अवस्थादि अनात्मजात जड, अनित्य इत्यादि धर्मयुक्त आहे असेंही ठरलें. ॥ २११ ॥

याविषयीं आगमप्रमाणही आहे असें सांगण्याकरितां अनुकूल श्रुतींचा अर्थतः निर्देश करितात:—

**स यत्तत्रेक्षते किंचित्तेनानन्वागतो भवेत् ॥**
**दृष्ट्वैव पुण्यं पापं चेत्येवं श्रुतिषु डिंडिमः ॥ १२ ॥**

अन्वयः—सः तत्र यत् किंचित् ईक्षते तेन अनन्वागतः भवेत् । पुण्यं च पापं च दृष्ट्वा एव इति एवं श्रुतिषु डिण्डिमः अस्ति ।

अर्थः—तो तेथें जें कांहीं पाहातो त्यास बरोबर न घेतां दुसऱ्या अवस्थेंत जातो, तसेंच पुण्य व पाप केवल पाहूनच (पुनः पूर्वोक्त रीतीनें परत जागृतींत येतो) इत्यादि प्रकारें श्रुतींमध्यें स्पष्ट वर्णन आहे. ॥२१२॥

विवरणः—या श्लोकांत दोन श्रुतींचा निर्देश केला आहे. व त्या दोन्ही बृहदारण्यकांतील आहेत. वस्तुतः पाहातां प्रस्तुत उपनिषदाच्या चवथ्या अध्यायाच्या

तिसऱ्या ब्राह्मणाचा जो पंधरावा मंत्र आहे, त्यांतच हीं दोन्हीं वाक्यें आहेत. पण येथें प्रथमार्धांत ज्याचा निर्देश केला आहे, तें वाक्य पूर्वोक्त ब्राह्मणाच्या पंधराव्या व सोळाव्या मंत्राचाही उत्तरार्ध आहे. यास्तव टीकाकारांनीं या दोन श्रुति आहेत असें ह्मटलें आहे, असें वाटतें. असो; या दोन्ही वाक्यांचें तात्पर्य असें:–हा कूटस्थ आत्मा त्या स्वप्नावस्थेमध्यें जें कांहीं पाहातो त्याच्याशीं संबंध होत नाहीं. कारण हा पुरुष असंग आहे. तो हा पुरुष या निद्रावस्थेंत रममाण होऊन व विहार करून, पुण्य व पाप यांस केवल पाहून, पुनरपि नेहमींप्रमाणें यथास्थान स्वप्नावस्थेकरितां (स्वप्नावस्थेंत) धांवतो. या सर्व प्रकरणाचा सारांश—कूटस्थ आत्मा कोणत्याही अवस्थेंत घडणाऱ्या पुण्यपापानें लिप्त होत नाहीं.—असा आहे. ॥ २१२ ॥

प्रस्तुत सिद्धांताचें ज्याच्यामध्यें वर्णन केलें आहे, अशा अथर्ववेदीय कैवल्योपनिषदाचेंही एक वाक्य प्रमाण ह्मणून देतातः—

**जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादिप्रपंचं यत्प्रकाशते ॥**
**तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा सर्वबंधैः प्रमुच्यते ॥ १३ ॥**

अन्वय–यत् जाग्रत्स्वप्नसुषुप्त्यादि प्रपंचं प्रकाशते तत् ब्रह्म अहं इति ज्ञात्वा सर्वबन्धैः प्रमुच्यते ।

अर्थः—जें जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति इत्यादि प्रपंचास प्रकाशित करितें, तें ब्रह्म मी आहें, असें जाणून प्राणि सर्व बंधांकडून सोडिला जातो. ॥ २१३ ॥

विवरण—जाग्रत्, स्वप्न इत्यादि अवस्था हाच प्रपंच होय. कारण प्रपंच ह्मणजे विस्तार. केवल आत्म्यास आपली कैवल्यावस्था सोडून निरनिराळ्या अवस्थेंत पडावें लागणें हा त्याचा विस्तारच होय. पण असंग आत्म्याशीं त्याचा कांहीं संबंध नसतो. तो केवल अवस्थामय प्रपंचाचा द्रष्टा आहे. यास्तव श्रुति ह्मणते कीं जो कोणी यति प्रपंचप्रकाशक ब्रह्मच मी आहें, असें निश्चयपूर्वक जाणतो, तो प्रमातृत्व, कर्तृत्व इत्यादि सर्व बंधांपासून मुक्त होतो. ॥ २१३ ॥

हीच गोष्ट अधिक दृढ करण्याकरितां अमृतबिंदूपनिषदाचेंही प्रमाण देतातः—

**एक एवात्मा मंतव्यो जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु ॥**
**स्थानत्रयव्यतीतस्य पुनर्जन्म न विद्यते ॥ १४ ॥**

अन्वयः—जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु एकः एव आत्मा मन्तव्यः। एवं स्थानत्रयव्यतीतस्य पुनर्जन्म न विद्यते।

अर्थः—जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति यांच्यामध्यें एकच आत्मा मानणें युक्त आहे. (याप्रमाणें) तिन्ही अवस्थांहून पृथक् केलेल्या आत्म्यास पुनर्जन्म नाहीं. ॥ २१४ ॥

विवरणः—जाग्रतादि तिन्ही अवस्थांचा साक्षी आत्मा एकच आहे असें ज्ञान झालें असतां तो या अवस्थांहून भिन्न आहे असें सहजच समजतें. व अशी ज्यांची दृढ समजूत झाली आहे, त्याला, पुनर्जन्माचें कारणच नष्ट झाल्यामुळें, तो घ्यावा लागत नाहीं. ॥ २१४ ॥

कैवल्योपनिषदाच्या आणखी एका वाक्याचें येथें प्रमाण देऊन प्रस्तुत विवेचन संपवितातः—

**त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता भोगश्च यद्भवेत् ॥**
**तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽहं सदाशिवः ॥ १५ ॥**

अन्वयः—त्रिषु धामसु यत् भोग्यं यः भोक्ता यः च भोगः भवेत् तेभ्यः विलक्षणः यः साक्षी चिन्मात्रः सदाशिवः सः एव अहं अस्मि।

अर्थः—तीन अवस्थांमध्यें जें भोग्य, जो भोक्ता व जो भोग असतो त्या सर्वांहून विलक्षण असा जो साक्षी व चिन्मात्र सदाशिव तोच मी आहें. ॥

विवरण—त्रिषु धामसु—जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति या अवस्थांमध्यें. भोग्यं—स्थूलरूप, सूक्ष्मरूप व आनंदरूप. भोक्ता—विश्व, तैजस, प्राज्ञ. भोगः—स्थूलादि भोग्याचा अनुभव. तेभ्यः—तीन स्थानें, स्थूलादि त्रिविध भोग्य व विश्वादि तीन प्रकारचा भोक्ता याहून अगदीं भिन्न धर्मानींयुक्त असा चिन्मात्र व सर्वदा शुभ परमात्मा मीच आहें. असा ज्याला साक्षात्कार होतो, तो पुनरपि संसारपरंपरेंत पडत नाहीं. ॥ २१५ ॥

याप्रमाणें विवेचन केलें असतां काय ठरतें तें आतां सांगतातः—

**एवं विवेचिते तत्त्वे विज्ञानमयशब्दितः ॥**
**चिदाभासो विकारी यो भोक्तृत्वं तस्य शिष्यते ॥ १६ ॥**

अन्वयः—एवं तत्वे विवेचिते सति यः विकारी विज्ञानमयशब्दितः चिदाभासः तस्य भोक्तृत्वं शिष्यते ।

अर्थः—ह्याप्रमाणें तत्त्वाचें विवेचन केलें असतां जो विकारी विज्ञानमय संज्ञक चिदाभास त्याची भोक्तृता असें ठरतें. ॥ १६ ॥

विवरण:—तत्त्वाचें यथार्थ स्वरूप समजल्यानंतर तें भोक्ता आहे असें कोणीही ह्मणत नाहीं. व त्यामुळें चिदाभासच भोक्ता होय असें कबूल करावें लागतें. कारण भोक्ता विकारी असावा लागतो व विज्ञानमय हें ज्याला नांव आहे तो चिदाभास तसा असल्यामुळें त्याला भोक्ता ह्मटल्यावांचून गत्यंतर नाहीं. ॥ ११६ ॥

पण हा भोक्ता चिदाभास खरा आहे का ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतातः—

मायिकोऽयं चिदाभासः श्रुतेरनुभवादपि ॥
इंद्रजालं जगत्प्रोक्तं तदंतःपात्ययं यतः ॥ १७ ॥

अन्वयः—श्रुतेः अनुभवात् अपि अयं चिदाभासः मायिकः । यतः जगत् इंद्रजालं प्रोक्तं अतः तदान्तःपाती अयं ( मिथ्याभूतः एव ) ।

अर्थः—श्रुति व अनुभव या दोघांवरूनही हा चिदाभास मायिक ठरतो. ज्या अर्थी जगत् इंद्रजाल आहे असें स्पष्टपणें सांगितलेलें आहे, त्या अर्थी त्यामध्यें अंतर्भूत होणारा हाही मिथ्याच होय. ॥ २१७ ॥

विवरणः—' माया, ही जीव व ईश्वर यांस चैतन्याभासानें करिते ' अशी श्रुति आहे व भोक्ता त्रिपुटींमध्यें येतो, असा अनुभव आहे आणि त्यावरून हा विकारी चिदाभास मिथ्या आहे, असें निश्चित होतें. शिवाय ज्या अर्थी जगत् इंद्रजालरूप आहे असें एकदा ठरून गेलें आहे, व ह्या चिदाभासाचाही त्यामध्यें अंतर्भाव होत आहे, त्याअर्थी तोही इंद्रजालरूप आहे हें उघड होतें. ॥ १८ ॥

चिदाभास मयिक आहे असें ह्मणण्यास आह्मांस आणखी एक सबळ कारण आहे. कोणतें ह्मणून ह्मणशील तर सांगतोः—

विलयोऽप्यस्य सुप्त्यादौ साक्षिणा ह्यनुभूयते ॥
एतादृशं स्वस्वभावं विविनक्ति पुनः पुनः ॥ १८ ॥

**अन्वय:**—सुप्त्यादौ अस्य अपि विलयः साक्षिणा अनुभूयते हि । ततः एतादृशं स्वस्वभाव पुनः पुनः विविनक्ति ।

**अर्थ:**—सुषुप्ति, समाधि इत्यादि अवस्थांमध्यें याचाही लय साक्षीकडून अनुभविला जातो, हें प्रसिद्ध आहे. तदनंतर तो अशाप्रकारचें आपलें स्वरूप पुनः पुनः भिन्नत्वानें जाणतो. ॥ २१८ ॥

**विवरण:**—ज्याचा ज्याचा ह्मणून बाध होतो तें तें मिथ्या असा नियम आहे; व या चिदाभासाचा सुषुप्तींत लय होत असतो हें साक्षी नित्य पाहातो. अर्थात् चिदाभास मिथ्या आहे. पण कूटस्थ असंग असल्यामळें कोणताही जरी विवेक झाला, तरी तो चिदाभासकृतच असणार, हें उघड आहे. व ह्याकरिताच ग्रंथकार ह्मणतात कीं, अशी वस्तुस्थिति असल्यामळें चिदाभास अशा प्रकारच्या आपल्या वास्तविक स्वरूपाचें वारंवार विवेचन करितो. ह्मणजे कूटस्थाहून माझें स्वरूप भिन्न आहे, असें वारंवार जाणतो. ॥ १८ ॥

तदनंतर—

**विविच्य नाशं निश्चित्य पुनर्भोगं न वांछति ॥**
**मुमूर्षुः शायितो भूमौ विवाहं कोऽभिवांछति ॥ १९ ॥**

**अन्वय:**—विविच्य नाशं निश्चित्य पुनः भोगं न वाञ्छति । भूमौ शायितः कः मुमूर्षुः विवाहं अभिवाञ्छति ।

**अर्थ:**—असा विवेक करून व आपल्या नाशाचा निश्चय करून तो पुनरपि भोगाची इच्छा करीत नाहीं. अहो, ज्याला भूमीवर काढलें आहे असा मरावयास टेंकलेला कोण विवाहाची इच्छा करणार आहे ? ॥ २१९ ॥

**विवरण:**—कूटस्थ व चिदाभास यांची भिन्नता समजली व चिदाभासरूप मी नाशिवंत आहें असें एकदा निश्चयपूर्वक समजलें, कीं प्राणी भोगांची इच्छा करीनासा होतो. उघडच आहे कीं जो मरावयास टेंकला आहे व अंतकाल अगदीं जवळ आल्यामुळें ज्याला भूमीवर काढलें आहे, असा कोणी तरी आपल्या लग्नाची इच्छा करील काय ? कधींही करणार नाहीं. अथवा ज्याला फांसावर चढवावयाचें आहे व त्याची वेळही ठरली आहे. असा एकादा पुरुष आपल्याला राहाण्या-

कारितां एक उत्तम घर बांधावयास पाहिजे, अशी नुस्ती कल्पना तरी करील काय ! कधींही करणार नाहीं. तसाच प्रकार या चिदाभासाचा होतो.. ॥ २१९ ॥

फार काय पण—

**जिह्रेति व्यवहर्तुं च भोक्ताऽहमिति पूर्ववत् ॥**
**छिन्ननास इव ह्रीतः क्लिश्यन्नारब्धमश्नुते ॥ २० ॥**

अन्वयः—' अहं भोक्ता ' इति पूर्ववत् व्यवहर्तुं सः जिह्रेति । च छिन्ननास इव ह्रीतः क्लिश्यन् सन् आरब्धं अश्नुते ।

अर्थः—मी भोक्ता आहें असें पूर्वीप्रमाणें ह्मणण्यास तो लाजतो. व ज्याचें नाक कापलें आहे, अशा एकाद्या मनुष्याप्रमाणें लज्जित व कष्टी होऊन तो प्रारब्धकर्माचा भोग भोगितो. ॥ २२० ॥

विवरणः—पूर्ववत्—ज्या वेळीं कूटस्थ व स्वस्वरूप यांतील भेद समजलेला नव्हता, त्या वेळीं जसा हा भोक्ता समजत होता तसा—विवेकानंतर समजत नाहीं. कारण 'मी भोक्ता आहें' हें माझें ह्मणणें चुकीचें आहे, असें एकदा समजल्यामुळें पुनः तसें ह्मणण्याची त्यास लाज वाटते. तर मग, प्रारब्ध कर्मामुळें प्राप्त होणारे भोग तो कसे भोगितो ? असें कोणी विचारील ह्मणून ग्रंथकार ह्मणतात. ज्याप्रमाणें एकादा अपराधी लाजत लाजत व मोठ्या दुःखानें व्यवहार करितो, त्याप्रमाणें हा नाइलाज म्हणून मोठ्या कष्टानें भोग भोगितो. ह्मणजे त्या भोगांपासून त्यास सुख होत नसून उलट असह्य दुःख होत असतें. ॥ २२० ॥

तात्पर्यः—

**यदा स्वस्यापि भोक्तृत्वं मंतुं जिह्रेत्ययं तदा ॥**
**साक्षिण्यारोपयेदेतदिति कैव कथा वृथा ॥ २१ ॥**

अन्वयः—यदा अयं स्वस्य अपि भोक्तृत्वं मंतुं जिह्रेति तदा, एतत् साक्षिणि आरोपयेत् इति वृथा का एव कथा ।

अर्थः—ज्या वेळीं हा आपलेंही भोक्तृत्व मानण्यास लाजतो, तेव्हां तें साक्षीच्या ठायीं आरोपित करील ही व्यर्थ गोष्ट,कशास पाहिजे ? ॥ २२१ ॥

विवरणः—चिदाभास जरी स्वतः विकारी आहे, तरी त्याला विवेकामुळें मी भोक्ता आहें असें म्हणण्याची लाज वाटते. आपल्यामध्यें योग्यता असूनही जर तो प्रस्तुत अधिकार आपल्याकडे घेऊं शकत नाहीं, तर ज्याच्यामध्यें विकारित्व नसल्यामुळें भोक्ता होण्याची योग्यताच नाहीं, त्याला तो उगीचच 'तूं भोक्ता आहेस' असें कसें म्हणेल? ॥ २२१ ॥

आतां या सर्व विवेचनाचा, प्रारंभीं अर्थ करण्याकरितां घेतलेल्या श्रुतीशीं कसा संबंध लागतो, तें सांगतातः—

**इत्यभिप्रेत्य भोक्तारमाक्षिपत्यविशंकया ॥**
**कस्य कामायेति ततः शरीरानुज्वरो न हि ॥ २२ ॥**

अन्वयः—इति अभिप्रेत्य 'कस्य कामाय' इति [ श्रुतिः ] भोक्तारं अविशंकया आक्षिपति । ततः शरीरानुज्वरः न हि ।

अर्थः—अशा अभिप्रायानें 'कस्य कामाय' हें श्रुतिवाक्य भोक्त्याविषयीं निःशंकपणें आक्षेप करीत आहे. भोक्त्याचाच पत्ता नाहींसा झाल्यावर शरीरास होणारी पीडा ( आपोआपच ) नाहींशी होते. ॥ २२२ ॥

विवरणः—सूक्ष्म दृष्टया पाहूं लागलें असतां कूटस्थही भोक्ता नव्हे व चिदाभासही खरा भोक्ता नव्हे असें ठरतें. म्हणून 'कस्य कामाय' म्हणजे कोणाच्या कामाकरितां हें श्रुतिवाक्य भोक्त्याचें निराकरण करीत आहे. अहो, मुळीं भोक्ताच जर कोणी नाहीं, तर त्याच्याकरितां शरीरास होणारा ताप तरी कोठून असणार? कारण शरीरास जी प्रयत्नादिकांमुळें पीडा होत असते, ती त्यांत राहाणाऱ्या भोक्त्याच्या तृष्णापूर्तिकरितां होत असते, हें उघड आहे. ॥ २२२ ॥

शरीरास संताप होत नाहीं, असें जें पूर्वश्लोकांत म्हटलें आहे, त्याचाच आतां पांच श्लोकांत विस्तार करितातः—

**स्थूलं सूक्ष्मं कारणं च शरीरं त्रिविधं स्मृतम् ॥**
**अवश्यं त्रिविधोऽस्त्येव तत्र तत्रोचितो ज्वरः ॥ २३ ॥**

अन्वयः—स्थूलं, सूक्ष्मं च कारणं इति शरीरं त्रिविधं स्मृतं अस्ति । अतः तत्र तत्र उचितः त्रिविधः ज्वरः अवश्यं अस्ति एव ।

अर्थः—स्थूल, सूक्ष्म व कारण असें शरीर तीन प्रकारचें आहे. यास्तव त्या त्या शरीरांत योग्य असा तीन प्रकारचा संताप अवश्य आहे. ॥२२३॥

विवरणः—स्थूलादि संज्ञक तीन शरीरें कशीं उत्पन्न झालीं आहेत व तीं कोणतीं हें पूर्वार्धांतील तत्त्वविवेकाख्य प्रथम प्रकरणांतच स्पष्ट होऊन गेलें आहे. तीन शरीरें असल्यामुळें त्या त्या शरीरास योग्य असा त्रिविध संताप होणेंही साहजिक आहे. व त्याचा यापुढें विस्तार व्हावयाचा असल्यामुळें येथें अधिक स्पष्टीकरण करीत नाहीं । २२३ ॥

**वातपित्तश्लेष्मजन्यव्याधयः कोटिशस्तनौ ॥**
**दुर्गंधित्वकुरूपत्वदाहभंगादयस्तथा ॥ २४ ॥**

अन्वयः—वातपित्तश्लेष्मजन्याः व्याधयः तथा दुर्गंधित्वकुरूपत्वदाहभंगादयः कोटिशः तनौ सन्ति ।

अर्थः—वात, पित्त व कफ यांपासून होणाऱ्या व्याधि त्याचप्रमाणें दुर्गंधित्व, कुरूपत्व, दाह, भंग, इत्यादि असंख्य पीडा शरीरामध्यें होतात. ॥ २२४ ॥

विवरणः—वात, पित्त व कफ हे तीन दोष स्थूल शरीरांत असतात व त्यांच्या वैषम्यामुळें शरीरास पीडा होते. त्याचप्रमाणें स्थूल देहाची उर्जा न ठेविल्यामुळें किंवा कांहीं व्याधीमुळें त्यास दुर्गंध सुटत असतो, पीनसासारख्या किंवा नाळपुळीसारख्या रोगामुळें शरीर विद्रूप होणें, अग्नीच्या संसर्गामुळें तें जळणें; हात, पाय, इत्यादि अवयव तुटणें; इत्यादि प्रकारच्या असंख्य पीडा या स्थूल शरीरास होतात. ॥२२४॥

आतां सूक्ष्म शरीरांतील ज्वर कोणते तें सांगतातः—

**कामक्रोधादयः शांतिदांत्याद्या लिंगदेहगाः ॥**
**ज्वरा द्वयेऽपि बाधंते प्राप्त्याऽप्राप्त्या नरं क्रमात् ॥ २५ ॥**

अन्वयः—कामक्रोधादयः शांतिदांत्याद्याः लिंगदेहगाः ज्वराः सन्ति । द्वये अपि क्रमात् प्राप्त्या अप्राप्त्या च नरं बाधन्ते ।

अर्थः—कामक्रोधादिक व शांति, दांति इत्यादिक सूक्ष्मशरीरस्थ ज्वर आहेत. हे दोन्ही प्रकारचे ज्वर क्रमानें प्राप्ति व अप्राप्ति यांच्या योगानें मनुष्यास पीडा करितात. ॥ २२५ ॥

**विवरण:**—काम, क्रोध, लोभ इत्यादि दुष्ट विकार व शांति, दान्ति, तितिक्षा, क्षमा, इत्यादि सात्त्विक विकार अंतःकरणांत राहाणारे आहेत. सर्व इंद्रियें आणि प्राण यांसह अंतःकरणच सूक्ष्म शरीर होय. आणि ह्मणूनच हे सर्व ज्वर सूक्ष्म शरीरांतील आहेत, असें येथें ह्मटलें आहे. कामादि दुष्ट विकार संताप देत असतात हें सर्वांस ठाऊक आहे. पण शांतीसारख्या सात्त्विक वृत्तींपासून संताप कसा होत असतो, हें अप्रसिद्ध असल्यामुळें ग्रंथकार ह्मणतात कीं, कामादि दुष्ट विकारांची उत्पत्ति झाली असतां व शांतिसारख्या वृत्तींची प्राप्ति झाली नसतां सूक्ष्म शरीरास असह्य पीडा होते. अर्थात् त्या दोन्ही प्रकारच्या वृत्ति सूक्ष्म शरीरास पीडा देणाऱ्या आहेत. ॥ २२५ ॥

आतां कारणशरीरास कशी पीडा होते तें श्रुतीचा आधार देऊन सांगतात:—

**स्वं परं च न वेत्त्यात्मा विनष्ट इव कारणे ॥**
**आगामिदुःखबीजं चेत्येतदिंद्रेण दर्शितम् ॥ २६ ॥**

अन्वय:—कारणे विनष्टः इव आत्मा स्वं परं च न वेत्ति । च एतत् आगामि-दुःखबीजं इति इंद्रेण दर्शितम् ।

**अर्थ:—जणुं काय कारणदेहांत नाहींसा झालेला आत्मा आपपर कांहीं जाणत नाहीं. पण हें दुसऱ्या दिवशीं भोगावयास लागणाऱ्या दुःखाचें बीज आहे असें इंद्रानें ( गुरूस ) दाखविलें. ॥ २२६ ॥**

**विवरण:**—छान्दोग्योपनिषदाच्या अष्टमाध्यायाच्या अकराव्या खंडाच्या प-हिल्या मंत्राचा या श्लोकांत निर्देश आहे. इंद्र आत्मज्ञानार्थ प्रजापतीकडे गेला. व प्रजापतींनीं सांगितल्याप्रमाणें विचार करीत असतां त्याला प्रस्तुत प्रकार आढळला. गाढ निद्रावस्थेंत जो अनिर्वचनीय अनुभव येतो, तोच आत्मा होय, असें त्यास प्रथम वाटलें होतें. पण विचारानंतर “ सुषुप्तींत तर आपलें व दुसऱ्याही कशाचें भान होत नाहीं. उलट स्वप्न व जाग्रत् या दोन अवस्थेंत भासणाऱ्या चैतन्याचा नाश ( कारणामध्यें लय ) झाल्यासारखें वाटतें. पण हीच अवस्था पुनरपि जाग्रतींत आणून प्राण्यास दुःख देणारी आहे. वास्तव या अवस्थेमध्यें मला कांहीं एक फल दिसत नाहीं. ” अशी त्याची खात्री झाली. व त्यानें तो सर्व प्रकार आपल्या गुरूस

निवेदन केला. तात्पर्य, कारण अवस्थेतील ज्वराची जरी सर्वांस प्रतीति नसली, तरी विवेक्यास त्याची प्रतीति येते. अर्थात् तो आहे, यांत शंका नाहीं. ॥ २२६ ॥

' उपायांच्या योगानें आपण या ज्वराचा परिहार करूं ' असें जर कोणी म्हणेल, तर तसें होणें अशक्य आहे असें आतां सांगतातः–

**एते ज्वराः शरीरेषु त्रिषु स्वाभाविका मताः ॥**
**वियोगे तु ज्वरैस्तानि शरीराण्येव नासते ॥ २७ ॥**

**अन्वयः**—त्रिषु शरीरेषु एते ज्वराः स्वाभाविकाः मताः । अतः ज्वरैः वियोगे तु तानि शरीराणि एव न आसते ।

**अर्थः**—तिन्ही शरीरांत हे ज्वर स्वाभाविक मानिलेले आहेत. यास्तव ज्वरांशीं यांचा जर वियोग झाला, तर तीं शरीरेंच नाहींशीं होतील. ॥२२७॥

**विवरणः**—स्वभावभूत जे धर्म असतात त्यांचा व धर्मांचा कधींच वियोग होत नाहीं:–ज्याप्रमाणें अग्नि या धर्मीचा दाहशक्ति हा धर्म स्वभावभूत आहे. यास्तव अग्नींतून दाहशक्ति निघून गेल्यास त्याचें अग्नित्वही नाहींसें होतें. या न्यायानें त्रिविध ज्वर शरीराचे स्वाभाविक धर्म आहेत. त्यामुळें ते नाहींसे झाल्यास शरीराचाही नाश होईल हें उघड आहे. तस्मात् शरीराचें रक्षण करून ज्वरांचा प्रतीकार करितां येणें शक्य नाहीं. ॥ २२७ ॥

हीच गोष्ट तीन दृष्टांत देऊन स्पष्ट करितातः–

**तंतोर्वियुज्येत पटो वालेभ्यः कम्बलो यथा ॥**
**मृदो घटस्तथा देहो ज्वरेभ्योऽपीति दृश्यताम् ॥ २८ ॥**

**अन्वयः**—यथा तंतोः पटः वा वालेभ्यः कम्बलः अथ वा मृदः घटः न वियुज्येत् तथा ज्वरेभ्यः अपि देहः न वियुज्येत् इति दृश्यताम् ।

**अर्थः—ज्याप्रमाणें तंतूपासून पट किंवा केंसापासून कांबळें, अथवा मृत्तिकेपासून घट वियुक्त होत नाहीं, त्याप्रमाणें ज्वरांपासून देह वियुक्त होत नाहीं, असें समजावें. ॥ २२८ ॥**

**विवरणः—सुताचे धागे हें वस्त्राचें उपादान कारण आहे, लोकरीचे केंस कांबळीचें उपादन कारण आहे व माती मातीच्या भांड्याचें उपादन कारण आहे.**

वास्तव त्यांचा वियोग होणें शक्य नाहीं. कारण उपादानाचा नाश झाल्यावर कार्य एक क्षणभरही राहूं शकत नाहीं. व हाच न्याय ज्वर व देह यांच्या ठायीं लागू पडतो. देहाचें उपादानकारण ज्वरच आहे, हें कशावरून अशी एक शंका येथें येते. पण त्याचें थोडक्यांत समाधान असें आहे कीं, धर्माधर्मजन्य फल भोगण्याकरितांच देह निर्माण झालेला असल्यामुळें व प्राण्याची प्रवृत्ति प्रायः पापकर्माकडेच असल्यामुळें त्याचें फलभूत दुःखच देहाचें कारण आहे. अर्थात् कारणभूत ज्वर व शरीर यांचा वियोग होणें शक्य नाहीं. अच्युतरायांच्या पाठाप्रमाणें मी येथें अन्वयादि लिहिला आहे, बहुतेक छापी पुस्तकांत ' वियुज्येत ' असा पाठ आढळतो, पण तो अपपाठ आहे, असें प्रस्तुत पंडितांनीं स्पष्ट म्हटलें आहे. शिवाय वियुज्येत्र असा पाठ घेतल्यानें अर्थही चांगला लागतो. ॥ २२८ ॥

ज्वर व शरीरें यांचा जसा नित्यसंबंध आहे तसाच चिदाभासाचा व ज्वराचा कां असूं नये ? अशी कोणी शंका विचारील, ह्मणून ग्रंथकार ह्मणतात:—

**चिदाभासे स्वतः कोऽपि ज्वरो नास्ति यतश्चितः ॥**
**प्रकाशैकस्वाभात्वमेव दृष्टं न चेतरत् ॥ २९ ॥**

**अन्वयः**—चिदाभासे स्वतः कः अपि ज्वरः न अस्ति । यतः चितः प्रकाशैकस्वभावत्वं एव दृष्टं च इतरत् न दृष्टम् ।

**अर्थः**—स्वतः चिदाभासाच्या ठायीं कोणत्याही प्रकारचा ज्वर नाहीं. कारण चैतन्याचें केवल प्रकाशरूपत्वच अनुभवास येतें, दुसरें कांहीं अनुभवास येत नाही. ॥ २२९ ॥

**विवरणः**—चिदाभासरूप जीव पीडा भोगीत असल्यासारखा दिसतो हें खरें, पण तो त्याचा स्वभाव नव्हे. तर केवळ पूर्वोक्त त्रिविध देहांशीं संबंध झाल्यामुळें त्यांच्या ठिकाणच्या ज्वरांचा यास संसर्ग होतो. खरोखर जर पाहिलें तर चैतन्याचा मुख्य स्वभाव प्रकाश हाच आहे. त्याहून अन्य एखादा स्वभाव असेल असें जर ह्मणावें, तर तसा अनुभव येत नाहीं. चैतन्य व त्याचा आभास यांच्या अवस्थेंत जरी भिन्नता असली, तरी त्यांच्या धर्मांत अंतर पडत नाहीं. यास सूर्य व त्याचें प्रतिबिंब, पुष्प व त्याचें प्रतिबिंब, इत्यादि अनेक दृष्टांत आहेत. सारांश, प्रकाश

हाच चैतन्याचा एक स्वभाव असल्यामुळें त्याच्या आभासाचा ज्वरांशीं नित्यसंबंध आहे, असें ह्मणणें अयुक्त होय. ॥ २२९ ॥

ज्वराचा चिदाभासाशींही संबंध होत नाहीं तर कूटस्थाशीं कसा होईल—असें आतां ह्मणतात—

**चिदाभासेऽप्यसंभाव्या ज्वराः साक्षिणि का कथा ॥**
**एवमप्येकतां मेने चिदाभासो ह्यविद्यया ॥ ३० ॥**

**अन्वय:**—यदा चिदाभासे अपि ज्वरा: असंभाव्याः तदा साक्षिणि का कथा ? एवं अपि चिदाभासः अविद्यया एकतां मेने हि ।

अर्थ:—चिदाभासाचे ठायींही जर ज्वर संभवत नाहींत, तर मग साक्षी-ची काय कथा ? पण असें जरी आहे, तरी चिदाभास अनादि व भावरूप अविद्येच्या योगानें एकता मानूं लागतोच. ॥ २३० ॥

**विवरण**:—पूर्व श्लोकांत ज्वरांचा व चिदाभासाचा संबंध नाहीं, हें स्पष्टपणें दाखविलें आहे. व चिदाभासाशींही जर त्यांचा संबंध होत नाहीं, तर कूटस्थ जो साक्षी. त्याच्याशीं त्याचा संबंध होईल हें नांव कशास पाहिजे ? मग असें जर आहे, तर मी अति दुःखी आहें, इत्यादि प्रकारें प्राण्यास अनुभव कसा येतो ? असें कोणी विचारील ह्मणून श्रीभारतीतीर्थ त्यांचें उत्तर देऊन ठेवितात—वस्तुस्थिति जरी अशी आहे तरी चिदाभास अनादि अविद्येच्या योगानें जड व चैतन्य यांचें ऐक्य मानितो, व त्यामुळें ' मी दुःखी आहें ' इत्यादि प्रकारें अनुभव येतो; पण तो भ्रम होय. कारण विचारानंतर त्याचा बाध होत असल्याचें शास्त्र व ब्रह्मनिष्ठ पुरुष सांगत आहेत. ॥ २३० ॥

चिदाभास जड व चैतन्य यांचें ऐक्य कसें मानितो, तें आतां स्पष्ट करून दाखवितात:—

**साक्षिसत्यत्वमध्यस्य स्वेनोपेते वपुर्द्वये ॥**
**तत्सर्वं वास्तवं स्वस्य स्वरूपमिति मन्यते ॥ ३१ ॥**

**अन्वय:**—चिदाभासः स्वेन उपेते वपुर्द्वये साक्षिसत्यत्वं अध्यस्य तत् सर्वं स्वस्य वास्तवं स्वरूपं इति मन्यते ।

**अर्थः**—चिदाभास आपल्यासह तीन शरीरांचे ठायीं साक्षीच्या सत्यत्वाचा अध्यास करून तें सर्व आपलें वास्तविक रूपच आहे, असें मानतो. २३१

**विवरण:**—चिदाभास हा अध्यासाचा कर्ता होय. कारण त्याच्या मिथ्या आग्रहामुळें किंवा खोट्या समजुतीमुळेंच जड व चैतन्य यांचें आरोपित ऐक्य होऊन त्यास अनर्थांत पडावें लागतें. तो स्वत: आभास असल्यामुळें जरी कांहीं काल प्रतीत होणारा असतो, तरी स्वतःचें खरें स्वरूप विसरून गेल्यामुळें तो कूटस्थाचें सत्यत्व आपल्या व स्वसंबद्ध शरीरांच्या ठायीं आरोपित करितो. खोटी भावना करणें ह्मणजेच आरोप करणें होय. यासच अध्यास ह्मणतात. याच्या योगानें चिदाभास, तीन शरीरें, ज्वर, संसार इत्यादि माझें वास्तविक स्वरूप आहे, असें मानितो. २३१

आणि एकदा त्याची अशी दृढ समजूत झाली कीं मोठाच अनर्थ ओढवतो असें आतां सांगतात:

**एतस्मिन् भ्रांतिकालेऽयं शरीरेषु ज्वरत्स्वथ ॥**
**स्वयमेव ज्वरामीति मन्यते हि कुटुंबिवत् ॥ ३२ ॥**

**अन्वयः**—एतस्मिन् भ्रांतिकाले अयं शरीरेषु ज्वरत्सु अथ स्वयं एव ज्वरामि इति हि कुटुंबिवत् मन्यते ।

अर्थ:—ह्या भ्रांतिसमयीं हा चिदाभास शरीरें पीडायुक्त झालीं असतां मीच पीडित आहें, असें एकाद्या प्रसिद्ध कुटुंबी गृहस्थाप्रमाणें मानितो. ॥ २३२ ॥

**विवरण:**—पूर्वोक्त प्रकारें एकदा दृढ अध्यास झाला कीं चिदाभास आपली योग्यता व आपणास केवळ्या श्रेष्ठत्वाचा आश्रय आहे हें विसरून जाऊन शरीरें प्रारब्धकर्माप्रमाणें दु:खी झालीं कीं मीच दु:खी आहें, व तीं कांहीं निमित्तानें सुखी झालीं कीं मीच सुखी आहें. असें मानूं लागतो. आपल्याहून अगदीं भिन्न अशा वस्तूंचे धर्म त्याला आपल्या ठायीं कसे मानितां येतील ? असा कोणी प्रश्न करील, ह्मणून ग्रंथकार ह्मणतात कीं एकाद्या कुटुंब्याप्रमाणें तो दुसऱ्याचे धर्म आपल्या ठायीं मानितो. जसा प्राकृत व्यवहारपटु आपल्याहून अगदीं निराळ्या अशा स्त्री, पुत्रादि वस्तूंच्या दु:खानें दु:खी व त्यांच्या सुखानें सुखी होतो, तसाच हाही शरीरादि अगदीं भिन्न पदार्थांच्या पीडेनें पीडित होतो. श्रीमच्छंकराचार्यांनीं शारीरकाच्या आरंभीं अध्यासभाष्यांत हाच दृष्टान्त दिला आहे. ॥ २३२ ॥

पूर्वोक्त दृष्टान्त स्वतः ग्रंथकारच स्पष्ट करितातः—

**पुत्रदारेषु तप्यत्सु तपामीति वृथा यथा ॥**
**मन्यते पुरुषस्तद्वदाभासोऽप्यभिमन्यते ॥ ३३ ॥**

अन्वयः—यथा पुरुषः पुत्रदारेषु तप्यत्सु अहं तपामि इति वृथा एव मन्यते, तद्वत् आभासः अपि अभिमन्यते ।

**अर्थः—ज्याप्रमाणें कोणी पुरुष पुत्र, स्त्री इत्यादि दुःखी झालीं असतां मी दुःखी आहें उगीचच असें मानतो, त्याप्रमाणें आभासही अभिमान करितो.**

**विवरणः**—वस्तुतः पुत्रादिकांच्या दुःखाचा याला यत्किंचितही प्रत्यय येणें शक्य नसतें. पण हीं माझीं आहेत, असें खोटेंच समजल्यामुळें त्याला त्यांच्या दुःखाचें नुस्तें अनुमान करूनच दुःखी व्हावें लागतें. पण जीं माझीं नव्हेत असें तो मानितो, त्यांना तशाच किंवा त्याहून हजारोपट अधिक जरी वेदना होत असल्या तरी त्याला त्याचें थोडेंही वाईट वाटत नाहीं, असें आपण नित्य पाहातों. व त्यावरून ममत्वरूप अध्यासच या सर्व दुःखांचें कारण आहे असें ठरतें. ॥ २३३ ॥

तात्पर्यः—

**विविच्य भ्रांतिमुज्झित्वा स्वमप्यगणयन्सदा ॥**
**चिंतयन्साक्षिणं कस्माच्छरीरमनुसंज्वरेत् ॥ ३४ ॥**

अन्वयः—विविच्य, भ्रांतिं उज्झित्वा, सदा स्वं अपि अगणयन् च साक्षिणं चिंतयन्, शरीरं अनु कस्मात् संज्वरेत् ।

**अर्थः—विवेक करून, भ्रांति सोडून व सर्वदा आपलीही गणना न करणारा आणि साक्षीचें चिंतन करणारा साधक शरीराच्या मागोमाग कशा करितां दुःखी होईल. ॥ २३४ ॥**

**विवरणः—विविच्य**—कूटस्थ, चिदाभास व शरीरें हीं भिन्न आहेत असें जाणून, **भ्रांतिं**—शरीरादि सर्व माझेंच रूप आहे ह्या २३१ व्या श्लोकांत दाखविलेल्या भ्रांतीस. **स्वं० अगणयन्**—कूटस्थाहून भिन्न असा मी कोणी पदार्थ आहें असें कधींही न समजणारा. **कस्मात्**—शरीराच्या पीडेमुळें पीडित होण्याचें कारणच

न राहिल्यामुळें, साक्षीचें अहोरात्र चिंतन करणारा पुरुष अनात्म्याच्या दुःखामुळें दुःखी होणार नाहीं. ॥२३४ ॥

विवेकानंतर शरीरें दुःखी झालीं असतां त्यांच्याबरोबर हाही कां दुःखी होत नाहीं, तें आतां दृष्टान्त देऊन सांगतातः—

**अयथावस्तुसर्पादिज्ञानं हेतुः पलायने ॥**
**रज्जुज्ञानेऽहिधीध्वस्तौ कृतमप्यनुशोचति ॥ ३५ ॥**

**अन्वयः**—अयथावस्तुसर्पादिज्ञानं पलायने हेतुः । रज्जुज्ञाने च अहिधीध्वस्तौ सत्यां कृतं अपि अनुशोचति ।

अर्थः—**मिथ्याभूत सर्पादिकांचें ज्ञान पळण्यास कारण होतें. पण रज्जु-ज्ञान होऊन सर्पभ्रांति नष्ट झाली असतां पळाल्याबद्दलही तो कष्टी होतो.**

**विवरणः**—मंद अंधकारामध्यें रज्जु पडलेली असावी व त्याच रस्त्यानें कोणी जात असावा. आणि इतक्यांत रज्जूकडे त्याची दृष्टि जाऊन तिचें यथार्थज्ञान न व्हावें व तो मोठा भुजंग आहे, असें त्यास वाटावें. मग काय विचारतां! तो बिचारा प्राणाच्या आशेनें पळत सुटेल! त्याचें हृदय धडधड उडूं लागेल. व त्याचें क्षणभर भानही उडेल. पण इतक्यांत जर कोणी ती दोरी आहे असें जाण-णार्‍यानें त्याला तिच्या यथार्थरूपाचा प्रत्यय आणून दिला तर भ्रमानें भासलेल्या सर्पाची तात्काळ निवृत्ति होईल व 'अरे रे! मी व्यर्थ घाबरलों व जीव घेऊन पळालों' असें तो खिन्न होऊन ह्मणेल, हें उघड आहे. तसाच प्रकार या चिदाभासाच्या भ्रमाचाही होतो. ह्मणजे विवेकानंतर 'अरे रे! मी उगीच या अनात्मभूत शरीरा-करितां आजपर्यंत कष्ट भोगीत होतों' असें त्यास वाटून फार दुःख होतें. ॥२३५॥

नंतर,

**मिथ्याभियोगदोषस्य प्रायश्चित्तप्रसिद्धये ॥**
**क्षमापयन्निवात्मानं साक्षिणं शरणं गतः ॥ ३६ ॥**

**अन्वयः**—मिथ्याभियोगदोषस्य प्रायश्चित्तप्रसिद्धये साक्षिणं आत्मानं क्षमापयन् इव शरणं गतः भवति ।

**अर्थः—खोटा आरोपरूप जो हा दोष त्याचें प्रायश्चित्त करण्याकरितां साक्षी, आत्म्याची जणुं काय क्षमा मागणारा होत्साता त्यास शरण जातो. ॥२३६॥**

विवरणः—अनादि अविद्येमुळें चिदाभासानें साक्षीच्या ठायीं जो कर्तृत्वादि रूप आरोप केला होता, त्याचें प्रायश्चित्त भोगण्याकरितां त्या आरोपास अयोग्य असलेल्या साक्षी आत्म्याची क्षमा मागून जणुं काय त्यास प्रसन्न करण्याकरितां तो त्यास शरण जातो, असा या सर्व श्लोकाचा भावार्थ आहे. एकाद्या भल्या मनुष्यावर आपण खोटाच कांहीं आरोप केल्यास व ती आपली मोटी चूक आहे असें समजल्यास पापाच्या भीतीनें जसे आपण त्याच्यापुढें नम्र होऊन त्याची क्षमा करण्याविषयीं प्रार्थना करितों, तसाच हा चिदाभास साक्षीपुढें लीन होऊन व त्याची सतत चिंतनरूप क्षमा मागून त्यास प्रसन्न करण्याची खटपट करितो. ॥ २३६ ॥

याविषयींच आणखी एक दृष्टान्तः—

**आवृत्तपापनुत्त्यर्थं स्नानाद्यावर्त्यते यथा ॥**
**आवर्तयन्निव ध्यानं सदा साक्षिपरायणः ॥ ३७ ॥**

अन्वयः—यथा आवृत्तपापनुत्त्यर्थं स्नानादि आवर्त्यते तथा अयं ध्यानं आवर्तयन् इव सदा साक्षिपरायणः भवति ।

अर्थः—ज्याप्रमाणें पुष्कळ वेळ आलेल्या पापाच्या नाशार्थ स्नानादिकांची आवृत्ति केली जाते, त्याप्रमाणें हा जणुं काय ध्यानाची आवृत्ति करणारा साधक, सर्वदा साक्षिपरायण होऊन राहातो. ॥ २३७ ॥

विवरणः—ज्याच्या हातून अनेक वेळ पाप घडलें असतें, त्याला त्याची निवृत्ति होण्यास्तव प्रायश्चित्तही पुष्कळ करावें लागतें. प्रायश्चित्ताचे प्राजापत्यादि अनेक प्रकार आहेत. व त्यांचे प्रत्याम्नायही अनेक आहेत. त्यांत केंस वाळेपर्यंत उघड्या जागेंत उभें राहून तीर्थांत बारा वेळ स्नान करणें—हाही एक आहे, व त्याला उद्देशून हा येथील निर्देश आहे. तात्पर्य; अपराधानुरूप प्रायश्चित्त सांगितलेलें असतें. व त्याप्रमाणेंच हा साधकही साक्षीच्या ठायीं कर्तृत्वादि खोटाच आरोप केल्यामुळें जणुं काय प्रायश्चित्तार्थ त्याचें सतत चिंतन करीत असतो. व तो प्रसन्न व्हावा म्हणून त्याची अनन्यभावानें अनुसंधानरूप सेवा करितो. ॥ २३७ ॥

आपलें खरें स्वरूप समजल्यावर चिदाभास प्रौढी मिरविण्याची लाज वाटते, असें आतां सदृष्टांत सांगतातः—

**उपस्थकुष्ठिनी वेश्या विलासेषु विलज्जते ॥**
**जाननोऽग्रे तथा भासः स्वप्रख्यातौ विलज्जते ॥ ३८ ॥**

अन्वयः—यथा उपस्थकुष्ठिनी वेश्या जाननः अग्रे विलासेषु विलज्जते तथा अयं भासः स्वप्रख्यातौ विलज्जते।

अर्थः—जिच्या गुह्यस्थानीं कोड आहे अशी वेश्या जशी जाणत्या पुरुषापुढें विलास करण्याविषयीं लाजते, त्याप्रमाणें हा भास आपल्या प्रख्याति विषयीं लाजतो. ॥ २३८ ॥

**विवरण:**—वेश्या स्त्रिया बहुतकरून निर्लज्ज असतात. कारण अनेक पुरुषांशीं संबंध झाल्यामुळें त्यांची नैसर्गिक लज्जा नाहींशी झालेली असते असें ह्मटलें तरी चालेल. पण जिच्या गुह्यस्थानीं कोड असतें, ती आपलें वर्म ज्याला ठाऊक आहे अशा पुरुषापुढें नेत्रकटाक्ष, हावभाव, इत्यादि करून आपल्या स्वरूपाची प्रौढी मिरविण्यास (विलास करण्यास) लाजते, हा दृष्टांत होय. व त्याप्रमाणेंच आभासही आपल्यामध्यें मोठा दोष आहे असें समजून आल्यावर मी कर्ता आहें, विद्वान आहें, सुंदर आहें, श्रीमंत आहें, इत्यादि प्रकारें स्वतःची प्रौढी मिरविण्यास लाजतो. कारण असें समजणें ही मोठीच चूक आहे, हें त्यास पूर्णपणें ठाऊक असतें. ॥ २३८ ॥

व त्याप्रमाणें ज्यानें एकदा प्रायश्चित्त केलें आहे, तो पुनरपि चित् व जड यांचें ऐक्य करीत नाहीं. असें आतां सोदाहरण सांगतात:—

**गृहीतो ब्राह्मणो म्लेच्छैः प्रायश्चित्तं चरन् पुनः ॥**
**म्लेच्छैः संकीर्यते नैव तथा भासः शरीरकैः ॥ ३९ ॥**

अन्वयः—म्लेच्छैः गृहीतः ब्राह्मणः प्रायश्चित्तं चरन् पुनः म्लेच्छैः न संकीर्यते एव तथा भासः शरीरकैः न संकीर्यते।

अर्थः—म्लेच्छांनीं ज्याला धरिलें आहे असा ब्राह्मण प्रायश्चित्त करीत असतां जसा पुनः म्लेच्छांकडून भ्रष्ट केला जात नाहीं, त्याप्रमाणें शरीरगत त्र्यणकडून चिदाभास मिश्रित केला जात नाहीं. ॥ २३९ ॥

**विवरण:**—बलात्कार करून म्लेच्छांनीं ज्यास भ्रष्ट केलें आहे असा एकादा ब्राह्मण त्यांच्या हातांतून सुटला असतां आपल्या शुद्ध्यर्थ प्रायश्चित्त करितो व त्यानंतर

पुनरपि त्यांच्या तावडींत सांपडूं नये म्हणून फार सावध होऊन राहातो, व त्यामुळें दुष्ट म्लेच्छ त्यास पुनः भ्रष्ट करूं शकत नाहींत, त्याचप्रमाणें ज्याला आत्मा व अनात्मा यांचें यथार्थ ज्ञान झालें आहे व आजपर्यंत कूटस्थावर मी भलताच आरोप करीत होतों असा ज्याला आपला अपराध समजला आहे व त्याच्या निरसनार्थ जो कूटस्थाची क्षमा मागूं लागलेला आहे, असा चिदाभासास म्लेच्छस्थानीय शारीरक ज्वर दूषित करूं शकत नाहीत. ॥ २३९ ॥

चिदाभास आपल्या अनर्थाच्या निवृत्तीकरितांच कूटस्थास शरण जातो असें नाहीं. तर त्यामुळें मोठें फल मिळणारें असल्यामुळेंही त्याला कूटस्थाचा आश्रय करावा लागतो:—

**यौवराज्ये स्थितो राजपुत्रः साम्राज्यवांछया ॥**
**राजानुकारी भवति तथा साक्ष्यनुकार्ययम् ॥ २४० ॥**

**अन्वयः**—यौवराज्ये स्थितः राजपुत्रः साम्राज्यवांछया यथा राजानुकारी भवति तथा अयं साक्ष्यनुकारी भवति ।

**अर्थः**—यौवराज्यावर आरूढ झालेला राजपुत्र साम्राज्याच्या इच्छेनें जसा राजाच्या तंत्रानें वागतो, तसा हाही साक्षीचा अनुयायी होतो.॥२४०॥

**विवरणः**—राजपुत्रास राजाच्या तंत्रानें वागण्यास साम्राज्याचा लोभ कारण होतो, व या चिदाभासास अनर्थापासून सुटका व्हावी हा लोभ सुटल्यामुळें साक्षीच्या तंत्रानें वागावें लागतें. तात्पर्य, मोठ्याच्या तंत्रानें वागण्यांत सर्वदा लाभच होत असतो. ॥ २४० ॥

आतां अनर्थांतून सोडविणारें ब्रह्मज्ञान कोणास होतें तें सांगतात:—

**यो ब्रह्म वेद ब्रह्मैव भवत्येव इति श्रुतिः ॥**
**श्रुत्वा तदेकचित्तः सन्ब्रह्म वेत्ति न चेतरत् ॥ ४१ ॥**

**अन्वयः**—यः ब्रह्मवेद स ब्रह्म एव भवति एव इति श्रुतिः श्रुत्वा तदेकचित्तः सन् ब्रह्म वेत्ति च न इतरत् ।

**अर्थः—जो ब्रह्मास जाणतो तो ब्रह्मच होतो यांत कांहीं शंका नाहीं, असें श्रुतीचें वाक्य ऐकून त्यामध्यें चित्त लावून जो राहातो तोच ब्रह्मास जाणतो. दुसरा कोणी जाणत नाहीं. ॥ २४१ ॥**

**विवरण:**– ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां स्वतः तो ज्ञानीच ब्रह्म होतो. असें श्रुतीचें प्रतिज्ञारूप वचन ऐकून साक्षात्काराकरितां प्रयत्न करणाऱ्या मुमुक्षूंस योग्य समयीं फल मिळतें. श्रुतीवर विश्वास ठेवून येणेंप्रमाणें प्रयत्न न करणारास आत्मसाक्षात्काररूप फल मिळत नाहीं. सारांश; अनुत्तम फलाकरितां राजपुत्रस्थानीय चिदाभास कूटस्थाच्या तंत्रानें वागतो. ॥ २४१ ॥

**प्रश्न:**—अहो पण ब्रह्मज्ञानाच्या योगानें चिदाभासाचाच नाश होत असल्यामुळें तो आपल्या नाशाकरितां प्रयत्न करितो, हें ह्मणणें संभवेल कसें ? **उत्तर:**—तो आपल्या नाश करण्यास कसा तयार होतो, तें सदृष्टांत सांगतात: ऐका—

**देवत्वकामा ह्यग्न्यादौ प्रविशंति यथा तथा ॥**
**साक्षित्वेनावशेषाय स्वविनाशं स वांच्छति ॥ ४२ ॥**

**अन्वय:**—देवत्वकामाः यथा अग्न्यादौ प्रविशन्ति हि तथा सः साक्षित्वेन अवशेषाय स्वविनाशं वांच्छति ।

**अर्थ:**—देवत्वाची इच्छा करणारे पुरुष जसे अग्न्यादिकांमध्यें प्रवेश करितात, त्याप्रमाणें हा चिदाभास साक्षीरूप होऊन राहण्याकरितां आपल्या विनाशाची इच्छा करितो. ॥ २४२ ॥

**विवरण:**—मोठ्या लाभाकरितां थोडीशी हानि सहन करण्यास प्राणिमात्र तयार होत असतो. पतीबरोबर सहगमन करणें, भागीरथींत देहाचें विसर्जन करणें, हिमालयादि पर्वतांच्या शिखरावर जाऊन तेथून भृगुपात विधीनें कडेलोट करून घेणें, इत्यादि स्वविघातक कृत्येंही मनुष्य स्वर्ग लोकांकरितां जशीं करितो त्याचप्रमाणें हा चिदाभास कूटस्थरूप होऊन राहण्याकरितां आपला नाश करून घेत असतो. बौद्धांचा वादांत पराजय करणाऱ्या कुमारिलभट्टांनीं अग्नींत प्रवेश केला हें प्रसिद्ध आहेच. ॥ २४२ ॥

आतां प्रारब्ध कर्माचा क्षय होई तों चिदाभासाचा नाश होणें अशक्य आहे व त्यामुळें वरील विवेचन बरोबर नाहीं, असें कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार सांगतात:—

**यावत्स्वदेहदाहं स नरत्वं नैव मुञ्चति ॥**
**यावदारब्धदेहं स्यान्नाभासत्वविमोचनम् ॥ ४३ ॥**

अन्वयः—सः यावत् स्वदेहदाहं नरत्वं न मुञ्चति एव । तथा यावदारब्धदेहं आभासत्व विमोचनं न स्यात् ।

अर्थः—अग्नींत प्रविष्ट झालेला तो मनुष्य आपला देह जळून भस्म होईतों मनुष्यपणा सोडीत नाहींच. त्याप्रमाणें प्रारब्ध देह असेपर्यंत चिदाभासत्वाचीही निवृत्ति होत नाहीं. ॥ २४३ ॥

विवरणः—जरी स्वर्गाच्या इच्छेनें एकाद्यानें अग्नींत प्रवेश केला व देह जळूं लागल्यामुळें त्यानें प्राण सोडिले, तरी देहाची आकृति असेपर्यंत त्याचें मनुष्यत्व नाहींसें होत नाहीं, तर त्याचा पूर्ण दाह होऊन भस्म होईतों " अग्नींत प्रवेश केलेल्या या मनुष्याचें हें मस्तक, हा उजवा हात, ही डावी मांडी " इत्यादि प्रकारें पाहणारास ज्ञान होतें. त्याचप्रमाणें चैतन्यरूप व संसारदुःखशून्य होण्याकरितां जरी चिदाभासानें कूटस्थामध्यें विचारद्वारा प्रवेश केला, तरी आरब्ध कर्मांचें फल भोगण्याकरितां निर्माण झालेल्या देहाचा पात होईतों त्याची आभासत्वापासून सुटका होत नाहीं. ॥२४३ ॥

शंकाः—पण शिंपीच्या ठायीं भासणाऱ्या रुप्याची शिंपीचें ज्ञान होतांच निवृत्ति होत असते असें दिसतें. तेव्हां केवळ अनादि अज्ञानामुळें भासणारा हा सर्व प्रपंचही त्याचें कारण निवृत्त होतांच निवृत्त होणें युक्त आहे. मग असें असतांना अधिष्ठानभूत आत्म्याचा साक्षात्कार झाल्यावरही चिदाभास असतो व द्वैताचें भान होतें, असें कसें म्हणतां ? समाधानः—शुक्तिरजत दृष्टांतांत जरी तुझें म्हणणें युक्त ठरलें, तरी रज्जुसर्पाच्या दृष्टान्तांत दोरीचें ज्ञान झाल्यावरही कांहीं वेळ भ्रमाचें कार्य राहातें, कसें म्हणून म्हणशील, तर स्पष्ट करून दाखवितों पहाः—

**रज्जुज्ञानेऽपि कंपादिः शनैरेवोपशाम्यति ॥**
**पुनर्मंदांधकारे सा रज्जुः क्षिप्तोरगीभवेत् ॥ ४४ ॥**

अन्वयः—रज्जुज्ञाने अपि कंपादिः शनैः एव उपशाम्यति । च मंदान्धकारे क्षिप्ता सा रज्जुः पुनः उरगीभवेत् ।

अर्थः—रज्जुज्ञान झालें तरीही कंपादि हळुहळूच नष्ट होतो. व मंद अंधकारांत टाकलेली दोरी पुनरपि सर्परूप भासते. ॥ २४४ ॥

**विवरण:**—प्रथम दोरीचें ज्ञान न झाल्यामुळें हा मोठा भुजंग आहे असें वाटावें व त्यामुळें हातपाय थरथर कांपूं लागलेले असावेत पण इतक्यांत "अरे ती दोरी आहे. उगीच कां भितोस ?" असें ह्मणून कोणीं तिला उचलून दाखवावें; तरी सुद्धां अंगाचा कंप दोरीला पहातांच नाहींसा होत नाहीं, तर तो कांहीं वेळानें नाहींसा होतो, असा अनुभव आहे. **शंका:**—हें जरी खरें असलें तरी त्याला पुनः सर्पाची भ्रांति होणार नाहीं. **समाधान:**—असा कांहीं अबाधित नियम नाहीं. कारण ती दोरी थोड्याशा अंधकारांत नजरेस पडून राहिल्यास पुनरपि त्यास सर्पासारखी भासणें शक्य आहे. सारांश भ्रमाची जरी निवृत्ति झाली तरी त्याचें अनर्थरूपी कार्य तत्काल नष्ट होत नाहीं. ॥ २४८ ॥

आतां हाच प्रकार दार्ष्टान्तिकाचे ठायीं योजून दाखवितात:—

**एवमारब्धभोगोऽपि शनैः शाम्यति नो हठात् ॥**
**भोगकाले कदाचित्तु मर्त्योऽहमिति भासते ॥ ४९ ॥**

**अन्वय:**—एवं आरब्धभोगः अपि शनैः शाम्यति न हठात् । तु कदाचित् भोगकाले अहं मर्त्यः इति भासते ।

**अर्थ:**—ह्याप्रमाणें आरब्धकर्म प्राप्त भोगही हळु हळु नाहींसा होतो, एकदम होत नाहीं. व केव्हां केव्हां भोगसमयीं 'मी मर्त्य आहें' असा भास होतोच.

**विवरण:**—एवं-पूर्व श्लोकांत दिलेल्या दृष्टान्ताप्रमाणें. सारांश; बाधित रज्जुसर्पाची जशी पुनः प्रतीति होते, त्याचप्रमाणें 'मी भोक्ता नाहीं. मी वस्तुतः कूटस्थरूप आहें व त्यामुळेंच असंग आहें.' असा जरी चिदाभासास प्रत्यय आला तरी व्यवहारदशेंत एकादे वेळीं 'मी भोक्ता आहें; मर्त्य आहें;' असा त्यास चुकून भ्रम होतो. एवढ्याकरितांच परमपूज्य वार्तिककारांनीं "ज्ञानानंतर जीवन्मुक्ति तर आहेच. पण द्वैताचा प्रतिभासही नाहींसा होत नाहीं याविषयीं अनुभव हेंच एक प्रबल प्रमाण आहे" असें ह्मटलें आहे. ॥ २४५ ॥

**शंका:**—भोगसमयीं जर एकादे वेळीं तत्त्वाचें विस्मरण होतें असें मानलें, तर त्या विस्मरणसमयीं होत असलेल्या संध्यावंदनादि व मिथ्याभाषणादि पुण्यपापरूप कर्मामुळें पुनरपि संसाराची प्राप्ति होते, असें समजणेंही युक्त होईल व त्यामुळें झालेलें तत्त्वज्ञानही नष्ट होईल. **समाधान:**—

**नैतावताऽपराधेन तत्त्वज्ञानं विनश्यति ॥**
**जीवन्मुक्तिव्रतं नेदं किन्तु वस्तुस्थितिः खलु ॥ ४६ ॥**

अन्वयः—एतावता अपराधेन तत्त्वज्ञानं न विनश्यति । इदं जीवन्मुक्तिव्रतं न । किंतु वस्तुस्थितिः खलु अस्ति ।

**अर्थः—एवढ्याशा अपराधामुळें तत्त्वज्ञान नष्ट होत नाहीं; कारण हें जीवन्मुक्तिव्रत नव्हे; तर खरोखर वस्तुस्थिति आहे. ॥ २४६ ॥**

**विवरणः**—एकादे वेळीं 'मी मर्त्य आहें' असें वाटल्यामुळें तत्त्वज्ञान्याच्या तत्त्वज्ञानाचा बाध होईल असें ह्मणणें युक्त नव्हे. कारण जीवन्मुक्ति हें कांहीं व्रत नव्हे कीं ज्याचें अग्निहोत्राप्रमाणें यावज्जीव अनुष्ठान करण्यासच फळ मिळतें. ॥ २४६ ॥

असो; गेल्या श्लोकांत प्रासंगिक शंकेचें थोडक्यांत निरसन करून आतां पूर्वोक्त भ्रमनाशानंतरही कांहीं काळपर्यंत कार्य रहातें, या अर्थाचें दुसऱ्या एका दृष्टान्तानें स्पष्टीकरण करितात—

**दशमोऽपि शिरस्ताडं रुदन्बुद्ध्वा न रोदिति ॥**
**शिरोव्रणस्तु मासेन शनैः शाम्यति नो तदा ॥ ४७ ॥**

अन्वय—शिरस्ताडं रुदन् दशमः अपि बुद्ध्वा न रोदिति । तु शिरोव्रणः मासेन शनैः शाम्यति तदा नो ।

**अर्थः—मस्तक बडवून रडणारा दहावाही 'मी दहावा आहें' असें समजल्यावर रडत नाहीं. पण मस्तकास पडलेली खोंक हळू हळू महिन्यानें शांत होते. तत्काल नष्ट होत नाहीं. ॥ २४७ ॥**

**विवरणः**—भ्रमाची जरी निवृत्ति झाली तरी त्या भ्रमामुळें झालेली पीडा तत्काळ नाहींशी होत नाहीं. तर तिची निवृत्ति होण्यास योग्य काळाची अपेक्षा असते. लौकिक भ्रमाची काय गोष्ट सांगावी ! शिरोव्रणः—दहावा नदींत बुडून मृत झाला असें निश्चयानें वाटलें असतां तो त्याच्याकरितां जमिनीवर मस्तक आपटतो व त्यामुळें त्याच्या कपाळास खोंक पडते. पुढें पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें आप्तवचनावरून जरी त्याच्या 'दहावा मेला' या भ्रमाची निवृत्ति झाली, तरी त्याबरोबर त्याच्या मस्तकावरील खोंक बरी होत नाहीं, असा या अर्धाचा भावार्थ आहे. ॥ २४७ ॥

ज्ञानाच्या योगानें संसाराची निवृत्ति जर होत नसली, तर त्या ज्ञानाचा उपयोग काय ? या शंकेचें आतां निरसन करितात–

**दशमामृतिलाभेन जातो हर्षो व्रणव्यथाम् ॥**
**तिरोधत्ते मुक्तिलाभस्तथा प्रारब्धदुःखिताम् ॥ ४८ ॥**

अन्वयः—दशमामृतिलाभेन जातः हर्षः व्रणव्यथां यथा तिरोधत्ते तथा मुक्तिलाभः प्रारब्धदुःखितां तिरोधत्ते ।

अर्थः—दाहावा मेला नाहीं असें समजल्यामुळें उत्पन्न झालेला हर्ष व्रणापासून होणाऱ्या पीडेस जसा झांकून टाकितो, त्याप्रमाणें मुक्तीमुळें प्राप्त होणारा लाभ प्रारब्धदुःखास आच्छादित करितो. ॥ २४८ ॥

विवरणः—हर्ष दुःखास व दुःख हर्षास हटवीत असतें. दहावा जीवंत आहे असें समजतांच त्याच्या विषयींचें दुःख नष्ट होतें व मस्तकावरील व्रणाचें दुःखही मागें पडतें. हा दृष्टांत होय. व याप्रमाणेंच जीवन्मुक्तीचा लाभ झाला असतां त्या आनंदापुढें प्रायः प्रारब्धप्राप्त दुःखाचा भासही होत नाहीं. ॥ २४८ ॥

'जीवन्मुक्ति हें कांहीं व्रत नव्हे' असें पूर्वीं (श्लोकाच्या उत्तरार्धात) सांगितलें आहे. व त्यावरून जीवन्मुक्तीचा सतत अभ्यास करावयास नको असें ठरतें. तेव्हां जीवन्मुक्तीपासून होणाऱ्या आनंदाचा तरी सतत लाभ कसा होणार ? या शंकेचें आतां निरसन करितातः—

**व्रताभावाद्यदाऽभ्यासस्तदा भूयो विविच्यताम् ॥**
**रससेवी दिने भुंक्ते भूयो भूयो यथा तथा ॥ ४९ ॥**

अन्वयः—यथा रससेवी दिने भूयः भूयः भुंक्ते तथा व्रताभावात् यदा अभ्यासः तदा भूयः विविच्यताम् ।

अर्थः—ज्याप्रमाणें रस सेवन करणारा मनुष्य एकाच दिवशीं वारंवार भोजन करितो, त्याप्रमाणें व्रत नसतांनाही जेव्हां अभ्यास होतो, तेव्हां पुनः विवेक करावा. ॥ १४९ ॥

विवरणः—भोजनापासून काय लाभ होतो हें त्याला ठाऊक आहे, असा तृप्तीचा अनुभव घेणारा मनुष्य क्षुधा लागतांच भोजन करितो. अमुक वेळीं खाल्ल्यानेंच मग भूक असो कीं नसो, असें तो ह्मणत नाहीं. हें जसें, त्याप्रमाणेंच जीवन्मुक्ति हें जरी व्रत नव्हे, ह्मणजे अग्निहोत्राप्रमाणें किंवा एकादशीप्रमाणें त्या त्या कालीं झालेंच पाहिजे न झाल्यास कर्ता प्रत्यवायी होतो—असें जरी नाहीं, तरी ज्या ज्या वेळीं अध्यास होतो, त्या त्या वेळीं त्यानें त्याच्या निवृत्त्यर्थ विवेक करावा. सारांश; जीवन्मुक्तीपासून होणाऱ्या आनंदाचा जेव्हां जेव्हां बाध होईल, तेव्हां तेव्हां चिदाभास, तीन शरीरें व कूटस्थ यांचा विवेक करावा. असें केल्यानें आनंदाचा भंग होईल ही भीति राहात नाहीं. ॥ २४९ ॥

आतां आत्मसाक्षात्कारानेंही नष्ट होणाऱ्या प्रारब्धाचा क्षय कसा होतो तें सांगतात—

**शमयत्यौषधेनायं दशमः स्वं व्रणं यथा ॥**

**भोगेन शमयित्वैतत्प्रारब्धं मुच्यते तथा ॥ २५० ॥**

**अन्वयः**—यथा अयं दशमः स्वं व्रणं औषधेन शमयति तथा भोगेन एतत् प्रारब्धं शमयित्वा मुच्यते ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें हा दहावा आपला व्रण औषधाच्या योगानें बरा करून सोडितो, त्याप्रमाणें भोगाच्या योगानें हें प्रारब्ध क्षीण करवून त्यापासून साधक मुक्त होतो. ॥ २५० ॥

**विवरणः**—मस्तक बडवून घेतल्यामुळें पडलेली खोंक औषधोपचारानें जशी बरी होते, त्याप्रमाणें भोगाच्या योगानें प्रारब्धकर्माचा क्षय करून साधक जन्ममरणपरंपरेंतून मुक्त होतो. ॥ २५० ॥

असो; ह्याप्रमाणें सिद्ध केलेल्या शास्त्रार्थाची पूर्वोक्त श्रुतीशीं एकवाक्यता कशी होते, तें दाखवून उपसंहार करितात—

**किमिच्छन्निति वाक्योक्तः शोकमोक्ष उदीरितः ॥**

**आभासस्य ह्यवस्थैषा षष्ठी तृप्तिस्तु सप्तमी ॥ ५१ ॥**

**अन्वयः**—किमिच्छिन् इति वाक्योक्तः शोकमोक्षः उदीरितः । एषा हि आभासस्य षष्ठी अवस्था । तृप्तिः तु सप्तमी ।

**अर्थः**—'कशाची इच्छा करून' या वाक्यामध्यें सांगितलेला शोकमोक्ष एवढा वेळ सांगितला. ही आभासाची सहावी अवस्था होय व तृप्तीही सातवी. ॥ २५१ ॥

**विवरणः**—ह्या प्रकरणाच्या अठ्ठाविसाव्या श्लोकांत आत्म्याच्या ठिकाणीं कोणत्या अवस्था होतात तें दाखविलें आहे. त्यांतील शोकमोक्षनामक जी सहावी अवस्था तिचें प्रतिपादन "किमिच्छन्" इत्यादि श्रुतीच्या उत्तरार्धांत केलें आहे. एकशें छत्तिसाव्या श्लोकापासून येथपर्यंत त्याच अवस्थेचें स्पष्टीकरण या ग्रंथांत केलें आहे, आणि आतां यापुढें चिदाभासाची सातवी अवस्था जी तृप्ति, तिचें व्याख्यान प्रस्तुत प्रकरणाच्या समाप्तीपर्यंत व्हावयाचें आहे. ॥ २५१ ॥

पण ही तृप्ति विषयांपासून होणाऱ्या तृप्तीप्रमाणें प्रतिबंध युक्त आहे, कीं तिच्याहून विलक्षण आहे? अशा अवश्य होणाऱ्या शंकेचें समाधान प्रथम करितात—

**सांकुशा विषयैस्तृप्तिरियं तृप्तिर्निरंकुशा ॥**
**कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव तृप्यति ॥ ५२ ॥**

**अन्वयः**—विषयैः तृप्तिः सांकुशा च इयं तृप्तिः निरंकुशा अस्ति । यतः कृत्यं कृतं, प्रापणीयं प्राप्तं इति एव तृप्यति ।

**अर्थः**—विषयांच्या योगानें होणारी तृप्ति प्रतिबंधयुक्त असते व ही तृप्ति निरंकुश आहे. कारण जें करावयाचें होतें, तें केलें, व जें प्राप्त करून घेण्यासारखें होतें, तें प्राप्त करून घेतलें, असें ह्मणून तो तृप्त होतो. ॥ २५२ ॥

**विवरणः**—जोंपर्यंत कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें असतें किंवा कर्तव्य असतें तोंपर्यंत मनुष्याच्या चित्तास समाधान होणें शक्य नाहीं. पण विवेकजन्य साक्षात्कारानंतर जी तृप्ति होते ती कर्तव्यादिकांचा सर्वथैव अभाव झाल्यानंतर होत असल्यामुळें प्रतिबंधरहित असते. विषयांपासून जी क्षणिक तृप्ति होते, ती एका विषयाचा भोग संपतांच दुसऱ्याविषयीं उत्पन्न होणाऱ्या कामनेच्या योगानें कुंठित होत असल्यामुळें प्रतिबंधयुक्त किंवा सांकुश असते. ॥ २५२ ॥

आतां ज्ञानापूर्वी कृत्य कोणतें असतें व ज्ञानानंतर त्याची अवस्था काय होते, तें सांगतात—

**ऐहिकामुष्मिकव्रातसिद्ध्यै मुक्तेश्च सिद्धये ॥**
**बहु कृत्यं पुराऽस्याभूत्तत्सर्वमधुना कृतम् ॥ ५३ ॥**

**अन्वयः**—ऐहिकामुष्मिकव्रतसिद्ध्यै च मुक्तेः सिद्धये अस्य पुरा बहु कृत्यं अभूत् । तत् सर्वं अधुना कृतम् ।

**अर्थः—ऐहिक व पारलौकिक सिद्धीकरितां आणि मुक्तीच्या सिद्ध्यर्थ याला पूर्वी पुष्कळ कर्तव्य होतें. पण आतां तें सर्व संपूर्ण झालें आहे. २५३**

**विवरणः**—तत्त्वज्ञानापूर्वी विद्वानास धनधान्यादि इष्ट वस्तूंच्या प्राप्त्यर्थ व रोगादि अनिष्ट वस्तूंच्या निवृत्त्यर्थ, शेतकी, व्यापार, सेवा इत्यादि कर्तव्य होतें; स्वर्गादि उत्तम लोकांची प्राप्ति व्हावी ह्मणून यज्ञ, उपासना इत्यादि कर्तव्य होतें; व मोक्ष-साधन जें ज्ञान त्याच्या सिद्धीकरितां श्रवणादि कर्तव्य होतें; पण ज्ञान झाल्यावर सांसारिक फलाची इच्छाच नष्ट झाल्यामुळें व ब्रह्मानंदाची प्राप्ति झाल्यामुळें तें सर्व कर्तव्य केल्याप्रमाणेंच झालें. सारांश, आत्मसाक्षात्कारानंतर ज्ञानी कृतकृत्य होत असतो. ॥ २५३ ॥

ह्याप्रमाणें कृतकृत्यतेचें प्रतिपादन करून आतां तिचें अनुसंधान केल्यानें तृप्ति होते, असें सांगतातः—

**तदेतत्कृतकृत्यत्वं प्रतियोगिपुरःसरम् ॥**
**अनुसंदधदेवायमेवं तृप्यति नित्यशः ॥ ५४ ॥**

**अन्वयः**—तत् एतत् प्रतियोगिपुरःसरं कृतकृत्यत्वं अनुसंदधत् एव अयं एवं नित्यशः तृप्यति ।

**अर्थः—त्या ह्या कृतकृत्यतेचें, तिच्या विरोधी भावनेसह अनुसंधान करणारा असा हा, अशा प्रकारेंच नित्य तृप्त होतो. ॥ २५४ ॥**

**विवरणः**—ज्या कृतकृत्यतेचा गेल्या दोन श्लोकांत उल्लेख केला आहे, तिचें सतत अनुसंधान करणारा पुरुष सर्वदा तृप्त राहातो. पण केवळ कृतकृत्यतेचें अनुसंधान करण्यापेक्षां तिच्या विरोधी जें जें असेल, त्याचें त्याचें प्रथम चिंतन करून

नंतर या कृतकृत्यतेचें अनुसंधान केल्यास निश्चल तृप्ति प्राप्त होते. अनुसंधान कसें करावें इत्यादि प्रकार मूळ ग्रंथांतच स्पष्ट होणारा असल्यामुळें त्याचा येथें विस्तार करण्याची गरज नाहीं. ॥ २५४ ॥

आतां पूर्वोक्त अनुसंधान कसें करावें तें सांगतात:—

**दुःखिनोऽज्ञाः संसरंतु कामं पुत्राद्यपेक्षया ॥**
**परमानंदपूर्णोऽहं संसारामि किमिच्छया ॥ ५५ ॥**

**अन्वय:**—अज्ञाः पुत्राद्यपेक्षया दुःखिनः कामं संसरन्तु। परमानन्दपूर्णः अहं किमिच्छया संसरामि।

**अर्थ:**—पुत्रादिकांच्या अपेक्षेनें दुःखी होत्साते अज्ञ पुरुष खुशाल संसारांत पडोत. परमानन्दरूप व पूर्ण असा मी कोणत्या इच्छेमुळें संसारांत पडूं ?

**विवरण:**—जे विवेकहीन असतात त्यांस विषयांची प्राप्ति न झाल्यास फार दुःख होतें. विवाह करूनही पुत्र न झाल्यास सामान्य मनुष्य मनांत किती झुरत असतो, हें अशा एकाद्या अभाग्याकडे पाहूनच समजण्यासारखें आहे. दशरथ पुत्राकरितां किती कष्टी होत असे हें रामायण ज्यांनीं वाचलें असेल त्यांस ठाऊकच असेल. प्रसिद्ध बाणभट्टांच्या कादंबरींतही चंद्रापीडाच्या पित्याची व मातेची पुत्राकरितां काय अवस्था झाली होती हें चांगलें दाखविलेलें आहे. तात्पर्य, पुत्र नसणें हें एक मोठें अभाग्याचें लक्षण आहे, असें व्यावहारिक मानीत असतात. व तें एका दृष्टीनें खरेंही आहे. त्यामुळें त्यांना पुत्रकामेष्टीसारखीं कर्में व नवसमानस करावीं लागतात आणि या जन्मीं तीं सफल न झाल्यास उत्तर जन्म घ्यावा लागतो. त्यांतही त्यांच्या पोषणादिकांकरितां अनेक बरीं वाईट कर्में करावीं लागतात. पुढें त्यांचीं फळें भोगण्याकरितां पुनः जन्म मिळतो. व अशी अव्याहत परंपरा चालते. पण ज्याला स्वरूपाची प्राप्ति झालेली असते, तो कशाचीही अपेक्षा करीत नाहीं. तर उलट 'मी परमानंदरूप व परिपूर्ण असल्यामुळें मला कशाची इच्छा असणार ? व इच्छाच नसल्यामुळें मी जन्ममरणपरंपरेंत तरी कशासाठीं पडूं ?' असा तो विचार करितो !

तसेंच—

**अनुतिष्ठन्तु कर्माणि परलोकयियासवः ॥**
**सर्वलोकात्मकः कस्मादनुतिष्ठामि किं कथम् ॥ ५६ ॥**

अन्वयः—परलोकयियासवः कर्माणि अनुतिष्ठन्तु । सर्वलोकात्मकः अहं किं कथं कस्मात् अनुतिष्ठामि ।

अर्थः—ज्यांना परलोकीं जाण्याची इच्छा असेल त्यांनीं कर्मांचें खुशाल अनुष्ठान करावें. पण सर्व लोकरूपच असा मी कशाचें, कसें व कशाकरितां अनुष्ठान करूं ? ॥ २५६ ॥

विवरणः—ज्यांना स्वर्गादि उत्तम लोक हवे असतील त्यांनीं अग्निहोत्र, दर्श-पूर्णमास, चातुर्मास्य, ज्योतिष्टोम, इत्यादि यज्ञ, जप, तप इत्यादि खुशाल करावे. मला त्यांची मुळींच गरज नाहीं, कारण मी स्वतः सर्व लोकमय आहें व त्यामुळें मला कर्म करून लोकप्राप्ति करून घ्यावयाची इच्छा नाहीं. ज्याला जी वस्तु प्राप्त झालेली नसते, तिच्या प्राप्तीचीच तो इच्छा करीत असतो. ॥ २५६ ॥

व्याचक्षतां ते शास्त्राणि वेदानध्यापयंतु वा ॥
येऽत्राधिकारिणो मे तु नाधिकारोऽक्रियत्वतः ॥ ५७ ॥

अन्वयः—ये अत्र अधिकारिणः सन्ति ते शास्त्राणि व्याचक्षतां वा वेदान् अध्या-पयन्तु । मे तु अक्रियत्वतः अधिकारः न अस्ति ।

अर्थः—जे त्याविषयीं अधिकारी असतील त्यांनीं शास्त्रांचें व्याख्यान करावें, किंवा वेदांचें अध्यापन करावें. मी अक्रिय असल्यामुळें माझा त्यांत अधिकार नाहीं. ॥ २५७ ॥

विवरणः—ज्ञानी विधिनिषेधातीत असल्यामुळें त्याचा व्याख्यान, अध्यापन इत्यादि कर्मांमध्येंही अधिकार असतो. यास्तव ज्याचा त्याविषयीं अधिकार असेल त्यानीं तें खुशाल करावें. मी मात्र त्या भानगडींत पडणार नाहीं. ॥ २५७ ॥

आतां—तूं जर कांहींच करावयाचें नाहीं झणून झणूं लागलास, तर तुझा देह राहणार कसा ? अन्न तर खावयास पाहिजे ! व तें कसें तरी मिळणेंही अवश्य आहे. त्याकरितां भिक्षा मागेन झणून जर झणशील तर ती क्रिया नव्हे का ? इत्यादि प्रकारें कोणी विचारल्यास त्याविषयीं कोणास प्रत्युत्तर न देतां आपणाशींच विचार कसा करावा, तें दाखवितात—

**निद्राभिक्षे स्नानशौचे नेच्छामि न करोमि च ॥**
**द्रष्टारश्चेत्कल्पयंति किं मे स्यादन्यकल्पनात् ॥ ५८ ॥**

अन्वयः---निद्राभिक्षे स्नानशौचे अहं न इच्छामि च न करोमि द्रष्टारः कल्पयंति चेत् अन्यकल्पनात् मे किं स्यात् ।

**अर्थः—निद्रा, भिक्षा, स्नान, शौच इत्यादिकांची मी इच्छा करीत नाहीं. आतां मजकडे पाहणारे जर मजवर त्यांचा आरोप करीत असले, तर ते करीनात. दुसऱ्यांच्या आरोपानें माझी काय हानि होणार आहे ? ॥ २५८ ॥**

विवरणः---आपल्याविषयीं कोणी वाईट बोलत असल्यास किंवा शंका घेत असल्यास त्यांस उत्तर देत बसूं नये. मात्र आपल्या मनाशीं आपल्या निर्दोषीपणाविषयीं निर्णय करून ठेवावा. सत्याचें मोठें पाठबळ असतें. कोणी एकाद्यावर भलताच आरोप करीत असला व तो खरोखर दोषी नसला, तर तो मोठ्या धैर्यानें--माझ्या हातून हा अपराध झालेला नाहीं. तुला मजवर आरोप करावयाचाच असला तर तर तो खुशाल कर--असें ह्मणेल. हें जसें, त्याचप्रमाणें--केवळ भिक्षाटणचसें काय पण निद्रा, स्नान, मूत्रपुरीषोत्सर्गसमयीं करावें लागणारें शौच, इत्यादि देह असेपर्यंत अवश्य घडणारीं कर्मेंही करण्याची मी इच्छा करीत नाहीं. व असंग असल्यामुळें तीं मी करीत नाहीं. आतां माझ्या देहाकडे पाहून ज्यांना मजवर त्यांचा आरोपच करावयाचा असेल, त्यांनीं तो खुशाल करावा. असें ह्मणून विवेक्यानें शांत होऊन बसावें. ज्याला खरोखरीच आत्मानात्मविवेक झाला असेल त्याचाच असा दृढ निश्चय होणार, हें उघड आहे. नाहींपेक्षां चोरी केलेली असूनही 'मी चोरी केली नाहीं.' असें ह्मणणाऱ्या ठगाच्या हृदयाप्रमाणें, विवेकहीन असूनही पूर्वोक्त शब्द उच्चारणाऱ्याचें हृदय आंतल्या आंत थरथर कांपत रहाणार हें ठरलेंच आहे. कलियुगांत असल्या वेदान्त्यांस ऊत येईल असें आमच्या सर्वज्ञ मुनींनीं पूर्वीच भविष्य करून ठेविलें आहे. ॥ २५८ ॥

दुसऱ्यांनीं जरी कसाही आरोप केला, तरी त्यापासून शुद्ध पुरुषाची कांहीं हानि होत नाहीं; असें जें पूर्व श्लोकांत सांगितलें आहे. तेंच आतां दृष्टान्तानें कसें स्पष्ट करावें तें सांगतात:—

गुंजापुंजादि दह्येत नान्यारोपितवह्निना ॥
नान्यारोपितसंसारधर्मानेवमहं भजे ॥ ५९ ॥

अन्वयः—यथा अन्यारोपितवह्निना गुंजापुंजादि न दह्येत एवं अन्यारोपितं संसारधर्मान् अहं न भजे।

अर्थः—ज्याप्रमाणें दुसऱ्यांनीं आरोपित केलेल्या अग्नीच्या योगानें गुंजांचा ढीग कोणास जाळीत नाहीं, त्याप्रमाणें दुसऱ्यांनीं आरोपित केलेल्या संसारधर्मांचें मी सेवन करीत नाहीं. ॥ २५९ ॥

विवरणः— एकाद्या घरावर दुरून गुंजांचा ढीग पाहून हा अग्नि आहे असें जरी कोणी म्हटलें, तरी तो जसा त्या घरास जाळीत नाहीं, त्याप्रमाणें दुसऱ्यांनीं 'मी कर्मी आहें' असें जरी मला म्हटलें, तरी माझ्या दृष्टीनें स्नान, भिक्षा, निद्रा इत्यादि कर्मेंच नसल्यामुळें ती मला बद्ध करूं शकत नाहींत. ॥ २५९ ॥

शंकाः—अरे पण भल्या गृहस्था, तूं ज्ञानाच्या श्रवणादि अंतरंग साधनांचा तरी यावज्जीव अंगीकार करणार कीं नाहीं ? अंगीकार केलास, तर तूं त्यांचा कर्ता आहेस, असें लोक समजतील व न केलास तर तुझें ज्ञान बाधित होईल ! या शंकेचें उत्तर कसें द्यावें, तें ग्रंथकार सांगतातः—

शृण्वंत्वज्ञाततत्त्वास्ते जानन्कस्माच्छृणोम्यहम् ॥
मन्यंतां संशयापन्ना न मन्येऽहमसंशयः ॥ २६० ॥

अन्वयः—ये अज्ञाततत्त्वाः ते शृण्वन्तु अहं तु जानन् सन् कस्मात् शृणोमि। संशयापन्नाः मन्यन्तां। अहं असंशयः न मन्ये।

अर्थः—ज्यांना तत्त्व समजलेलें नाहीं ते श्रवण करोत. मी तर ज्ञानी आहें, तेव्हां कशाकरितां श्रवण करूं ? ज्यांना संशय असेल ते खुशाल मनन करोत. मी संशयरहित असल्यामुळें मनन करीत नाहीं. ॥ २६० ॥

विवरणः—गुरु व शास्त्र यांच्या वचनावर ज्यांची श्रद्धा नसते व त्यामुळें ज्यांना अनेक संशय असतात, त्यांच्याकरितां मननाचें विधान केलेलें असतें. पण मला मुळीं संशयच नसल्यामुळें त्याचा कांहीं उपयोग नाहीं. व म्हणून मी एकांतांत बसून यथाविधि मनन करीत नाहीं. त्याचप्रमाणें आत्मतत्त्वाचा साक्षात्कार झाल्यामुळें

मला श्रवणाचाही कांहीं उपयोग नाहीं. श्रवण हें मननापूर्वी करावयाचें असतें व अज्ञांकरितां त्याचें विधान केलेलें आहे. ॥ २६० ॥

विपर्यस्तो निदिध्यासेत्किं ध्यानमविपर्ययात् ॥
देहात्मत्वविपर्यासं न कदाचिद्भजाम्यहम् ॥ ६१ ॥

अन्वयः—विपर्यस्तः निदिध्यासेत् । अविपर्ययात् ध्यानं किम् ? अहं देहात्मत्व-विपर्यासं न कदाचित् भजामि ।

अर्थः—ज्याची विपरीत भावना झाली असेल, त्यानें निदिध्यासन करावें. पण ज्याची विपरीत भावनाच झालेली नसते, त्यास ध्यानाचा काय उपयोग होणार ? मी देह हाच आत्मा आहे अशी विपरीत भावना कधींच होऊं देत नाहीं. ॥ २६१ ॥

विवरणः—ज्याची विपरीत भावना झालेली असते त्यालाच निदिध्यासनाचा उपयोग होतो. ' देह आत्मा आहे ' हीच मुख्य विपरीत भावना असून तिच्यामुळें प्राण्यास संसारांत पडावें लागतें, हें शास्त्राशीं ज्यांचा परिचय असतो, त्यांस ठाऊक असतेंच. पण माझ्या मनांत अशी विपरीत भावना नसल्यामुळें मला त्याचा कांहीं एक उपयोग नाहीं. निदिध्यासन म्हणजे तत्त्वाचें सतत चिंतन होय. ॥ २६१ ॥

प्रश्नः—अहो पण विपरीत भावनेवांचून ' मी मनुष्य आहें ' ' हा घट आहे ' इत्यादि व्यवहार कसा होणार ? व तोच न झाल्यास जगांत वसति कशी होईल ? उत्तरः—

अहं मनुष्य इत्यादिव्यवहारो विनाऽप्यमुम् ॥
विपर्यासं चिराभ्यस्तवासनातोऽवकल्पते ॥ ६२ ॥

अन्वयः— अहं मनुष्यः इत्यादि-व्यवहारः अमुं विपर्यासं विना अपि चिराभ्यस्त-वासनातः अवकल्पते ।

अर्थः—' मी मनुष्य आहें ' इत्यादि प्रकारचा व्यवहार या विपर्यासा-वांचूनही दीर्घकाल जिचा अभ्यास झाला आहे, अशा वासनेच्या योगानें उत्पन्न होतो. ॥ २६२ ॥

विवरणः—मी मनुष्य आहें इत्यादि व्यवहारास विपरीत भावनाच पाहिजे असें नाहीं. कारण मागचे अनेक जन्म व प्रस्तुत जन्मभर ही संचय झालेली अस-ल्यामुळें बाधितानुवृत्तीनें ' मी मनुष्य आहें ' इत्यादि प्रकारें सामान्य व्यवहार होऊं शकतो. ॥ २६२ ॥

प्रश्नः—तर मग या व्यवहाराची निवृत्ति कधीं होते ? उत्तरः—

प्रारब्धकर्मणि क्षीणे व्यवहारो निवर्तते ॥
कर्माक्षये त्वसौ नैव शाम्येद्ध्यानसहस्रतः ॥ ६३ ॥

अन्वयः—प्रारब्धकर्मणि क्षीणे सति व्यवहारः निवर्तते । कर्माक्षये तु असौ ध्यान-सहस्रतः न शाम्येत् एव ।

अर्थः—प्रारब्धकर्म क्षीण झालें असतां ( असला ) व्यवहार ( आपोआप ) निवृत्त होतो. पण कर्मक्षय न झाल्यास हा हजारों वेळां ध्यान केल्यानेंही नाहींसा होत नाहीं. ॥ २६३ ॥

विवरणः—भोग भोगिल्यामुळें प्रारब्ध कर्म निःशेष नष्ट झालें असतां सर्व प्रकारचा व्यवहार सहजच निवृत्त होत असतो असें पूर्वींही सांगितलेंच आहे. भोगा-वांचून प्रारब्धकर्माचा क्षय होत नाहीं, असा मीमांसेचाही सिद्धांत आहे. कर्माचा क्षय झाल्यावांचून कितीही जरी ध्यान केलें, तरी तें निरुपयोगी ठरतें. ॥ २६३ ॥

आतां व्यवहार विरळ होण्याकरितां ध्यान करणें योग्य आहे, असें जर कोणी ह्मणूं लागलें, तर तें तुझ्या जरी उपयोगी असलें तरी माझ्या निरुपयोगी आहे असें त्यास सांगावें असें सांगतातः—

विरलत्वं व्यवहृतेरिष्टं चेद्ध्यानमस्तु ते ॥
अबाधिकां व्यवहृतिं पश्यन् ध्यायाम्यहं कुतः ॥ ६४ ॥

अन्वयः—व्यवहृतेः विरलत्वं इष्टं चेत् ते ध्यानं अस्तु । अबाधिकां व्यवहृतिं पश्यन् अहं कुतः ध्यायामि ।

अर्थः—व्यवहार थोडा तरी कमी व्हावा हें इष्ट आहे, असें जर ह्मणशील तर तूं त्याकरितां ध्यान कर. पण व्यवहार बाधरहित आहे असें पहाणारा मी कशाकरितां ध्यान करूं ? ॥ २६४ ॥

विवरण:—व्यवहाराचा वेग कमी भासावा ह्मणूनच जर ध्यान करावयाचें असलें तर खुशाल करावें, पण प्रारब्धकर्म अनुल्लंघनीय आहे असा माझा दृढ निश्चय असल्यामुळें मला व्यवहाराचा वेग कमी होईल ही आशाच नाहीं. या व याच्या पूर्वीच्याही कांहीं कांहीं श्लोकांत केवळ द्वैतवादाचा भास होण्यासारखा आहे. यास्तव हा वाद सामान्य लोकांकरितां नसून तितक्या योग्यतेच्या व दृढ निश्चयी साधकांकरितां आहे, एवढें येथें सांगून ठेवणें अवश्य दिसतें. ॥ २६४ ॥

आतां ध्यानाची जरी आवश्यकता नसली, तरी विक्षेपाचा परिहार करण्यास्तव समाधि तरी लावावी लागेल. असें कोणी ह्मणेल ह्मणून अशा पुरुषाला समाधीचीही आवश्यकता नाहीं, असें सकारण दाखवितात—

विक्षेपो नास्ति यस्मान्मे न समाधिस्ततो मम ॥
विक्षेपो वा समाधिर्वा मनसः स्याद्विकारिणः ॥ ६५ ॥

अन्वय:—यस्मात् मे विक्षेपः नास्ति ततः मे समाधिः न (युक्तः) विक्षेपः वा समाधिः वा विकारिणः मनसः स्यात् ।

अर्थ:—ज्या अर्थी मला विक्षेप नाहीं, त्या अर्थी मला समाधीचीही आवश्यकता नाहीं. विक्षेप किंवा समाधि विकारी मनास होते. ॥ ६५ ॥

विवरण:—विक्षेपाच्या नाशाकरितांच समाधि हवी असते हें उघड आहे. पण मला विक्षेपच नसल्यामुळें तिची जरूर नाहीं. विक्षेप व समाधि या तरी अवस्थाच असल्यामुळें त्या विकारी मनाला होणेंच युक्त आहे. मज निर्विकाऱ्यांशीं त्यांचा संबंध होणें त्रिकालींही शक्य नाहीं. ॥ २६५ ॥

अहो, पण अनुभवाची तरी तुह्मांला जरूर आहे किंवा नाहीं ? असें पुनः वादी विचारील ह्मणून ह्मणतात—

नित्यानुभवरूपस्य को मे वाऽनुभवः पृथक् ॥
कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव निश्चयः ॥ ६६ ॥

अन्वय:—नित्यानुभवरूपस्य मे कः पृथक् अनुभवः । कृत्यं कृतं प्रापणीयं प्राप्तं इति एव निश्चयः अस्ति ।

अर्थः—नित्य अनुभवरूप अशा मला दुसरा कोणता अनुभव लागणार ! करण्यास जें योग्य होतें तें सर्व केलें व प्राप्त करून घेण्यासारखें जेवढें होतें तेवढें प्राप्तही करून घेतलें, असाच माझा निश्चय आहे. ॥ २६६ ॥

विवरणः—कूटस्थ स्वतः अनुभवरूप आहे इत्यादि प्रकार प्रथम भागांतील तिसऱ्या प्रकरणाच्या तेराव्या श्लोकांतही स्पष्ट होऊन गेला आहे. सूर्यादि प्रकाशरूप पदार्थांस जशी अन्य पदार्थांची गरज नसते, त्याप्रमाणें अनुभवरूप आत्म्यास अन्य अनुभवाची गरज नसते. ज्ञानाचा निश्चय कसा असतो, हें येथल्याप्रमाणें पूर्वी दोनशें बावन्नाव्या श्लोकांतही सांगितलें आहे. ॥ २६६ ॥

असें जर आहे, तर ज्ञान्याचा व्यवहार कसा होणार ? असा कोणी प्रश्न केल्यास त्याचें उत्तर कसें द्यावें तें सांगतात.—

**व्यवहारो लौकिको वा शास्त्रीयो वाऽन्यथाऽपि वा ॥**
**ममाकर्तुरलेपस्य यथाऽरब्धं प्रवर्तताम् ॥ ६७ ॥**

अन्वयः—मम अकर्तुः अलेपस्य लौकिकः वा शास्त्रीयः वा अन्यथा अपि वा व्यवहारः यथा प्रारब्धं प्रवर्तताम् ।

अर्थः—अकर्ता व निर्लेप असा जो मी त्या माझा लौकिक किंवा शास्त्रीय किंवा प्रतिषिद्ध व्यवहार प्रारब्धानुरूप खुशाल होऊं दे. ॥ २६७ ॥

विवरणः—मी परमार्थतः असंग असल्यामुळें अकर्ता आहें, व आकाशाप्रमाणें निरवयव असल्यामुळें मला कोणत्याही प्रकारचा लेप लागत नाहीं. खरा प्रकार हा असा असल्यामुळें प्रारब्धकर्मानुरूप निद्रा, भिक्षा इत्यादि लौकिक व ध्यान, जप इत्यादि शास्त्रीय आणि हिंसादि प्रतिषिद्ध व्यवहार जरी माझ्या देहाकडून होत आहे असें वाटलें, तरी त्यापासून माझी कांहीं हानि नाहीं. ॥ २६७ ॥

ह्याप्रमाणें वस्तुतत्त्व सांगून आतां भगवद्गीतेंतील भगवानांच्या उपदेशाप्रमाणें प्रौढ वादाचा अंगीकार करून पूर्वीच्या शंकेचें निरसन करावें, असें सुचवितात.—

**अथ वा कृतकृत्योऽपि लोकानुग्रहकाम्यया ॥**
**शास्त्रीयेणैव मार्गेण वर्तेऽहं का मम क्षतिः ॥ ६८ ॥**

**अन्वयः**—अथ वा अहं कृतकृत्यः अपि लोकानुग्रहकाम्यया शास्त्रीयेण एव मार्गेण वर्ते तथा च मम का क्षतिः ।

**अर्थः**—किंवा मी जरी कृतकृत्य आहें, तरी लोकांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें शास्त्रीय मार्गानेंच जात आहें, तेव्हां माझी काय हानि होणार आहे?

**विवरणः**—भगवद्गीतेच्या तिसऱ्या अध्यायाच्या पंचविसाव्या श्लोकांत "हे अर्जुना, ज्याप्रमाणें अविद्वान् ( कर्मामध्यें ) आसक्त होऊन कर्मे करितात, त्याचप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या विद्वानानें आसक्त न होतां कर्में करावीं." असें श्रीकृष्णांनीं सांगितलें आहे. लोकसंग्रह ह्मणजे शास्त्रीय मार्गास सोडून आचरण करणाऱ्या लोकांचें निवारण. असो; स्वतः भगवानांचें असें वचन असल्यामुळें जरी मी कृतकृत्य आहें, तरी लोकोपकारार्थ केवल शास्त्रीय मार्गाचेंच अवलंबन करीत असतों व त्यामुळें मला कशाचीही भीति नाहीं. ॥ २६८ ॥

आतां या पुढच्या दोन श्लोकांत ज्ञान्याचा शास्त्रीय मार्ग कसा असतो तें दाखवून तो स्वतः 'मी असंग आहें' असें सतत अनुसंधान कसें ठेवितो, तें व्यक्त करितात—

देवार्चनस्नानशौचभिक्षादौ वर्ततां वपुः ॥
तारं जपतु वाक् तद्वत्पठत्वाम्नायमस्तकम् ॥ ६९ ॥
विष्णुं ध्यायतु धीर्यद्वा ब्रह्मानंदे विलीयताम् ॥
साक्ष्यहं किंचिदप्यत्र न कुर्वे नापि कारये ॥ २७० ॥

**अन्वयः**—वपुः देवार्चनस्नानशौचभिक्षादौ वर्ततां । तद्वत् वाक् तारं जपतु वा आम्नायमस्तकं पठतु । यत् वा धीः विष्णुं ध्यायतु वा ब्रह्मानन्दे विलीयताम् । अत्र अहं साक्षी किंचित् अपि न कुर्वे न कारये अपि ।

**अर्थः**—देवपूजा, स्नान, शौच, भिक्षा इत्यादि कर्मामध्यें शरीर गढून जावो, कीं वाणी प्रणवाचा जप करो किंवा वेदान्ताचें पठण करो, अथवा बुद्धि विष्णूचें ध्यान करो कीं ब्रह्मानन्दांत निमग्न होवो. मी साक्षी यां पैकीं कांहीं करीत नाहीं व करवीतही नाहीं. ॥ २६९,२७० ॥

**विवरणः**—देवतार्चनादि शारीरिक कर्में शरीराकडून खुशाल घडोत; उपांशु जप व पठण वाणी वेळानुक करो; व बुद्धि ध्यान करो कीं समाधींत लीन होवो, त्यांच्या

कर्मांशीं व स्थितीशीं माझा कांहीं एक संबंध नाहीं. मी कूटस्थ, केवल, साक्षी आहे. या दोन्ही श्लोकांत–कायिक, वाचिक व मानसिक कर्में शरीर, वाणी व मन यांच्या द्वारा होत असल्यामुळें तीं जरी शास्त्रीय असलीं तरी त्यांच्या ठायीं कर्तृभाव ठेवणें मला योग्य नाहीं–असें मनांत बाळगून विद्वान् पुरुष लोकसंग्रहार्थ व्यवहार करितो–असें स्पष्टपणें सांगितलें आहे. ॥ २६९,२७० ॥

तात्पर्यः—

एवं च कलहः कुत्र संभवेत्कर्मिणो मम ॥
विभिन्नविषयत्वेन पूर्वापरसमुद्रवत् ॥ ७१ ॥

अन्वयः—एवं पूर्वापरसमुद्रवत् विभिन्नविषयत्वेन कर्मिणः मम च कलहः कुत्र संभवेत् ।

अर्थः—ह्याप्रमाणें पूर्व व पश्चिम समुद्राप्रमाणें (प्रत्येकाचा) अति भिन्न विषय असल्यामुळें कर्मी पुरुषाचा व माझा कलह कोठून संभवणार? २७१

विवरणः—पूर्वोक्त रीतीनें विचार केला असतां कर्मठ पुरुष व ज्ञानी यांचा कलह होणें अशक्यच होतें. कारण त्यांतील प्रत्येकांचा विषय अति भिन्न असल्यामुळें गंगा व कृष्णा यांचा जसा समागम होणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें त्या उभयतांचा कलह होणेंही शक्य नाहीं. ॥ २७१ ॥

ज्ञानी व कर्मी यांचा पूर्व व पश्चिम समुद्राप्रमाणें भिन्न विषय कसा तें आतां सांगतातः—

वपुर्वाग्धीषु निर्बंधः कर्मिणो न तु साक्षिणि ॥
ज्ञानिनः साक्ष्यलेपत्वे निर्बंधो नेतरत्र हि ॥ ७२ ॥

अन्वयः—कर्मिणः वपुर्वाग्धीषु निर्बंधः साक्षिणी तु न । ज्ञानिनः साक्ष्यलेपत्वे निर्बंधः इतरत्र न हि ।

अर्थः—कर्मी पुरुषाचा शरीर, वाणी व बुद्धि यांच्याविषयीं आग्रह असतो पण साक्षीविषयीं नसतो आणि ज्ञान्याचा साक्षी निर्लेप आहे ह्याविषयीं आग्रह असतो दुसऱ्या कशाविषयींही नसतो. ॥ २७२ ॥

विवरणः—या श्लोकाचा अर्थ स्पष्ट असल्यामुळें विवरणाची गरज नाहीं. ॥ २७२ ॥

प्रश्नः—मग असा जर खरा प्रकार आहे, तर पूर्व मीमांसेचा अभिमान बाळगणारा व उत्तर मीमांसक यांची जर कोठें गांठ पडली तर कलह कां होतो ? व शास्त्रांमध्यें तसा प्रकार कां आढळतो ? उत्तर—

**एवं चान्योन्यवृत्तांतानभिज्ञौ बधिराविव ॥**
**विवदेतां बुद्धिमंतो हसंत्येव विलोक्य तौ ॥ ७३ ॥**

अन्वयः—एवं च अन्योन्यवृत्तांतानभिज्ञौ बधिरौ इव विवदेताम् । बुद्धिमन्तः तौ विलोक्य हसन्ति एव ।

अर्थः—असें असतां एकमेकांचा अभिप्राय न जाणणारे दोघे मीमांसक बहिऱ्यांप्रमाणें कडाक्याचा वाद करितात. पण बुद्धिमान् त्यांस पाहून हंसतातच. ॥ २७३ ॥

विवरणः—शास्त्राचें रहस्य ज्यांना समजत नाहीं व त्यामुळें तात्पर्याकडे ज्यांची दृष्टि जात नाहीं ते उगीच अभिमानानें भांडूं लागतात. या त्यांच्या भांडणास बहिऱ्यांच्या भांडणाचा दृष्टांत दिला आहे. ह्मणजे जसे दोन बहिरे एके ठिकाणीं जमले असतां एकमेकांचें बोलणें एकमेकांस न समजल्यामुळें प्रत्येकाची कांहींतरी विपरीत भावना होऊन हातघाईवर काम येतें, त्याप्रमाणें शास्त्राचें तात्पर्य न समजल्यामुळें हे पूर्वोक्त मीमांसकही मीमांसेचा चूर करून सोडितात. या दुष्ट संवईमुळेंच आपल्या देशाची आज अपरिहार्य हानि झाली आहे. अनेक मतें, अनेक शास्त्रें, अनेक पंथ व अनेक व्यवहार होण्याचेंही कारण ही गैरसमजूतच होय. खरोखर असला हा अज्ञानमूलक संवाद ऐकून ज्ञानी पुरुषास तर हसूं येतें. ॥ २७३ ॥

मीमांसकही एकमेकांचा अभिप्राय समजत नाहींत हें आश्चर्य होय. असें कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार सांगतात—कीं,—

**यं कर्मी न विजानाति साक्षिणं तस्य तत्त्ववित् ॥**
**ब्रह्मत्वं बुद्ध्यतां तत्र कर्मिणः किं विहियते ॥ ७४ ॥**

अन्वयः—यं साक्षिणं कर्मी न विजानाति तस्य ब्रह्मत्वं तत्त्ववित् बुध्यतां तत्र कर्मिणः किं विहीयते।

अर्थः—ज्या साक्षीस कर्मठ जाणत नाहीं, तोच ब्रह्म आहे असें तत्त्वज्ञ समजेना; त्यांत कर्म्याची काय हानि आहे? ॥ २७४ ॥

विवरणः—जो आपला विषयच नव्हे त्याविषयीं दुसरा कांहीं कां समजेना त्यांत आपलें काय नुकसान आहे? असा पोक्त विचार कर्मठास करितां येत नाहीं. व एकदा अभिमानयुक्त झाल्यावर कोणालाही झाला तरी असा विचार सुचणें कठिणच होय. ॥ २७४ ॥

तसेंच

देहवाग्बुद्धयस्त्यक्ता ज्ञानिनाऽनृतबुद्धितः ॥
कर्मी प्रवर्तयत्वाभिर्ज्ञानिनो हीयतेऽत्र किम् ॥ ७५ ॥

अन्वयः—ज्ञानिना देहवाग्बुद्धयः अनृतबुद्धितः त्यक्ताः। आभिः कर्मी प्रवर्तयतु अत्र ज्ञानिनः किं हीयते।

अर्थः—ज्ञान्यानें देह, वाणी व बुद्धि हीं सर्व मिथ्या आहेत अशा बुद्धीनें टाकिलीं, मग त्यांच्याकडून कर्मी प्रवृत्त केला जाईना. (ह्मणजे तीं कर्म्यांस क्रियेमध्यें प्रवृत्त करीनात) त्यांत ज्ञान्याचें काय नुकसान होतें? ॥ २७५ ॥

विवरणः—या श्लोकांत ज्ञान्यानेंही शांति कशी करावी तें सांगितलें आहे. कर्माची सामग्री निराळी व ज्ञानाचा निराळी. तेव्हां कर्मठाशीं ज्ञान्यालाही भांडण्याचें कांहीं कारण नाहीं. पण अभिमानाचा सर्वथैव नाश न झाल्यामुळें कर्मठाप्रमाणेंच यालाही प्रस्तुत विचार सुचत नाहीं. ॥ २७५ ॥

खरोखर पाहातां प्रवृत्ति व निवृत्ति या दोघींचाही उपयोग आहे. व त्यामुळें व्यर्थ कलह करण्यांत कांहीं तात्पर्य नाहीं. असें सुचविण्याकरितां ज्ञान्यास प्रश्न करून योग्य उत्तर देतात.—

प्रवृत्तिर्नोपयुक्ता चेन्निवृत्तिः क्वोपयुज्यते ॥
बोधहेतुर्निवृत्तिश्चेद्बुभुत्सायां तथेतरा ॥ ७६ ॥

अन्वयः—प्रवृत्तिः न उपयुक्ता इति चेत् निवृत्तिः क उपयुज्यते । निवृत्तिःबोधहेतुः इति चेत् इतरा बुभुत्सायां तथा अस्ति ।

अर्थः—प्रवृत्ति निरुपयोगी आहे असें जर ह्मणशील, तर निवृत्ति कोठें उपयोगी पडणारी आहे? बोधाचें साधन निवृत्ति आहे असें जर ह्मणशील तर प्रवृत्ति ही जिज्ञासेचें साधन आहे. ॥ २७६ ॥

विवरणः—कर्मप्रवृत्ति निरुपयोगी आहे असें ज्ञान्याला ह्मणतांच येत नाहीं व कर्मापासून निवृत्त होणें अयोग्य आहे असें कर्मठांस ह्मणतां येणार नाहीं. कारण कर्मप्रवृत्ति चित्तशुद्धिद्वारा जिज्ञासेच्या जशी उपयोगी आहे, तशी कर्मनिवृत्तिही साक्षात् ज्ञानाच्या उपयोगी आहे. यास्तव एकमेकांवर आक्षेप घेऊन उगीच भांडत बसणें व्यर्थ आहे. ॥ २७६ ॥

पण जो एकदा ज्ञानी झाला त्याला फिरून जिज्ञासा होणें शक्य नसल्यामुळें त्याला प्रवृत्तीचा कांहींएक उपयोग होत नाहीं. अशी शंका घेऊन आतां समाधान करितात—

**बुद्धश्चेन्न बुभुत्सेत नाप्यसौ बुध्यते पुनः ॥**
**अबाधादनुवर्तेत बोधो न त्वन्यसाधनात् ॥ ७७ ॥**

अन्वयः—बुद्धः न बुभुत्सेत चेत् असौ न अपि पुनः बुध्यते । बोधः अबाधात् अनुवर्तेत न तु अन्यसाधनात् ।

अर्थः—ज्ञानी जाणण्याची इच्छा करीत नाहीं ह्मणून जर ह्मणशील तर तो पुनरपि जाणतही नाहीं. कारण प्रबल प्रमाणानें बाधित न झाल्यास बोधाची आपोआप अनुवृत्ति होईल. ती दुसऱ्या साधनाच्या योगानें होणार नाहीं. ॥ २७७ ॥

विवरणः—ज्याला एकदा ज्ञान होतें त्याला पुनः जिज्ञासा होणें शक्य नाहीं व त्यामुळें जिज्ञासेच्या उपयोगी जी प्रवृत्ति तिचा त्याला कांहीं उपयोग नाहीं असें जर तूं ह्मणशील तर त्यावर आह्मी तुला असें सांगतों कीं ज्याला एकदा ज्ञान झालें आहे, त्याला तें पुनः होणेंही असंभवनीय आहे. व त्यामुळें ज्ञानाच्या उपयोगी पडणारी जी निवृत्ति तिचाही त्याला कांहीं उपयोग नाहीं. आतां एकदा झालेलें ज्ञान

दृढ होण्याकरितां तिचा उपयोग आहे ह्मणून ह्मणशील, तर तें अयुक्त आहे. कारण ज्ञान दृढ होणें ह्मणजे काय? तें सतत राहणें असेंच कीं नाहीं? झालें तर. एकदा झालेलें ज्ञान, त्याचा दुसऱ्या एकाद्या प्रबल प्रमाणानें बाध न झाल्यास आपणच स्थिर राहील! त्याला पुनः निवृत्तिरूप अन्य साधनाची कांहीं जरूर नाहीं. वेदान्ताहून प्रबल असें दुसरें प्रमाणच नसल्यामुळें वेदान्तजन्य आत्मज्ञानाचा बाध होणें शक्य नाहीं. असें पूर्वी महाभूतविवेकाच्या एकशें आठव्या श्लोकांत सांगितलें आहे. ॥२७७॥

दुसरें प्रबल प्रमाण नसल्यामुळें जरी ज्ञानाचा बाध न झाला, तरी अविद्या किंवा त्याचें कर्तृत्वादि कार्य यांच्या योगानें त्याचा बाध होईल—असें एकाद्या पूर्वग्रंथाकडे अनुसंधान न ठेवणाऱ्या साधकास वाटेल ह्मणून ह्मणतातः—

**नाविद्या नापि तत्कार्यं बोधं बाधितुमर्हति ॥**
**पुरैव तत्त्वबोधेन बाधिते ते उभे यतः ॥ ७८ ॥**

अन्वयः—यतः पुरा एव तत्त्वबोधेन ते उभे बाधिते ततः न अविद्या न अपि तत्कार्यं बोधं बाधितुं अर्हति ।

अर्थः—ज्या अर्थीं त्या दोघांचा तत्त्वबोधानें पूर्वींच बाध करून सोडिलेला असतो त्या अर्थीं अविद्या व त्याचें कार्य या दोहोंतून एकही बोधास बाधित करूं शकत नाहीं. ॥ २७८ ॥

विवरणः—अविद्यादि प्रतिबंधांची निवृत्ति झाल्यावांचून तत्त्वसाक्षात्कार होणेंच असंभवनीय असल्यामुळें ते बोधास बाधित करतील ही कल्पनाही करणें व्यर्थ होय. स्वप्नाचा बाध केल्यावांचून जागृति होऊंच शकत नाहीं. व एकदा जागृतींत आल्यावर पुनः तेंच स्वप्न जागृतीस बाधित करील हें ह्मणणें व्यर्थ आहे. ॥ २७८ ॥

**बाधितं दृश्यतामक्षैस्तेन बाधो न शक्यते ॥**
**जीवन्नाखुर्न मार्जारं हंति हन्यात्कथं मृतः ॥ ७९ ॥**

अन्वयः—बाधितं अक्षैः दृश्यताम् । तेन बाधः न शक्यते । जीवन् आखुः मार्जारं न हन्ति । मृतः कथं हन्यात् ।

अर्थः—बाधित झालेलें जग इंद्रियांच्या योगानें दिसो, त्याच्या योगानें तत्त्वज्ञानाचा बाध होणें शक्य नाहीं. जीवंत उंदीर जर मांजरास मारूं शकत नाहीं, तर मेलेला कसा मारील? ॥ २७९ ॥

विवरणः—अविद्येचा जरी बाध झाला, तरी त्याच्या कार्याची ( जगाची ) प्रतीति येत असल्यामुळें तिच्या योगानें तत्त्वसाक्षात्काराचा बाध होइल असें ह्मणणें योग्य नव्हे. कारण अविद्या हें जगाचें उपादान कारण आहे; तेव्हां त्याचाच नाश झाल्यावर जगद्रूप कार्याचें वस्तुतः अस्तित्व कसें होणार ? आतां इंद्रियांच्या योगानें त्याचा केवळ भास होईल हें खरें, पण त्यामुळें तत्त्वज्ञानाचा बाध होणार नाहीं, असें यांचें तात्पर्य समजावें. ॥ २७९ ॥

तसेंच—

**अपि पाशुपतास्त्रेण विद्धश्चेन्न ममार यः ॥**
**निष्फलेषु विनुन्नांगो नंक्ष्यतीत्यत्र का प्रमा ॥ २८० ॥**

अन्वयः—यः पाशुपतास्त्रेण विद्धः अपि न ममार चेत् निष्फलेषु विनुन्नांगः नंक्ष्यति इति अत्र का प्रमा ?

अर्थः—जो पाशुपत अस्त्रानें विद्ध होऊनही मृत झाला नाहीं, तो निष्फल बाणानें व्याकुळ होऊन मरेल, याविषयीं प्रमाण काय ? ॥ २८० ॥

विवरणः—पाशुपतासारख्या अमोघ शस्त्राचाही ज्याच्यावर परिणाम झाला नाहीं, तो सामान्य बाणाच्या योगानें मरेल, अशी आशा करणें ह्मणजे खुळेपणाच होय. २८०

दोन दृष्टांत देऊन स्पष्ट केलेल्या गोष्टीचाच आतां विस्तार करितात—

**आदावविद्यया चित्रैः स्वकार्यैर्जृंभमाणया ॥**
**युद्ध्वा बोधोऽजयत्सोऽद्य सुदृढो बाध्यतां कथम् ॥ ८१ ॥**

अन्वयः—यः आदौ चित्रैः स्वकार्यैः जृंभमाणया अविद्यया सह युद्ध्वा तां अजयत् स दृढः बोधः अद्य कथं बाध्यताम् ।

अर्थः—जो प्रथमतः विचित्र कार्यांच्या योगानें विकार पावणाऱ्या अविद्येशीं युद्ध करून तिला जिंकता झाला तो अतिदृढ बोध आज कसा बाधित होईल ? ॥ २८१ ॥

विवरणः—आदौ–विद्याभ्यासकालीं. कार्यैः—प्रमातृत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादि रूप अनेक प्रकारच्या कार्यांनीं ( वृद्धिंगत होणाऱ्या अविद्येशीं ) साधनकालींही

एकसारखा प्रयत्न करून ज्या बोधानें कार्यासह अविद्येस जिंकलें त्या बोधास सिद्धकालीं माया किंवा तिचें कार्य जिंकूं शकेल हें नांव कशास पाहिजे ? ॥ २८१ ॥

पुनरपि रूपक करून बाधित प्रपंचाची प्रतीति इष्टच आहे असें सांगतात.—

**तिष्ठंत्वज्ञानतत्कार्यशवा बोधेन मारिताः ॥**

**न भीतिर्बोधसम्राजः कीर्तिः प्रत्युत तस्य तैः ॥ ८२ ॥**

अन्वयः—बोधेन मारिताः अज्ञानतत्कार्यशवाः तिष्ठन्तु बोधसम्राजः न भीतिः। प्रत्युत तस्य तैः कीर्तिः भविष्यति।

अर्थः—बोधानें मारून टाकिलेलें अज्ञान व त्याचीं कार्यें यांचीं प्रेतें खुशाल पडून राहोत. बोधसंज्ञक चक्रवर्ती राजास त्यांची भीति नाही. उलट त्यांच्या योगानें त्याची कीर्तिच होईल. ॥ २८२ ॥

विवरणः—ज्याप्रमाणें एकाद्या धनुर्धाऱ्यानें असंख्य सैन्यास मारून टाकून त्याचें वैभव घेतलें असतां त्यास त्या प्रेतांची मुळींच भीति वाटत नाहीं. व तीं उलट त्या वीराच्या कीर्तीलाच कारण होतात, त्याप्रमाणें बोधानें ज्यांना निःसत्त्व करून सोडिलें आहे, अशा अज्ञानादिकांची बोधरूपी सार्वभौम राजास मुळींच भीति नसते. व उलट, वाहवा! केवढा या बोधाचा प्रभाव आहे? ज्यांनीं या सर्व सृष्टीला त्राहि त्राहि करून सोडिलें होतें, त्या ह्या अज्ञानादिकांस यानें आज निःशेष करून टाकिलें आहे—असा त्याचा गौरव करितात.॥ २८२ ॥

सारांशः—

**य एवमतिशूरेण बोधेन न वियुज्यते ॥**

**प्रवृत्त्या वा निवृत्त्या वा देहादिगतयाऽस्य किम् ॥ ८३ ॥**

अन्वयः—यः एवं अतिशूरेण बोधेन न वियुज्यते अस्य देहादिगतया प्रवृत्त्या वा निवृत्त्या वा किम्?

अर्थः—जो ह्याप्रमाणें अतिशूर बोधाशीं वियुक्त होत नाहीं, त्याचें देहादिगत प्रवृत्ति व निवृत्ति यांच्या योगानें काय होणार आहे ? ॥ २८३ ॥

विवरणः—बोधाच्या, ह्मणजे आत्मसाक्षात्काराच्या शौर्याचें यथार्थ वर्णन नुक्तेंच केलें आहे. तेव्हां अशा शौर्यशाली बोधाशीं ज्याचा कधींच वियोग होत

नाहीं, म्हणजे जो सतत आत्मानुभव घेत असतो, त्याचें देह, इंद्रियें व मन यांच्या योगानें होणाऱ्या प्रवृत्तिमुळें किंवा निवृत्तिमुळें काय इष्ट किंवा अनिष्ट होणार आहे ? हा आक्षेप असल्यामुळें त्याचें–कांहीं एक इष्टानिष्ट होणें शक्य नाहीं–असें तात्पर्य समजावें. ॥ २८३ ॥

प्रवृत्ति कोणाला इष्ट आहे, तें आतां सांगतात—

**प्रवृत्तावाग्रहो न्याय्यो बोधहीनस्य सर्वथा ॥**
**स्वर्गाय वाऽपवर्गाय यतितव्यं यतो नृभिः ॥ ८४ ॥**

अन्वयः—सर्वथा बोधहीनस्य प्रवृत्तौ आग्रहः न्याय्यः । यतः नृभिः स्वर्गाय अपवर्गाय वा यतितव्यम् ।

**अर्थः**—सर्व प्रकारें बोधहीन पुरुषाचा प्रवृत्तीविषयीं आग्रह असणें युक्त आहे. कारण पुरुषांना स्वर्गाकरितां किंवा मोक्षाकरितां यत्न करणें अवश्य आहे. ॥ २८४ ॥

विवरणः—जो मनुष्य जन्मास येऊन चारी पुरुषार्थांपैकीं एकाचीही प्राप्ति करून घेत नाहीं त्याचा जन्म व्यर्थ होय, असें शास्त्रामध्यें म्हटलेलें असल्यामळें मनुष्यास मोक्षाकरितां किंवा निदान स्वर्गाकरितां तरी प्रयत्न करणें जरूर आहे. वास्तव ज्याला कोणत्याही प्रकारें बोध नसतो त्याला नुस्ती प्रवृत्तिही हितकर असल्या-मुळें त्यानें तिच्याविषयीं अवश्य आग्रह धरावा. ॥ २८४ ॥

असें जर आहे, तर विद्वानानें प्रवृत्तिमार्गाच्या लोकांमध्यें असतांना काय करावें ? सर्वांबरोबर प्रवृत्तीच करीत रहावें कीं त्यांच्या अगदीं उलट वागून निवृत्तीचा स्वीकार करावा ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतात—

**विद्वांश्चेत्तादृशां मध्ये तिष्ठेत्तदनुरोधतः ॥**
**कायेन मनसा वाचा करोत्येवाखिलाः क्रियाः ॥ ८५ ॥**

अन्वयः—तादृश्यां मध्ये विद्वान् तिष्ठेत् चेत् सः तदनुरोधतः कायेन मनसा वाचा अखिलाः क्रियाः करोति एव ।

**अर्थः—तशा पुरुषामध्यें जर विद्वान् राहात असला तर तो त्यांच्या अनुरोधानें शरीर, मन व वाणी यांच्या योगानें सर्व क्रिया करितोच. २८५**

विवरणः—लोकांनीं उन्मार्गी होऊन स्वार्थापासून भ्रष्ट होऊं नये ह्मणून विद्वानानें, भगवानांनीं अर्जुनास सांगितल्याप्रमाणें, त्यांच्या प्रमाणेंच प्रवृत्ति करावी. पण तिच्यामध्यें आसक्त होऊं नये व काम्य आणि निषिद्ध कर्मे करूं नयेत. कारण त्यांच्या योगानें अनर्थ प्राप्ति होत असते. या श्लोकांत वस्तुतः कर्मे करावीं असें विधान नसून तो परोपकारार्थ कर्में करितो ह्मणजे स्वतःकरितां निरुपयोगी असलेलें कर्म तो इतरांच्या कल्याणार्थ करितो, असें सांगितलेलें आहे. त्यावरून अज्ञांचा बुद्धिभेद करणें व त्यांना श्रद्धाभ्रष्ट करणें किती हानिकर आहे, हें व्यक्त होत आहे. ॥ २८५ ॥

तेंच तो जर जिज्ञासूंमध्यें राहूं लागला, तर त्यानें काय करावें तें सांगतात—

**एष मध्ये बुभुत्सूनां यदा तिष्ठेत्तदा पुनः ॥**
**बोधायैषां क्रियाः सर्वा दूषयंस्त्यजतु स्वयम् ॥ ८६ ॥**

अन्वयः—एषः पुनः यदा बुभुत्सूनां मध्ये तिष्ठेत् तदा एषां बोधाय सर्वाः क्रियाः दूषयन् स्वयं त्यजतु।

अर्थः—पण हा पुनः जेव्हां जिज्ञासूंच्या मध्यें राहूं लागेल त्या वेळीं त्यांच्या ज्ञानाकरितां सर्व क्रियांना दूषण देऊन स्वतः खुशाल त्यांच्या त्याग यानें करावा. ॥ २८६ ॥

विवरणः—अज्ञानी लोकांची हानि होऊं नये ह्मणून त्यांच्याप्रमाणें वागण्याविषयीं जसें पूर्वी सांगितलें आहे, तसेंच येथें जिज्ञासूंच्या हिताकरितां त्यांच्याप्रमाणें वागण्याविषयीं ग्रंथकार अनुज्ञा देत आहेत. व हें त्यांचें कृत्य अनेक श्रुतिस्मृतींशीं संगत आहे. स्वतः भगवानांनींही " सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ह्मणजे इतर सर्व धर्मांचा त्याग करून मला शरण ये. " इत्यादि प्रकारें उपदेश केलाच आहे. सारांश, जशी संगति मिळेल, तशी वागणूक ठेवावी. मात्र त्यापासून आपलें अहित न होईल अशी खबरदारी राखावी. ॥ २८६ ॥

अहो, पण कृतकृत्य झालेल्या विद्वानानें अज्ञांप्रमाणें कां वागावें! असें कोणी विचारील ह्मणून ह्मणतात—

**अविद्वदनुसारेण वृत्तिर्बुद्धस्य युज्यते ॥**
**स्तनंधयानुसारेण वर्तते तत्पिता यतः ॥ ८७ ॥**

अन्वयः—यतः स्तनंधयानुसारेण तत्पिता वर्तते, अतः अविद्वदनुसारेण बुद्धस्य वृत्तिः युज्यते ।

**अर्थः—ज्या अर्थी स्तनपान करणाऱ्या मुलाच्या अनुरोधानें त्याचा पिता वागतो त्या अर्थी अविद्वानाच्या अनुरोधानें ज्ञानी पुरुषाचें वागणें युक्तच होय. ॥ २८७ ॥**

विवरणः—एकाद्या नुकत्या रांगू लागलेल्या मुलाच्या इच्छेप्रमाणेंच त्याचा ज्ञानी पिता वागतो. तें मूल जिकडे रांगत जाईल तिकडे हा त्याच्या मागोमाग जातो; तें जें हातांत घेण्याची इच्छा करील, तें त्यास देतो. इत्यादि प्रकार सांसारिकांस सांगण्याची गरज नाहीं. पण यावरून एक सिद्धान्त ठरतो. तो हा कीं, ज्ञानी पुरुषानें अज्ञांच्या अंतःकरणास दुखविणें बरें नव्हे. तर त्यांच्या श्रद्धेचा भंग न होईल अशा रीतीनेंच त्यानें त्यांच्याशीं वागलें पाहिजे. कारण असें न केल्यास त्यांचा ( अज्ञांचा ) नाश होण्यास उशीर लागत नाहीं. ॥ २८७ ॥

आतां पूर्वोक्त दृष्टांत अधिक स्पष्ट करितात—

**अधिक्षिप्तस्ताडितो वा बालेन स्वपिता तदा ॥**
**न क्लिश्नाति न कुप्येत बालं प्रत्युत लालयेत् ॥ ८८ ॥**

अन्वयः—बालेन अधिक्षिप्तः ताडितः वा स्वपिता न क्लिश्नाति च बालं प्रति न कुप्येत उत लालयेत् ।

**अर्थः—अज्ञान अवस्थेंत असतांना बालकानें ज्याचा अधिक्षेप केला आहे, किंवा ज्याला ताडण केलें आहे, असा त्याचा पिता दुःखी होत नाहीं, व आपल्या बालकावर रागावतही नाहीं; तर त्याचें लालनच करितो. ॥२८८॥**

विवरणः—बाल्यावस्थेंत व्यावहारिक किंवा शास्त्रीय ज्ञान नसल्यामुळें अज्ञ मूल आपल्या पूज्य पित्यास लाथाही मारतें व शिव्याही देतें. पण बापास त्यापासून दुःख होत असल्याचें किंवा तो त्याच्यावर रागावल्याचें आढळत नाहीं. तर उलट जणूं काय त्या पित्यास ' आपण धन्य आहों ' असेंच वाटतें व त्यामुळें तो त्याचे अधिक लाड करितो; असें सर्वत्र दिसतें. ' अहो, हेंच ऐहिक सुख आहे ' असें म्हणणारे अनेक पिते कोठेंही सांपडतील. सारांश, अज्ञांच्या हातून घडलेल्या अपराधामुळें ज्ञानी चिडत नाहींत, तर त्यांचें कौतुक करितात. ॥ २८८ ॥

वादीः—बालक अगदीं व्यवहारशून्य असल्यामुळें तुह्मी सांगता तसा प्रकार घडतो, हें खरें. पण ज्यांना कांहीं व्यावहारिक ज्ञान ह्मणून आहे, ते ज्ञात्यांची निंदा करितील हें ह्मणणें जरा अतिशयोक्तीचें वाटतें. सिद्धांतीः—छेः ही अतिशयोक्ति नव्हे. हा अगदीं खरा प्रकार आहे. कसा ह्मणशील तर सांगतों. ज्या वेळीं विवेकी अज्ञान्यांच्या समुदायांत असतो, त्या वेळीं तो सत्कर्में मात्र करीत असल्याचें दिसतें. पण जेव्हां मुमुक्षूंच्या समागमांत जातो. तेव्हां सत् व असत् अशा दोन्ही प्रकारच्या कर्मांस दोष देतो. आणि त्याची अशी ही अवस्था पाहून विषयी लोक निंदा करूं लागतात. हा प्रकार श्रीमद्भागवताच्या एकादश स्कंधांतील भिक्षुगीतामध्यें सांगितलेला आहे, व वायुपुराणांतर्गत माघमाहात्म्यांत मांडव्यास शूलावर चढविल्याची जी कथा आहे, तींत वर्णिला आहे. यास्तव 'ज्ञानी पुरुषानें निंदा, इत्यादिकांस समान मानावें' असें जें भगवद्गीतावचन आहे, त्याप्रमाणें विवेक्यानें वागावें. कारण त्याच्याकडे पाहणारे विषयी मुख्यतः याच लक्षणावरून त्यास ओळखतील, व पुनरपि निंदा करणार नाहींत. सारांश ज्यांच्या योगानें त्यांस बोध होईल, असें आचरण करावें, असें आतां थोडक्यांत सांगतात—

**निंदितः स्तूयमानो वा विद्वानज्ञैर्न निंदति ॥**
**न स्तौति किं तु तेषां स्याद्यथा बोधस्तथाऽऽचरेत् ॥ ८९ ॥**

अन्वयः—अज्ञैः निंदितः स्तूयमानः वा विद्वान् न निन्दति च न स्तौति किं तु तेषां यथा बोधः स्यात् तथा आचरेत् ।

अर्थः—अज्ञांकडून निंदित किंवा मुमुक्षूंकडून स्तुत असा विद्वान् त्यांची निंदा किंवा स्तुति करीत नाहीं, तर ज्याच्या योगानें त्यांस बोध होईल असें आचरण करितो. ॥ २८९ ॥

विवरण:—अज्ञ आपली निंदा करितात ह्मणून आपणही त्यांची निंदा करावी व मुमुक्षु स्तुति करितात ह्मणून आपणही उलट स्तुति करावी, असें ज्याच्या मनांत येत नाहीं, तोच तुल्यनिंदास्तुतिः होय. अज्ञ व मुमुक्षु या उभयतांसही ज्याच्या योगानें बोध होईल असें आचरण करण्याचेंच त्याचें शील असतें. ॥ २८९ ॥

वादीः—पण कृतकृत्य झालेल्या ज्ञान्याला अज्ञांस बोध व्हावा असें तरी कां वाटावें ? त्यांच्या बोधाशीं याला काय कर्तव्य आहे ?

सिद्धान्तीः—वस्तुतः त्यांना अज्ञांच्या सुखदुःखाशीं कांहींएक कर्तव्य नाहीं. हें खरें, पण समज कीं कांहीं तृषित मृगजलास जल समजून तिकडे धांवत चालले आहेत व एक पूर्वींच असा धांवत जाऊन व हें मृगजल आहे असें समजून मोठ्या कष्टानें परत फिरला आहे, व त्यांची व यांची गांठ पडली आहे. तेव्हां 'हे बिचारे माझ्यासारखेच भ्रमिष्ट होऊन उगीच धांवत आहेत. यास्तव त्यांना खरा प्रकार सांगून मागें फिरवावें.' असें त्याच्या मनांत आल्यावांचून राहील काय ? कधींही नाहीं. तर करुणायुक्त अंतःकरणानें तो त्यांस वस्तुस्थितीचा बोध करून देईल, हें उघड आहे. ह्या दृष्टान्ताप्रमाणेंच ज्ञानी करुणायुक्त होत्साता अज्ञांस ज्ञानी करण्याचा प्रयत्न करितो, असें आतां सांगतातः—

**येनायं नटनेनात्र बुध्यते कार्यमेव तत् ॥**
**अज्ञप्रबोधान्नैवान्यत्कार्यमस्त्यत्र तद्विदः ॥ २९० ॥**

अन्वयः—अयं अत्र येन नटनेन बुध्यते तत् कार्यं एव । तद्विदः अत्र अज्ञप्रबोधनात् अन्यत् कार्यं न अस्ति एव ।

अर्थः—ह्या अज्ञानी या लोकीं ज्या आचरणानें तत्त्वज्ञ होईल, तें ज्ञान्यानं अवश्य करावेंच. कारण तत्त्ववेत्त्याला इहलोकीं अज्ञास ज्ञानी करण्यावांचून दुसरें कर्तव्य नसतें. ॥ २९० ॥

विवरणः—या श्लोकांत नटनेन असा शब्द योजून ज्ञानी पुरुषाची कोणतीही क्रिया वास्तविक नसते, असें सुचविलें आहे. शंकाः—करुणेमुळेंच जर ज्ञानी कर्मी-मध्यें प्रवृत्त होत असला, तर दरिद्र्यांस द्रव्य मिळवून द्यावें म्हणून सेवादि कष्टकर कर्मांमध्येंही प्रवृत्ति होणें शक्य आहे. समाधानः—केवल अज्ञांस सज्ञ करण्यापलीकडे त्याचें काम नाहीं. पूर्वोक्त मृगजलाच्या दृष्टान्तांत–हें मृगजल आहे, असें समजून जो परत फिरलेला असतो, तो पाण्याच्या आशेनें तिकडे धांवणाऱ्यांस करुणेनें मृगजलाचें ज्ञान करून देतो एवढेंच म्हटलें आहे. त्यांना इतर विपत्तींतून सोडविण्याचाही तो प्रयत्न करितो, असें म्हटलेलें नाहीं. ॥ २९० ॥

तात्पर्यः—

**कृतकृत्यतया तृप्तः प्राप्तप्राप्यतया पुनः ॥**
**तृप्यन्नेवं स्वमनसा मन्यतेऽसौ निरंतरम् ॥ ९१ ॥**

अन्वयः—कृतकृत्यतया तृप्तः पुनः प्राप्तप्राप्यतया तृप्यन् असौ स्वमनसा निरंतरं एवं मन्यते ।

अर्थः—कृतकृत्यतेमुळें तृप्त झालेला व पुनरपि प्राप्तप्राप्यतेमुळें तृप्त होणारा हा ब्रह्मनिष्ठ आपल्या मनानें सर्वदा असें मानतो. ॥ २९१ ॥

विवरणः—जें कांहीं कर्तव्य होतें तें करून टाकिल्यामुळें पूर्वींच तृप्त झालेला व आतां पुढील प्रकरणांत जिचा उल्लेख होणार आहे, त्या–प्राप्त करून घेण्यास योग्य अशा–स्थितीची प्राप्ति करून घेतल्यामुळें तृप्त होणारा, हा ब्रह्मनिष्ट मुनि आपल्या मनामध्यें सर्वदा कसा विचार करितो तें आतां यापुढील सहा श्लोकांत सांगितलें आहे. ॥ २९१ ॥

धन्योऽहं धन्योऽहं नित्यं स्वात्मानमंजसा वेद्मि ॥
धन्योऽहं धन्योऽहं ब्रह्मानंदो विभाति मे स्पष्टम् ॥ ९२ ॥

अन्वयः—अहं नित्यं स्वात्मानं अंजसा वेद्मि अतः अहं धन्यः अस्मि अहं धन्यः अस्मि । मे ब्रह्मानन्दः स्पष्टं विभाति अतः धन्यः अहं धन्यः अहं अस्मि ।

अर्थः—मी नित्य आत्म्याला साक्षात् जाणतों. यास्तव मी धन्य आहें; धन्य आहें. मला ब्रह्मानन्द स्पष्ट भासतो यास्तव मी धन्य आहें; धन्य आहें. ॥ २९२ ॥

विवरणः—नित्यं—हा शब्द स्वात्मानं या शब्दाचें विशेषण आहे, असें समजावें किंवा क्रियाविशेषण समजावें. क्रियाविशेषण केल्यास ' मी स्वात्म्यास सतत साक्षात् जाणतों ' असा अर्थ होतो. ह्मणजे माझ्या साक्षात्काराचा विच्छेद कधींच होत नाहीं: असा याचा भावार्थ निघतो. या व यापुढील श्लोकांत ' धन्योहं, अहो पुण्यं, अहो शास्त्रं, अहो गुरुः ' इत्यादि वाक्यांची जी द्विरुक्ति आहे ती आदर दर्शविण्याक-रितां आहे असें समजावें. स्वात्मानं हा कर्मधारय समास आहे व त्यामुळें त्याचा अर्थ स्व हाच आत्मा असा होतो. स्व–कूटस्थ चिदात्मा, त्वंपदाचा शुद्ध अर्थ. व आत्मा ह्मणजे सच्चिदानंदरूप ब्रह्म. तात्पर्य ब्रह्म व प्रत्यगात्मा यांचें ऐक्य आहे, असा साक्षात्कार झाल्यामुळें मी धन्य आहें. साक्षात्काराच्या योगानें ब्रह्मानन्दाचा स्पष्ट प्रत्यय आल्यामुळेंही मी धन्य आहें. ॥ २९२ ॥

इष्टपदार्थांची प्राप्ति झाल्यामुळें कोणालाही झाला तरी हर्ष होणारच, व तो ज्ञान्याला कसा होतो, हें गेल्या श्लोकांत सांगितलें आतां अनिष्टांची निवृत्ति झाल्यावर अवश्य होणारा जो आनंद त्याच्या योगानें ज्ञानी तृप्त कसा होतो तें सांगतातः—

धन्योऽहं धन्योऽहं दुःखं सांसारिकं न वीक्षेऽद्य ॥
धन्योऽहं धन्योऽहं स्वस्याज्ञानं पलायितं क्वापि ॥ ९३ ॥

अन्वयः—अद्य सांसारिकं दुःखं न वीक्षे। अतः अहं धन्यः अहं धन्यः। स्वस्य अज्ञानं क अपि पलायितं अतः अहं धन्यः अहं धन्यः अस्मि।

अर्थः—आज संसारसंबंधीं दुःख मला मुळींच दिसत नाहीं, त्यामुळें मी धन्य व कृतार्थ झालों आहें. आत्मसंबंधीं अज्ञान कोठें तरी पळून गेलें आहे, व त्यामुळें मी कृतकृत्य झालों आहें. ॥ २९३ ॥

विवरण—जोपर्यंत आत्म्याचा साक्षात्कार झालेला नसतो तोंपर्यंत पुरुषास संसार आवडतो व आत्म्याचा साक्षात्कार झाला कीं तोच त्याला विषासारखा कडू वाटतो. कारण संसार हा आत्मसुखाचा पडदा आहे, किंवा त्यास प्रतिबंध करणारा एक पदार्थ आहे. त्यामुळें आत्मसुखाची गोडी कळण्यापूर्वी जरी तो इष्ट वाटत असला, तरी आत्मसुखानुभवानंतरही तो तसाच वाटणें शक्य नाहीं. फार काय, पण तो त्या अवर्णनीय सुखास प्रतिबंध करीत असल्यामुळें शत्रूसारखा वाटणेंच साहजिक आहे. आत्मसाक्षात्कार स्थिर झाला असतां म्हणजे अनुसंधानानें चित्तवृत्ति एकसारखी आत्म्यामध्यें तल्लीन होऊन गेली असतां, जीवन्मुक्तीचा अनुभव येतो. त्या अवस्थेंत संसार व संसारसंबंधी दुःख यांचा लेशही रहात नाहीं. कारण सर्व प्रकारचे प्रत्यय मनावर अवलंबून आहेत. जोंपर्यंत मन चंचल अवस्थेंत राहून क्षणोक्षणीं निरनिराळ्या पदार्थांचा प्रत्यय घेत असतें तोंपर्यंत त्या त्या इष्ट किंवा अनिष्ट प्रत्ययाप्रमाणें पुरुषास सुख किंवा दुःख होतें. पण अभ्यासबलानें तें एकदा आत्मवश झालें व आत्म्यास सोडून क्षणोक्षणीं बाहेर पळण्याचा त्याचा स्वभाव नष्ट झाला कीं प्रपंचांतील पदार्थांचा प्रत्ययच येईनासा होतो. या उच्च अवस्थेचा ज्यास अनुभव आला आहे असा ज्ञानी माझा दुःखरूप संसार नष्ट झाला, व त्यामुळें मी कृतकृत्य झालों आहें. आणि आजपर्यंत आत्म्यास मी जाणत नाहीं. असें जें मला वाटत होतें, तें आतां वाटेनासें झालें व त्यामुळेंही परम धन्य झालों,

असें म्हणूं लागतो. या श्लोकांतील अज्ञान या शब्दाचा अर्थ–अनेक कर्मवासनांचा समूह–असा रामकृष्णांनीं केला आहे. ॥ २९३ ॥

अज्ञानाची निवृत्ति झाली असतां कोणतें फल मिळतें, तें सांगतातः—

**धन्योऽहं धन्योऽहं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ॥**
**धन्योऽहं धन्योऽहं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम् ॥ २९४ ॥**

अन्वयः—मे किंचित् कर्तव्यं न विद्यते । अतः अहं धन्यः अहं धन्यः अद्य । सर्वं प्राप्तव्यं संपन्नं अतः अपि अहं धन्यः अहं धन्यः ।

अर्थः—मला कांहीं एक कर्तव्य राहिलेलें नाहीं. यास्तव मी धन्य आहें; मी धन्य आहें. आज सर्व प्राप्तव्य मला प्राप्त झालें आहें, त्यामुळेंही मी धन्य व कृतकृत्य आहे. ॥ २९४ ॥

विवरणः—आत्मसाक्षात्कार होऊन अज्ञानाची निवृत्ति झाली असतां त्या ज्ञानी पुरुषास " मला कांहीं कर्तव्य आहें व तें केलें पाहिजे " असें कधींच वाटत नाहीं. त्याचप्रमाणें " मला अमुक एक वस्तु प्राप्त झालेली नाहीं. व ती प्राप्त करून घेतली पाहिजे " असेंही वाटत नाहीं. अर्थात् तो धन्य पुरुष निरिच्छ होतो. निरिच्छ होणें हें काम सोपें नव्हे. त्यासारिखें सुखही दुसऱ्या कशांत नाहीं. अर्थात् ज्या भाग्यवानाच्या सर्व तृष्णा नाहींशा झाल्या आहेत त्यास " मी धन्य आहें किंवा कृतकृत्य आहें " असेंही वाटल्यास नवल तें कोणतें ? ॥ २९४ ॥

" मी कृतकृत्य झालों, माझें कोणतेंही कर्तव्य राहिलेलें नाहीं; व अवश्य प्राप्त करून घेण्यारखी वस्तुही मला दिसत नाहीं. " अशी एकदा दृढ भावना झाली कीं त्या पुरुषाला जी तृप्ति प्राप्त होत असते, तिचें शब्दांनीं वर्णन करवत नाहीं. असें आतां सांगतातः—

**धन्योऽहं धन्योऽहं तृप्तेर्मे कोपमा भवेल्लोके ॥**
**धन्योऽहं धन्योऽहं धन्यो धन्यः पुनः पुनर्धन्यः ॥ ९५ ॥**

अन्वयः—धन्यः अहं, धन्यः अहं । लोके मे तृप्तेः का उपमा भवेत् । धन्यः अहं धन्यः अहं । धन्यः धन्यः पुनः पुनः धन्यः अस्मि ।

**अर्थः**—मी धन्य आहें, मी धन्य आहे. लोकांमध्यें माझ्या तृप्तीस कोणती उपमा असणार ? तात्पर्य, मी धन्य, कृतकृत्य, अत्यंत तृप्त व त्यामुळेंच अति संतुष्ट झालों आहें. ॥ २९५ ॥

विवरणः—निःस्पृह व कृतकृत्य आत्मज्ञान्याच्या तृप्तीस जगांत उपमाच नसल्यामुळें त्या पुरुषास मी धन्य आहें, असें वारंवार वाटत असतें. ॥ २९५ ॥

पण ही कृतकृत्यता व अवर्णनीय तृप्ति ज्याच्यामुळें प्राप्त झाली, त्या पुण्याची आत्मज्ञानी कशी स्तुति करितो, तें आतां सांगतात—

**अहो पुण्यमहो पुण्यं फलितं फलितं दृढम् ॥**
**अस्य पुण्यस्य संपत्तेरहो वयमहो वयम् ॥ ९६ ॥**

अन्वयः—अहो पुण्यं ! अहो पुण्यं दृढं फलितं । अहो वयं । अस्य पुण्यस्य संपत्तेः अहो वयम् ।

**अर्थः**—अहाहा केवढें माझें पुण्य; केवढें हें माझें भाग्य ! खरोखर मला त्याचें फल मिळालें. निःसंशय मला पुण्यफल मिळालें. आह्मी मोठे भाग्यवान् आहों. या पुण्याच्या संपत्तीमुळें आह्मीं मोठे भाग्यशाली झालों आहों. ॥ २९६ ॥

विवरणः—अनेक सहस्र जन्मांतील प्रचंड पुण्यसंचयावांचून आत्मसाक्षात्कार होत नाहीं. यास्तव निरतिशय तृप्ति, परमानंद इत्यादि जें जें ह्मणून या साक्षात्काराच्या फलाला नांव द्याल, तें तें त्या पुण्यसंचयाचेंच कार्य असणार हें उघड आहे. आणि एवढ्या करितांच त्या ज्ञानी पुरुषास आपल्या पुण्याविषयीं आश्चर्य कसें वाटतें व त्या पुण्यसंचयामुळें प्राप्त झालेल्या फलाच्या योगानें मी धन्य झालों आहें असें त्यास कसें वाटतें तें येथें दाखविलें आहे. मी असें न ह्मणतां आह्मी असें येथें ह्मटलें आहे. व त्याचें तात्पर्य असें आहे कीं, मी या मराठी शब्दास संस्कृतांत " अहं " हा प्रतिशब्द आहे. व " अहं " असें ह्मणणें हें अहंकाराचें द्योतक आहे. करितां त्या अनर्थकारक अहंशब्दाचा प्रयोग आत्मज्ञानी करीत नाहींत; हें सुचविण्याकरितां श्रीभारतीतीर्थांनीं येथें आह्मी ( वयं ) असें मुद्दाम ह्मटलें आहे.२९६

आतां आत्म्याचें पदार्थज्ञान होण्यास कारण झालेल्या शास्त्र गुरु, व परोक्ष ज्ञान या तीन अंतरंग साधनांचें स्मरण करून ज्ञानी आश्चर्य कसें प्रगट करितो तें दाखवितात—

**अहो शास्त्रमहो शास्त्रमहो गुरुरहो गुरुः ॥**
**अहो ज्ञानमहो ज्ञानमहो सुखमहो सुखम् ॥ ९७ ॥**

**अन्वयः**—अहो शास्त्रं अहो शास्त्रं । अहो गुरुः अहो गुरुः । अहो ज्ञानं अहो ज्ञानं। अहो सुखं अहो सुखम् ।

**अर्थः—अहाहा! काय या अद्वैतप्रतिपादनशास्त्राची योग्यता सांगावी? अहाहा! परम दयाळू गुरूंचा केवढा हा चमत्कार!! ज्ञानाच्या महिम्यार्चे तरी किती वर्णन करावें! धन्य धन्य धन्य आहे या सुखाची!!!॥ २९७ ॥**

**विवरणः**—ज्या शास्त्रादिकांच्या द्वारा साधकास सिद्ध होतां आलें व अनुपमेय सुखप्राप्ति झाली, त्या शास्त्रादिकांविषयीं त्यास मागून आश्चर्य वाटणें व त्यांचें वारंवार स्मरण होणें साहजिक आहे. ॥ २९७ ॥

आतां श्री भारतीतीर्थ या ग्रंथांच्या अभ्यासाचें फल सांगून चालू असलेल्या प्रकरणाचा उपसंहार करितात—

**तृप्तिदीपमिमं नित्यं येऽनुसंदधते बुधाः ॥**
**ब्रह्मानंदे निमज्जंतस्ते तृप्यंति निरंतरम् ॥ ९८ ॥**

**अन्वयः**—ये बुधाः इमं तृप्तिदीपं नित्यं अनुसंधते ते ब्रह्मानन्दे निमज्जन्तः सन्तः निरंतरं तृप्यन्ति ।

**अर्थः—जे ज्ञानी या तृप्तिदीपाचें पठणपाठणादिकांच्या द्वारा सतत अनुसंधान करितात, ते ब्रह्मानन्दामध्यें निमग्न होत्साते निरंतर तृप्तीचा अनुभव घेतात. ॥ २९८ ॥**

**विवरणः**—या तृप्तिदीप नामक प्रकरणाच्या आरंभीं "आत्मानं चेद्विजानीयात्०" इत्यादि बृहदारण्यकोपनिषदांतील मंत्रांचें व्याख्यान करण्याकरितां त्या मंत्राचा उल्लेख केला. व त्याचें व्याख्यान करीत असतांना विचाराच्या सात भूमिकांचें सविस्तर वर्णन केलें. त्यांतीलच तृप्ति ही शेवटची भूमिका असून तिचाही वरील

श्लोकांत उपसंहार केला. व या शेवटच्या श्लोकांत या प्रकरणाचें सतत चिंतन करणास ब्रह्मानंदाची प्राप्ति–निरंतर तृप्ति,–हें फल सांगीतलें. तात्पर्य, या प्रकरणाचा अभ्यास आत्मसाक्षात्काराच्या उपयोगीं असल्यामुळें तो अवश्य करावा. व आत्म-साक्षात्कार हेंच परमसुखाचें, परम तृप्तीचें व परम पुरुषार्थाचें निमित्त आहे. ॥२९८॥

ह्याप्रमाणें श्रीभारतीतीर्थमुनिप्रणीत पंचदशीच्या उत्तरार्धांतील तृप्तिदीप नामक सातव्या प्रकरणाचें श्रीमच्छंकराचार्यभक्त विष्णु वामन बापटकृत सान्वयार्थविवरण समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

॥ श्रीः ॥

# कूटस्थदीपः ।



श्रीभारतीतीर्थ मुनींनीं पंचदशीच्या गेल्या सातव्या प्रकरणांत अज्ञानादि सात अवस्था चिदाभासाच्या आहेत, कूटस्थाच्या नव्हेत, असें सांगितलें. पण कूटस्थ कोण हें अजूनपर्यंत व्हावें तसें स्पष्ट झालेलें नाहीं. यास्तव तें स्पष्ट करण्याकरितां कूटस्थ व चिदाभास यांस भिन्न करून दाखवितात.—

**खादित्यदीपिते कुड्ये दर्पणादित्यदीप्तिवत् ॥**
**कूटस्थभासितो देहो धीस्थजीवेन भास्यते ॥ १ ॥**

अन्वयः—खादित्यदीपिते कुड्ये दर्पणादित्यदीप्तिवत् कूटस्थभासितः देहः धीस्थजीवेन भास्यते ।

अर्थः—खऱ्या सूर्यानें प्रकाशित केलेल्या भिंतीवर आरशांत प्रतिबिंबित झालेल्या सूर्याचें जसें किरण पडतें, त्याप्रमाणें कूटस्थानें प्रकाशित केलेला देह बुद्धिस्थ जीवाकडून प्रकाशित केला जातो. ॥ १ ॥

विवरणः—सूर्यनारायण उदय पावला असतां सर्व सृष्टि प्रकाशित होते, हें सर्वांस ठाऊक आहेच. सूर्याच्या प्रकाशानें आपल्या घरांतील भिंत सामान्यतः प्रकाशित झालेली असते, ह्मणजे तिच्यावर प्रकाश सर्वत्र पडलेला असतो. आणि इतक्यांत कोणी सूर्याचें प्रतिबिंब आरशांत घेऊन त्याचा प्रकाश घरांतील भींतीवर पाडल्यास ती पुनः अधिक प्रकाशित होते, हा दृष्टांत होय. याप्रमाणेंच कूटस्थ या भौतिक देहास प्रथमतः सामान्यरीत्या प्रकाशित करितो. दृष्टांतांतील भिंत, सूर्य, आरसा व प्रतिबिंब यांच्या स्थानीं दार्ष्टान्तिकांत क्रमानें देह, कूटस्थ, बुद्धि व चिदाभास हे आहेत. भिंतीस प्रकाशित करणारे जसे सूर्याचेच दोन प्रकाश आहेत त्याप्रमाणें देहास सचेतन करणारीं कूटस्थाचींच दोन्हीं चैतन्यें आहेत. या श्लोकांत केवल प्रतिज्ञा केली आहे व पुढें सर्व प्रकरणांत प्रतिज्ञात गोष्टीचेंच विस्तारपूर्वक व्याख्यान होणार आहे. ॥ १ ॥

" पण पूर्वोक्त दृष्टांत बरोबर नाहीं कारण तुह्मी सांगतां तसा दोन प्रकारचा प्रकाश भिंतीवर दिसत नाहीं. " असें कदाचित् कोणी ह्मणेल, ह्मणून ग्रंथकार ह्मणतात—

**अनेकदर्पणादित्यदीप्तीनां बहुसंधिषु ॥**
**इतरा व्यज्यते तासामभावेऽपि प्रकाशते ॥ २ ॥**

अन्वयः—अनेकदर्पणादित्यदीप्तीनां बहुसंधिषु इतरा व्यज्यते तथा तासां अभावे अपि प्रकाशते ।

अर्थः—अनेक आरशांत प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या दीप्तींच्या अनेक संधीमध्यें जशी मुख्य सूर्याची प्रभा भासते, तशीच ती पूर्वोक्त दीप्तींचा नाश झाल्यावरही भासते. ॥ २ ॥

विवरणः—अनेक दर्पणांतून वर्तुलाकार अनेक किरणें घरांतील भिंतीवर थोड्या अंतरानें पाडिलीं असतां, त्यांच्यामध्यें जी संधि असते, त्यांत सूर्याची सामान्य प्रभा दिसते. तसेंच अशा प्रकारचीं किरणें मुळींच न पाडल्यासही ती सूर्याची प्रभा भींतीवर सारखी पसरलेली असते. हा सर्व प्रकार थोड्याशा विचारानंतर कोणालाही समजण्यासारखा आहे. ॥ २ ॥

हा दृष्टान्तगत प्रकार दार्ष्टांतिकांच्या ठायीं योजून दाखवितातः—

**चिदाभासविशिष्टानां तथाऽनेकधियामसौ ॥**
**संधिं धियामभावं च भासयन् प्रविविच्यताम् ॥ ३ ॥**

अन्वयः—तथा चिदाभासविशिष्टानां अनेकधियां संधिं च धियां अभावं भासयन् असौ प्रविविच्यताम् ।

अर्थः—त्याप्रमाणें चिदाभासयुक्त अनेक बुद्धिवृत्तींची संधि व त्यांचा अभाव यांस भासविणारा हा कूटस्थ चिदाभासादिकांहून भिन्न आहे, असें समजावें. ॥ ३ ॥

विवरणः—एक वृत्तिज्ञान होऊन त्याचा लय होणें व दुसऱ्याची उत्पत्ति होणें यांच्यामध्यें जो कांहीं थोडासा काल जातो तो कूटस्थरूप होय. व तो जर नसता तर एक वृत्तिज्ञान नष्ट झालें व दुसरें उत्पन्न झालें, हें कधींच समजलें

नसतें. अर्थात् दृष्टांतगत संधींतील प्रकाशाप्रमाणें हा कूटस्थ आहे. जी भिंत सूर्याच्या प्रकाशानें प्रकाशित झालेली नसते, तिच्यावर जरी वर्तुलाकार किरणें पाडिलीं, तरी त्यांच्यामधील संधीचें ज्ञान होत नाहीं. हें सर्वांस ठाऊक आहे. ॥ ३ ॥

ह्याप्रमाणें देहांतील कूटस्थ व चिदाभास यांचा भेद दाखवितात:—

**घटैकाकारधीस्था चिद्घटमेवावभासयेत् ॥**
**घटस्य ज्ञातता ब्रह्मचैतन्येनावभासते ॥ ४ ॥**

अन्वयः—घटैकाकारधीस्था चित् घटं एव अवभासयेत् । घटस्य ज्ञातता तु ब्रह्मचैतन्येन अवभासते ।

अर्थः—केवल घटाकार झालेल्या बुद्धीमध्यें राहणारें चैतन्य केवल घटालाच प्रकाशित करितें. पण घटाची ज्ञातता ब्रह्मचैतन्याच्या योगानें भासते. ॥ ४ ॥

विवरणः—इंद्रियद्वारा वृत्तिरूपानें बाहेर पडून बुद्धि विषयरूप होते. व त्या बुद्धीमध्यें जो चिदाभास असतो, तो घटास व्यक्त करितो. त्यावांचून त्याला कांहींएक करितां येत नाहीं. पण ' मला घट समजला ' असें जें वाटत असतें, तें कोणाला ? या प्रश्नाचें उत्तर प्रस्तुत श्लोकाच्या उत्तरार्धांत आहे. ह्मणजे ' घट समजला ' असें जें वाटतें तें ब्रह्मचैतन्यामुळेंच होय. तात्पर्य ' हा घट ' असें जें ज्ञान होतें, तें चिदाभासामुळें व मला ' घटाचें ज्ञान झालें, ' ' मी घटास जाणलें ' असें जें ज्ञान होतें, तें घटाच्या कल्पनेचें अधिष्ठान जें ब्रह्म त्याच्यामुळें होय. अर्थात् त्यांचा हा विभाग स्पष्ट आहे. ॥ ४ ॥

वादीः—मग असें जर आहे, तर बुद्धि घटाकार होण्याच्या पूर्वींही घटकल्पनेच्या अधिष्ठानभूत ब्रह्माच्या योगानें घटाचें भान होण्यास काय हरकत आहे ? कारण ब्रह्मचैतन्य नित्य असल्यामुळें तें कोणत्याही वस्तूच्या कल्पनेचें सतत अधिष्ठान असणारच. सिद्धांतीः—असें नाहीं. कारण—

**अज्ञातत्वेन ज्ञातोऽयं घटो बुद्ध्युदयात्पुरा ॥**
**ब्रह्मणैवोपरिष्टात्तु ज्ञातत्वेनेत्यसौ भिदा ॥ ५ ॥**

अन्वयः—बुद्ध्युदयात् पुरा अयं घटः अज्ञातत्वेन ज्ञातः उपरिष्टात् तु ब्रह्मणा एव ज्ञातत्वेन ज्ञातः इति असौ भिदा ।

**अर्थः—बुद्धीचा उदय होण्यापूर्वी हा घट अज्ञातपणें ज्ञात होता, पण नंतर ब्रह्माच्या योगानें हा ज्ञातपणें ज्ञात झाला. असा यामध्यें भेद आहे. ॥ ५ ॥**

विवरणः—कोणत्याही पदार्थाचें भान होण्यापूर्वी तो पदार्थ अज्ञात असतो. व बुद्धिवृत्ति पदार्थाकार झाल्यावांचून त्याचें भान होत नाहीं. पण बुद्धिवृत्तीचा उदय होऊन ती पदार्थमय होईतों त्या पदार्थाचें ज्ञान नसतें. यालाच त्या पदार्थाचें अज्ञान ह्मणतात. व त्यालाही नित्य ब्रह्माचा आधार असतोच. कारण त्याच्या आधारावांचून मला अमुक पदार्थ दिसला नाहीं, असें समजणे अशक्य आहे. यास्तव वृत्तीच्या उदयापूर्वी कोणताही पदार्थ जसा अज्ञातपणें समजत असतो, तसाच तो वृत्त्युदयानंतर 'मला हा समजला.' अशा प्रकारें ज्ञातपणे समजतो. सारांश, ज्ञातता, व अज्ञातता हे दोन्ही धर्म ब्रह्मरूप अधिष्ठानावर राहातात. ॥ ५ ॥

पण एकाच घटाच्या ठायीं अज्ञातता व ज्ञातता असे दोन विरुद्ध धर्म कसे राहूं शकतात ? असें कोणी विचारील, ह्मणून प्रथमतः त्यांचें स्वरूप सांगतात—

**चिदाभासांतधीवृत्तिर्ज्ञानं लोहांतकुंतवत् ॥**
**जाड्यमज्ञानमेताभ्यां व्याप्तः कुंभो द्विधोच्यते ॥ ६ ॥**

अन्वयः—लोहांतकुंतवत् चिदाभासांतधीवृत्तिः ज्ञानं च जाड्यं अज्ञानं एताभ्यां व्याप्तः कुंभः द्विधा उच्यते ।

**अर्थः—लोखंडाच्या भाल्याच्या अग्राप्रमाणें चिदाभासापर्यंत जी बुद्धिवृत्ति तेंच ज्ञान व तिचें स्फूर्तिराहित्य हेंच अज्ञान होय. आणि यांच्या योगानें व्याप्त घट दोन प्रकारचा आहे, असें ह्मटलें जातें. ॥ ६ ॥**

विवरणः—बुद्धीमध्यें प्रतिबिंबित जें चैतन्य तोच चिदाभास होय. व तो आहे अग्रभागीं जिच्या अशा बुद्धीच्या वृत्तीस ज्ञान असें ह्मणतात. या ज्ञानास भाल्याचा दृष्टांत दिला आहे. ह्मणजे ज्ञानामध्यें भाल्याच्या तीक्ष्ण टोंकाप्रमाणें हा चिदाभास पुढें असतो व भाल्याच्या मागील काठीप्रमाणें बुद्धि असते. तसेंच भानाच्या विरोधी, अनादि, भावरूप व अनीर्वचनीय असें जें कांहीं आहे व जें सदा बुद्धीमध्येंही राहातें तें अज्ञान होय. अर्थात् अशा प्रकारचें ज्ञान व अज्ञान यांच्या योगानें व्यापून रहाणारा कोणताही पदार्थ दोन प्रकारचा आहे असें ह्मणतात. ॥ ६ ॥

पण असें असलें ह्मणून झालें काय ? त्यावरून घट ब्रह्मभास्य आहे, ह्मणजे ब्रह्म हें त्यास प्रकाशित करितें हें कसें सिद्ध होणार ? अज्ञात घटास तें प्रकाशित करितें असें जर ह्मटलेंत तर तें एक आह्मी क्षणभर मानूं. पण ज्ञात घटासही तें प्रकाशित करितें हें तुमचें ह्मणणें कसें योग्य ठरेल ? अशी कोणी शंका विचारील, ह्मणून ग्रंथकार ह्मणतातः—

**अज्ञातो ब्रह्मणा भास्यो ज्ञातः कुंभस्तथा न किम् ॥**
**ज्ञातत्वजननेनैव चिदाभासपरिक्षयः ॥ ७ ॥**

अन्वयः—अज्ञातः [ घटः यथा ] ब्रह्मणा भास्यः अस्ति तथा ज्ञातः कुंभः न किं ? यतः ज्ञातत्वजननेन एव चिदाभासपरिक्षयः भवति ।

**अर्थः—अज्ञात घट, जसा ब्रह्माकडून प्रकाशित होण्यास योग्य आहे तसा ज्ञात घट नाहीं का ? कारण त्याचें ज्ञातत्व उत्पन्न केल्यामुळेंच चिदाभासाचा सर्व प्रकारें क्षय होतो. ॥ ७ ॥**

विवरणः—' घट समजलेला नाहीं. ' हें जसें ब्रह्मास भासतें तसेंच ' तो समजला ' हें कां भासणार नाहीं ? ' अज्ञातसमयीं चिदाभासाचें कामच नसल्यामुळें त्या अवस्थेचें प्रकाशन ब्रह्म करितें पण ज्ञातसमयीं चिदाभासाची अवश्य आवश्यकता असल्यामुळें त्याच्याच योगानें पदार्थाच्या ज्ञातावस्थेचें ज्ञान होणें शक्य आहे ' असें जर ह्मणशील तर तें बरोबर नाहीं. कारण ज्ञाततेस उत्पन्न केल्यानेंच चिदाभासाचें सामर्थ्य नष्ट होत असतें. अथवा पदार्थाविषयींचें ज्ञान उत्पन्न करणें एवढेंच कायतें त्याचें काम असतें व त्यामुळें त्या ज्ञाततेचा प्रकाशक दुसराच कोणी असणें युक्त आहे. व तो हें ब्रह्मच होय. ॥ ७ ॥

आतां ज्ञातत्वरूप ज्ञान बुद्धीच उत्पन्न करीना, कारण अज्ञानता उत्पन्न करण्यास जसें अज्ञानच पुरें असतें, त्याप्रमाणें ज्ञानता उत्पन्न करण्यास बुद्धि पुरे आहे तिच्या साह्यास दुसरा आणखी चिदाभास कशास पाहिजे ? असें कोणी ह्मणेल, ह्मणून बुद्धि घटादिकांप्रमाणें जड असल्यामुळें चिदाभासाच्या साह्यावांचून ज्ञान उत्पन्न करूं शकत नाहीं—असें सांगतातः—

**आभासहीनया बुद्ध्या ज्ञातत्वं नैव जन्यते ॥**
**तादृग्बुद्धेर्विशेषः को मृदादेः स्याद्विकारिणः ॥ ८ ॥**

अन्वयः—आभासहीनया बुद्ध्या ज्ञातत्वं न जन्यते एव । तादृक् बुद्धेः मृदादेः विकारिणः कः विशेषः स्यात् ।

**अर्थः—चिदाभासहीन अशा बुद्धीकडून ज्ञातत्व उत्पन्न केलें जात नाहीं. तशा बुद्धीचा मृत्तिका इत्यादि विकारी पदार्थांहून विशेष तो कोणता ? ॥ ८ ॥**

**विवरण:**—केवल बुद्धि अनात्म वर्गामध्यें येत असल्यामुळें ती पाषाणाप्रमाणें जड आहे व त्यामुळें तिला कोणत्याही पदार्थांची ज्ञातता उत्पन्न करितां येत नाहीं. ह्मणजे केवल बुद्धीस ज्ञान होणें अशक्य आहे. यास्तव तिला चिदाभासाचें साह्य घेतल्यावांचून कोणत्याही पदार्थांचे ज्ञान होत नाहीं. तादृक् बुद्धेः—चिदाभा-रहित बुद्धि व मृत्तिका इत्यादि पदार्थ यांमध्यें भेद तो कोणता ? अर्थात् तीं दोन्ही सारखींच होत. ॥ ८ ॥

चिदाभासरहित बुद्धीनें पदार्थास जरी व्यापून सोडिलें, तरी त्यापासून—ज्ञातत्व उत्पन्न होत नाहीं, असें आतां दृष्टांत पूर्वक सांगतातः—

**ज्ञात इत्युच्यते कुंभो मृदा लिप्तो न कुत्र चित् ॥**
**धीमात्रव्याप्तकुंभस्य ज्ञातत्वं नेष्यते तथा ॥ ९ ॥**

अन्वयः—यथा मृदा लिप्तः कुंभः ज्ञातः इति कुत्रचित् न उच्यते यथा धीमात्र व्याप्तकुंभस्य ज्ञातत्वं नेष्यते ।

**अर्थः—ज्याप्रमाणें मातीनें लिंपलेला घट ‘ जाणला ’ असें कोठेंही कोणी ह्मणत नाहीं, त्याप्रमाणें केवळ बुद्धीकडून व्याप्त झालेल्या घटाच्या ठायीं ज्ञातत्व आहे, असें मानलें जात नाहीं. ॥ ९ ॥**

**विवरण:**—माती व बुद्धि हीं दोन्हीं सारखींच असें येथें दाखविलें आहे. ॥ ९ ॥

असो; आतां या ज्ञाताज्ञाततेचा उपसंहार करितातः—

**ज्ञातत्वं नाम कुंभेऽतश्चिदाभासफलोदयः ॥**
**न फलं ब्रह्मचैतन्यं मानात्प्रागपि सत्त्वतः ॥ १० ॥**

अन्वय:—अतः कुंभे ज्ञातत्वं नाम चिदाभासफलोदयः । मानात् प्राक् अपि सत्त्वतः ब्रह्मचैतन्यं न फलम् ।

**अर्थ:—यास्तव कुंभाच्या ठिकाणचें ज्ञातत्व ह्मणजे चिदाभासाच्या फलाचा उदय होय. पण प्रमाणाच्या पूर्वींही असल्यामुळें ब्रह्मचैतन्य फल नव्हे. ॥ १० ॥**

**विवरण:**—केवळ बुद्धिजड असल्यामुळें तिच्यामध्यें ज्ञातत्व या धर्मास उत्पन्न करण्याची शक्ति नसते; असें पूर्वी सांगितलेंच आहे. यास्तव ज्ञातव्य ह्मणजे काय तें आतां सांगतात. चिदाभास हेंच प्रमाणाचें फल होय. व त्याचा उदय होणें ह्मणजेच घटादि पदार्थांच्या ठिकाणची ज्ञातता ( जाणणेंपणा ) उत्पन्न होणें होय. **वादी:**—अहो, पण सर्व स्फूर्तींचें अधिष्ठान जें ब्रह्म, तेंच प्रमाणफल होय असें ह्मट-ल्यास काय बिघडेल ? **सिद्धान्ती:**—ब्रह्मचैतन्य तर प्रमाणाच्या उत्पत्ति पूर्वींही असतें तेव्हां त्यास फल कसें ह्मणतां येईल? प्रमाणाच्या प्रवृत्तीनंतर फल उत्पन्न होत असतें असा नियम आहे. यास्तव ब्रह्मचैतन्य फल नव्हे. ॥ १० ॥

**वादी:**—पण हें तुमचें ह्मणणें सुरेश्वराचार्यांच्या एका वार्तिकाविरुद्ध आहे. कसें ह्मणून ह्मणाल तर पहा; त्यांचें वार्तिक येणेंप्रमाणें आहे.—

**परागर्थप्रमेयेषु या फलत्वेन संमता ॥**
**संवित्सैवेह मेयोऽर्थो वेदांतोक्तिप्रमाणतः ॥ ११ ॥**

**अन्वय:**—परागर्थप्रमेयेषु या संवित् फलत्वेन संमता सा एव इह वेदान्तोक्ति-प्रमाणतः मेयः अर्थः अस्ति ।

**अर्थ:—बाह्य पदार्थ प्रमेय झाले असतां संवित् फल भावानें संमत आहे तीच या स्थळीं वेदान्तवाक्यरूप प्रमाणाच्या योगानें मेय विषय आहे. ॥ ११ ॥**

**विवरण:—परागर्थप्रमेयेषु:**—आत्मा पराक् अर्थ असल्यामुळें अनात्मजात प्रत्यक् अर्थ होय. अर्थात् बुद्धि घटादि जेवढे ह्मणून जड पदार्थ आहेत, तेवढे सर्व परागर्थ आहेत. प्रमेय ह्मणजे प्रमाणांचा विषय, यास्तव या सर्व पदांचा प्रत्य-गर्थरूप प्रमाण विषयांमध्यें ह्मणजे त्या त्या पदार्थांच्या योगानें मर्यादित झालेल्या

चैतन्यामध्यें असा अर्थ होतो. अशा प्रकारच्या चैतन्यामध्यें जी संवित् ( चिति ) फलरूपत्वानें ( प्रमाणफल चैतन्यत्वानें ) सर्व विद्वानांस मान्य आहे, तीच या अद्वैतशास्त्रामध्यें ' प्रमितीचा विषय ' होय. हा श्लोक पारिभाषिक असल्यामुळें अति कठिण आहे. यास्तव प्रमेयादिकांविषयीं येथें थोडीशी अधिक माहिती देणें अवश्य आहे.

शरीरामध्यें राहणारा, सर्व शरीरास व्यापून टाकणारा व सूक्ष्मपंचभूतापासून होणारा, असा जो अविद्येचा विवर्तनामक परिणाम त्यासच अंतःकरण असें ह्मणतात. तो आरशाप्रमाणें अति स्वच्छ असतो. नेत्रादि इंद्रियाच्या द्वारा बाहेर पडून व घटादि योग्य पदार्थांस व्यापून तो त्या त्या पदार्थांच्या आकाराचा होतो. सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें त्याचा एकदम संकोच व विकास होत असतो. हा अविद्येचा विवर्तसंज्ञक परिणाम सावयव असल्यामुळें देहांत, पदार्थांचे ठायीं, व देह आणि विषय यांच्या मध्येंही रहातो. त्यांतील देहामध्यें राहणाऱ्या अहंकारसंज्ञक अंतःकरणाच्या भागास कर्ता ह्मणतात. देह व विषय यांच्या मध्यें राहणाऱ्या भागास वृत्तिज्ञान किंवा क्रिया ह्मणतात. आणि जो भाग विषयास व्यापून रहातो त्यास अभिव्यक्तियोग्यता म्हणतात. हिच्या योगानेंच विषयज्ञानाचें कर्म होतें. अभिव्यक्ति होते व तें स्वच्छ अंतःकरणांत प्रगट झालेलें चैतन्य जरी वस्तुतः एकच असतें तरी त्यास प्रगट करणारें अंतःकरण त्रिविध असल्यामुळें तेंही तीन प्रकारचें होतें. आणि कर्तृसंज्ञक अंतःकरणयुक्त चैतन्य प्रमाता, क्रियासंज्ञक अंतःकरणयुक्त चैतन्य प्रमाण व विषयगत अभिव्यक्तियोग्यतासंज्ञक अंतःकरणयुक्त चैतन्य प्रमिति होय. विषयगत ब्रह्मचैतन्यास प्रमेय ह्मणतात, तेंच अज्ञान होय. ज्ञान झालें असतां तेंच फल होतें. सारांश, ब्रह्मचैतन्यच अधिष्ठान असल्यामुळें तेंच ज्ञानत्व या उपाधियुक्त झालें असतां फल होतें हें निर्विवाद आहे. आणि "गाय आण" एवढीच ज्याला गुरूनें आज्ञा केली आहे अशा एकाद्या शिष्यानें पांढऱ्या रंगाची गाय आणल्यास ' तूं पांढरी गाय कां आणलीस ' असें ह्मणून गुरु त्याच्यावर रागावत नाहीं, असा अनुभवही आहे. तस्मात् विशिष्ट पदार्थ शुद्ध पदार्थाहून भिन्न नसतो असें ठरतें व त्यामुळें वाणी व मन यांस गोचर न होणाऱ्या ब्रह्माच्या ठायीं, जिज्ञासूच्या बुद्धीचा प्रवेश होत नसल्यामुळें त्याच्यावर अनुग्रह करण्याकरितां हें वार्तिक प्रवृत्त झालें आहे. पण हा खरा प्रकार संप्रदायशून्य असलेल्या वाद्यास समजला नाहीं. व त्यामुळें त्यानें

प्रस्तुत वार्तिकांत 'ब्रह्मचैतन्यच फल होय.' असें ह्मटलें आहे—असें समजून त्याच्याशीं पूर्व श्लोकाचा विरोध आहे असें या श्लोकांत सांगितलें. ॥ ११ ॥

पूर्वोक्त वार्तिकाचें तात्पर्य काय आहे तें आतां सांगतात:—

**इति वार्तिककारेण चित्सादृश्यं विवक्षितम् ॥**
**ब्रह्मचित्फलयोर्भेदः साहस्र्यां विश्रुतो यतः ॥ १२ ॥**

अन्वय:—इति वार्तिककारेण चित्सादृश्यं विवक्षितम् । यतः साहस्र्यां ब्रह्मचित्फलयो: भेदः विश्रुतः आस्ति ।

अर्थ:—या वार्तिकांत वार्तिककारांना केवल चैतन्याचें सादृश्य विवक्षित आहे. कारण उपदेशसाहस्रीमध्यें ब्रह्मचैतन्य व फल यांचा भेद स्पष्टपणें सांगितलेला आहे. ॥ १२ ॥

विवरण:—प्रस्तुत वार्तिकांत चैतन्याचें सादृश्य असतें, एवढेंच सुरेश्वराचार्यांस सांगावयाचें आहे असें ह्मणावें लागतें. कारण, श्रीमच्छंकराचार्यांनीं उपदेशसाहस्रीच्या चवदाव्या प्रकरणांत ब्रह्मचैतन्य व फलचैतन्य यांचा भेद स्पष्टपणें सांगितला आहे. त्यामुळें सुरेश्वरांचार्यांचें वार्तिक भाष्यकाराच्या मताविरुद्ध आहे. त्यामुळें असें मानण्यापेक्षां त्याची पूर्वोक्त प्रकारें व्यवस्था लावणें सयुक्तिक होय. ॥ १२ ॥

ज्या अर्थी असा प्रकार आहे,

**आभास उदितस्तस्माज्ज्ञातत्वं जनयेद्घटे ॥**
**तत्पुनर्ब्रह्मणाभास्यमज्ञातत्ववदेव हि ॥ १३ ॥**

अन्वय:—तस्मात् उदितः आभासः घटे ज्ञातत्वं जनयेत् तत्पुनः अज्ञातत्ववत् एवं हि ब्रह्मणा आभास्यम् ।

अर्थ:—त्या अर्थी उत्पन्न झालेला आभास घटाच्या ठायीं ज्ञातता उत्पन्न करील व ती ज्ञातता अज्ञाततेप्रमाणेंच ब्रह्माकडून प्रकाशित होण्यास योग्य आहे. ॥ १३ ॥

**विवरण:**—सूर्य प्रकाशाचें साह्य घेऊन प्रवृत्त झालेल्या नेत्रांच्या द्वारा पदार्थाशीं संयुक्त होऊन घटाकार झालेली बुद्धिवृत्ति पदार्थाविषयींची ज्ञातता उत्पन्न करील. व ब्रह्म पूर्वी जसें त्याच्या अज्ञाततेस प्रकाशित करीत होतें, त्याप्रमाणेंच नंतर त्यांच्या ज्ञाततेसही प्रकाशित करील. कारण जें जें पुढें येईल तें तें दीपाप्रमाणें प्रकाशित करणें एवढेंच ब्रह्मचैतन्याचें काम आहे. ॥ १३ ॥

ह्याप्रमाणें ब्रह्म व चिदाभास यांच्यामधील भेद दाखवून आतां त्यांचे विषय भिन्न असल्यामुळेंही ते भिन्न आहेत असें दाखवितात:—

**धीवृत्त्याभासकुंभानां समूहो भास्यते चिता ॥**
**कुंभमात्रफलत्वात्स एक आभासतः स्फुरेत् ॥ १४ ॥**

**अन्वय**—चिता धीवृत्त्याभासकुंभानां समूहः भास्यते । कुंभमात्रफलत्वात् आभासतः सः एकः एव स्फुरेत् ।

**अर्थ:**—चैतन्याकडून बुद्धिवृत्ति, आभास व घट यांचा समुदाय प्रकाशित केला जातो, पण चिदाभासास केवल कुंभनिष्ठ फलता असल्यामुळें आभासाच्या योगानें त्याचें एकट्याचेंच स्फुरण होतें. ॥ १४ ॥

**विवरण:**—प्रमाणजन्य मनोवृत्ति, प्रमाणफलसंज्ञक त्यांतील चिदाभास व विषयभूत कोणताही पदार्थ यांच्या समूहास पदार्थाच्या अधिष्ठानभूत चैतन्य प्रकाशित करितें असा अबाधित अनुभव आहे व त्यामुळेंही ब्रह्म व चिदाभास यांचा भेद व्यक्त होतो. आतां ब्रह्मचैतन्याची काय जरूर आहे, एकटा चिदाभासच विषयास व्यक्त करितो, असें ह्मटल्यास कोणती हानि आहे ? असें जर विचारशील तर सांगतों—चिदाभास केवल त्या त्या पदार्थावर रहाणारा ( फलरूप ) असल्यामुळें त्याच्या योगानें केवल तो तो पदार्थ मात्र भासेल, पूर्वोक्त अनुभवानें वृत्त्यादिकांचा समुदाय भासणार नाहीं. ॥ १४ ॥

पूर्व श्लोकांत सांगितल्याप्रमाणें कोणताही पदार्थ ब्रह्म व चिदाभास या उभयतांच्या योगानेंही प्रकाशित होतो असें मानण्यास काय प्रमाण आहे ? असें कोणी विचारील ह्मणून ग्रंथकार ह्मणतात:—

**चैतन्यं द्विगुणं कुंभे ज्ञातत्वेन स्फुरत्यतः ॥**
**अन्येऽनुध्यवसायाख्यमाहुरेतद्यथोदितम् ॥ १५ ॥**

अन्वयः—यतः कुंभः ज्ञातत्वेन स्फुरति अतः कुंभे द्विगुणं चैतन्यं अस्ति । अन्ये यथोदितं एतत् अनुव्यवसायाख्यं आहुः ।

**अर्थः—ज्या अर्थी 'मी घटज्ञानवान् आहें' असें स्फुरण होतें, त्या अर्थी घटाच्या ठायीं दुप्पट चैतन्य आहे असें ठरतें. या पूर्वोक्त ज्ञाततेस नैयायिक अनुव्यवसाय ह्मणतात. ॥ १५ ॥**

विवरणः—घट हा पदार्थ या स्थळीं उदाहरणार्थ घेतला आहे. 'मी घटज्ञानवान् आहें' या वाक्यांत दोनप्रकारचें चैतन्य कसें आहे, हें पुढच्या श्लोकांतच स्पष्ट होणार आहे. या स्थळीं एवढेंच सांगावयाचें आहे कीं न्यायशास्त्रांतील अनुव्यवसाय व या शास्त्रांतील ब्रह्मचैतन्य हीं दोन्ही एकच आहेत. अनुव्यवसाय ह्मणजे मागून होणारा शब्द व्यवहार. मी घटत्वानें घटास जाणतों हें त्याचें उदाहरण होय. हें एक प्रत्यक्षादिकांहून भिन्न ज्ञात आहे असें ते मानितात. ॥ १५ ॥

पूर्वोक्त अर्थच उदाहरणानें स्पष्ट करितात—

**घटोऽयमित्यसावुक्तिराभासस्य प्रसादतः ॥**
**विज्ञातो घट इत्युक्तिर्ब्रह्मानुग्रहतो भवेत् ॥ १६ ॥**

अन्वयः—आभासस्य प्रसादतः 'अयं घटः' इति उक्तिः भवति तथा 'घटः विज्ञातः' इति उक्तिः ब्रह्मानुग्रहतः भवेत् ।

**अर्थः—चिदाभासाच्या प्रसादामुळें 'हा घट' असें बोलतां येतें तसेंच ब्रह्माच्या कृपेमुळें 'घट जाणला' असें ह्मणतां येतें. ॥ १६ ॥**

विवरणः—आभासस्य–प्रमितियुक्त चिदाभासामुळें 'हा घट' असें व ब्रह्मा०–घटाच्या अधिष्ठानभूत ब्रह्मचैतन्यामुळें 'घट जाणला' असें ह्मणतां येतें. अर्थात् घटज्ञानास दोघांचीही गरज आहे. ॥ १६ ॥

देहाच्या बाहेर ब्रह्म व चिदाभास यांचा विवेक कसा करितां येतो तें गेल्या तेराव्या श्लोकांत दाखविलें व आतां त्याच रीतीनें देहांतील कूटस्थ व चिदाभास यांचा विवेक करावा असें सांगतात—

**आभासब्रह्मणी देहाद्बहिर्यद्वद्विवेचिते ॥**
**तद्वदाभासकूटस्थौ विविच्येतां वपुष्यपि ॥ १७ ॥**

अन्वयः---यद्वत् देहात् बहिः आभासब्रह्मणी विवेचिते तद्वत् आभासकूटस्थौ वपुषि अपि विविच्येताम् ।

**अर्थः---ज्याप्रमाणें देहाच्या बाहेर आभास व ब्रह्म यांचा विवेक केला त्याप्रमाणेंच देहामध्येंही आभास व कूटस्थ यांचा विवेक करावा. ॥ १७ ॥**

**विवरणः**---या प्रकरणाच्या आरंभीं सूर्यप्रभेचा दृष्टांत देऊन कूटस्थ व चिदाभास यांचें विवेचन जरी सामान्यतः केलें आहे, तरी देहादि पांच कोशांशीं त्यांचें तादात्म्य झाल्यासारखें वाटत असल्यामुळें त्याचा पूर्णपणें विवेक होणेंच इष्ट आहे. कारण त्यावांचून आत्मा व अनात्मा यांचें ज्ञान निःसंशय होणें शक्य नाहीं. ह्मणून पुनरपि कूटस्थाचेंच विवेचन विशेषरीत्या चालविलें आहे. ॥ १७ ॥

चिदाभास देहाच्या बाहेरील घटादि पदार्थांस जसा व्यापून राहातो तसाच तो आंतील पदार्थांसही व्यापून असतो, असें आतां सांगतात---

**अहंवृत्तौ चिदाभासः कामक्रोधादिकासु च ॥**
**संव्याप्य वर्तते तप्ते लोहे वह्निर्यथा तथा ॥ १८ ॥**

अन्वयः---तप्ते लोहे यथा वह्निः तथा अहंवृत्तौ च कामक्रोधादिकासु चिदाभासः संव्याप्य वर्तते ।

**अर्थः---तापलेल्या लोखंडामध्यें जसा अग्नि व्यापून राहतो, तसा अहंवृत्ति व काम क्रोधादिक यांच्यामध्यें चिदाभास संपूर्णपणें व्यापून राहातो. ॥ १८ ॥**

**विवरणः**---देहाच्या बाहेरील पदार्थ स्पष्टपणें भासत असल्यामुळें त्यांना व्यापून राहणाऱ्या चिदाभासाचा जरी स्वीकार करितां आला, तरी देहाच्या आंत मुळीं पदार्थच नसल्यामुळें त्यांना व्यापणाऱ्या चिदाभासाचा कसा अंगीकार करितां येईल ? असें कोणी अविवेकी ह्मणेल ह्मणून देहाच्या आंतील पदार्थांचा निर्देश करून या श्लोकांत सदृष्टांत विवेचन केलें आहे. अहंकार, काम, क्रोध, लोभ, मोह, इत्यादि सर्व मनोमय भावांस चिदाभास व्यापून सोडतो. तो कसा व्यापितो तें स्पष्टपणें सम-

जावें ह्मणून येथें लोखंडांतील अग्नीचा दृष्टांत दिला आहे. ह्मणजे तापून लाल झालेल्या लोखंडांत जसा अग्नि सर्वत्र व्यापून राहातो, त्याप्रमाणें हा चिदाभास अहंकारादि मनोमयवृत्तीमध्यें व्यापून असतो. ॥ १८ ॥

चिदाभासास लोखंडाचा दृष्टांत आणखी एका सादृश्यावरुनही दिलेला आहे. कोणत्या ह्मणून विचाराल तर सांगतोः—

**स्वमात्रं भासयेत्तप्तं लोहं नान्यत्कदाचन ॥**
**एवमाभाससहिता वृत्तयः स्वस्वभासिकाः ॥ १९ ॥**

अन्वयः—तप्तं लोहं स्वमात्रं भासयेत् अन्यत् कदाचन न । एवं आभाससहिताः वृत्तयः स्वस्वभासिकाः सन्ति ।

**अर्थः—तापलेलें लोखंड आपणास मात्र भासवितें दुसऱ्या कोणासही कधींच भासवीत नाहीं. त्याचप्रमाणें आभासयुक्त वृत्ति आपणांस मात्र भासविणाऱ्या आहेत. ॥ १९ ॥**

विवरणः—काळोखांत एकादा तापून लाल झालेला लोखंडाचा गोळा ठेवून पहावें, ह्मणजे तो आपणांस मात्र प्रकाशित करीत असतो व थोड्या अंतरावर असलेल्या दुसऱ्या कोणत्याच पदार्थास प्रकाशित करीत नाहीं असें अनुभवास येतें. त्याचप्रमाणें प्रत्येक वृत्ति आभासयुक्त झाली असतां आपल्या स्वरूपास मात्र प्रकाशित करिते. आभासयुक्त एका वृत्तीस दुसऱ्या वृत्तीचें ज्ञान होत नाहीं. ॥ १९ ॥

ह्याप्रमाणें गेल्या दोन श्लोकांत देहांतील चिदाभासाचें स्वरूप सांगून आतां कूटस्थाचें निरूपण करण्याकरितां त्याला व्यक्त करणारी जी दोन वृत्तींच्या मधील वृत्त्यभावरूप अवस्था ती प्रथम दाखविली पाहिजे, असें समजून या श्लोकांत अगोदर वृत्तींची उत्पत्ति व लय कसा होतो, तें सांगतातः—

**क्रमाद्विच्छिद्य विच्छिद्य जायंते वृत्तयोऽखिलाः ॥**
**सर्वा अपि विलीयंते सुप्तिमूर्च्छासमाधिषु ॥ २० ॥**

अन्वयः—अखिलाः वृत्तयः क्रमात् विच्छिद्य विच्छिद्य जायन्ते । तथा ताः सर्वाः अपि सुप्तिमूर्च्छासमाधिषु विलीयन्ते ।

अर्थः—सर्व वृत्ति क्रमानें वारंवार विच्छिन्न होऊन उत्पन्न होतात व तशाच त्या सर्वही सुषुप्ति, मूर्च्छा व समाधि या अवस्थांमध्यें लीन होतात. ॥ २० ॥

विवरणः—एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत ह्मणजे एका अहोरात्रांत अथवा आठ प्रहरांत मनामध्यें किती वृत्ति उत्पन्न होतात, व किती नाश पावतात याचें गणित करणें अशक्य आहे. पण एकाच कालीं अनेक वृत्ति उत्पन्न होऊं शकत नाहींत. तर प्रत्येक वेळीं क्रमानें एक एक वृत्तीच मनामध्यें उठत असते. यास्तव या श्लोकांत " सर्व वृत्ति वारंवार विच्छिन्न होऊन उत्पन्न होतात " असें ह्मटलें आहे. अर्थात् पूर्ववृत्तीचा लय झाल्यावांचून उत्तरवृत्तीचा उदय होत नाहीं. तसेंच पूर्वोक्त आठ प्रहरांतील जो काल सुषुप्ति, मूर्च्छा किंवा समाधि या अवस्थांत जातो, तेवढ्या-पुरत्या त्या सर्वही वृत्ति लीन होऊन रहातात. तस्मात् एका वृत्तीचा लय होऊन दुसऱ्या वृत्तीचा उदय होईतों व सुषुप्ति इत्यादिक अवस्थांमध्यें जो काल जातो त्यांत वृत्तींचा अभाव असतो, असें ठरतें. ॥ २० ॥

वृत्तीचा अभाव केव्हां असतो, तें मागच्या श्लोकांत सांगितलें व आतां त्यावरून कूटस्थाचें ज्ञान कसें होतें, तें सांगतात—

**संधयोऽखिलवृत्तीनामभावाश्चावभासिताः ॥**
**निर्विकारेण येनासौ कूटस्थ इति चोच्यते ॥ २१ ॥**

अन्वयः—येन निर्विकारेण अखिलवृत्तीनां संधयः च अभावाः अवभासिताः असौ कूटस्थः इति उच्यते ।

**अर्थः—ज्या निर्विकार आत्म्याकडून सर्व वृत्तींच्या संधी व अभाव प्रकाशित केले जातात तो कूटस्थ होय असें ह्मणतात. ॥ २१ ॥**

**विवरणः—अमुक वेळीं माझी अमुक वृत्ति लीन झाली व त्यानंतर अमुक वेळानें माझ्या मनांत ही अमुक वृत्ति उत्पन्न झाली, असें ज्याच्या योगानें समजतें, व त्याचप्रमाणें सुषुप्ति इत्यादि अवस्थेमध्यें सर्व वृत्तींचा अभाव आहे असें ज्याच्यामुळ निश्चयपूर्वक कळतें आणि वृत्तीमध्यें कसाही जरी फरक झाला तरी त्यामुळें ज्याच्या स्वरूपांत कधींही फरक पडत नाहीं, तो कूटस्थ होय. ॥ २१ ॥**

असो; वस्तुस्थिति अशी असल्यामुळें—

**घटे द्विगुणचैतन्यं यथा बाह्ये तथांऽतरे ॥**
**वृत्तिष्वपि ततस्तत्र वैशद्यं संधितोऽधिकम् ॥ २२ ॥**

अन्वयः—यथा बाह्ये घटे द्विगुणं चैतन्यं तथा आंतरे वृत्तिषु अपि । ततः सन्धितः तत्र अधिकं वैशद्यं दृश्यते ।

अर्थः—ज्याप्रमाणें बाह्य घटादि पदार्थांच्या ठायीं दुप्पट चैतन्य असतें त्याचप्रमाणें तें आंतील वृत्तींमध्येंही असतें. त्यामुळें त्यांच्यामध्यें संधीहून अधिक निर्मलता दिसते. ॥ २२ ॥

विवरणः—बाह्य पदार्थांच्या ठायीं केवळ त्या पदार्थांस भासविणारा चिदाभास व त्याच्या ज्ञाततेस भासविणारें ब्रह्मचैतन्य असें दोन प्रकारचें चैतन्य असतें असें पूर्वी सांगितलें आहे. व त्याचप्रमाणें अहंकारादि आंतील वृत्तीमध्येंही तें असतें असा येथें उल्लेख केला आहे. पण आंतरवृत्तीमध्यें वृत्तीचा अवभासक चिदाभास व कूटस्थ चैतन्य असतें. सर्व वृत्तिज्ञानांमध्यें असें दोन प्रकारचें चैतन्य असल्यामुळें त्यांचा प्रकाश वृत्तीच्या अभावापेक्षां अधिक स्पष्ट होतो. एकाद्या मोठ्या खोलींत एका दिव्याचा जितका उजेड पडतो, त्याच्याहून दोन दिव्यांचा अधिक पडेल हें उघडच आहे. सारांश, वृत्तींची संधि व अभाव यांचें प्रकाशन एकट्या कूटस्थासच करावयाचें असल्यामुळें त्याचा वृत्तिप्रमाणें स्पष्ट प्रत्यय येत नाहीं, तर तो अस्पष्ट असतो. ॥ २२॥

घटादि बाह्य पदार्थांच्या ठायीं जशी अज्ञातता व ज्ञातता असते, त्याप्रमाणेंच ती वृत्तींच्या ठिकाणींही असते व कूटस्थ त्याचा अवभासक आहे असें ह्मणण्यास काय हरकत् आहे असें कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार सांगतात—

**ज्ञातताज्ञातते न स्तो घटवद्वृत्तिषु क्वचित् ॥**
**स्वस्य स्वेनागृहीतत्वात्ताभिश्चाज्ञाननाशनात् ॥ २३ ॥**

अन्वयः—स्वस्य स्वेन अगृहीतत्वात् च ताभिः अज्ञाननाशनात् घटवत् वृत्तिषु ज्ञातताज्ञातते क्वचित् न स्तः ।

अर्थः—आपलें आपल्याकडूनच ग्रहण होत नसल्यामुळें व त्यांच्याकडू अज्ञानाचा नाश होत असल्यामुळें घटाप्रमाणें वृत्तींच्या ठायीं ज्ञातता अज्ञातता कधींच नसते. ॥ २३ ॥

विवरण:—ज्ञान व अज्ञान हीं ज्या पदार्थांस व्यापूं शकतात त्यांच्याच ठायींज्ञातत व अज्ञातता हे धर्म येतात. घटादि पदार्थ ज्ञान व अज्ञान यांनीं व्याप्त असल्यामुळे त्यांच्याठायीं जरी हे धर्म येत असले तरी ते वृत्तींच्या ठायीं येऊं शकत नाहींत. कारण वृत्ति स्वप्रकाश असल्यामुळें त्यांना ज्ञान व्यापूं शकत नाहीं. व त्यांची उत्पत्ति होतांच त्यांच्याविषयींचें अज्ञान नष्ट होत असल्यामुळें त्यांना अज्ञानही व्यापीत नाहीं. ॥ २३ ॥

वादीः—चिदाभास व कूटस्थ या दोघांच्याही ठिकाणीं जर स्वप्रकाशता हा धर्म सारखाच आहे, तर एक कूटस्थ व दुसरा विकारी असें कसें ह्मणतां येईल? समाधान-

द्विगुणीकृतचैतन्ये जन्मनाशानुभूतितः ॥
अकूटस्थं तदन्यत्तु कूटस्थमविकारतः ॥ २४ ॥

अन्वयः—द्विगुणीकृतचैतन्ये जन्मनाशानुभूतितः तत् अकूटस्थं अन्यत् तु अविकारतः कूटस्थम् ।

अर्थः—दुप्पट केलेल्या चिदाभासरूप चैतन्यामध्यें जन्म व नाश यांचा अनुभव येत असल्यामुळें तें अकूटस्थ व दुसरें निर्विकार असल्यामुळें तें कूटस्थ होय. ॥ २४ ॥

विवरणः—घटादि पदार्थयुक्त झाल्यामुळें पूर्वोक्तरीत्या दुप्पट केलें आहे चैतन्य ज्यानें अशा चिदाभासामध्यें जन्म व नाश यांचा अनुभव येतो. ह्मणजे स्वप्न, व जागृति या अवस्थेंत चिदाभास उत्पन्न होत असतो व सुषुप्ति, समाधि इत्यादि अवस्थेंत त्याचा नाश होतो, असें प्रत्यही अनुभवास येतें. यास्तव तें चिदाभासरूप चैतन्य विकारी होय. पण साक्षिचैतन्याचा ह्याप्रमाणें उत्पत्तिविनाशरूप विकार कधींच प्रत्यक्षास येत नसल्यामुळें तें कूटस्थ चैतन्य होय. ॥ २४ ॥

हें ह्मणणें संप्रदायास सोडून आहे, असें कोणास वाटेल ह्मणून ग्रंथकार ह्मणतात:-

अंतःकरणतद्वृत्तिसाक्षीत्यादावनेकधा ॥
कूटस्थ एव सर्वत्र पूर्वाचार्यैर्विनिश्चितः ॥ २५ ॥

अन्वयः—अंतःकरणतद्वृत्तिसाक्षीत्यादौ अनेकधा पूर्वाचार्यैः सर्वत्र कूटस्थः एव विनिश्चितः अस्ति ।

अर्थः—' अंतःकरण तद्वृत्ति० ' इत्यादि वचनांतून अनेक प्रकारें पूर्वीच्या आचार्यांनीं सर्वत्र कूटस्थाचाच निश्चय केला आहे. ॥ २५ ॥

विवरणः—कूटस्थाविषयीं येथें जें प्रतिपादन केलेलें आहे, तें संप्रदायास सोडून नाहीं. कारण श्रीमच्छंकराचार्यांचें बृहद्वाक्यवृत्तींत असें वाक्य आहेः—अंतःकरण-तद्वृत्तिसाक्षी चैतन्यविग्रहः । आनंदरूपः सत्यः सन् किं नात्मानं प्रपद्यसे ॥ १ ॥ याचें तात्पर्य—अंतःकरण व त्याच्या वृत्ति यांचा साक्षी, चैतन्याकार, आनंदरूप व सत्य असतांना तूं आत्म्यास कां जाणत नाहींस ? सारांश, पूर्वाचार्यांच्या या व अशाच प्रकारच्या दुसऱ्या अनेक वाक्यांवरूनही कूटस्थाची सिद्धि होत आहे. ॥ २५ ॥

कूटस्थाप्रमाणें पूर्वाचार्यांनीं चिदाभासाचें वर्णनही केलें आहे, असें आतां सांगतात—

आत्माभासाश्रयाश्चैवं मुखाभासाश्रया यथा ॥
गम्यंते शास्त्रयुक्तिभ्यामित्याभासाश्च वर्णितः ॥ २६ ॥

अन्वयः—यथा मुखाभासाश्रयाः एवं आत्माभासाश्रयाः शास्त्रयुक्तिभ्यां गम्यन्ते । इति आभासः वर्णितः ।

अर्थः—ज्याप्रमाणें मुख, प्रतिबिंब, व आश्रय ( आरसा ) हे तीन पदार्थ प्रत्यक्ष दिसतात त्याप्रमाणें आत्मा, आभास व आश्रय (बुद्धि) हे तीन पदार्थ शास्त्र व युक्ति यांच्या योगानें समजतात. अशा प्रकारें आभासाचेंही वर्णन केलें आहे. ॥ २६ ॥

विवरणः—श्रीमच्छंकराचार्यांच्या उपदेशसाहस्रींत प्रस्तुत श्लोक आहे. पण ग्रंथकारांनीं मूळ श्लोकाचा " आभासासत्त्वमेव च " हा चवथा चरण काढून त्याच्या जागीं " इत्याभासश्च वर्णितः " हा घातला आहे. ह्मणजे या श्लोकाचे पहिले

तीन चरण उपदेशसाहस्रींतीलच आहेत. आरशामध्यें मुख दिसलें असतां मुख, त्याचें प्रतिबिंब व आरसा ह्या तीन पदार्थांची भावना होते, हें प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणेंच कूटस्थ, चिदाभास व अंतःकरणादि आश्रय यांची शास्त्र व युक्ति यांच्या योगानें सिद्धि होते. असा या श्लोकाचा तात्पर्यार्थ असून त्यावरून आचार्यांनाहीं चिदाभास मान्य होता, असें ठरतें. ॥ २६ ॥

ह्याप्रमाणें चिदाभासाची सिद्धि झाली असतां त्याविषयीं कोणी वाचस्पतिमतानुयायी शंका घेत आहे—

**बुद्ध्यवच्छिन्नकूटस्थो लोकांतरगमागमौ ॥**
**कर्तुं शक्तो घटाकाश इवाभासेन किं वद ॥ २७ ॥**

अन्वयः—घटाकाशः इव बुद्ध्यवच्छिन्नकूटस्थः लोकान्तरगमागमौ कर्तुं शक्तः अतः आभासेन किं वद ।

**अर्थः—घटाकाशाप्रमाणें बुद्धीच्या योगानें परिच्छिन्न झालेला कूटस्थ अन्य लोकीं जाणें व येणें हीं करण्यास समर्थ आहे, तेव्हां आभासाचा काय उपयोग ? सांग. ॥ २७ ॥**

विवरणः—व्यापी कूटस्थाच्या ठिकाणीं बुद्धीची कल्पना होते. व नंतर कूटस्थाचा जेवढा भाग बुद्धीमध्यें येतो तेवढ्या भागास बुद्ध्यवच्छिन्न असें ह्मणतात. याला प्रस्तुत श्लोकांतील घटाकाशाचाच दृष्टांत घ्यावा. व्यापी आकाशाचा जेवढा भाग घटामध्यें येतो तेवढ्यास घटाकाश असें ह्मणतात. व तें घटकाश आपल्या उपाधिबरोबर राहून अनेक क्रिया करितें. त्याच्या घटरूप उपाधीस कोठें कोणी नेऊं लागलें असतां तेंही त्याच्याबरोबर जातें. त्यास पाण्यांत बुडविलें असतां तेंही बुडून जातें; त्याला फोडून टाकिलें असतां तेंही नष्ट होतें व ह्याप्रमाणें तें घटाकाश घटाचा नित्य सहचारी होऊन राहतें. त्याचप्रमाणें बुद्ध्यवच्छिन्न कूटस्थ बुद्धिसह परलोकीं गमनकरणें, पुनः इहलोकीं येऊन कर्मानुरूप फल भोगणें इत्यादि करील. तेवढ्याकरितां निराळ्या चिदाभासाची कल्पना करण्याचें काय कारण ? असा या श्लोकांत प्रश्न केला आहे. ॥ २७ ॥

आतां सिद्धान्ती या प्रश्नांचें उत्तर देतात:—

**शृण्वसंगः परिच्छेदमात्राज्जीवो भवेन्न हि ॥**
**अन्यथा घटकुड्याद्यैरवच्छिन्नस्य जीवता ॥ २८ ॥**

अन्वयः––शृणु । असंगः परिच्छेदमात्रात् जीवः न भवेत् हि । अन्यथा घट-कुड्याद्यैः अवच्छिन्नस्य जीवता स्यात् ।

अर्थः––ऐक. असंग कूटस्थ केवल परिच्छिन्न झाल्यामुळें जीव कधींच होणार नाहीं. कारण तो केवल परिच्छिन्न झाल्यामुळें जीव होतो, असें जर मानलें तर घट, भिंत इत्यादिकांच्या योगानें परिच्छन्न झालेल्या कूटस्थासही जीवत्व प्राप्त होईल. ॥ २८ ॥

विवरणः—कूटस्थ परिच्छिन्न ( मर्यादित ) झाला कीं, तेवढ्याच त्याच्या भागास जवित्व प्राप्त होतें असें ह्मणणें अयुक्त आहे. कारण कूटस्थ व्यापी असल्यामुळें तो घटादि दुसऱ्याही अनेक जड पदार्थांनीं परिच्छिन्न होत असतो; पण त्यांच्याठायीं जीवभाव आल्याचें कोणालाही ठाऊक नाहीं. ॥ २८ ॥

बुद्धि व घटादि पदार्थ यांच्या धर्मांमध्यें फरक असल्यामुळें असा प्रकार घडतो असें पुनः वादी ह्मणतो व सिद्धान्ती त्याचेंही उत्तर देतातः—

**न कुड्यसदृशी बुद्धिः स्वच्छत्वादिति चेत्तथा ॥**
**अस्तु नाम परिच्छेदे किं स्वाच्छयेन भवेत्तव ॥ २९ ॥**

अन्वयः—स्वच्छत्वात् बुद्धिः कुड्यसदृशी न इति चेत् तथा अस्तु नाम । परि-च्छेदे स्वाच्छयेन तव किं भवेत् ।

अर्थः—स्वच्छ असल्यामुळें बुद्धि भिंतीसारखी नाहीं. असें जर ह्मणशील तर ती स्वच्छ असेना. परिच्छेदांमध्यें स्वच्छतेमुळें तुझा कोणता लाभ होणार? ॥ २९ ॥

विवरणः—बुद्धि स्वच्छ आहे व भिंत अति मलिन आहे. यास्तव त्यांची बरोबरी होणार नाहीं. असें वाद्याचें ह्मणणें आहे. पण सिद्धान्ती ह्मणतात कीं, जरी त्यांच्या-मध्यें असा फरक असला तरी परिच्छेदामध्यें फरक कसा पडणार? परिच्छिन्न ह्मणजे मर्यादित होणें होय. तेव्हां स्वच्छ पदार्थांच्या योगानें होणारा

व अस्वच्छ पदार्थांच्या योगानें होणारा परिच्छेद यांच्यामध्यें भेद आहे, हें म्हणणें युक्तिसिद्ध नव्हे. ॥ २९ ॥

तें कसें म्हणून विचाराल तर दृष्टांत देऊन सांगतों म्हणजे चांगलें समजेल:—

**प्रस्थेन दारुजन्येन कांस्यजन्येन वा न हि ॥**
**विक्रेतुस्तण्डुलादीनां परिमाणं विशिष्यते ॥ ३० ॥**

अन्वयः—विक्रेतुः दारुजन्येन वा कांस्यजन्येन प्रस्थेन तंडुलादीनां परिमाणं न विशिष्यते हि ।

अर्थः—विकणाऱ्याच्या लांकडाच्या किंवा कांशाच्या शेरानें तांदुळादिकांच्या परिमाणांत फरक पडत नाहीं हें प्रसिद्ध आहे. ॥ ३० ॥

विवरण:—लांकुड अस्वच्छ असतें व कांसे स्वच्छ असतें हें आबालवृद्धांस ठाऊक आहे. पण लांकडाच्या शेरानें परिच्छिन्न होणारे तांदुळ कांशाच्या शेरानें परिच्छिन्न होणाऱ्या तांदुळांपेक्षां कमी असतात असें कोणीही मानीत नाहींत. या दोन प्रकारच्या मापांमध्यें स्वच्छता व अस्वच्छता यांच्या योगानें जर फरक पडता तर लांकडी माप बाळगणाऱ्या व एका पारड्यांत दगडाचा शेर घालून जोखणाऱ्या वाण्याचा माल कोणींही घेतला नसता !! ॥ ३० ॥

आतां पुनरपि यावर शक्य शंका घेऊन समाधान करितातः—

**परिमाणाविशेषेऽपि प्रतिबिंबो विशिष्यते ॥**
**कांस्ये यदि तदा बुद्धावप्याभासो भवेद्बलात् ॥ ३१ ॥**

अन्वयः—परिमाणाविशेषे अपि कांस्ये प्रतिबिंबः विशिष्य तेयदि तदा बुद्धौ अपि आभासः बलात् भवेत् ।

अर्थः—परिमाण जरी सारखेंच असलें तरी कांशाच्या शेरांत तांदुळाचें प्रतिबिंब पडतें हा विशेष आहे; असें जर म्हणशील तर बुद्धीमध्येंही आभास अवश्य होईल. ॥ ३१ ॥

विवरण:—लांकडाच्या व कांशाच्या शेराचें परिमाण जरी सारखेंच असलें तरी कांसें अति स्वच्छ असल्यामुळें त्यांत तांदुळादि पदार्थांचें प्रतिबिंब पडतें. व अस्वच्छ लांकडामध्यें पडत नाहीं. हाच त्यांच्यामध्यें विशेष आहे; असें जर तूं म्हटलेंस

तर तें आह्मांस इष्टच आहे. कारण कांसें स्वच्छ असल्यामुळें त्यांत जसें प्रतिबिंब पडतें तसें बुद्धीही अति स्वच्छ असल्यामुळें जरी इच्छा नसली तरी त्यांत कूटस्थाचें प्रतिबिंब पडेलच व तोच आभास होय. ॥ ३१ ॥

प्रतिबिंब व आभास यांचें ऐक्य कसें तें आतां सांगतात.

**ईषद्भासनमाभासः प्रतिबिंबस्तथाविधः ॥**
**बिंबलक्षणहीनः सन् बिंबवद्भासते हि सः ॥ ३२ ॥**

अन्वयः—ईषद्भासनं आभासः च तथाविधः प्रतिबिंबः । हि सः बिंबलक्षणहीनः सन् बिंबवत् भासते ।

अर्थः—थोडें भासणें हाच आभास होय व तशाप्रकारचेंच प्रतिबिंब असतें. कारण तें बिंबलक्षणरहित असून बिंबासारखें भासतें. ॥ ३२ ॥

विवरणः—आभास या शब्दाचा यौगिक अर्थ थोडें भासणें असा आहे. कारण 'आ' याचा अर्थ ईषत्–थोडें, व 'भास' याचा भासणें. शब्दामध्यें जे उपसर्ग, प्रत्यय, धातु इत्यादि अवयव असतात त्यांच्यावरून ठरणाऱ्या अर्थास यौगिक अर्थ ह्मणतात. असो. हें आभासाचें लक्षण प्रतिबिंबाचे ठायींही आहे. कारण बिंबाचें लक्षण नसतांही जें बिंबाप्रमाणें भासतें तें प्रतिबिंब होय. तस्मात् थोडेसें भासणें हें लक्षण प्रतिबिंबाचे ठायीं असल्यामुळें आभास व प्रतिबिंब हे पर्याय शब्द होत. ॥ ३२ ॥

आतां पूर्वोक्त प्रकारच स्पष्ट करितातः—

**ससंगत्वविकाराभ्यां बिंबलक्षणहीनता ॥**
**स्फूर्तिरूपत्वमेतस्य बिंबवद्भासनं विदुः ॥ ३३ ॥**

अन्वयः—एतस्य ससंगत्व विकाराभ्यां बिंबलक्षणहीनता च स्फूर्तिरूपत्वं बिंबवत् भासनं विदुः ।

अर्थः—याची ससंगत्व व विकार यांच्या योगानें बिंबाच्या लक्षणाची हीनता व स्फूर्तिरूपत्व हें बिंबाप्रमाणें भासणें असें पूर्व आचार्य समजतात. ॥ ३३ ॥

विवरणः—चिदाभासाच्या ठायीं पूर्वोक्त प्रतिबिंबाचें लक्षण कसें आहे तें येथें सांगितलें आहे. चिदाभास बुद्धिवृत्तींशीं संग ठेवणारा आहे. व तो स्वतः विकारी

आहे. त्यामुळें बिंबभूत कूटस्थाचें असंगत्व व निर्विकारित्व हें लक्षण त्याचे ठायीं नाहीं हें उघड झालें. पण त्याच्या ठायीं स्फूर्तिरूपत्व आहे असा प्रत्यय येतो व तेंच त्याचें कूटस्थाप्रमाणें भासणें होय. सारांश बिंबलक्षणशून्य व बिंबाप्रमाणें भासणें हें प्रतिबिंबाचें लक्षण चिदाभासाच्या ठायीं आहे. ॥ ३३ ॥

आतां वाचस्पतीचा अनुयायी पुनः निराळी युक्ति योजून शंका करीत आहे; पण सिद्धान्ती तिचेंही हंसत हंसत समाधान करतात—

**न हि धीभावभावित्वादाभासोऽस्ति धियः पृथक् ॥**
**इति चेदल्पमेवोक्तं धीरप्येवं स्वदेहतः ॥ ३४ ॥**

अन्वयः—धीभावभावित्वात् आभासः धियः पृथक् न हि अस्ति इति चेत् अल्पं एव इदं उक्तं यतः एवं धीः अपि स्वदेहतः अभिन्ना ।

अर्थः—बुद्धीच्या सत्त्वामुळेंच आभासाचेंही अस्तित्व होत असल्यामुळें तो बुद्धीहून भिन्न नाहीं, असें जर ह्मणशील तर हें तूं अगदीं थोडेंच बोललास. कारण ह्या न्यायानें बुद्धीही आपल्या देहाहून अभिन्न आहे. ॥ ३४ ॥

विवरणः—ज्याप्रमाणें मृत्तिकेच्या अस्तित्वामुळेंच अस्तित्वांत येणारा घट मृत्तिकेहून भिन्न नाहीं, त्याप्रमाणें बुद्धीच्या अस्तित्वानंतर अस्तित्वांत येणारा चिदाभासही तिच्याहून पृथक् नाहीं. तर घट जसा आपल्या उपादान कारणरूपच आहे तसा आभासही बुद्धिरूप होय. असें वाद्यानें आपल्या मतें सयुक्तिकपणें सिद्ध केलें असतां सिद्धान्ती हंसत ह्मणतात कीं, छेः ह्यांत काय अर्थ आहे? हें तूं कांहींच बोलला नाहींस. याच्या पेक्षांही तुझी कल्पना जरा पुढें जावयास पाहिजे होती. कारण देहानंतर बुद्धीचा उद्भव होत असल्यामुळें व तिला देहाच्या अस्तित्वाचीही अवश्यकता असल्यामुळें देह व बुद्धि एकच आहेत असें ह्मणणेंही प्रस्तुत दृष्टया अयोग्य झालें नसतें. ॥ ३४ ॥

पण सिद्धान्त्यांच्या ह्या उपरोधिक बोलण्याचा भाव समजून वादी देह व बुद्धि यांचा भेद आहे असें सप्रमाण सांगतो व सिद्धान्ती त्याच न्यायानें आभास व बुद्धि यांचाही भेद आहे असें सिद्ध करितातः—

देहे मृतेऽपि बुद्धिश्चेच्छास्त्रादस्ति तथा सति ॥
बुद्धेरन्यश्चिदाभासः प्रवेशश्रुतिषु श्रुतः ॥ ३५ ॥

अन्वयः—देहे मृते अपि शास्त्रात् बुद्धिः अस्ति इति चेत् तथा सति प्रवेश-श्रुतिषु बुद्धेः अन्यः चिदाभासः श्रुतः अस्ति ।

अर्थः—देह मृत झाल्यावरही बुद्धि असते; असें शास्त्रावरून ठरतें असें जर ह्मणशील तर तसें असल्यास प्रवेशश्रुतींमध्यें बुद्धीहून भिन्न चिदाभास सांगितलेला आहे. ॥ ३५ ॥

विवरणः—बुद्धीहून देह भिन्न आहे. कारण देह निर्जीव झाल्यावरही बुद्धि असते; असें शास्त्र सागतें. असें वाद्याचें ह्मणणें आहे. पण सिद्धान्ती ह्मणतात—शास्त्र सांगतें ह्मणून पूर्वोक्त युक्ति सोडूनही जर देह व बुद्धि यांची भिन्नता स्वीकारावयाची असली तर "आत्मा हें सर्व निर्माण करून त्यांत प्रवेश करिता झाला" या प्रवेश श्रुतीमध्यें तसें स्पष्टपणें सांगितलेलें असल्यामुळें बुद्धिहून आभास भिन्न आहे असें समजण्यास काय प्रत्यवाय आहे? सारांश शास्त्र—देहाहून बुद्धि भिन्न आहे—हें जसें सांगत आहे, तसेंच तें बुद्धीहून आभास भिन्न आहे असेंही प्रतिपादन करीत आहे.

"अहो पण या प्रवेश श्रुतीमध्यें बुद्धियुक्त चैतन्याचाच प्रवेश सांगितला आहे व तसें होणेंच युक्त आहे. कारण निरुपाधिक व व्यापी कूटस्थाचा कोणत्याही मर्यादित स्थळीं प्रवेश होणें अशक्य आहे" अशी शंका यावर येण्यासारखी असल्यामुळें सिद्धान्ती तिचा अनुवाद करून परिहार करितातः—

धीयुक्तस्य प्रवेशश्चेन्नैतरेये धियः पृथक् ॥
आत्मा प्रवेशं संकल्प्य प्रविष्ट इति गीयते ॥ ३६ ॥

अन्वयः—धीयुक्तस्य प्रवेशः इति चेत् न । यतः ऐतरेये धियः पृथक् आत्मा प्रवेशं संकल्प्य प्रविष्टः इति गीयते ।

अर्थः—बुद्धियुक्त कूटस्थाचाच प्रवेश होतो असें जर ह्मणशील तर तें बरोबर नाहीं. कारण ऐतरेयोपनिषदांत बुद्धिहून भिन्न असा आत्मा प्रवेशाचा संकल्प करून तिच्यामध्यें प्रविष्ट झाला असें सांगितलें आहे. ॥ ३६ ॥

**विवरणः**—बुद्धियुक्त कूटस्थ या सृष्टींत प्रविष्ट झाला असें कोठेंही सांगितलेलें नाहीं. उलट ऐतरेयामध्यें बुद्धीहून भिन्न असणाऱ्या आत्म्यानें प्रथम प्रवेशाचा संकल्प केला व नंतर प्रवेश केला असें स्पष्टपणें वर्णन केलेलें आहे. ॥ ३६ ॥

पूर्वोक्त ऐतरेय श्रुतीचा येथें अर्थतः निर्देश करितातः—

**कथं न्विदं साक्षदेहं मदृते स्यादितीरणात् ॥**

**विदार्य मूर्धसीमानं प्रविष्टः संसरत्ययम् ॥ ३७ ॥**

**अन्वयः**—अयं इदं साक्षदेहं मदृते कथं नु स्यात् इति ईरणात् मूर्धसीमानं विदार्य प्रविष्टः संसरति ।

**अर्थः**—हा परमात्मा " इंद्रियें देह इत्यादिकांसह हा जडसमूह माझ्या-वांचून कसा व्यवहार करूं शकेल ? " असा विचार करून व मस्तकावरील टाळू फोडून आंत प्रविष्ट होत्साता संसार करूं लागला. ॥ ३७ ॥

**विवरणः**—सर्व सृष्टीची उत्पत्ति केल्यावर, चेतन जो मी त्या मजवाचून हा जडवर्ग व्यवहार करूं शकणार नाहीं; असें समजून तो परमात्मा देहांत प्रवेश करिता झाला. त्यानें कोणत्या मार्गानें प्रवेश केला हें श्रुतीमध्येंच स्पष्टपणें सांगितलेलें आहे; व त्याचाच येथेंही निर्देश केला आहे. तो असा–मस्तकाच्या मध्यभागीं जेथें तीन कंवट्या मिळलेल्या आहेत असें दिसतें किंवा लहान मुलांच्या मस्तकावरील जो भाग जन्मानंतर मऊ असतो व ज्यास व्यवहारांत टाळु ह्मणतात तिचें विदारण करून यानें शरीरांत प्रवेश केला व नंतर जाग्रदादि अवस्थांचा अनुभवरूप संसार करूं लागला. ॥ ३७ ॥

पण असंग आत्मा प्रवेश कसा करील ? अशी शंका घेऊन तिचें आतां समाधान करितातः—

**कथं प्रविष्टोऽसंगश्चेत्सृष्टिर्वाऽस्य कथं वद ॥**

**मायिकत्वं तयोस्तुल्यं विनाशश्च समस्तयोः ॥ ३८ ॥**

**अन्वयः**—असंगः कथं प्रविष्टः इति चेत् अस्य सृष्टिः वा कथं । वद । तयोः मायिकत्वं तुल्यं च तयोः विनाशः समः ।

अर्थः—असंग आत्मा कसा प्रवेश करील असें जर ह्मणशील तर याची सृष्टि तरी कशी ? सांग. सृष्टिकर्ता व प्रवेशकर्ता यांचें मायिकत्व व विनाश हीं सारखींच आहेत. ॥ ३८ ॥

विवरणः—असंग आत्म्याचा कोणत्याही कार्यांत प्रवेश होणें अशक्य आहे असें जर ह्मणावें तर तो असंग आत्मा कार्याचा कर्ता तरी कसा होणार ? हा प्रश्न पुढें येतो. सृष्टिकर्ता मायिक असल्यामुळें त्याला कर्ता होतां येतें असें जर ह्मणावें तर प्रवेशकर्ता तरी अमायिक कोठें आहे ? सारांश त्यांचें मायिकत्व व निवृत्ति हे भाव सारखेच आहेत. ॥ ३८ ॥

आतां औपाधिक रूपाचें विनाशित्व व्यक्त करितातः—

**समुत्थायैष भूतेभ्यस्तान्येवानुविनश्यति ॥**
**विस्पष्टमिति मैत्रेय्यै याज्ञवल्क्य उवाच हि ॥ ३९ ॥**

अन्वयः—एषः भूतेभ्यः समुत्थाय तानि एव अनु विनश्यति इति याज्ञवल्क्यः मैत्रेय्यै विस्पष्टं उवाच हि ।

अर्थः—हा भूतांपासून निघून त्यांच्याच मागोमाग नष्ट होतो असें याज्ञवल्क्य मैत्रेयीस स्पष्टपणें सांगते झाले हें प्रसिद्ध आहे. ॥ ३९ ॥

विवरणः—हा प्रज्ञानघन आत्मा या देहेंद्रियादिरूप पंचभूतांच्या कार्यापासून निघून ह्मणजे जीवभावाप्रत प्राप्त होऊन त्या देहेंद्रिय संज्ञक कार्यांच्या मागोमाग ह्मणजे तीं नष्ट होतांच आपणही नष्ट होतो. "मी जीव आहें" हा अभिमान सोडणें हाच याचा नाश होय. सारांश याप्रमाणें सोपाधिक आत्म्याचें विनाशित्व याज्ञवल्क्यांनीं मैत्रेयीस सांगितलें आहे. ॥ ३९ ॥

आणि त्याचप्रमाणें कूटस्थ चिदाभासाहून भिन्न आहे असाही पूर्वोक्त मुनींनींच आपल्या पत्नीस उपदेश केला आहे असें आतां सांगतातः—

**अविनाश्ययमात्मेति कूटस्थः प्रविवेचितः ॥**
**मात्रासंसर्ग इत्येवमसंगत्वस्य कीर्तनात् ॥ ४० ॥**

अन्वयः—मात्रासंसर्गः इति एवं असंगत्वस्य कीर्तनात् अयं आत्मा अविनाशी इति कूटस्थः प्रविवेचितः ।

अर्थः—"देहादि पदार्थांशीं संबद्ध न होणारा" अशा प्रकारें याच्या असंगतेचें वर्णन केलेलें आहे व "हा आत्मा अविनाशी आहे" असें कूटस्थाचें उत्तम प्रकारें विवेचन केलें आहे. ॥ ४० ॥

विवरणः—'अविनाशी वा अरे' इत्यादि कण्वशाखेची श्रुति असून 'मात्रासंसर्गः' ही माध्यंदिन शाखेची श्रुति आहे. मात्रासंसर्ग–ह्मणजे देहादि पदार्थांशीं संबंध न ठेवणारा. या दोन्ही वाक्यांवरून आत्मा कूटस्थ आहे असें स्पष्ट होतें. ॥ ४० ॥

"अहो पण तुह्मी ज्या चिदाभासास विनाशी ह्मणतां तो अविनाशी आहे असें श्रुतीनें सांगितलें आहे." अशी श्रुतीनिर्देशपूर्वक शंका घेऊन सिद्धान्ती समाधान करितातः—

जीवापेतं वाव किल शरीरं म्रियते न सः ॥
इत्यत्र न विमोक्षोर्थः किंतु लोकांतरे गतिः ॥ ४१ ॥

अन्वयः—जीवापेतं वाव किल शरीरं म्रियते न सः इति अत्र न विमोक्षः अर्थः किंतु लोकान्तरे गतिः ।

अर्थः—'जीवभिन्न असें हें शरीर मरतें. जीव मरत नाहीं.' या श्रुतीमध्यें मोक्षरूप अर्थ सांगितलेला नाहीं तर पर लोकांतील गति सांगितली आहे. ४१

विवरणः—'जीवापेतं' इत्यादि श्रुतीमध्यें जीव मरत नाहीं असें जें ह्मटलें आहे तें जीवास परलोक प्राप्ति होते हें सांगण्याकरितां आहे. त्यास अत्यंत नाशरूप मोक्षही मिळत नाहीं हें सांगण्याकरितां नव्हे. शरीर जरी निर्जीव झालें तरी जीव नष्ट होत नाहीं तर तो आत्मसाक्षात्कार होई तों अनेक देहांचा स्वीकार करून अनेक लोकीं हिंडत रहातो; असा या वाक्याचा भावार्थ आहे. ॥ ४१ ॥

पण जीव विनाशी आहे असें जर मानलें तर त्याचा अविनाशी ब्रह्माशीं "मी ब्रह्म आहें" या ज्ञानद्वारा तादात्म्यभाव कसा होऊं शकेल?—अशी शंका घेऊन समाधान करितातः—

नाहं ब्रह्मेति बुध्येत स विनाशीति चेन्न तत् ॥
सामानाधिकरण्यस्य बाधायामपि संभवात् ॥ ४२ ॥

अन्वयः—सः विनाशी 'अहं ब्रह्म' इति न बुद्ध्येत इति चेत् तत् न । कुतः । सामानाधिकरण्यस्य बाधायां अपि संभवात् ।

**अर्थः—तो विनाशी जीव "मी ब्रह्म आहें" असें जाणणार नाहीं असें जर ह्मणशील तर तें बरोबर नाहीं. कारण समानाधिकरणभाव बाधामध्येंही संभवतो. ॥ ४२ ॥**

विवरणः—भिन्न अर्थाचे दोन शब्द एकाच विभक्तीमध्यें येऊन त्यांच्यामध्यें जर विशेषणविशेष्यभाव असला तर ते दोन्ही समानाधिकरण होत. जसें–चांगला घोडा. अथवा एका आश्रयावर रहाणाऱ्या अनेक धर्मांमध्यें सामानाधिकरण्य असतें. जसें गाईवर रहाणारे गाईपणा, लाली, गरीबपणा इत्यादि धर्म परस्पर समानाधिकरण आहेत. ह्मणजे त्यांच्यामध्यें सामानाधिकरण्य संबंध आहे. किंवा परस्पर अभिन्न अशा पदार्थांमध्यें जो अभिन्नतारूप संबंध असतो त्यासही सामानाधिकरण्य ह्मणतात. जसें कार्य व कारण यांचें वेदान्त व सांख्य शास्त्रांत ऐक्य मानलेलें असल्यामुळें त्यांच्यामध्यें सामानाधिकरण्य संबंध आहे. या सामानाधिकरण्याचे मुख्य सामानाधिकरण्य व बाध सामानाधिकरण्य असे दोन भेद आहेत. दोन अभिन्न वस्तूंमध्यें जें सामानाधिकरण्य असतें तें मुख्य होय. उदाहरणार्थ–घटाकाश व महाकाश यांचें नित्य तादात्म्य असतें व त्यामुळें त्यांच्यामध्यें मुख्य सामानाधिकरण्य आहे. भ्रामक वस्तूचा बाध होऊन नंतर तिचा ज्या अधिकरणाशीं अभेद ( तादात्म्य ) होतो त्याच्याशीं तिचें बाध सामानाधिकरण्य असतें. जसा रज्जूवर भासलेल्या सर्पाचा बाध होऊन त्याचें रज्जूशीं तादात्म्य होतें किंवा आरशांत भासलेल्या प्रतिबिंबाचा बाध होऊन तें बिंबभूत पदार्थाशीं अभिन्न होतें. अशा प्रकारच्या सामानाधिकरण्यास बाध सामानाधिकरण्य ह्मणतात. कूटस्थ व ब्रह्म यांच्यामध्यें घटाकाश व महाकाशाप्रमाणें मुख्य सामानाधिकरण्य आहे. कूटस्थ व ब्रह्म यांचा घटाकाश व महाकाशाप्रमाणेंच संबंध आहे हें चित्रदीपाच्या अठराव्या श्लोकांत सांगितलें आहे. तरी त्याचें ज्यांस विस्मरण झालें असेल त्यांनीं प्रथम भागाच्या सहाव्या प्रकरणाचा अठरावा श्लोक पहावा. असो. प्रस्तुत श्लोकांत विनाशी जीवास 'मी ब्रह्म आहें' अशा प्रकारें ज्ञान होणें शक्य नाहीं असें वाद्याचें ह्मणणें आहे व विनाशी मी आणि अविनाशी ब्रह्म यांचें एकविभक्तिप्रयुक्त सामानाधिकरण्य होणें अशक्य आहे; ही युक्ति त्यानें स्वमतपुष्ट्यर्थ योजिली आहे. पण सिद्धान्ती ह्मणतात कीं, यांचें मुख्य सामानाधिकरण्य जरी अशक्य

असलें तरी बाधं सामानाधिकरण्य अशक्य नाहीं. यास्तव 'मी ब्रह्म आहें' या वाक्यांतील मी व ब्रह्म या दोन वस्तूंचें बाध सामानाधिकरण्य आहे असें आह्मी ह्मणतों. ॥ ४२ ॥

तें कसें ह्मणून विचाराल तर सांगतों:—

**योऽयं स्थाणुः पुमानेष पुंधिया स्थाणुधीरिव ॥**
**ब्रह्मास्मीति धियाशेषाप्यहंबुद्धिर्निवर्त्यते ॥ ४३ ॥**

अन्वय:—'यः अयं स्थाणुः एषः पुमान्' इति अत्र पुंधिया स्थाणुधीः इव 'ब्रह्म अस्मि' इति धिया अशेषा अपि अहं बुद्धिः निवर्त्यते ।

अर्थ:—'जो हा स्थाणु ह्मणून तूं समजत होतास तो पुरुष आहे.' या वाक्यामध्यें पुरुषबुद्धीच्या योगानें स्थाणुबुद्धि जशी निवृत्त होते; त्याप्रमाणें 'मी ब्रह्म आहें' या बुद्धीच्या योगानें सर्वही अहंबुद्धि निवृत्त केली जाते. ॥ ४३ ॥

विवरण:—वृक्षाच्या शाखा तोडून टाकल्यावर जें नुस्तें खोड उभें असतें त्याला स्थाणु ह्मणतात. मराठीमध्यें याला खुंट असें ह्मणण्याचाही प्रघात आहे. अंधाऱ्या रात्रीमुळें अशा प्रकारचा खुंट पुरुष असावा असें वाटण्याचा संभव आहे तसाच ...ष उभा असतांना 'हा खुंट आहे' असा भास होण्याचाही संभव आहे. व ...कांत ह्या दुसऱ्या प्रकारचाच दृष्टान्त दिला आहे. 'अरे बाबा, तूं ज्याला ...वा लांकडाचा खांब ह्मणून समजत आहेस तोच अमुक अमुक मनुष्य होय.' असें कोणी सांगितलें असतां ऐकणाऱ्याच्या मनांत पुरुषाविषयींची भावना उत्पन्न होते व स्थाणूविषयींची नष्ट होते. हा दृष्टांत होय. ह्मणजे याप्रमाणेंच 'मी ब्रह्म आहें; संसारी जीव नव्हे.' अशी बुद्धि झाली असतां तिच्या योगानें अहंबुद्धि समूळ नष्ट होते. व त्यामुळें तत्त्वमस्यादि सर्व महावाक्यांतील पदांचें बाधसामानाधिकरण्य सिद्ध होतें. हें वार्तिककार श्रीसुरेश्वराचार्यांचें नैष्कर्म्य सिद्धींतील वाक्य आहे व स्वतः ग्रंथकारही हें पुढच्याच श्लोकांत सांगत आहेत. ॥ ४३ ॥

सारांश:—

**नैष्कर्म्यसिद्धावप्येवमाचार्यैः स्पष्टमीरितम् ॥**
**सामानाधिकरण्यस्य बाधार्थत्वमतोऽस्तु तत् ॥ ४४ ॥**

अन्वयः—एवं आचार्यैः नैष्कर्म्यसिद्धौ अपि सामानाधिकरण्यस्य बाधार्थत्वं स्पष्टं ईरितम् अतः तत् अस्तु ।

अर्थः—मागच्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें आचर्यांनीं नैष्कर्म्यसिद्धीमध्यें ही सामानाधिकरण्याची बाधार्थता स्पष्टपणें सांगितलेली आहे. यास्तव (ब्रह्मा 'हमस्मि' या वाक्यांत) ती असो. ॥ ४४ ॥

विवरणः—आचार्य या शब्दाची व्याख्या अशी आहे—

**आचिनोति च शास्त्रार्थमाचारे स्थापयत्यपि ।**
**स्वयमप्याचरेद्यस्तु स आचार्य इति स्मृतः ॥**

याचा अर्थः—जो शास्त्राचा अर्थ व्यवस्थित करितो व त्याची आचारामध्यें प्रस्थापना करवितो आणि स्वतःही तसें आचरण करितो त्यास आचार्य असें म्हटलें आहे.

या व्याख्येप्रमाणें श्रीसुरेश्वराचार्य आचार्य ह्या पदवीस पात्र होते; हें कोणीही कबूल करील. त्यांच्या नैष्कर्म्यसिद्धिनामक ग्रंथामध्यें दुसऱ्या अध्यायांत मागचा श्लोक असल्यामुळें श्रीभारतीतीर्थ ह्मणतात कीं प्रस्तुत आचार्यांच्या वचनाप्रमाणें 'मी ब्रह्म आहें' या वाक्यांतील मी व ब्रह्म या पदांच्या सामानाधिकरण्याचाही बाध हा अर्थ असो. ॥ ४४ ॥

वादीः—सुरेश्वराचार्य स्वतः आभासवादी असल्यामुळें त्यांचें जरी ॥ ४७ ॥ असलें तरी श्रीशंकराचार्यादिकांना व स्वतः श्रुतीलाही हें बाधसामानाधिकरण्य नी— आहे असें ह्मणतां येत नाहीं. सिद्धांतीः—श्रुति व आचार्यांचे ग्रंथ यांचा ज्याचा परिचय आहे तो असें कधींही ह्मणणार नाहीं. कारणः—

**सर्वं ब्रह्मेति जगता सामानाधिकरण्यवत् ॥**
**अहं ब्रह्मेति जीवेन सामानाधिकृतिर्भवेत् ॥ ४५ ॥**

अन्वयः—'सर्वं ब्रह्म' इति जगता सामानाधिकरण्यवत् 'अहं ब्रह्म' इति जीवेन सामानाधिकृतिः भवेत् ।

अर्थः—'सर्व ब्रह्म आहे' या वाक्यांत जसें जगाशीं ब्रह्माचें सामानाधिकरण्य सांगितलें आहे त्याप्रमाणें 'मी ब्रह्म आहें' या वाक्यांत जीवाशीं ब्रह्माचें सामानाधिकरण्य होतें. ॥ ४५ ॥

विवरणः—मांडुक्योपनिषदामध्यें 'सर्वं हि एतत् ब्रह्म' असें वाक्य आहे. काण्वशाखीय बृहदारण्यकांत 'इदं सर्वं यदयमात्मा' असें वाक्य आहे. व 'हें सर्व ब्रह्म आहे' 'हें जें कांहीं सर्व जग आहे तें आत्माच आहे' असा त्यांचा क्रमानें भावार्थ आहे. या श्रुतिवाक्यांवरून जग व ब्रह्म यांच्या सामानाधिकरण्याची सिद्धि होते हें कोणीही कबूल करील. पण तें मुख्य आहे कीं बाध आहे याच्या विषयीं मात्र विचार केला पाहिजे. त्यांचें मुख्य सामानाधिकरण्य जर मानलें जर ब्रह्मही दृश्य, विकारी, विनाशी इत्यादि होऊं लागेल. पण तें सिद्धान्ताच्या व अनेक श्रुतींच्या विरुद्ध असल्यामुळें अनिष्ट आहे. यास्तव जगाचा बाध करून त्याचें ब्रह्मांशीं ऐक्य होणेंच युक्त आहे. अर्थात् आभासवाद श्रुतीलाही मान्य आहे असें यावरून ठरतें. आतां श्रीमच्छंकराचार्यांचें मत ज्या कोणास पहावयाचें असेल त्यानें प्रस्तुत श्रुतीवरील भाष्य पहावें. म्हणजे निर्णय होईल. सारांश ब्रह्माचें जगाशीं जसें सामानाधिकरण्य आहे तसेंच तें जीवाशींही आहे असें समजावें ॥ ४५ ॥

वादीः—श्रुति व आचार्य यांचें जरी क्वचित् असें मत आढळलें तरी मान्य अशा श्रीप्रकाशात्ममुनींनीं विवरणामध्यें त्यांच्या बाधसामानाधिकरण्याचें निराकरण केलें आहे. सिद्धान्तीः—त्यांनीं तसें केलें आहे हें खरें, पण त्याचा गूढार्थ आहे. कोणता म्हणून म्हणशील तर सांगतों:—

**सामानाधिकरण्यस्य बाधार्थत्वं निराकृतम् ॥**
**प्रयत्नतो विवरणे कूटस्थत्व विवक्षया ॥ ४६ ॥**

अन्वयः—विवरणे कूटस्थत्वविवक्षया सामानाधिकरण्यस्य बाधार्थत्वं प्रयत्नतः निराकृतम् ।

अर्थः—विवरणामध्यें कूटस्थतेचें प्रतिपादन करण्याच्या इच्छेनें सामानाधिकरण्याचा बाध हा अर्थ नाहीं असें प्रयत्नपूर्वक सांगितलें आहे. ॥ ४६ ॥

विवरणः—'अहं ब्रह्मास्मि' या वाक्यांतील निरुपाधिक अहं शब्दाचा जो अर्थ तोच कूटस्थ आहे, असें सांगण्याची इच्छा असल्यामुळें त्यांनीं आपल्या विवरणांत अहं व ब्रह्म यांच्या बाध सामानाधिकरण्याचें निराकरण केलें आहे. पण त्यावरून सोपाधिक अहं व ब्रह्म यांचें बाधसामानाधिकरण्य नाहीं असें ठरत नाहीं. कारण विवरणकारही प्रतिबिंबवादी आहेत असें त्यांच्याच ग्रंथावरून निश्चित होत असून

आभासवाद व प्रतिबिंबवाद एकच आहे हें पूर्वी तेतिसाव्या श्लोकांत स्पष्ट झालेंच आहे. ॥ ४६ ॥

आतां हीच गोष्ट स्पष्ट करून 'भामिति' इत्यादि इतर ग्रंथांप्रमध्यें भासणाऱ्या विरोधाचाही याप्रमाणेंच परिहार करावा असें सांगतातः–

**शोधितस्त्वंपदार्थो यः कूटस्थो ब्रह्मरूपताम् ॥**
**तस्य वक्तुं विवरणे तथोक्तमितरत्र च ॥ ४७ ॥**

अन्वयः—यः शोधितः त्वं पदार्थः कूटस्थः तस्य ब्रह्मरूपतां वक्तुं विवरणे च इतरत्र तथा उक्तं ।

अर्थः—जो बुद्ध्यादिकांहून भिन्न केलेला त्वं पदाचा लक्ष्य अर्थ कूटस्थ त्याला ब्रह्मरूपत्व आहे असें सांगण्याकरितां विवरणांत व दुसऱ्याही कांहीं ग्रंथांत तशा प्रकारें सांगितलें आहे. ॥ ४७ ॥

विवरणः—कूटस्थ बुद्ध्यादिकांहून भिन्न आहे. तो त्वं या पदाचा लक्ष्य अर्थ आहे असें विचारानें समजतें. व अशा प्रकारचा कूटस्थ ब्रह्मरूपच आहे. ह्मणजे त्यांचें मुख्य सामानाधिकरण्य आहे; बाधसामानाधिकरण्य नव्हे; असें सांगण्याकरितां विवरणकारांनीं व भामतीकारादि दुसऱ्या कांहीं ग्रंथकारांनींही तसें ह्मटलें आहे. ॥ ४७ ॥

वादीः—बरें तें असो; पण आभासवादांत कूटस्थ कोणास ह्मणतात? सिद्धान्ती–ठीक आहे; असा जरा शुद्धीवर येऊन प्रश्न कर. ह्मणजे योग्य उत्तर लागलेंच मिळेल. कूटस्थ कोण तें आतां ऐक–

**देहेंद्रियादियुक्तस्य जीवाभासभ्रमस्य या ॥**
**अधिष्ठानाचितिः सैषा कूटस्थात्र विवक्षिता ॥ ४८ ॥**

अन्वयः—देहेंद्रियादियुक्तस्य जीवाभासभ्रमस्य या अधिष्ठानचितिः सा एषा अत्र कूटस्था विवक्षिता ।

अर्थः—देह, इंद्रियें इत्यादिकांनीं युक्त अशा जीवाभासरूप भ्रमाची जी अधिष्ठानरूप चिति ( चैतन्य ) तीच ही येथें कूटस्थ ह्मणून विवक्षित आहे.

**विवरण:**—देहादि उपाधींनी युक्त असा चिदाभास भ्रमरूप असल्यामुळें त्याचें कांहींतरी अधिष्ठान असलें पाहिजे. कारण अधिष्ठानावाचून भ्रम होत नाहीं असें मागें सांगितलेंच आहे. चिदाभासाचें अधिष्ठान चैतन्यरूप असणेंच युक्त आहे. व हें अधिष्ठानभूत चैतन्यच या आभासवादांतील कूटस्थ होय. ॥ ४८ ॥

आतां ब्रह्मशब्दाचा अर्थ सांगतातः—

**जगद्भ्रमस्य सर्वस्य यदधिष्ठानमीरितम् ॥**
**त्रय्यन्तेषु तदत्र स्याद्ब्रह्मशब्दविवक्षितम् ॥ ४९ ॥**

**अन्वय:**—त्रय्यन्तेषु सर्वस्य जगद्भ्रमस्य यत् अधिष्ठानं ईरितं तत् अत्र ब्रह्मशब्दविवक्षितं स्यात् ।

**अर्थ:—वेदान्तामध्यें सर्व जगद्रूप भ्रमाचें जें अधिष्ठान सांगितलेलें आहे तें या वादांत ब्रह्मशब्दानें विवक्षित आहे. ॥ ४९ ॥**

**विवरण:**—विवक्षित ह्मणजे सांगावयास इच्छिलेलें. जगद्रूपभ्रमाचें जें चैतन्य अधिष्ठान आहे असें वेदान्तांत निरूपण केलें आहे त्यासच या आभासवादांत ब्रह्म असें ह्मटलें आहे. असा याचा भावार्थ होय. ॥ ४९ ॥

असें जरी आहे तरी जीवाभासाचें अधिष्ठानभूतचैतन्य कूटस्थ आहे हें ह्मणणें संभवत नाहीं. कारण जीवाचा कूटस्थाचे ठायीं आरोप झालेला आहे असें ह्मणणेंच मुळीं अयुक्त आहे. अशी शंका घेऊन तिचें समाधान करितातः—

**एतस्मिन्नेव चैतन्ये जगदारोप्यते यदा ॥**
**तदा तदेकदेशस्य जीवाभासस्य का कथा ॥ ५० ॥**

**अन्वय:**—एतस्मिन् एव चैतन्ये यदा जगत् आरोप्यते । तदा तदेकदेशस्य जीवाभासस्य का कथा ? ।

**अर्थः—याच ब्रह्मचैतन्याचे ठायीं जगाचाही जर आरोप केला जात आहे तर मग त्याच्या एक देशभूत जीवाभासाची काय कथा ? ॥ ५० ॥**

**विवरणः**—सर्व जग ब्रह्माचे ठायीं आरोपित आहे हें नुक्तेंच पंचेचाळीसाव्या श्लोकांत व त्याच्या मागेंही अनेकदां श्रुतियुक्तिद्वारा सिद्ध झालें आहे. सर्व जगच

वर आरोपित आहे तर त्याचाच एक भाग जो जीव तो आरोपित नाहीं असें कसें ह्मणतां येईल? ॥ ५० ॥

वादीः—जगाचें जें अधिष्ठान तेंच जीवाचेंही असल्यामुळें 'तत्' व 'त्वं' या पदांच्या अर्थांत भेद नाहीं असें ठरतें. मग खरा प्रकार असा असतांना तत् व त्वं या पदांच्या अर्थाची पुनरुक्ति करण्यांत काय तात्पर्य आहे? समाधानः– वास्तवीक पणें त्यांचें जरी ऐक्य आहे; तरी उपाधिमुळें त्यांचा भेद झाला आहे. असें आतां सांगतात:–

**जगत्तदेकदेशाख्यसमारोप्यस्य भेदतः ॥**
**तत्त्वंपदार्थौ भिन्नौ स्तो वस्तुतस्त्वेकता चितेः ॥ ५१ ॥**

अन्वयः—जगत्तदेकदेशाख्यसमारोप्यस्य भेदतः तत्त्वंपदार्थौ भिन्नौ स्तः वस्तुतः तु चितेः एकता अस्ति ।

अर्थः—जगत् व त्याचा एक देश या नांवाचें जें आरोप्य त्याच्या भेदामुळें तत्पदाचा व त्वंपदाचा अर्थ भिन्न झाला आहे. पण वस्तुतः चैतन्याचें ऐक्य आहे. ॥ ५१ ॥

विवरणः—आरोप्य ह्मणजे ज्याचा आरोप करावयाचा आहे असा पदार्थ. अर्थात् प्रस्तुत स्थळीं जग व त्याचा एक भाग–जीवाभास. या आरोप्यामध्यें भेद असल्यामुळें त्याच्या अपेक्षेनें अधिष्ठानामध्येंही भेद पडतो. पण तो भेदही आभासिक आहे; खरा नव्हे. ॥ ५१ ॥

आतां चिदाभाचे ठायीं आरोप्य व अधिष्ठान या उभयतांचेंही धर्म दिसत असल्यामुळें तो भ्रम होय असें सांगतात—

**कर्तृत्वादीन्बुद्धिधर्मान् स्फूर्त्याख्यां चात्मरूपताम् ॥**
**दधद्विभाति पुरत आभासोऽतो भ्रमो भवेत् ॥ ५२ ॥**

अन्वयः—कर्तृत्वादीन् बुद्धिधर्मान् च स्फूर्त्याख्यां आत्मरूपतां दधत् आभासः पुरतः विभाति अतः सः भ्रमः भवेत् ।

अर्थः—कर्तृत्वादिक बुद्धीचे धर्म व स्फूर्तिसंज्ञक आत्म्याचें स्वरूप यांस धारण करणारा आभास स्पष्ट भासतो. यास्तव तो भ्रम आहे. ॥ ५२ ॥

विवरण:—दोरीच्या अज्ञानामुळें भासणाऱ्या सर्पांत कांहीं धर्म दोरीचे असतात व कांहीं सर्पाचे असतात. जसें–जाडी, लांबी, व 'हा' हा इदं अंश इत्यादि दोरीचे धर्म असून भ्रमामुळें भासणारी त्याची चळवळ, तोंडाकडील व मागचा भाग इत्यादि सर्पाचे धर्म असतात; व त्यामुळें त्यास भ्रम असें म्हणतात. त्याचप्रमाणें चिदाभासाचे ठायीं कर्तृत्व, भोक्तृत्व, इत्यादि बुद्धीचे धर्म व स्फूर्ति हा आत्मधर्म अगदीं स्पष्टपणें प्रत्ययास येतो; व त्यामुळें तो भ्रम आहे असें ठरतें. ॥ ५२ ॥

पण या संसाररूप भ्रमाचें कारण काय? असें कोणी विचारील म्हणून ग्रंथकार म्हणतातः—

**का बुद्धिः कोऽयमाभासः को वात्माऽत्र जगत्कथम् ॥**
**इत्यनिर्णयतो मोहः सोऽयं संसार इष्यते ॥ ५३ ॥**

अन्वयः—का बुद्धीः कः अयं अभासः अत्र कः वा आत्मा कथं जगत् इति अनिर्णयतः यः मोहः सः अयं संसारः इष्यते ।

अर्थः—बुद्धि कोण आहे ? हा आभास कोण आहे ? अथवा यांतील आत्मा कोण आहे ? व जग कसें आहे ? याचा निर्णय न झाल्यामुळें होणारा जो मोह तोच हा संसार होय. ॥ ५३ ॥

विवरणः—बुद्ध्यादिकांचा निर्णय न होणें हाच मोह असून तोच संसार आहे. आणि संसार अनर्थाचें कारण असल्यामुळें त्याची निवृत्ति करणेंच योग्य आहे. तात्पर्य बुद्ध्यादिकांचें स्वरूप न समजणें हेंच संसारभ्रमाचें कारण आहे. ॥ ५३ ॥

पण या मोहरूप संसाराची निवृत्ति कशी होणार? असें कोणी विचारील म्हणून तिचे उपाय संक्षेपतः सांगतातः—

**बुद्ध्यादीनां स्वरूपं यो विविनक्ति स तत्त्ववित् ॥**
**स एव मुक्त इत्येवं वेदान्तेषु विनिश्चयः ॥ ५४ ॥**

अन्वयः—बुद्ध्यादीनां स्वरूपं यः विविनक्ति सः तत्त्ववित् । सः एव मुक्तः इति एवं वेदान्तषु विनिश्चयः आस्ति ।

अर्थः—बुद्ध्यादिकांचें स्वरूप जो पृथक्पणें जाणतो तो तत्त्ववित् व तोच मुक्त होय. अशाप्रकारें वेदान्तांत पूर्ण निश्चय केलेला आहे. ॥ ५४ ॥

विवरणः—बुद्धि, आभास, आत्मा, जग इत्यादिकांचा निर्णय करणें हाच संसारनिवृत्तीचा उपाय आहे. याप्रमाणें उपाय सुचवून शिवाय अशाप्रकारें निर्णय करणाराची योग्यताही सांगतात.—अशा प्रकारें जो विवेक करितो तोच तत्त्ववेत्ता आणि मुक्त होय. हें आह्मी आधारावांचून सांगत आहों असें नाहीं. तर याला वेदान्तामध्यें ह्मणजे उपनिषदें व शारीरक मीमांसा यामध्यें ठिकठिकाणीं आधार आहे. ॥ ५४ ॥

सारांश अशाप्रकारें बंध व मोक्ष हे दोन्हीही अविवेकामुळें होणारे आहेत असें ठरल्यावर, अद्वैत वादांत 'कोणाचा बंध व कोणाचा मोक्ष' ह्मणजे बद्ध व मुक्त कोण होतो? इत्यादि तर्कपटु लोकांकडून होणाऱ्या कुतर्करूप थट्टेचें खंडन कसें करितां येतें हें श्रीहर्षमिश्रांच्या खंडनामध्यें पहावें. व त्याप्रमाणें तार्किकांचे खंडन करावें; असें आतां सांगतातः—

**एवं च सति बंधः स्यात्कस्येत्यादिकुतर्कजाः ॥**
**विडंबना दृढं खण्ड्याः खण्डनोक्तिप्रकारतः ॥ ५५ ॥**

अन्वयः—एवं च सति 'कस्य बंधः स्यात्' इत्यादि कुतर्कजाः विडंबनाः खंडनोक्तिप्रकारतः दृढं खंड्याः ।

**अर्थः—असें झालें असतां 'बंध कोणास होतो' इत्यादि प्रकारच्या तार्किकांकडून होणाऱ्या कुतर्कमूलक विडंबना खंडनामध्यें सागितल्याप्रमाणें पूर्णपणें खंडन करण्यास योग्य आहेत. ॥ ५५ ॥**

कूटस्थ बुद्ध्यादिकांहून भिन्न आहे असें केवल श्रुति व युक्ति यांवरूनच सिद्ध होतें असें नाहीं; तर हा प्रकार पुराणामध्येंही स्पष्टपणें सांगितलेला आहे. असें आतां शैवपुराणांतील तीन श्लोक येथें घेऊन सुचवितातः—

**वृत्तेः साक्षितया वृत्तिप्रागभावस्य च स्थितः ॥**
**बुभुत्सायां तथाऽज्ञोऽस्मीत्याभासाज्ञानवस्तुनः ॥ ५६ ॥**

अन्वयः—वृत्तेः वृत्तिप्रागभावस्य बुभुत्सायां च तथा अज्ञः अस्मि इति आभासाज्ञानवस्तुनः साक्षितया स्थितः अस्ति ।

**अर्थः—वृत्ति, वृत्तीच्या उत्पत्तीच्या पूर्वींचा काल, (मी कोण आहें) अशी जाणण्याची इच्छा आणि त्याचप्रमाणें ती होण्यापूर्वीं 'मी अज्ञ आहें'**

अशा प्रकारें भासणारी, अज्ञान संज्ञक वस्तु यांच्या साक्षित्वानें शिवच असतो. ॥ ५६ ॥

विवरणः—वृत्तेः—अंतःकरणाच्या कोणत्याही वृत्तीचा; वृत्तिप्राग०—कोणतीही वृत्ति उत्पन्न होण्यापूर्वी तिचा जो अभाव असतो त्याचा, जिज्ञासा उत्पन्न झाली असतां तिचा व तिच्या पूर्वी मी अज्ञ आहें अशाप्रकारें प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या अज्ञानाचा साक्षी ( कूटस्थ ) शिव आहे. असा याचा भावार्थ समजावा. ॥ ५६ ॥

आतां पुढच्या दोन श्लोकांत या शिवनामक कूटस्थाचें स्वरूप सांगतातः—

**असत्यालंबनत्वेन सत्यः सर्वजडस्य तु ॥**
**साधकत्वेन चिद्रूपः सदा प्रेमास्पदत्वतः ॥ ५७ ॥**
**आनंदरूपः सर्वार्थसाधकत्वेन हेतुना ॥**
**सर्वसंबंधवत्वेन संपूर्णः शिवसंज्ञितः ॥ ५८ ॥**

अन्वयः—असौ शिवसंज्ञितः असत्यालंबनत्वेन सत्यः । तु सर्वजडस्य साधकत्वेन चिद्रूपः । सदा प्रेमास्पदत्वतः आनंदरूपः । सर्वार्थसाधकत्वेन हेतुना सर्वसंबंधवत्त्वेन च संपूर्णः अस्ति इति उच्यते ।

अर्थः—हा शिव नामक कूटस्थ मिथ्याजगाचें अधिष्ठान असल्यामुळें सत्य, सर्व जड सृष्टीचा प्रकाशक असल्यामुळें चिद्रूप; सर्वदा प्रेमाचें स्थान असल्यामुळें आनंदरूप आणि सर्व विषयांचा प्रकाशक व सर्वांशीं संबंध ठेवणारा असल्यामुळें संपूर्ण आहे असें सांगितलें जातें. ॥ ५७ । ५८ ॥

विवरणः—या सर्व प्रतिपादनाचा थोडक्यांत असा अभिप्राय आहे. छपन्नाव्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें हा वृत्ति, वृत्तींचा ( पूर्वींचा ) अभाव, जिज्ञासा इत्यादिकांचा साक्षी असल्यामुळें त्यांच्याहून भिन्न आहे. कारण साक्षी साक्ष्य पदार्थाहून ( झ० आपल्या विषयांहून ) भिन्न असतो; असें आपण व्यवहारांतही नित्य पहातों. तसाच तो भ्रामक जगाचें अधिष्ठान असल्यामुळें सत्य आहे. कारण भ्रमाचें अधिष्ठान सत्य असतें; असा अबाधित अनुभव आहे. सर्व जड पदार्थांचा तो प्रकाशक असल्यामुळें चैतन्यरूप आहे. कारण सचेतन प्राण्यावांचून जड पदार्थांचा कोणत्याही प्रकारचा व्यवहार होणें शक्य नसतें. हा अत्यंत प्रेमाचें स्थान असल्यामुळें आनंदरूप आहे. जो पदार्थ

दुःखरूप असतो त्याच्या ठायीं कोणाही विवेक्याचें प्रेम नसतें; आणि त्याचप्रमाणें सर्व विषयांचा प्रकाशक व त्यामुळें आकाशाप्रमाणें सर्वांशीं संबंध ठेवणारा असा हा शिव असल्यामुळें संपूर्णही आहे. ॥ ५७ । ५८ ॥

सारांशः—

**इति शैवपुराणेषु कूटस्थः प्रविवेचितः ॥**
**जीवेशत्वादिरहितः केवलः स्वप्रभः शिवः ॥ ५९ ॥**

अन्वयः—इति शैवपुराणेषु जीवेशत्वादिरहितः केवलः स्वप्रभः शिवः कूटस्थः प्रविवेचितः अस्ति ।

अर्थः—ह्याप्रमाणें शैव पुराणामध्यें जीव व ईश इत्यादि भावरहित, केवल व स्वयंप्रकाश शिवसंज्ञक कूटस्थ उत्तमप्रकारें भिन्न करून दाखविला आहे. ॥ ५९ ॥

विवरणः—शिवाचें ज्यामध्यें मुख्यतः प्रतिपादन केलेलें आहे अशा स्कंद, वायु इत्यादि पुराणांमध्यें जीवभाव व ईश्वरभाव यांनीं रहित अशा कूटस्थाचें पूर्वोक्त प्रकारें स्पष्ट विवेचन केलेलें आहे. ॥ ५९ ॥

जीवादिभावरहित असेंच त्याचें प्रतिपादन कां केलें असें कोणी विचारील ह्मणून ग्रंथकार ह्मणतात :—

**मायाभासेन जीवेशौ करोतीति श्रुतत्वतः ॥**
**मायिकावेव जीवेशौ स्वच्छौ तौ काचकुंभवत् ॥ ६० ॥**

अन्वयः—माया आभासेन जीवेशौ करोति इति श्रुतत्वतः जीवेशौ मायिकौ एव किंतु काचकुंभवत् तौ स्वच्छौ ।

अर्थः—माया चैतन्याभासाच्या योगानें जीव व ईश्वर यांस करिते अशी श्रुति असल्यामुळें जीव व ईश्वर मायिकच आहेत. पण कांचेच्या घागरीप्रमाणें ते स्वच्छ आहेत. ॥ ६० ॥

विवरणः—अनादि मूलमाया चैतन्याच्या आभासांच्या योगानें ईश्वर व जीव करिते व तीच स्वतः माया व अविद्या या नांवाची त्यांची उपाधि होते; अशी श्रुति आहे. त्यामुळें माया व अविद्या यांच्या अधीन असणारे जीव व ईश्वर मायिक आहेत; असें

निःसंशय ठरतें. पण ते जर मायिक आहेत असें ह्मटलें तर देहादिकांहून त्यांच्यामध्यें फरक कसा रहाणार ? असा कोणी प्रश्न करील ह्मणून ह्मणतात कीं मातीची घागर व कांचेची घागर ह्या दोन्ही घागरी जरी पृथ्वीद्रव्याच्याच असल्या तरी त्यांतील कांचेची घागरच जशी स्वच्छ असते, त्याप्रमाणें जीवेश व देहादि पदार्थ हे जरी मायिक असले तरी त्यांतील जीव व ईश्वर यांच्यामध्येंच स्वच्छता असणें युक्त व शक्य आहे. ॥ ६० ॥

वादीः—अहो पण मातीचा घट व कांचेचा घट जरी पार्थिव ( पृथ्वी द्रव्यापासून झालेला ) असला तरी त्यांच्या मूल द्रव्यांतच कांहीं विशेष असल्यामुळें एक अस्वच्छ व दुसरा स्वच्छ असा त्यांच्यामध्यें फरक पडतो. पण मायेमध्यें तसा विशेष आढळत नाहीं. मग कारण एक असतांना कार्यें भिन्न कशीं झालीं ?

सिद्धान्तीः—या तुझ्या प्रश्नाचें दृष्टांतासह उत्तर देतों ऐक :—

**अन्नजन्यं मनो देहात्स्वच्छं यद्वत्तथैव तौ ॥**
**मायिकावपि सर्वस्मादन्यस्मात्स्वच्छतां गतौ ॥ ६१ ॥**

अन्वयः—यद्वत् अन्नजन्यं मनः देहात् स्वच्छं तथा एव तौ मायिकौ अपि अन्यस्मात् सर्वस्मात् स्वच्छतां गतौ ।

अर्थः—ज्याप्रमाणें अन्नापासून उत्पन्न होणारें मन देहाहून स्वच्छ असतें त्याचप्रमाणें तें मायक असूनही दुसऱ्या सर्वांपेक्षां स्वच्छतेप्रत प्राप्त झालें. ॥ ६१ ॥

विवरणः—' हे शिष्या, मन अन्नमय आहे ' इत्यादि छांदोग्यांत वर्णन आहे व त्यावरून तें अन्नमय आहे असा निश्चय होतो. देहही अन्नमय आहे हें तर सर्वप्रसिद्ध आहे. अर्थात् मन व देह या उभयतांचेंही अन्न हें एकच कारण असतांना जसा त्यांच्यामध्यें स्वच्छता व अस्वच्छता यांच्या द्वारा फरक पडतो तसाच जीव व ईश्वर आणि जगत् यांच्यामध्येंही फरक पडतो असें समजावें. ॥ ६१ ॥

असें जरी मानलें, तरी त्यांच्यामध्यें चैतन्यता कोठून आली हें समजत नाहीं. असें कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार ह्मणतातः—

**चिद्रूपत्वं च संभाव्यं चित्त्वेनैव प्रकाशनात् ॥**
**सर्वकल्पनशक्ताया मायाया दुष्करं न हि ॥ ६२ ॥**

अन्वयः---चित्त्वेन एव प्रकाशनात् चिद्रूपत्वं च संभाव्यं हि सर्वकल्पनशक्तायाः मायायाः तत् दुष्करं न ।

अर्थः—चैतन्यत्वानेंच प्रकाशमान होत असल्यामुळें त्यांची चिद्रूपता संभवनीय आहे. कारण सर्व कल्पना करण्यास समर्थ असलेल्या मायेस ती दुष्कर नाहीं ॥ ६२ ॥

विवरणः---जीव व ईश्वर चैतन्यच आहेत असा अनुभव व अनुमान यांवरून निश्चय होत असल्यामुळें त्यांची चिद्रूपता शक्य आहे. व "हें कसें होतें?" असा येथें प्रश्नही योग्य होत नाहीं. कारण अघटित घटना करणाऱ्या मायेला अशक्य असें कांहींच नाहीं. ॥ ६२ ॥

प्रस्तुत प्रकारच कैमुतिक न्यायानें सिद्ध करितातः—

**अस्मन्निद्राऽपि जीवेशौ चेतनौ स्वप्नगौ सृजेत् ॥**
**महामाया सृजत्येतावित्याश्चर्यं किमत्र ते ॥ ६३ ॥**

अन्वयः—यदि अस्मन्निद्रा अपि स्वप्नगौ चेतनौ जीवेशौ सृजेत् । तर्हि एतौ महामाया सृजति इति अत्र ते किं आश्चर्यं ।

अर्थः—आमची निद्राही स्वप्नांतील चेतनरूप जीव व ईश्वर यास जर उत्पन्न करिते तर खऱ्या जीवेश्वरांस महामाया उत्पन्न करिते यांत तुला आश्चर्य तें काय वाटतें ? ॥ ६३ ॥

विवरणः—अरे आमची यःकश्चित् निद्राही जर स्वाप्निक जीवादिकांस निर्माण करूं शकते, तर महाशक्तियुक्त माया हवे तें करील यांत काय आश्चर्य आहे ? अशा प्रकारें प्रश्न करून जी वाक्यरचना करितात त्यास कैमुतिकन्याय ह्मणतात. ॥ ६३ ॥

असें जर आहे तर ही माहामाया जीवाप्रमाणें ईश्वरासही मोहित कां करीत नाहीं ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतात :—

**सर्वज्ञत्वादिकं चेशे कल्पयित्वा प्रदर्शयेत् ॥**
**धर्मिणं कल्पयेद्याऽस्याः को भारो धर्मकल्पने ॥ ६४ ॥**

अन्वयः—सर्वज्ञत्वादिकं च ईशे कल्पयित्वा प्रदर्शयेत् । या धर्मिणं कल्पयेत् अस्याः धर्मकल्पने कः भारः अस्ति ।

अर्थः—ही सर्वज्ञत्वादि भाव ईश्वराच्या ठायीं कल्पून दाखविते. जी र्मींची कल्पना करिते तिला धर्मांची कल्पना करण्यांत काय त्रास आहे? ॥ ६४ ॥

विवरणः—सर्वज्ञत्वादि येथील आदिशब्दानें सर्वशक्तित्व, सर्वकर्मत्व इत्यादि तिप्रोक्त धर्म घ्यावे. अहो धर्मी जो ईश्वर त्याचीही जर ही महामाया सहज कल्पना रूं शकते, तर धर्मांची कल्पना करण्यांत तिला कोणता भार होणार आहे ! हाही मुतिक न्याय होय. ॥ ६४ ॥

ही तुमची महामाया जर एवढी सामर्थ्यवान् आहे तर तिला कूटस्थाची कल्पना करण्यांत तरी काय त्रास होणार आहे ? असें कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार सांगतातः—

**कूटस्थेऽप्यतिशंका स्यादिति चेन्माऽतिशंक्यताम् ॥**
**कूटस्थमायिकत्वे तु प्रमाणं न हि विद्यते ॥ ६५ ॥**

अन्वयः—कूटस्थे अपि अतिशंका स्यात् इति चेत् मा अति शंक्यतां । हि कूटस्थमायिकत्वे तु प्रमाणं न विद्यते ।

अर्थः—कूटस्थाविषयींही मायिकत्वाची अतिशंका होईल असें जर ह्मणशील तर ( सांगतों ) अतिशंका करूं नये. कारण कूटस्थ मायिक आहे अशाविषयीं कांहीं प्रमाण नाहीं ॥ ६५ ॥

विवरणः—कूटस्थ मायिक आहे अशाविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. ह्मणजे जीव व ईश यांच्या मायिकत्वाविषयीं जसें श्रुतिप्रमाण आहे तसें याविषयीं नाहीं. व अनुमानादि दुसऱ्या योग्य प्रमाणांच्या योगानेंही याची सिद्धि करतां येत नाहीं. वास्तव भलतीच कांहींतरी शंका घेऊं नये. ॥ ६५ ॥

शिवायः—

**वस्तुत्वं घोषयंत्यस्य वेदान्ताः सकला अपि ॥**
**सपत्नरूपं वस्त्वन्यन्न सहन्तेऽत्र किंचन ॥ ६६ ॥**

अन्वयः—सकलाः अपि वेदान्ताः अस्य वस्तुत्वं घोषयन्ति । च अत्र सपत्नरूपं अन्यत् किंचन वस्तु न सहन्ते ।

अर्थः—सर्वेही वेदान्त याचें वस्तुत्व ओरडून सांगत आहेत व याच्या परमार्थतेविषयीं प्रतिपक्षभूत अशी दुसरी कोणतीही वस्तु सहन करित नाहींत. ॥ ६६ ॥

विवरणः—सर्व उपनिषदें हा कूटस्थ आत्मा पारमार्थिक सत्य आहे; असा घोष करीत आहेत. व त्यांना त्यांच्या यथार्थत्वाविषयींच्या समर्थनास आड येणारें कांहींहीं खपत नाहीं; असा याचा भावार्थ आहे. ॥ ६६ ॥

शंकाः—पण हा सर्व प्रकार तुह्मी श्रुतींची प्रमाणें देऊन सिद्ध कां करितां ? तर्कांच्या योगानें त्याची सिद्धि कां करीत नाहीं.

समाधानः—

**श्रुत्यर्थं विशदीकुर्मो न तर्काद्वच्मि किंचन ॥**
**तेन तार्किकशंकानामत्र कोऽवसरो वद ॥ ६७ ॥**

अन्वयः—वयं श्रुत्यर्थं विशदी कुर्मः । तर्कात् किंचन वस्तु न ( विशदीकुर्मः ) तेन तार्किकशंकानां अत्र कः अवसरः वद ।

अर्थः—आह्मी श्रुतीचा अर्थ स्पष्ट करितों. तर्कांच्या योगानें कोणतीही गोष्ट स्पष्ट करीत नाहीं. तेव्हां तार्किकांच्या शंकांना येथें अवकाश कसा मिळणार ? सांग. ॥ ६७ ॥

विवरणः—आस्तिक श्रद्धाळूंनीं कृतार्थ व्हावें ह्मणून आह्मी प्रयत्न करीत आहों. नास्तिकांशीं भांडत बसण्याची आमची मुळींच इच्छा नाहीं. यास्तव आह्मांस जें कांहीं सांगावयाचें आहे तें आह्मी श्रुतीचा अर्थ स्पष्ट करून सांगत आहों. तर्कांचा आह्मांस मुळींच आश्रय करावयाचा नाहीं. व जरी क्वचित् कोठें तर्क केला तरी तो श्रुतीच्या अर्थांशीं मिळेल व त्यामुळें श्रुतीचा अर्थ दृढ होईल असें वाटल्यासच करितों. तेव्हां आमच्या या प्रतिपादनांत तार्किकांच्या तर्कांस कशी जागा मिळणार ? ॥ ६७ ॥

आणि ज्याअर्थीं खरा प्रकार असा आहे,

**तस्मात्कुतर्कं संत्यज्य मुमुक्षुः श्रुतिमाश्रयेत् ॥**
**श्रुतौ तु माया जीवेशौ करोतीति प्रदर्शितम् ॥ ६८ ॥**

अन्वयः—तस्मात् मुमुक्षुः कुतर्कं संत्यज्य श्रुतिं आश्रयेत् । श्रुतौ तु माया जीवेशौ करोति इति प्रदर्शितम् ।

अर्थः—त्याअर्थी मुमुक्षूनें कुतर्कास सोडून श्रुतीचा आश्रय करावा. श्रुतीमध्यें तर माया, जीव व ईश्वर यांस करिते असें सांगितलेलें आहे ।।६८।।

विवरणः—श्रद्धाळूनीं केवल श्रुतीचा आश्रय करावा. श्रुतीमध्यें माया, जीव व ईश्वर यांस करिते असें स्पष्ट सांगितलेलें आहे. यास्तव प्रत्येक आस्तिक वैदिकानें त्या मताचाच अंगिकार करावा. उगीच भलभलते तर्क करीत बसूं नये. ॥ ६८ ॥

पण ईश्वर व जीव असे चैतन्याचे दोन प्रकार मायेनें कां केले?

**ईक्षणादिप्रवेशान्ता सृष्टिरीशकृता भवेत् ॥**
**जाग्रदादिविमोक्षांतः संसारो जीवकर्तृकः ॥ ६९ ॥**

अन्वयः—ईक्षणादिप्रवेशान्ता सृष्टिः ईशकृता भवेत् । तथा जाग्रदादि विमोक्षान्तः संसारः जीवकर्तृकः अस्ति ।

अर्थः—ईक्षणापासून प्रवेशापर्यंत सृष्टी ईश्वरानें केलेली आहे. त्याचप्रमाणें जाग्रदवस्थेपासून मुख्य मोक्षापर्यंत संसार जीवानें केलेला आहे. ॥ ६९ ॥

विवरणः—हा श्लोक पूर्वीं सहाव्या व सातव्या प्रकरणांतही गेला आहे. व त्याचें व्याख्यान मी यथामति केलें आहे. 'भिन्न भिन्न सृष्टीमुळें चैतन्याचे असे दोन प्रकार झाले आहेत. पण ते वस्तुतः मायिकच आहेत' हें दृढ करण्याकरितां पुनः हा श्लोक येथें घेतला आहे ॥ ६९ ॥

आतां कूटस्थ असंग असल्यामुळें त्याच्यामध्यें कोणत्याही प्रकारचा अतिशय येत नाहीं; असें सांगतातः—

**असंग एव कूटस्थः सर्वदा नास्य कश्चन ॥**
**भवत्यतिशयस्तेन मनस्येवं विचार्यताम् ॥ ७० ॥**

अन्वयः—कूटस्थः असंगः एव । अस्य कश्चन अतिशयः न भवति तेन मनसि सर्वदा एवं विचार्यताम् ।

अर्थः—कूटस्थ असंगच आहे याच्यामध्यें कोणत्याही प्रकारचा अतिशय येत नाहीं. यास्तव ( मुमुक्षूनें ) सर्वदां ह्या ( पुढें सांगितल्या ) प्रमाणें विचार करावा. ।। ७० ।।

विवरणः—ह्या कूटस्थाच्या ठायीं तो असंग असल्यामुळें जन्मादि अतिशय होत नाहीं; असा याचा तात्पर्यार्थ आहे. ॥ ७० ॥

आतां पूर्व श्लोकांत सांगितल्याप्रमाणें विचार कसा करावा तें सांगतात:—

**न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो न च साधकः ।।**
**न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ।। ७१ ।।**

अन्वयः—निरोधः न । च उत्पत्तिः न । बद्धः न । च साधकः न । मुमुक्षुः न । मुक्तः वै न । इति एषा परमार्थता अस्ति ।

अर्थः—( वस्तुतः ) नाश नाहीं, व उत्पत्ति नाहीं, कोणी बद्ध नाहीं व साधक नाहीं. कोणी मुमुक्षु नाहीं आणि मुक्त नाहीं अशी ही परमार्थता आहे. ।। ७१ ।।

**विवरणः**—ही श्रुति आहे. पण तिला श्रीगौडपादाचार्यांनीं मांडुक्योपनिषदावरील आपल्या कारिकेंत घेतली आहे. मायिक दृष्टि सोडून जर खरा खरा प्रकार काय आहे, ह्मणून पाहूं लागले तर तो असा भासतो. परमार्थदृष्ट्या ज्ञानी पुरुष " न शास्ता न शास्त्रं न शिष्यो न शिक्षा न च त्वं न चाहं न चायं प्रपंचः । स्वरूपावबोधो विकल्पासहिष्णुस्तदेकोवशिष्टः शिवः केवलोऽहं ।" असें ह्मणत असतो असें आचार्यांनींही एके ठिकाणीं सांगितलें आहे. ॥ ७१ ॥

वस्तुस्थिति जर अशी आहे तर श्रुतीनें जीव, ईश्वर व जग यांचें प्रतिपादन कां केलें ? असें कोणी विचारील ह्मणून सांगतातः—

**अवाङ्मनसगम्यं तं श्रुतिर्बोधयितुं सदा ।।**
**जीवमीशं जगद्वापि समाश्रित्य प्रबोधयेत् ।। ७२ ।।**

अन्वयः—श्रुतिः सदा अवाङ्मनसगम्यं तं बोधयितुं जीवं ईशं जगत् वा अपि समाश्रित्य प्रबोधयेत् ।

**अर्थः**—श्रुति सर्वदा वाणी व मन यांस अगम्य अशा कूटस्थाचा बोध करवून देण्यास्तव जीव, ईश्वर व जगत्‌ही यांचा पूर्णपणें आश्रय करून बोध करविते ॥ ७२ ॥

**विवरणः**—केवल मुमुक्षूंस कूटस्थाचें ज्ञान व्हावें ह्मणून श्रुति प्रसंगोपात्त जीवादिकांचें वर्णन करिते. ॥ ७२ ॥

तात्पर्य :—

**यया यया भवेत्पुंसां व्युत्पत्तिः प्रत्यगात्मनि ॥**
**सा सैव प्रक्रियेह स्यात् साध्वीत्याचार्यभाषितम् ॥ ७३ ॥**

अन्वयः—पुंसां प्रत्यगात्मनि यया यया व्युत्पत्तिः भवेत् सा सा एव इह साध्वी प्रक्रिया स्यात् इति आचार्यभाषितं अस्ति ।

**अर्थः**—पुरुषांस प्रत्यगात्म्याविषयीं ज्या ज्या प्रक्रियेच्या योगानें बोध होईल, ती तीच येथें उत्तम प्रक्रिया होय असें आचार्यांनीं सांगितलें आहे. ७३

**विवरणः**—हें सुरेश्वराचार्यांचें वार्तिक आहे. यांत हेतूकडे दृष्टि देऊन तो ज्या युक्तीनें साध्य होईल तीच युक्ति योजावी असें सांगितलें आहे. सारांश ऐक्यरूप तत्त्वाचेंच श्रुति बोध करिते हें जरी खरें आहे, तरी तिनें या वार्तिकांत सांगितल्या-प्रमाणें अज्ञांकरितां अनेक उपाय योजिले आहेत. पण त्यावरून मुख्य तत्त्वामध्यें कांहीं भेद पडतो असें समजू नये. ॥ ७३ ॥

**प्रश्नः**—श्रुतींचा जर मुख्य हेतु एकच आहे तर त्यांचें प्रतिपादन करणारांमध्यें एवढा मोठा मतभेद कां दिसतो ? उत्तरः—॥ ७४ ॥

**श्रुतितात्पर्यमखिलमबुद्ध्वा भ्राम्यते जडः ॥**
**विवेकी त्वखिलं बुद्ध्वा तिष्ठत्यानन्दवारिधौ ॥ ७४ ॥**

अन्वयः—अखिलं श्रुतितात्पर्यं अबुद्ध्वा जडः भ्राम्यते । विवेकी तु अखिलं बुद्ध्वा आनंदवारिधौ तिष्ठति ।

**अर्थः**—सर्व श्रुतितात्पर्य न जाणून मूढ तत्त्वार्थाविषयीं भ्रांत होतो. पण विवेकी तें सर्व जाणून आनंदसमुद्रांत निमग्न होऊन रहातो. ॥ ७४ ॥

**विवरण:**—असंख्य श्रुतींची एकवाक्यता करणें हें कांहीं सोपें काम नव्हे. यास्तव सामान्यजन त्याविषयीं सर्वदा मोहित होतात. पण एकादाच जो विवेकी असतो तो श्रुतींचें तात्पर्य जाणून आनंदसमुद्रांत लोळत रहातो. सारांश विवेक हें सर्वसुखाचें आगर होय. ॥ ७४ ॥

**प्रश्न:**—पण श्रुतींची एकवाक्यता केल्यावर तरी विवेकी पुरुषाचा निश्चय कसा होतो ? **उत्तर:**—

**मायामेघो जगन्नीरं वर्षत्वेष यथा तथा ॥**
**चिदाकाशस्य नो हानिर्न वा लाभ इति स्थितिः ॥ ७५ ॥**

**अन्वय:**—एषः मायामेघः जगन्नीरं यथा तथा वर्षतु । चिदाकाशस्य नो हानिः वा न लाभः इति स्थितिः भवति ।

**अर्थ:—हा मायारूपी मेघ जगद्रूपी उदकाचा कसाही वर्षाव करो. त्यामुळें चिद्रूप आकाशाची कांहीं हानि नाहीं व लाभही नाहीं अशी स्थिति होते. ७५**

**विवरण:**—ज्याला श्रुतींचें तात्पर्य समजून चुकलें आहे, त्यास जग इत्यादिकांविषयीं कांहींच वाटत नाहीं. तो आत्मवस्तूचे ठायीं निश्चल होऊन रहातो. प्रसिद्ध मेघांच्या केवळ्याही जोराच्या वृष्टीनें सुद्धां जसा आकाशास कधीं विकार होत नाहीं, त्याप्रमाणें मायारूपी मेघ जगद्रूपी जलाचा कसाही जरी वर्षाव करूं लागला तरी त्यापासून चिदात्म्याची कांहीं हानि किंवा लाभ होत नाहीं. ॥ ७५ ॥

असो:—

**इमं कूटस्थदीपं योऽनुसंधत्ते निरंतरम् ॥**
**स्वयं कूटस्थरूपेण दीप्यतेऽसौ निरंतरम् ॥ ७६ ॥**

**अन्वय:**—इमं कूटस्थदीपं यः निरंतरं अनुसंधत्ते। असौ स्वयं कूटस्थरूपेण निरंतरं दीप्यते ।

**अर्थ:—या कूटस्थदीपाचें जो सतत चिंतन करितो तो स्वतः कूटस्थरूपानें अखंडित प्रकाशमान होतो. ॥ ७६ ॥**

**विवरणः**—या श्लोकांत प्रस्तुत प्रकरणाच्या अभ्यासापासून मिळणाऱ्या फलाचा निर्देश केला आहे. या प्रकरणाच्या सहा तात्पर्यबोधक लिंगावरून–निरुपाधिक त्वं-पदार्थ जो कूटस्थ त्याच्या ज्ञानास प्रतिबंध करणाऱ्या प्रमेयगत असंभावनेची निवृत्ति होते–असेंच दृढ होतें. सारांश कूटस्थाचें सतत चिंतन केलें असतां चिंतकास अखंड ब्रह्मप्राप्ति होते. ॥ ७६ ॥

ह्याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या कूटस्थदीपनामक आठव्या प्रकरणाचें श्रीशंकराचार्यभक्त विष्णु वामन बापटकृत सान्वयार्थ मराठी विवरण संपूर्ण झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# अथ ध्यानदीपः



श्री भारतीतीर्थांनीं मागच्या प्रकरणाच्या शेवटच्या श्लोकांत 'जो सतत ब्रह्मचिंतन करितो तो मुक्त होतो' असें सांगितलें. पण अनेक प्रतिबंधांमुळें सर्वांसच तें करितां येत नाहीं. कांहीं असेही लोक आढळतात कीं ज्यांना श्रवणादि साधनांची जरी रुचि असली व ते जरी त्याविषयीं प्रयत्न करीत असले तरी त्यांचें चित्त अनेक मलांनीं भरलेलें असल्यामुळें स्थिर होत नाहीं. हा सर्व सत्य प्रकार ध्यानांत आणून दयालु ग्रंथकार या नवम प्रकरणांत मोक्षरूप फल देणाऱ्या तत्त्वसाक्षात्काराच्या अत्यंत उपयोगी अशी उपासना करण्याविषयीं उपदेश करणार आहेत. पण त्याकरितां अगोदर ब्रह्मतत्त्वाच्या उपासनेनेंही मोक्ष होतो अशी प्रतिज्ञा करितात :—

**संवादिभ्रमवद्ब्रह्मतत्त्वोपास्त्याऽपि मुच्यते ॥**
**उत्तरे तापनीयेऽतः श्रुतोपास्तिरनेकधा ॥ १ ॥**

**अन्वय:**—संवादिभ्रमवत् ब्रह्मतत्त्वोपास्त्या अपि मुच्यते । अतः उत्तरे तापनीये उपास्तिः अनेकधा श्रुता ।

**अर्थ:—संवादि भ्रमाप्रमाणें ब्रह्मतत्त्वाच्या उपासनेनेंहीं साधक मुक्त होतो. आणि एवढ्याकरितांच उत्तरतापनीयोपनिषदांत उपासना अनेक प्रकारें सांगितलेली आहे. ॥ १ ॥**

**विवरण:**—ज्याप्रमाणें संवादिभ्रमामुळें प्रवृत्त झालेल्या पुरुषास इष्ट पदार्थ प्राप्त होतो, त्याप्रमाणें ब्रह्माच्या उपासनेनेंही मोक्ष मिळतो. याविषयीं प्रमाण काय म्हणून कोणी विचारील तर सांगतों. अथर्व वेदाचें पूर्वोत्तरतापनीयसंज्ञक उपनिषद् आहे. त्यांत व विशेषतः उत्तरतापनीयांत ही उपासना अनेकप्रकारें सांगितलेली आहे. अर्थात् ती श्रुतिप्रोक्त असल्यामुळें कोणाही आस्तिक वैदिकास ग्राह्य होय. ॥ १ ॥

पहिल्या श्लोकांत 'संवादिभ्रमाप्रमाणें' असें म्हटलें आहे. पण संवादी भ्रम म्हणजे काय हें सांगण्याकरितां श्रीसुरेश्वराचार्यांचें प्रस्तुत भ्रमप्रतिपादक वार्तिक येथें घेतात :—

**मणिप्रदीपप्रभयोर्मणिबुध्याऽभिधावतोः ॥**
**मिथ्याज्ञानाविशेषेऽपि विशेषोऽर्थक्रिया प्रति ॥ २ ॥**

**अन्वयः**—मणीप्रदीपप्रभयोः मणिबुद्धयाभिधावतोः मिथ्याज्ञानाविशेषे अपि अर्थक्रियां प्रति विशेषः अस्ति ।

**अर्थः**—मण्याची प्रभा व दीपाची प्रभा याच्याकडे हा मणि आहे असें समजून धांवणाऱ्या दोघांचेंही मिथ्याज्ञान जरी सारखेंच असलें तरी अर्थक्रियेमध्यें ( सफल प्रवृत्तींत ) भेद असतो. ॥ २ ॥

**विवरण:**—एकानें दुरून एका रत्नाची प्रभा पाहिली व दुसऱ्यानें दिव्याची पाहिली. आणि दोघांनाही हा मणी आहे असें वाटून ते तिकडे मोठ्या आशेनें धांवूं लागले. नुसत्या प्रभेलाच मणी मानल्यामुळें त्या दोघांचेंही ज्ञान जरी भ्रामक होतें तरी त्यांस त्या भ्रामक ज्ञानामुळेंच फल निरनिराळें मिळालें. ह्मणजे जो मण्याच्या प्रभेला मणी समजून तिकडे गेला त्यास खरोखरीच मणी मिळाला व त्यामुळें अत्यानंद झाला. पण ज्यानें दिव्याच्या प्रभेला मणी समजून तिकडे धांव मारिली होती त्याला नुस्त्या श्रमांचा व निराशा झाल्यामुळें दुःखाचा लाभ झाला. ॥ २ ॥

आतां वरील वार्तिकाचें या पुढील तीन श्लोकांत स्पष्टीकरण करितात :—

**दीपोऽपवरकस्यांतर्वर्तते तत्प्रभा बहिः ॥**
**दृश्यते द्वार्यथान्यत्र तद्वद्दृष्टा मणेः प्रभा ॥ ३ ॥**

**अन्वय**—दीपः अपवरकस्य अंतर् वर्तते च तत्प्रभा बहिः द्वारि दृश्यते अथ तद्वत् मणेः प्रभा दृष्टा ।

**अर्थः**—एकाद्या मंदिराच्या खिडकींत दिवा ठेवलेला असतो. व त्याची प्रभा बाहेरच्या द्वारांत दिसते. तसाच दुसऱ्या एका ठिकाणीं कोठें मणी आहे. व त्याचीही प्रभा ( दिव्याच्या प्रभेप्रमाणेंच ) दिसत आहे. ॥ ३ ॥

**दूरे प्रभाद्वयं दृष्ट्वा मणिबुध्याऽभिधावतोः ॥**
**प्रभायां मणिबुद्धिस्तु मिथ्याज्ञानं द्वयोरपि ॥ ४ ॥**

अन्वयः—दूरे प्रभाद्वयं दृष्ट्वा मणिबुद्ध्या अभिधावतोः द्वयोः अपि प्रभायां मणिबुद्धिः तु मिथ्याज्ञानं एव ।

अर्थ—दूर दोन प्रभा पाहून तो मणी आहे अशा बुद्धीनें धांवणाऱ्या दोघांचेंही—प्रभेच्या ठायीं मणिबुद्धि करणें—हें मिथ्याज्ञानच होय. ॥ ४ ॥

**न लभ्यते मणिर्दीपप्रभां प्रत्यभिधावता ॥**
**प्रभायां धावताऽवश्यं लभ्येतैव मणिर्मणेः ॥ ५ ॥**

अन्वयः—दीप प्रभां प्रति अभिधावता ( पुरुषेण ) मणिः न लभ्यते । मणे प्रभायां अभिधावता तु मणिः अवश्यं लभ्येत एव ।

अर्थः—दीपप्रभेकडे धांवणाऱ्या पुरुषास रत्नाची प्राप्ति होत नाहीं. पण मण्याच्या प्रभेकडे धांवणाऱ्यास रत्न अवश्य मिळतें. ॥ ५ ॥

विवरणः—याविषयीं अशी कल्पना करावी कीं, एखाद्या राजमंदिरांत कोनाड्यामध्यें दिवा ठेवलेला आहे व त्याच्या भिंतीस बाहेरून लहानसें छिद्र आहे. दुरून पहाणारास त्यांतून प्रभा दिसते. पंडित अच्युतरायांनीं " किड्यांचा उपद्रव कमी व्हावा ह्मणून राजाच्या किंवा श्रीमंताच्या घरीं जाळीदार कंदिल लावून उघड्या जागेंत ठेवितात व त्याच्या जाळींतून वर्तुळ प्रभा बाहेर पडते. हें श्रीमंतांच्या घरीं जाणाऱ्यायेणाऱ्यांस माहित आहेच. " असें ह्मटलें आहे. प्रस्तुत ग्रंथकारांच्या वेळीं आपला देश राजकीय ऐश्वर्याचा उपभोग घेत असल्यामुळें त्यांचा हा उल्लेख अगदीं बरोबर आहे. पण सांप्रतकालीं महाराष्ट्राच्या दुर्दैवामुळें तसा प्रकार नाहीं. व त्यामुळें अशा प्रकारचा कंदील पुष्कळांस पहावयास मिळण्याचीही मारामार आहे. असो; अशा प्रकारची प्रभा पाहून कोणी रत्नाकरितां हपापलेला मनुष्य ' हें रत्न आहे; सहज सांपडण्यासारखें असल्यास पाहूं या. ' असें ह्मणून तिकडे पळत सुटतो. तसाच दुसरा एक दुसऱ्या कोठें पडलेल्या रत्नाची वर्तुळ प्रभा पाहून रत्नाच्या आशेनें तिकडे धांवतो. रत्नाची प्रभाही दिव्याप्रमाणेंच चोहोंकडे पसरत असल्यामुळें वेलींनीं किंवा पानांनीं आच्छादित अशा एखाद्या वृक्षाच्या तळीं तें पडलेलें असून, सर्व बाजूंनीं आच्छादित झालेलें आहे, व एकीकडूनच त्याची वर्तुळ प्रभा पडत आहे अशी कल्पना करावी. हे दोघेही लोभी वर्तुलाकार प्रभेलाच रत्न समजल्यामुळें मिथ्याज्ञानवान् आहेत; हें

उघड आहे. पण जो दिव्याच्या प्रभेस रत्न समजतो त्याचे श्रम व्यर्थ होतात व जो रत्नाच्या प्रभेस रत्न समजतो त्याचे श्रम सफल होतात. ॥ ३, ४, ५ ॥

ह्याप्रमाणें वार्तिकाचा अर्थ करून आतां यांतील ससंवादी भ्रम कोणता व विसंवादी कोणता हें सांगतातः—

**दीपप्रभामणिभ्रांतिर्विसंवादिभ्रमः स्मृतः ॥**
**मणिप्रभामणिभ्रांतिः संवादिभ्रम उच्यते ॥ ६ ॥**

**अन्वयः**—दीपप्रभामणिभ्रांतिः विसंवादिभ्रमः स्मृतः । तथा मणिप्रभामणिभ्रांतिः संवादिभ्रमः उच्यते ।

**अर्थः**—**दिव्याच्या प्रभेच्या ठायीं जी मण्याची भ्रांति तो विसंवादि भ्रम होय व रत्नाच्या प्रभेच्या ठायीं जी मण्याची भ्रांति तो ससंवादि भ्रम असें ह्मणतात. ॥ ६ ॥**

**विवरणः**—ज्या भ्रांतीमुळें केवळ श्रमाचाच लाभ होतो ती विसंवादी भ्रांति व जिच्यामुळें इष्ट पदार्थांची प्राप्ति होते ती ससंवादि भ्रांति होय. ॥ ६ ॥

ह्याप्रमाणें प्रत्यक्ष प्रमाणगम्य भ्रम दाखवून अनुमान व आगम या प्रमाणांमध्येंही हे दोन्ही भ्रम होतात असें आतां सांगतात :—

**बाष्पं धूमतया बुद्ध्वा तत्रांगारानुमानतः ॥**
**वन्हिर्यदृच्छया लब्धः स संवादिभ्रमो मतः ॥ ७ ॥**

**अन्वयः**—बाष्पं धूमतया बुद्ध्वा तत्र अंगरानुमानतः प्रवृत्तेन यदृच्छया वह्निः लब्धः सः संवादिभ्रमः मतः ।

**अर्थः**—**बाष्पास धूर मानून व त्या ठिकाणीं अग्नीचें अनुमान करून प्रवृत्त झालेल्या पुरुषास जर सहज येथें अग्नि सांपडला, तर हा संवादी भ्रम होय असें मानलेलें आहे. ॥ ७ ॥**

**विवरणः**—विशेषतः थंडीच्या दिवसांत सकाळीं तळ्यांतून निघणारी वाफ पाहून एकाद्यास तो धूरच आहे असें वाटण्याचा व त्यावरून अग्नीचें अनुमान होण्याचा पुष्कळ संभव असतो. आणि असें अनुमान झाल्यामुळें तिकडे अग्नीच्या

आशेने किंवा ‘ आग लागली आहे ’ अशा भीतीनें तो गेल्यास जर त्याला दैववशात् अग्नि दिसला तर या धुमविषयींच्या भ्रमास संवादिभ्रम ह्मणतात. हें संवादी अनुमानाचें उदाहरण होय. ॥ ७ ॥

तथैव:—

**गोदावर्युदकं गंगोदकं मत्वा विशुद्धये ॥**
**संप्रोक्ष्य शुद्धिमाप्नोति स संवादिभ्रमो मतः ॥ ८ ॥**

अन्वय:—गोदावर्युदकं गंगोदकं मत्वा विशुद्धये संप्रोक्ष्य शुद्धिं आप्नोति सः संवादिभ्रमः मतः ।

अर्थ:—**गोदावरीचें उदक गंगोदक आहे असें मानून शुद्धीकरितां त्यानें प्रोक्षण केलें असतां शुद्धता प्राप्त होते. हा संवादिभ्रम होय. ॥ ८ ॥**

**विवरण:**—संवादि आगमभ्रमाचें हें उदाहरण आहे. पुराणांतील वर्णन ऐकून त्यावरून गोदावरीचें उदक गंगोदकच आहे, असा निश्चय करणं हा वस्तुत: भ्रम आहे. पण शरीराची शुद्धि होणें हें कार्य केवल भावनेनेंही होतें असा सर्व धार्मिकांचा अनुभव आहे. तस्मात् हा जरी भ्रम असला तरी तो विसंवादी नसून संवादी आहे; असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. ॥ ८ ॥

आगमजन्य संवादीभ्रमाचें आणखी एक उदारहण देतात:—

**ज्वरेणाप्तः सन्निपातं भ्रांत्या नारायणं स्मरन् ॥**
**मृतः स्वर्गमवाप्नोति स संवादिभ्रमो मतः ॥ ९ ॥**

अन्वय:—ज्वरेण संनिपातं आप्तः अत एव भ्रांत्या नारायणं स्मरन् मृतः स्वर्गं अवाप्नोति सः संवादिभ्रमः मतः ।

अर्थ:—**ज्वराच्या योगानें ज्यास त्रिदोष झाला आहे व त्या वायूच्या भ्रमामध्येंच नारायणाचें स्मरण करून जो मरण पावला आहे, तो स्वर्गास जातो. हा संवादी भ्रम मानिलेला आहे. ॥ ९ ॥**

**विवरण:**—ज्वरामुळें ज्याला संनिपात झाला आहे व त्यामुळें भ्रांतीनेंच ‘ नारायण, नारायण ’ असें ह्मणत ज्यानें प्राण सोडला आहे तो स्वर्गास जातो. याविषयीं पुराणांत अनेक कथा आहेत. आधुनिकांना त्या आज फारशा पटण्यासारख्या नाहींत हें खरें. पण ज्यांना आगमप्रमाण मान्य आहे, अशा श्रद्धाळु पुरुषाकरितां

च या भ्रमाचा येथें उल्लेख केला आहे असें समजावें. सारांश 'नारायण' शब्द अंतकाली भ्रमानें जरी मुखांतून निघाला तरी त्याचें फल मिळत असल्यामुळें तो भ्रमही संवादी होय. ॥ ९ ॥

सारांश:—

**प्रत्यक्षस्यानुमानस्य तथा शास्त्रस्य गोचरे ॥**
**उक्तन्यायेन संवादिभ्रमाः संति हि कोटिशः ॥ १० ॥**

**अन्वय:**—उक्तन्यायेन प्रत्यक्षस्य अनुमानस्य तथा शास्त्रस्य गोचरे संवादिभ्रमाः कोटिशः संति हि ।

**अर्थ:**—पूर्वोक्तन्यायानें प्रत्यक्ष, अनुमान व तसेंच शास्त्र यांविषयीं संवादिभ्रम कोट्यवधि आहेत हें प्रसिद्ध आहे. ॥ १० ॥

**विवरण:**—प्रत्यक्षादि तिन्ही संवादी भ्रमांचीं उदाहरणें वर दिलीं आहेत व त्याचप्रमाणें आणखीं असंख्य उदाहरणें मिळण्यासारखीं आहेत. ॥ १० ॥

आतां यांना जर संवादी भ्रम न मानलें तर त्यांची उपपत्तीच लागत नाहीं. असें आतां सांगतात:—

**अन्यथा मृत्तिकादारुशिलाः स्युर्देवताः कथम् ॥**
**अग्नित्वादिधियोपास्याः कथं वा योषिदादयः ॥ ११ ॥**

**अन्वय:**—अन्यथा मृत्तिकादारुशिलाः देवताः कथं स्युः । योषिदादयः वा अग्नित्वादिधिया कथं उपास्याः स्युः ।

**अर्थ:—असें जर न मानलें तर माति, लांकुड, व पाषाण, देव कसे होतील ? किंवा स्त्रीपुरुषादिक अग्नित्वबुद्धीनें उपासना करण्यास योग्य कसे होतील ?**

**विवरण:**—पूर्वोक्त आगमादिजन्य भ्रमास संवादी जर न मानलें तर मृत्तिकेची, लांकडी किंवा दगडी मूर्ति देवता कशी होईल ? व तिच्या उपासनेनें चित्तशुद्धी-सारखीं परम फलें जीं मिळतात त्यांची उपपत्ति कशी लागेल ? पार्थिवलिंग, गणपति, इत्यादि मृण्मयदेवतांचे अनेक उपासक कृतकृत्य झाल्याचें दिसतें. कृष्णातीरीं श्रीकृष्णाबाईची लांकडी मूर्ति असून माघमासीं सर्वत्र उत्सव होत असतात व त्या मूर्तीवर श्रद्धा ठेवणारे अनेक भक्त संपदादिसंपन्न झालेले आढळतात. प्रसिद्ध विठ्ठलमूर्ति

पाषाणाची असूनही ज्ञानदेव, तुकाराम इत्यादि तिचे भक्त सर्व महाराष्ट्राचा उद्धार करून निजधामास गेले, हें आबालवृद्धांस ठाऊक आहे. तसेंच छान्दोग्यामध्यें " हे गौतमा, स्त्री हाच अग्नि आहे; पुरुष अग्नि आहे, पृथिवी अग्नि आहे " इत्यादि प्रकारें भावना करून उपासना करण्याविषयीं सांगितलें आहे, व त्यामुळें ब्रह्मलोकाची प्राप्ति होते असेंही स्पष्टपणें ह्मटलें आहे. अर्थात् भावनेमुळें निव्वळ भ्रमही संवादी भ्रम होतो हें निर्विवाद होय. ॥ ११ ॥

**अयथावस्तुविज्ञानात्फलं लभ्यत ईप्सितम् ॥**
**काकतालीयतः सोऽयं संवादिभ्रम उच्यते ॥ १२ ॥**

अन्वयः—यस्मात् अयथावस्तुविज्ञानात् ईप्सितं फलं काकतालीयतः लभ्यते सः अयं संवादिभ्रमः उच्यते ।

अर्थः—ज्या विपरीतज्ञानापासून इष्ट फल दैववशात् मिळतें तो हा संवादी भ्रम होय असें ह्मटलें जातें ॥ १२ ॥

विवरणः—या सर्व प्रतिपादनाचें तात्पर्य असें कीं—शास्त्रविहित किंवा अविहित अशा ज्या विपरीत भावनेच्या योगानेंही काकतालीयन्यायानें इष्ट फल मिळतें त्यास संवादी भ्रम ह्मणतात. अर्थात् ज्या भ्रमाच्या योगानें इष्ट फल मिळत नाहीं तो विसंवादी भ्रम होय. काकतालीयन्याय ह्मणजे कावळा बसावयास व डहाळी मोडावयास एक गांठ पडणें. ॥ १२ ॥

ह्याप्रमाणें संवादीभ्रमरूपदृष्टांताचें उपपादन करून आतां तोच न्याय दार्ष्टांतिकाचे ठायीं योजून दाखवितातः—

**स्वयं भ्रमोऽपि संवादी यथा सम्यक्फलप्रदः ॥**
**ब्रह्मतत्त्वोपासनाऽपि तथा मुक्तिफलप्रदा ॥ १३ ॥**

अन्वयः—संवादी स्वयं भ्रमः अपि यथा सम्यक् फलप्रदः तथा ब्रह्मतत्त्वोपासना अपि मुक्तिफलप्रदा भवति ।

अर्थः—संवादी भ्रम स्वतः भ्रम असूनही जसा उत्तम फल देतो, त्याप्रमाणें ब्रह्मतत्त्वाची उपासनाही मुक्तिरूप फल देणारी होते. ॥ १३ ॥

विवरणः—या प्रकरणाच्या प्रथम श्लोकांत ब्रह्मतत्त्वोपासनेला संवादीभ्रमाचा दृष्टांत दिला होता, हें वाचकांच्या ध्यानांत असेलच. त्या दृष्टांताचें एवढा वेळ विवेचन

करून तोच न्याय ब्रह्मतत्त्वोपानेस कसा लागू पडतो, तें येथें सांगितलें आहे. संवादी भ्रम जरी स्वतः भ्रम असला तरी तो इष्ट फल जसें देऊं शकतो, त्याचप्रमाणें ब्रह्मतत्त्वाची उपासनीहा जरी भ्रमरूप असली तरी ती इष्ट फल जी मुक्ति तिला देऊं शकते. शंका:-पण असें जर ह्मटलें तर 'ज्ञानावाचून मुक्ति नाहीं' या श्रुतिवचनाचा बाध नाहीं का होणार? समाधानः-श्रुतिवचनाचा बाध होईल असें कोणतेंही विधान आह्मी करीत नसतों. संवादी भ्रमांत मण्याच्या प्रभेस मणी समजून जो त्याच्याकडे धांवतो तो त्या भ्रमामुळें मण्याजवळ जाऊन पोंचतो; व 'अरे मी ज्याला मणी समजलों होतों तो मणी नव्हे' असें त्यास समजतें. पण-ही मण्याप्रमाणें दिसणारी प्रभा कशाची आहे तें पहावें-असें त्यास सहजच वाटतें व त्यामुळें शेवटीं मणी मिळतो. त्याप्रमाणेंच ब्रह्मतत्त्वाच्या उपासनेमुळें साधक जितेंद्रियत्वादि गुणसंपन्न होऊन पूर्णपणें अंतर्मुख होतो; व भृगुपुत्र वारुणीप्रमाणें किंवा इंद्राप्रमाणें विचार केल्यावर त्यास आत्मसाक्षात्कार होतो. सारांश संवादी भ्रम व ब्रह्मतत्त्वोपासना यांच्यामध्यें सर्वप्रकारें साम्य आहे. ॥ १३ ॥

पूर्वोक्तप्रकाराचाच आणखी विस्तार करितातः—

**वेदांतेभ्यो ब्रह्मतत्त्वमखंडैकरसात्मकम् ॥**
**परोक्षमवगम्यैतदहमस्मीत्युपासते ॥ १४ ॥**

**अन्वयः**—वेदांतेभ्यः अखंडैकरसात्मकं ब्रह्मतत्त्वं परोक्षं अवगम्य एतत् अहं अस्मि इति उपासते।

**अर्थः—वेदान्त वाक्यांच्या योगानें अखंड एकरसरूप ब्रह्मतत्त्वास परोक्ष जाणून 'तें मी आहें' अशी उपासना करितो. ॥ १४ ॥**

**विवरणः**—वेदान्तवाक्यांचें श्रद्धापूर्वक श्रवण केल्यानें ब्रह्मतत्त्वाचें परोक्षज्ञान होतें. ह्मणजे तें अविच्छिन्न एकरसरूप आहे असें नुसतें समजतें. पण त्या निश्चयपूर्वक समजलेल्या स्वरूपाचा साक्षात्कार झालेला नसतो. यास्तव त्याच्या साक्षात्कारार्थ 'तें ब्रह्मच मी आहें' अशी भावना करून साधक उपासना करितो. ॥ १४ ॥

आतां या श्लोकांत पूर्वोक्त परोक्षज्ञानाचें स्वरूप सांगतातः—

**प्रत्यग्व्यक्तिमनुल्लिख्य शास्त्राद्विष्ण्वादि मूर्तिवत् ॥**
**अस्ति ब्रह्मेति सामान्यज्ञानमत्र परोक्षधीः ॥ १५ ॥**

अन्वयः---प्रत्यग्व्यक्तिं अनुल्लिख्य शास्त्रात् 'ब्रह्म अस्ति' इति विष्ण्वादि मूर्तिवत् सामान्यज्ञानं अत्र परोक्षधीः विवक्षिता ।

अर्थः—साक्षी आत्म्यास विषय न करिता शास्त्रावरून 'ब्रह्म आहे' असें विष्णु, शिव इत्यादिकांच्या मूर्तिप्रमाणें जें सामान्य ज्ञान होतें, तेंच येथें 'परोक्ष ज्ञान' ह्मणून विवक्षित आहे. ॥ १५ ॥

विवरणः—भगवान् विष्णु, चतुर्भुज, शंखचक्रगदाधारी, शेषशायी इत्यादि प्रकारचा आहे. असें शास्त्रावरून जरी ज्ञान झालें तरी ती ती मूर्ति प्रत्यक्ष दिसत नाहीं. तसेंच शास्त्रावरून 'ब्रह्म आहे' असा निश्चय होणें हेंच परोक्ष ज्ञान होय. या ज्ञानामध्यें वस्तूचा साक्षात्कार होत नसल्यामुळें त्यास परोक्ष ह्मणण्याचा शास्त्रीय प्रघात आहे. ॥ १५ ॥

'विष्ण्वादि मूर्तिवत्' असा जो मागच्या श्लोकांत उल्लेख केला आहे, त्याचें आतां स्वतः ग्रंथकार स्पष्टीकरण करितातः---

**चतुर्भुजाद्यवगतावपि मूर्तिमनुल्लिखन् ॥**
**अक्षैः परोक्षज्ञान्येव न तदा विष्णुमीक्षते ॥ १६ ॥**

अन्वयः—शास्त्रात् चतुर्भुजाद्यवगतौ अपि मूर्तिं अनुल्लिखन् पुरुषः परोक्षज्ञानी एव अतः तदा अक्षैः विष्णुं न ईक्षते ।

अर्थः—शास्त्रावरून 'चतुर्भुज' इत्यादि ज्ञान जरी झालें तरी त्यास साक्षात् न पहाणारा पुरुष परोक्षज्ञानीच होय. त्यामुळें ध्यानसमयीं तो भगवान् विष्णूस प्रत्यक्ष पहात नाहीं. ॥ १६ ॥

त्या मूर्तीचा साक्षात्कार जर होत नाहीं तर तो भ्रम आहे असें तरी कां ह्मणूं नये ? या शंकेचें आतां निरसन करितातः—

**परोक्षत्वापराधेन भवेन्नातत्त्ववेदनम् ॥**
**प्रमाणेनैव शास्त्रेण सत्यमूर्तेर्विभासनात् ॥ १७ ॥**

अन्वयः—प्रमाणेन एव शास्त्रेण सत्यमूर्तेः विभासनात् परोक्षत्वापराधेन अतत्त्ववेदनं न भवेत् ।

अर्थः—प्रमाणभूत शास्त्राच्या योगानें यथार्थमूर्तीची उत्तमप्रकारें भावना होत असल्यामुळें केवल परोक्षज्ञानत्वरूप अपराधामुळें अतत्त्ववेदन सिद्ध होणार नाहीं. ॥ १७ ॥

विवरणः—परोक्षज्ञान हें भ्रांतीचें कारण नव्हे. कारण भ्रांति व परोक्षज्ञान यांच्यामध्यें कार्यकारणभाव दिसत नाहीं. शिवाय शास्त्र हें प्रमाण आहे. तेव्हां शास्त्रावरून ज्याचें ज्ञान होतें तो भ्रम असें कसें ह्मणतां येईल ? ॥ १६।१७ ॥

ह्याप्रमाणें दृष्टान्ताचें स्पष्टीकरण करून आतां त्याची ब्रह्माच्या परोक्षज्ञानाचे ठायीं योजना करितातः—

**सच्चिदानन्दरूपस्य शास्त्राद्भानेऽप्यनुल्लिखन् ॥**
**प्रत्यञ्चं साक्षिणं तत्तु ब्रह्मसाक्षान्न वीक्षते ॥ १८ ॥**

अन्वयः—सच्चिदानंदरूपस्य शास्त्रात् भाने अपि प्रत्यञ्चं साक्षिणं अनुल्लिखन् तत् ब्रह्म साक्षात् न वीक्षते ।

अर्थः—सच्चिदानंदरूप ब्रह्माचें शास्त्रावरून जरी भान झालें तरी तें प्रत्यक् साक्षीच आहे असें ज्याला समजलेलें नसतें तो त्या ब्रह्मास साक्षात् पहात नाहीं. ॥ १८ ॥

विवरणः—केवल ब्रह्म आहे असें जाणण्यापासून फारसा लाभ नसतो. तर तें प्रत्यक् आत्माच आहे असें जाणणें हे मोक्षदायक आहे. पण ज्याला परोक्षज्ञानच झालेलें असतें त्यास ब्रह्मसाक्षात्कार होत नाहीं हें उघडच आहे. ॥ १८ ॥

मग अशाप्रकारच्या ज्ञानास तत्त्वज्ञान कसें ह्मणतां येईल ? या शंकेचें निरसन करितातः—

**शास्त्रोक्तेनैव मार्गेण सच्चिदानन्दनिश्चयात् ॥**
**परोक्षमपि तज्ज्ञानं तत्त्वज्ञानं न तु भ्रमः ॥ १९ ॥**

अन्वयः—शास्त्रोक्तेन मार्गेण एव सच्चिदानंदनिश्चयात् तत् परोक्षं अपि ज्ञानं तत्त्वज्ञानं । न तु भ्रमः ।

**अर्थः—शास्त्रोक्त मार्गानेंच सच्चिदानंदाचा निश्चय होत असल्यामुळें तें परोक्ष असलेलेंही ज्ञान तत्त्वज्ञानच होय. भ्रम नव्हे. ॥ १९ ॥**

विवरण:—भगवान् विष्णूच्या मूर्तीचें ज्ञान शास्त्रीय असल्यामुळें तें जसें यथार्थ होय; असें पूर्वी सांगितलें आहे, तसेंच ब्रह्म सच्चिदानंदरूप आहे हें ज्ञानही शास्त्रीय असल्यामुळें यथार्थ होय. व त्यामुळेंच त्यास भ्रम असें ह्मणतां येणार नाहीं. या सर्व प्रतिपादनावरून वैदिक धर्मी मनुष्यास शास्त्रावर किती दृढ विश्वास ठेवावयास पाहिजे, हें व्यक्त होत आहे. ॥ १९ ॥

'सत्यं, ज्ञानं०' इत्यादि वाक्यांवरून जरी ब्रह्माचें परोक्षज्ञान होतें; तसेंच 'तत्त्वमसि' इत्यादि वाक्यांवरून अपरोक्ष ज्ञानही होतें. मग असें असतांना 'तें दुर्विज्ञय आहे.' असें सर्वच आचार्य कसें ह्मणतात? या प्रश्नाचें आतां उत्तर देतात:—

**ब्रह्म यद्यपि शास्त्रेषु प्रत्यक्त्वेनैव वर्णितम् ॥**
**महावाक्यैस्तथाऽप्येतद्दुर्बोधमविचारिणः ॥ २० ॥**

अन्वय:—यद्यपि ब्रह्म शास्त्रेषु महावाक्यैः प्रत्यक्त्वेन एव वर्णितम्, तथापि एतत् अविचारिणः दुर्बोधम् ।

अर्थ:—जरी ब्रह्माचें शास्त्रांत महावाक्यांच्या योगानें प्रत्यक्पणें वर्णन केलेलें आहे, तरी तें अविचाऱ्यांस दुर्बोध होय. ॥ २० ॥

विवरण:—'तत्त्वमसि' इत्यादि शास्त्रीय महावाक्यांच्या द्वारा ब्रह्म अंतर्यामी आत्मा आहे, असें शतशः वर्णिलें आहे. पण तें दुर्दैवी सामान्य पुरुषांस अति दुर्बोध आहे. व त्यामुळें केवळ महावाक्यांवरून अपरोक्ष साक्षात्कार होत नाहीं. सारांश 'आत्मतत्त्व दुर्ज्ञेय आहे.' असें जें पूर्वीच्या आचार्यांनीं ह्मटलें आहे तें योग्यच होय. ॥ २० ॥

शंका—अहो पण यथार्थज्ञान प्रमाणभूतवस्तूच्या अधीन असतें असा नियम आहे; तत्त्वमस्यादि वाक्यरूपप्रमाणें विद्यमान आहेत. आणि ब्रह्म व आत्मा यांच्या ऐक्यरूप वस्तूही अस्तित्वांत आहे. मग इतकी सामग्री सिद्ध असतांना केवळ वाक्यावरूनच अपरोक्ष साक्षात्कार कां होऊं नये? व्यवहारांत सामग्रीच्या तयारीनंतर कार्यास उशीर लागल्याचें आढळत नाहीं? समाधान:—

**देहाद्यात्मत्वविभ्रांतौ जाग्रत्यां न हठात्पुमान् ॥**
**ब्रह्मात्मत्वेन विज्ञातुं क्षमते मंदधीत्वतः ॥ २१ ॥**

**अन्वयः**—देहाद्यात्मत्वविभ्रान्तौ जाग्रत्यां पुमान् मंदधीत्वतः हटात् ब्रह्म आत्मत्वेन विज्ञातुं न क्षमते ।

**अर्थः**—देहादि अनात्मपदार्थांस आत्मा समजणें ही भ्रांति जीवंत असतांना पुरुष मंदबुद्धित्वामुळें बलात्कारानेंच 'ब्रह्म आत्मा आहे' असें जाणण्यास समर्थ होत नाहीं. ॥ २१ ॥

**विवरणः**—देहादिकांस आत्मा समजणें हा भ्रम आहे व त्याची निवृत्ति केवल विचारानेंच होणें शक्य आहे. यास्तव इतर कितीही सामग्री जरी तयार असली तरी विचारावाचून 'ब्रह्म आत्मा आहे' असें ज्ञान होत नाहीं ॥ २१ ॥

मग असें जर आहे तर भ्रमाची निवृत्ति होण्यापूर्वी ब्रह्माचें परोक्ष ज्ञान तरी कसें होईल ? या शंकेचें आतां निरसन करितातः—

**ब्रह्ममात्रं सुविज्ञेयं श्रद्धालोः शास्त्रदर्शिनः ॥**
**अपरोक्षद्वैतबुद्धिः परोक्षाद्वैतबुध्यनुत् ॥ २२ ॥**

**अन्वयः**—यतः अपरोक्षद्वैतबुद्धिः परोक्षाद्वैतबुद्धयनुत् अतः श्रद्धालोः शास्त्रदर्शिनः ब्रह्ममात्रं सुविज्ञेयं ।

**अर्थः**—ज्या अर्थी अपरोक्ष द्वैतबुद्धि परोक्ष अद्वैतबुद्धीचा नाश करूं शकत नाहीं, त्याअर्थी श्रद्धाळु जो शास्त्रदर्शी पुरुष त्यास केवल ब्रह्म सहज समजण्यासारखें आहे. ॥ २२ ॥

**विवरणः**—प्राण्यास द्वैतसाक्षात्कार जरी होत असला तरी तो परोक्ष अद्वैत ज्ञानाशीं विरोध करीत नाहीं. कारण एकाच वस्तुविषयींचीं दोन भिन्न ज्ञानें एकाच वेळीं अंतःकरणांत राहूं शकत नाहींत; असा नियम आहे. व त्यामुळें एकाच कालीं अंतःकरणांत द्वैताचें किंवा अद्वैताचें परोक्ष व अपरोक्ष ज्ञान रहाणें असंभवनीय आहे. पण द्वैताचें अपरोक्ष व अद्वैताचें परोक्ष अशीं भिन्न विषयक ज्ञानें रहाण्यास कांहीं हरकत नाहीं. पूर्वोक्त 'तूंच दहावा आहेस' या दृष्टांतांतील आपल्या सोबत्यास मोजणाऱ्या दहाव्या मनुष्यास नऊ जणांचें जेव्हां साक्षात् ज्ञान होतें, तेव्हांच "दहावा मेला नाहीं. तो जीवंत आहे" या आप्तवाक्यावरून होणारें परोक्षज्ञान झालें आहे. सारांश द्वैताचें

अपरोक्षज्ञान व अद्वैताचें परोक्षज्ञान यांच्यामध्यें तिळभरही विरोध नसल्यामुळें श्रद्धेनें शास्त्रावलोकन करणाऱ्या पुरुषास द्वैतानुभवकालींच ब्रह्माचें परोक्षज्ञान होणें शक्य आहे. ॥ २२ ॥

पूर्वोक्त उभयविधज्ञानामध्यें विरोध नाहीं हें अधिक स्पष्ट करण्याकरितां एक दृष्टांत देतातः—

**अपरोक्षशिलाबुद्धिर्न परोक्षेशतां नुदेत् ॥**
**प्रतिमादिषु विष्णुत्वे को वा विप्रतिपद्यते ॥ २३ ॥**

अन्वयः—अपरोक्षशिलाबुद्धिः परोक्षेशतां न नुदेत् । प्रतिमादिषु विष्णुत्वे कः वा विप्रतिपद्यते ।

**अर्थः**—शालिग्राम, बाण इत्यादि प्रतिमांच्या ठिकाणची साक्षात् शिलाबुद्धि परोक्ष ईश्वरतेशीं विरोध करीत नाहीं. कारण प्रतिमादिकांच्या ठिकाणच्या विष्णुत्वाविषयीं कोण विवाद करणार आहे ? ॥ २३ ॥

**विवरणः**—श्रीभारती तीर्थांनीं ज्यावेळीं हा श्लोक लिहिला त्यावेळीं पुढें कांहीं शतकांनीं आपला हा देश नास्तिकांचें आगर होणार आहे, व मूर्तिपूजादिक वैदिक आचारांचीं भरचवाठ्यावर निःशंकपणें निंदा होणार आहे, हें त्यांच्या ध्यानीं मनीं तरी आलें असेल कीं नाहीं याची शंका आहे. असो; येथील उल्लेख केवळ श्रद्धाळु पुरुषांस उद्देशूनच असल्यामुळें शालिग्रामादि शिला आहेत असें जरी स्पष्टपणें भासत असलें, तरी शास्त्रांवरून सिद्ध होणारें त्यांतील देवत्व नष्ट होत नाहीं. असें जें ह्मटलें आहे, तें युक्तच आहे. सारांश श्रद्धाळुपुरुषाच्या मनांत साक्षात् शिलाबुद्धि व परोक्ष विष्णुबुद्धि राहूं शकते. ॥ २३ ॥

आतां कांहीं नास्तिक परोक्ष विष्णुबुद्धिविषयीं वाद करीत असतात हें खरें पण—

**अश्रद्धालोरविश्वासो नोदाहरणमर्हति ॥**
**श्रद्धालोरेव सर्वत्र वैदिकेऽप्यधिकारतः ॥ २४ ॥**

अन्वयः—सर्वत्र वैदिकेषु श्रद्धालोः एव अधिकारः। अश्रद्धालोः अविश्वासः उदाहरणं न अर्हति ।

अर्थः—सर्व वैदिकअनुष्ठानांमध्यें श्रद्धावान् पुरुषाचाच अधिकार असल्यामुळें अश्रद्धाळुपुरुषाचा ( त्याविषयींचा ) अविश्वास हें कांहीं योग्य उदाहरण नव्हे. ॥ २४ ॥

विवरणः—ईश्वराच्या सृष्टींत ' नास्तिक ' हाही एक मनुष्यांचा प्रकार अनादिच आहे. आतां कांहीं काल त्यांचें प्राबल्य होतें व कांहीं वेळ अप्राबल्य असतें एवढेंच. कलियुगांत उत्तरोत्तर त्यांचें प्राबल्य होणार आहे असें सर्वज्ञ ऋषींनीं पूर्वींच भाकित करून ठेविलें आहे. व त्यांचा त्या भविष्याचा आज आपणांस कांहींसा प्रत्ययही येत आहे. अर्थात् आजच्या इतके जरी नसले तरी श्रीभारतीतीर्थांच्या वेळींही कांहीं नास्तिक श्रुतिस्मृतिपुराणोक्त उपदेशावर आक्षेप घेणारे होते. त्यांस उद्देशून ग्रंथकार म्हणतात कीं, वैदिक अनुष्ठानामध्यें केवल श्रद्धाळुपुरुषांचाच अधिकार असल्यामुळें ' त्याविषयीं अश्रद्धाळु पुरुष वाद करीत असतात कीं नाहीं ? ' असें म्हणून त्यांचें उदाहरण देणें अयुक्त आहे. कारण त्यांचा तो विषयच नसल्यामुळें त्याविषयीं चर्चा करण्याचा वस्तुतः त्यांस मुळींच अधिकार नाहीं. ॥ २४ ॥

तात्पर्यः—

**सकृदाप्तोपदेशेन परोक्षज्ञानमुद्भवेत् ॥**
**विष्णुमूर्त्युपदेशो हि न मीमांसामपेक्षते ॥ २५ ॥**

अन्वयः—सकृदाप्तोपदेशेन परोक्षज्ञानं उद्भवेत् । हि विष्णुमूर्त्युपदेशः मीमांसां न अपेक्षते ।

अर्थः—एकदांच आप्त वचनाचा उपदेश झाल्यानें परोक्षज्ञान उत्पन्न होतें. कारण विष्णुमूर्तीचा उपदेश मीमांसेची अपेक्षा करीत नाहीं. ॥ २५ ॥

---

१ पंचदशीच्या कांहीं प्रतींत अश्रद्धालोः अविश्वासोः असा पाठ आढळतो. त्याचा अश्रद्धाळु व अविश्वासु यांचें उदाहरण योग्य नव्हे. असा अर्थ करावा. आप्तवचनाविषयीं आस्तिक्यबुद्धि ठेवणें ही श्रद्धा, व त्याचें कार्य जें फळ तें अवश्य मिळणार अशी बुद्धि ठेवणें हा विश्वास होय.

विवरणः—चवदाव्या श्लोकापासून गत्या चोवीसाव्या श्लोकापर्यंत परोक्ष ज्ञान विषयीं संपपत्तिक विवेचन केलें आहे. त्यावरून आप्तवचनाचा उपदेश होतांच परोक्ष ज्ञान उत्पन्न होतें असें सिद्ध होतें. याविषयीं लौकिक अनुभवही आहे. कसा ह्मणून ह्मणशील तर सांगतों—ही विष्णूची मूर्ति आहे, असा शालिग्रामास उद्देशून कोणी ( माता, पिता, शास्त्र इत्यादि ) आप्तानें उपदेश केला असतां, त्याविषयीं कधीं कोणी श्रद्धाळु विचार करीत बसतो का ? कधींच नाहीं. तसाच हा प्रस्तुत प्रकार होय. २५

तर मग पूर्वमीमांसादिकग्रंथांमध्यें विचार केलेला जो आढळतो तो कां ? असें कोणी विचारील ह्मणून ग्रंथकार ह्मणतातः—

**कर्मोपास्ती विचार्येते अनुष्ठेयाविनिर्णयात् ॥**
**बहुशाखाविप्रकीर्णं निर्णेतुं कः प्रभुर्नरः ॥ २६ ॥**

अन्वयः—अनुष्ठेयाविनिर्णयात् कर्मोपास्ती विचार्येते । बहुशाखाविप्रकीर्णं निर्णेतुं कः नरः प्रभुः अस्ति ।

अर्थः—अनुष्ठान करण्यास योग्य अशा–कर्म व उपासना–यांचा निर्णय होत नसल्यामुळें कर्म व उपासना यांविषयीं विचार केला आहे. कारण अनेकशाखांमध्यें सांगितलेल्या व त्यामुळें अगदीं मिसळून गेलेल्या कर्मादिकांचा निर्णय करण्यास कोण पुरुष समर्थ आहे ? ॥ २६ ॥

विवरणः—अनेक शाखांतून एकच कर्म अगदीं भिन्न भिन्न प्रकारें करण्याविषयीं सांगितलेलें असतें. अथवा प्रत्येक शाखेंत क्वचित् भिन्न भिन्न कर्मेंही आढळतात. उपासनेचाही तोच प्रकार आहे. त्यामुळें सामान्यबुद्धीच्या मनुष्यास त्यांच्या अनुष्ठानाचा निर्णय करितां येत नाहीं. ह्मणून त्या सर्व संदिग्धकर्मादिकांचा निर्णय करण्याकरितां पूर्वमीमांसादि ग्रंथ प्रवृत्त झाले आहेत. ॥ २६ ॥

आणि त्या ग्रंथांच्या सहायानें सामान्य मनुष्यही निःशंकपणें अनुष्ठान करूं शकतो; असें आतां सांगतातः—

**निर्णीतोऽर्थः कल्पसूत्रैर्ग्रथितस्तावताऽस्ति कः ॥**
**विचारमन्तरेणापि शक्तोऽनुष्ठातुमंजसा ॥ २७ ॥**

**अन्वयः**—निर्णीतः अर्थः कल्पसूत्रैः ग्रथितः अस्ति । तावता आस्तिकः विचारं अन्तरेण अपि अंजसा अनुष्ठातुं शक्तः अस्ति ।

**अर्थः—जैमिनी इत्यादि आचार्यांनीं ज्याचा मीमांसेच्या द्वारा निर्णय केला आहे तोच अनुष्ठानाचा प्रकार कल्पसूत्रांनीं संग्रहित केला आहे. ( ह्मणजे त्याचा एके ठिकाणीं संग्रह केला आहे. ) त्यावरून आस्तिक विचारावांचूनही शीघ्र अनुष्ठान करण्यास समर्थ होतो. ॥ २७ ॥**

**विवरणः**—जैमिनी मुनींनीं 'अथातो धर्मजिज्ञासा' हें जिचें प्रथम सूत्र आहे अशी धर्ममीमांसा रचिली. तिचे बारा अध्याय आहेत. या विस्तृत ग्रंथामध्यें कर्मकांडमय सर्व वेदांची एकवाक्यता केलेली आहे. त्यांतील निर्णय पाहून भिन्न भिन्न शाखेचीं कल्प सूत्रें आश्वलायन, आपस्तंब, बौधायन, कात्यायन इत्यादि मुनींनीं रचिलीं. त्यांच्या योगानें कोणताही वैदिक विधि कोणी कसा करावा हें तात्काल समजतें. सारांश या सूत्रांच्या सहायानें कोणीही आस्तिक पुरुष विशेष विचारांत न पडतां सहज अनुष्ठान करूं शकतो. आणि त्यामुळें कल्पसूत्र हें एक वेदाचें अंग होऊन राहिलें आहे. ॥ २७ ॥

'कल्पसूत्रादि ग्रंथांमध्यें तर केवळ कर्माचाच विचार केलेला आहे;' असें कोणी ह्मणेल ह्मणून उपासनेचा विचार कोठें केला आहे तें आतां सांगतातः—

**उपास्तीनामनुष्ठानमार्षग्रंथेषु वर्णितम् ॥**
**विचाराक्षममर्त्याश्च तच्छ्रुत्वोपासते गुरोः ॥ २८ ॥**

**अन्वयः**—उपास्तीनां अनुष्ठानं आर्षग्रंथेषु वर्णितं अस्ति । च विचाराक्षममर्त्याः गुरोः तत् श्रुत्वा उपासते ।

**अर्थः—उपासनांचें अनुष्ठान ऋषिप्रणीत ग्रंथामध्यें वर्णिलें आहे. व विचार करण्यास असमर्थ असलेले पुरुष गुरुमुखांतून तें ऐकून उपासना करितात.**

**विवरणः**—ब्रह्मदेवाचें ब्राह्मतंत्र, वसिष्ठमुनिप्रणीत वासिष्ठतंत्र इत्यादि अनेक तंत्रग्रंथांत उपासना कशी करावी इत्यादि प्रकार सांगितला आहे; व ज्यांना स्वतः विचार करण्याची शक्ति नसते त्यांना योग्य गुरूपासून त्यांचा उपदेश घेऊन उपासना करितां येते. ॥ २८ ॥

**प्रश्नः**—असें जर आहे तर आधुनिक लोक वेदवाक्यांच्या विचाराविषयीं इतका प्रयत्न कां करितात? त्यांचा या पूर्वग्रंथावर विश्वास बसत नाहीं कीं काय? **उत्तरः**—याचें स्पष्ट उत्तर असें आहे–ते आपापल्या संतोषाकरितां ही सर्व खटपट करीत असतात. अनुष्ठानाच्या सिद्धीकरितां नव्हे. खरोखर जर पाहिलें तर पूर्वींच्या आचार्यांनीं वैदिक विद्येच्या विचारास कोठें अवकाशच ठेविलेला आढळत नाहीं. असें आतां समर्पक उत्तर देतातः—

अथवा पूर्वमीमांसेमध्यें कोणाचा अधिकार आहे व त्याच्या अनुष्ठानामध्यें कोणाचा आहे. हें आतां सांगतातः—

**वेदवाक्यानि निर्णेतुमिच्छन्मीमांसतां जनः ॥**
**आप्तोपदेशमात्रेण ह्यनुष्ठानं हि संभवेत् ॥ २९ ॥**

**अन्वयः**—वेदवाक्यानि निर्णेतुं इच्छन् जनः मीमांसतां हि । आप्तोपदेशमात्रेण अनुष्ठानं संभवेत् ।

**अर्थः**—वेदवाक्यांचा निर्णय करण्याची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें मीमांसा खुशाल करावी. पण केवल आप्तांच्या उपदेशावरूनच अनुष्ठान होऊं शकतें. ॥ २९ ॥

**विवरणः**—वेद वाक्यांचा आपण निर्णय करावा असें ज्याला वाटत असेल, त्यानें मीमांसा केल्यास आमची त्यांस ना नाहीं. आमचें एवढेंच ह्मणणें आहे कीं कोणालाही कल्पसूत्रादि आप्तवचनांवरून अनुष्ठान करितां येतें. ॥ २९ ॥

पण ब्रह्मज्ञानाची अशी स्थिति नाहीं. तीं कां? ह्मणून ह्मणशील तर सांगतोंः—

**ब्रह्मसाक्षात्कृतिस्त्वेवं विचारेण विना नृणाम् ॥**
**आप्तोपदेशमात्रेण न संभवति कुत्रचित् ॥ ३० ॥**

**अन्वयः**—एवं नृणां ब्रह्मसाक्षात्कृतिः तु विचारेण विना आप्तोपदेशमात्रेण कुत्रचित् न संभवति ।

**अर्थः**—ह्याप्रमाणें मनुष्यांचा ब्रह्मसाक्षात्कार विचारावाचून केवल आप्तांच्या उपदेशानेंच कधींही संभवत नाहीं. ॥ ३० ॥

विवरणः—कर्म व उपासना यांचें अनुष्ठान जसें केवल आप्ताच्या उपदेशावरून होऊं शकतें, त्याप्रमाणें ब्रह्माचा साक्षात्कार होऊं शकत नाहीं. तर त्यास विचाराचें अवश्य सहाय लागतें. ॥ ३० ॥

कारणः—

**परोक्षज्ञानमश्रद्धा प्रतिबध्नाति नेतरत् ॥**
**अविचारोऽपरोक्षस्य ज्ञानस्य प्रतिबंधकः ॥ ३१ ॥**

**अन्वयः**—अश्रद्धा परोक्षज्ञानं प्रतिबध्नाति न इतरत् । अपरोक्षस्य ज्ञानस्य प्रतिबंधकः अविचारः अस्ति ।

**अर्थः**—अश्रद्धा परोक्षज्ञानास प्रतिबंध करिते. अविचार नव्हे. पण अपरोक्ष ज्ञानास प्रतिबंध करणारा अविचार होय. ॥ ३१ ॥

**विवरणः**—परोक्षज्ञानास केवल अविश्वासच हटवीत असतो. यास्तव त्याची निवृत्ति झाली कीं परोक्षज्ञानास एका आप्तवचनावाचून दुसऱ्या कशाचीही गरज लागत नाहीं. पण अपरोक्षज्ञानास अविचार एकसारखा प्रतिबंध करीत असल्यामुळें त्याच्या निवृत्तीचा उपाय योजणें अत्यंत अवश्य असतें. व एका विचाराच्या योगानेंच त्याची निवृत्ति होणें शक्य असल्यामुळें आत्मसाक्षात्कारास विचाराची फार गरज असते. ॥ ३१ ॥

पण विचार करूनही आत्मसाक्षात्कार न झाल्यास काय करावें? असें कोणी ह्मणेल ह्मणून पुनः पुनः त्याची आवृत्ति करावी असें सांगतातः—

**विचार्याप्यापरोक्ष्येण ब्रह्मात्मानं न वेत्ति चेत् ॥**
**आपरोक्ष्यावसानत्वाद्भूयो भूयो विचारयेत् ॥ ३२ ॥**

**अन्वयः**—विचार्य अपि आपरोक्ष्येण ब्रह्मात्मानं न वेत्ति चेत् आपरोक्ष्यावसानत्वात् भूयः भूयः विचारयेत् ।

**अर्थः**—विचार करूनही अपरोक्षतः ब्रह्म व आत्मा त्याचें ऐक्य न समजल्यास विचाराची साक्षात्कारामध्येंच परिसमाप्ति होत असल्यामुळें वारंवार विचार करावा. ॥ ३२ ॥

विवरणः—वेदान्तश्रवणानंतर एकांतांत बसून विचार केल्यास, भृगुपुत्र वारुणी-प्रमाणें किंवा इंद्राप्रमाणें त्याचें पर्यवसान अद्वैतात्मसाक्षात्कारामध्यें होणार हें उघडच आहे. पण ज्यांना धीर नसतो ते थोडासा विचार करून 'साक्षात्कार अजून कां होत नाहीं' ह्मणून व्याकूळ होऊन विटारूं लागतात. यास्तव ग्रंथकार ह्मणतात कीं, विचाराची आवृत्ति करावी. आत्मा व ब्रह्म यांच्या ऐक्याचा साक्षात्कार होईतों विचाराम कंटाळूं नये. ॥ ३२ ॥

'यावज्जीव विचार करूनही एखाद्यास आत्मज्ञान होत नाहीं, हें खरें. पण त्यामुळें विचार व्यर्थ गेला असें समजूं नये' असें आतां सांगतात:—

**विचारयन्नामरणं नैवात्मानं लभेत चेत् ॥**
**जन्मांतरे लभेतैव प्रतिबंधक्षये सति ॥ ३३ ॥**

अन्वयः—आमरणं विचारयन् एव आत्मानं न लभेत चेत् प्रतिबंधक्षये सति जन्मान्तरे लभेत एव ।

अर्थः—मरणापर्यंत विचार करणाऱ्यासही आत्म्याची प्राप्ति जर न झाली तर प्रतिबंधांचा क्षय झाला असतां दुसऱ्या जन्मीं त्यास आत्मसाक्षात्कार होईल. ॥ ३३ ॥

विवरणः—आत्मसाक्षात्कार न होऊं देणारे अनेक प्रबळ प्रतिबंध असल्यास जन्मभर विचार करूनही कांहीं लाभ होत नाहीं हें खरें. पण त्यामुळें केलेला विचार फुकट गेला असें कधींही समजूं नये. कारण जे प्रतिबंध या जन्मीं साक्षात्कारास हटवीत होते, त्यांचा क्षय झाल्यावर पुढच्या जन्मीं इष्टलाभ सहज होतो. ॥ ३३ ॥

'हें आह्मीं आमच्या पदरचें कांहींतरी सांगतों, असें समजूं नये. तर त्याला सबळ प्रमाणेंही आहेत' असें आतां सांगतात:—

**इह वाऽमुत्र वा विद्येत्येवं सूत्रकृतोदितम् ॥**
**शृण्वंतोऽप्यत्र बहवो यन्न विद्युरिति श्रुतिः ॥ ३४ ॥**

अन्वयः—'इह वा अमुत्र वा विद्या' इति सूत्रकृता उदितं अस्ति । च 'अत्र बहवः शृण्वंतः अपि यत् न विद्युः' इति श्रुतिः अस्ति ।

अर्थः—इहलोकीं किंवा परलोकीं विद्या प्राप्त होते असें सूत्रकारानीं ह्मटलें आहे. व ' या जन्मीं पुष्कळ लोक श्रवण करीत असूनही ज्यास जाणत नाहींत; ' अशा अर्थाची श्रुति आहे. ॥ ३४ ॥

विवरणः—शारीरकमीमांसेच्या तिसऱ्या अध्यायाच्या चवथ्या पादाचे एकावन्नावें सूत्र " ऐहिकमप्यप्रस्तुतप्रतिबंधे तद्दर्शनात् " असें आहे. याचा अर्थः—प्रस्तुत प्रतिबंध नसल्यास या जन्मींही विद्या उत्पन्न होते. कारण हीच गोष्ट श्रुतिनें सांगितली आहे. या सूत्रावरील भाष्यांत आचार्यांनीं श्रुति व स्मृति यांचीं प्रमाणें घेऊन व अनुकूल युक्तींचाही आश्रय करून—कांहीं प्रबल प्रतिबंध नसल्यास या जन्मीं विचारानंतर लागलेच आत्मज्ञान होतें. व तसें नसल्यास ह्मणजे अगोदरच फल देण्यास तयार झालेला प्रतिबंध साक्षात्कारास हटवीत असल्यास, त्याच्या क्षयानंतर दुसऱ्या जन्मीं विद्या प्राप्त होते—असें सिद्ध केलें आहे.—त्याचप्रमाणें कठोपनिषदांतील दुसऱ्या वल्लीच्या सातव्या मंत्रांत, भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायाच्या चाळीस व पंचेचाळीस श्लोकाच्या उत्तरार्धांत आणि त्रेचाळीसाव्या श्लोकाच्या पूर्वार्धांत—प्रस्तुत गोष्टच सांगितली आहे. ॥ ३४ ॥

या पूर्वोक्तसिद्धान्ताच्या पुष्ट्यर्थ आतां वामदेवाचें उदाहरण देतातः—

**गर्भ एव शयानः सन् वामदेवोऽवबुद्धवान् ॥**
**पूर्वाभ्यस्तविचारेण यद्वदध्ययनादिषु ॥ ३५ ॥**

अन्वयः—यद्वत् अध्ययनादिषु तद्वत् वामदेवः गर्भे एव शयानः सन् पूर्वाभ्यस्तविचारेण अवबुद्धवान् ।

अर्थः—ज्याप्रमाणें अध्ययनादिकांमध्यें होतें त्याप्रमाणें वामदेव गर्भामध्यें शयन करीत असतांनाच पूर्वी ज्याचा अभ्यास केला आहे अशा विचाराच्या योगानें जाणता झाला. ॥ ३५ ॥

विवरणः—वामदेवानें पूर्वजन्मीं जरी पूर्ण विचार केला होता, तरी प्रबल प्रतिबंधामुळें त्यास त्या जन्मीं साक्षात्कार झाला नाहीं. पण त्या प्रतिबंधाचा क्षय होतांच गर्भवासामध्यें असतांनाच त्यास ' मी सर्व देवांचा उत्पादक आहें. ' असा साक्षात्कार झाला. हा असा अघटित प्रकार कसा घडतो ह्मणून कोणास आश्चर्य वाटेल ह्मणून ' अध्ययनादिकाप्रमाणें ' असा त्यास दृष्टान्त दिला आहे. ॥ ३५ ॥

गेल्या श्लोकांतील दृष्टांताचें आतां स्पष्टीकरण करितात:—

**बहुवारमधीतेऽपि तदा नायाति चेत्पुनः ॥**
**दिनांतरेऽनधीत्यैव पूर्वाधीतं स्मरेत्पुमान् ॥ ३६ ॥**

अन्वय:—बहुवारं अधीते अपि तदा न आयाति चेत् । पुनः दिनांतरे अनधीत्य एव पुमान् पूर्वाधीतं स्मरेत् ।

अर्थः—पुष्कळ वेळ अध्ययन केल्यावरही त्यावेळीं जर तें न आलें, तर पुनरपि दुसऱ्या दिवशीं अध्ययन केल्यावाचूनच पुरुषास पूर्वदिवशीं अध्ययन केलेल्याचें स्मरण होतें. ॥ ३६ ॥

विवरण:—ह्या श्लोकांत सांगितलेली गोष्ट विद्यार्थ्यांच्या मनांत तत्काल बिंबेल. कारण, एकादे वेळीं कितीही जरी घोकंपट्टी केली, तरी तो पाठ त्यावेळीं तोंडपाठ ह्मणतां येत नाहीं. पण दुसऱ्या दिवशीं प्रयत्नावांचूनच तो तोंडपाठ ह्मणून दाखवितां येतो. त्याचप्रमाणें पूर्वाभ्यासामुळें वामदेवास दुसऱ्या जन्मीं आपोआप साक्षात्कार झाला. ॥ ३६ ॥

सारांश:—

**कालेन परिपच्यन्ते कृषिगर्भादयो यथा ॥**
**तद्वदात्मविचारोऽपि शनैः कालेन पच्यते ॥ ३७ ॥**

अन्वय:—यथा कृषिगर्भादयः कालेन परिपच्यन्ते । तद्वत् आत्मविचारः अपि कालेन शनैः पच्यते ।

अर्थः—ज्याप्रमाणें शेत, गर्भ इत्यादि कालाच्या योगानें परिपक्व होतात; त्याप्रमाणें आत्मविचारही कालाच्या योगानें हळु हळु पक्व होतो. ॥ ३७ ॥

विवरण:—शेत, गर्भ, झाड इत्यादि पदार्थांच्या वृद्धीस जशी कालाची अपेक्षा असते; ह्मणजे ते एकदम न वाढतां रोज थोडे थोडे वाढतात, त्याप्रमाणें आत्मविचारही हळु हळु परिपक्व होतो. ॥ ३७ ॥

श्रीसुरेश्वराचार्यांनींही असेंच सांगितलें आहे, असें आतां सांगतात:—

**पुनः पुनर्विचारेऽपि त्रिविधप्रतिबंधतः ॥**
**न वेत्ति तत्त्वमित्येतद्वार्तिके सम्यगीरितम् ॥ ३८ ॥**

अन्वयः—पुनः पुनः विचारे अपि त्रिविधप्रतिबंधतः पुरुषः तत्त्वं न वेत्ति। इति एतत् वार्तिके सम्यक् ईरितं अस्ति।

अर्थः—**वारंवार विचार करूनही तीन प्रकारच्या प्रतिबंधामुळें पुरुष तत्त्व जाणत नाहीं; असें हें वार्तिकांतही स्पष्टपणें सांगितलेलें आहे.** ॥ ३८ ॥

**विवरणः**—भूत, वर्तमान व भविष्य असे कालावरून होणारे तीन प्रतिबंध आहेत; व त्यांच्यामुळें विचारजन्य ज्ञानाची उत्पत्ति होत नाहीं. असें वार्तिककारांनीं सांगितलें आहे. ॥ ३८ ॥

सुरेश्वराचार्यांच्या ज्या वार्तिकांत पूर्वोक्त तीन प्रतिबंध उदाहरणांसह दाखविले आहेत, तीं वार्तिकेंच येथें घेतातः—

**कुतस्तज्ज्ञानमिति चेत्तद्धि बंधपरिक्षयात् ॥**
**असावपि च भूतो वा भावी वा वर्तते ऽथ वा ॥ ३९ ॥**

अन्वयः—तत् ज्ञानं कुतः इति चेत् तत् हि बंधपरिक्षयात्। असौ अपि भूतः वा भावी वा अथ वर्तते वा।

अर्थः—**तें ज्ञान कसें होतें? असें विचारशील तर, तें प्रतिबंधांच्या क्षयामुळें होतें ( असें समज. ) हा प्रतिबंधही भूत किंवा भावी अथवा वर्तमान असतो.**

विवरणः—ह्या वार्तिकांत भूतादि तीन प्रतिबंधांचा नामनिर्देश केलेला आहे. त्यांचें व्याख्यान आतां क्रमानेंच होणारें असल्यामुळें, येथें विस्तार करीत नाहीं. ३९

**अधीतवेदवेदार्थोऽप्यत एव न मुच्यते ॥**
**हिरण्यनिधिदृष्टांतादिदमेव हि दर्शितम् ॥ ४० ॥**

अन्वयः—अतः एव अधीतवेदवेदार्थः अपि न मुच्यते। हिरण्यनिधिदृष्टान्तात् इदं एव हि दर्शितं अस्ति।

अर्थः—**एवढ्याकरितांच वेद व वेदांचा अर्थ यांचा ज्यानें अभ्यास केला आहे, असा पुरुषही मुक्त होत नाहीं. सुवर्णाच्या सांठ्याच्या दृष्टान्तानें ( श्रुतीनेंही ) हेंच दाखविलें आहे. ॥ ४० ॥**

**विवरणः—एकाद्या शेतांत सोन्याचा मोठा सांठा असावा. पण जन्मभर अहोरात्र त्या शेतांत वरवर खपणाऱ्या शेतकऱ्यास तो ठाऊक नसावा. ह्मणजे त्यामुळें तो जरा**

दरिद्र भोगीत असतो, त्याप्रमाणें केवल वेद व वेदार्थ यांचाच अभ्यास करणारांचीही स्थिति होते. सारांश प्रतिबंध जोंपर्यंत ज्ञानास हटवीत असतात तोंपर्यंत कितीही जरी अध्ययन केलें तरी तें निष्फल होय. ॥ ४० ॥

आतां पूर्वोक्त त्रिविध प्रतिबंधांतील पहिल्या भूतप्रतिबंधाचें उदाहरण देतातः—

**अतीतेनापि महिषीस्नेहेन प्रतिबंधतः ॥**
**भिक्षुस्तत्त्वं न वेदेति गाथा लोके प्रगीयते ॥ ४१ ॥**

**अन्वयः**—अतीतेन महिषीस्नेहेन अपि प्रतिबंधतः भिक्षुः तत्त्वं न वेद । इति गाथा लोके गीयते ।

अर्थः—मागच्या राणीवरील प्रेमामुळेंही प्रतिबंध होऊन भिक्षूस तत्त्वज्ञान झालें नाहीं; अशी दंतकथा लोकांत सांगितली जाते. ॥ ४१ ॥

**विवरणः**—कोणा एका गृहस्थाचें एका राणीशीं प्रेम जडलें होतें, व तो पुष्कळ दिवस तिच्या प्रेमाचा अनुभव घेत होता. पुढें कर्मधर्मसंयोगानें त्यास उपरति झाली व त्यानें संन्यास घेतला. पण त्या पूर्वस्नेहरूपी प्रतिबंधामुळें त्यास गुरूंनीं जरी परोपरीनें उपदेश केला तरी तत्त्वज्ञान झालें नाहीं. अशी लौकिक कहाणी आहे. व ती भूतप्रतिबंधाचें उदाहरण असल्यामुळें येथें घेतली आहे. ॥ ४१ ॥

पण ही गोष्ट गुरूंच्या ध्यानीं येतांच त्यांनीं त्यास मोठ्या युक्तीनें उपदेश कसा केला, तें आतां सांगतातः—

**अनुसृत्य गुरुः स्नेहं महिष्यां तत्त्वमुक्तवान ॥**
**ततो यथावद्वेदैष प्रतिबंधस्य संक्षयात् ॥ ४२ ॥**

**अन्वयः**—गुरुः स्नेहं अनुसृत्य महिष्यां तत्त्वं उक्तवान् । ततः एषः प्रतिबंधस्य संक्षयात् यथावत् वेद ।

**अर्थः—गुरु स्नेहास अनुसरून राणीच्या ठिकाणींच तत्त्व सांगता झाला, व नंतर हा प्रतिबंधाचा पूर्णपणें क्षय झाल्यामुळें, तत्त्वास शास्त्रोक्तरीत्या जाणता झाला. ॥ ४२ ॥**

**विवरणः**—तत्त्वोपदेशक गुरु चतुर असले ह्मणजे ते शिष्यास हरतऱ्हेनें कृतार्थ करून सोडतात, असा सामान्य नियम आहे. व त्यास अनुसरूनच या पूर्वोक्तयतीच्या गुरूंनीं त्यास कृतार्थ करून सोडलें. आपल्या शिष्यास वारंवार उपदेश करूनही कांहीं निष्पन्न होत नाहीं, असें पहातांच त्यांनीं कोणत्या प्रबलप्रतिबंधामुळें असें होत आहे, याचा विचार केला; व त्यामुळें राणीचा स्नेह याच्या ज्ञानास बाध करीत आहे, असें त्यांस समजलें. तेव्हां लागलेंच त्यांनीं त्या राणीमध्यें जें तत्त्व होतें त्याचाच उपदेश केला. व त्यामुळें तो यति थोडक्याच वेळांत कृतार्थ झाला. आपल्या महाराष्ट्रांतील साधुवर्य एकनाथांच्या चिरंजीवांविषयीं अशाच प्रकारची एक आख्यायिका आहे. ज्या वेश्येवर पुत्राचें प्रेम होतें, तिलाच किरीटकुंडलयुक्त देवी समजून तिचें एकांतांत ध्यान करावयास नाथांनीं सांगितलें, व ह्या युक्तीनें त्यांचें चिरंजीव कृतार्थ झाले. सारांश " योजकस्तत्र दुर्लभः " ही ह्मण सर्वत्र लागू पडते. ॥ ४२ ॥

ह्याप्रमाणें गेल्या दोन श्लोकांत अतीत प्रतिबंधाचें उदाहरणासह प्रतिपादन करून आतां या श्लोकांत वर्तमान प्रतिबंधाचें स्वरूप सांगतातः—

**प्रतिबन्धो वर्तमानो विषयासक्तिलक्षणः ॥**
**प्रज्ञामांद्यं कुतर्कश्च विपर्ययदुराग्रहः ॥ ४३ ॥**

अन्वयः—वर्तमानः प्रतिबंधः विषयासक्तिलक्षणः, प्रज्ञामांद्यं, कुतर्कः च विपर्ययदुराग्रहः ।

**अर्थः**—वर्तमानप्रतिबंध–१ विषयासक्तिरूप, २ बुद्धिमांद्य, ३ कुतर्क व ४ विपर्ययाविषयीं दुराग्रह ( असा चार प्रकारचा आहे. ) ॥ ४३ ॥

**विवरणः**—चित्ताची विषयामध्यें प्रीति असणें; बुद्धि मंद असणें; शुष्कतर्क लढवून श्रुतीचा भलताच अर्थ करणें, आत्माच्या ठिकाणीं कर्तृत्वादि धर्म आहेत, असें समजून त्याविषयीं उगीच आग्रह धरणें इत्यादि वर्तमान प्रतिबंध होत. ॥ ४३ ॥

आतां या प्रतिबंधांची निवृत्ति कशी होते तें सांगतातः—

**शमाद्यैः श्रवणाद्यैश्च तत्र तत्रोचितैः क्षयम् ॥**
**नीतेऽस्मिन्प्रतिबंधेऽतः स्वस्य ब्रह्मत्वमश्नुते ॥ ४४ ॥**

अन्वयः—तत्र तत्र उचितैः शमाद्यैः च श्रवणाद्यैः अस्मिन् प्रतिबंधे क्षयं नीते सति अतः स्वस्य ब्रह्मत्वं अश्नुते ।

**अर्थः—त्या त्या प्रतिबंधास उचित अशा शमादि व श्रवणादि उपायांच्या योगानें ह्या प्रतिबंधाचा क्षय करून टाकिला असतां त्यामुळें, साधक आपल्या ब्रह्मभावास प्राप्त होतो. ॥ ४४ ॥**

**विवरण:**—गेल्या श्लोकांत सांगितलेल्या चार प्रकारच्या वर्तमान प्रतिबंधापैकीं विषयासक्तिरूप प्रतिबंधाचा क्षय शमादि सहा साधनांच्या योगानें; बुद्धिमांद्यरूप प्रतिबंधाचा श्रवणाच्या योगानें; कुतर्काचा मननानें व आत्मा कर्ता आहे; जग सत्य आहे; इत्यादि विपर्ययदुराग्रहाचा निदिध्यासानें होतो. 'शमादि' यांतील आदिपदानें दम, तितिक्षा, उपरति, श्रद्धा व समाधान यांचें ग्रहण करावें. ह्याप्रमाणें त्या त्या प्रतिबंधास उचित अशा उपायांच्या अनुष्ठानानें सर्व प्रतिबंधाचा क्षय झाला असतां, त्या कृतकृत्य साधकास आपला कूटस्थ आत्माच ब्रह्म आहे; असा साक्षात्कार होतो.

आतां भावी प्रतिबंध कोणता तें सांगतातः—

**आगामिप्रतिबंधश्च वामदेवे समीरितः ॥**
**एकेन जन्मना क्षीणो भरतस्य त्रिजन्मभिः ॥ ४५ ॥**

अन्वयः—च आगामिप्रतिबंधः वामदेवे समीरितः । सः च तस्य एकेन जन्मना क्षीणः । भरतस्य त्रिजन्मभिः क्षीणः ।

**अर्थः—आणि भावी प्रतिबंध वामदेवाच्या ठायीं सांगितला आहे. व तो वामदेवाच्या एका जन्मानेंच क्षीण झाला; भरताचा तीन जन्मांनीं क्षीण झाला.**

**विवरण:**—आगामी किंवा भावी प्रतिबंध ह्मणजे पुढच्या जन्मास कारण होणारा प्रारब्धकर्माचा शेष आहे. तो प्रारब्धरूपच असल्यामुळें, त्याचा भोगावाचून क्षय होत नसतो व त्यामुळें श्रवणादि साधनांचें जरी पूर्णपणें अनुष्ठान झालेलें असलें, तरी जन्म घ्यावा लागतोच. अर्थात् प्रारब्धाची निवृत्ति केव्हां होईल याविषयीं कोणत्याच प्रकारें नियम करितां येत नाहीं. याविषयीं—वामदेवाची एकाच गर्भवासानें मुक्ति झाली; भरतास तीन जन्म घ्यावे लागले—इत्यादि पुराणामध्यें अनेक उदाहरणें आहेत. ॥ ४५ ॥

**शंका:**—अहो पण एका जन्मानें, तीन जन्मांनीं, असा तरी नियम करितां येतो कीं नाहीं ? झालें तर, आह्मीं यालाच कालनियम समजणार. **समाधान:**—एक जन्म, तीन जन्म इत्यादि केवल पौराणिक उदाहरणें दिलीं आहेत. त्यांवरून काळाचा नियम ठरवितां येत नाहीं. कारण—

**योगभ्रष्टस्य गीतायामतीते बहुजन्मनि ॥**
**प्रतिबंधक्षयः प्रोक्तो न विचारोऽप्यनर्थकः ॥ ४६ ॥**

**अन्वय:**—गीतायां योगभ्रष्टस्य बहुजन्मनि अतीते सति प्रतिबंधक्षयः प्रोक्तः । अतः विचारः अपि न अनर्थकः

**अर्थ:—श्रीमद्भगवद्गीतेमध्यें योगभ्रष्ट पुरुषाचे अनेक जन्म झाल्यावर त्याच्या प्रतिबंधाचा क्षय होतो, असें सांगितलें आहे. त्यामुळें विचारही व्यर्थ नाहीं. ॥ ४६ ॥**

**विवरण:**—तत्त्वसाक्षात्कार होई तों ज्याचा विचार होत नाहीं, त्यास योगभ्रष्ट असें ह्मणतात. ह्मणजे विचार करीत असूनही ज्याला प्रतिबंधामुळें त्याच जन्मांत साक्षात्कार होत नाहीं तो योगभ्रष्ट होय. अशा साधकाच्या प्रतिबंधाचा क्षय अनेक जन्मांनंतर होतो; असें श्रीभगवानांनीं अर्जुनास सांगितलें आहे. त्यावरून दोन गोष्टी सिद्ध होतात. एक तर प्रतिबंधाचा क्षय केव्हां होईल याचा अनियम व दुसरी— विचार कधींही व्यर्थ होत नाहीं. प्रतिबंधामुळें जरी त्याचा सांप्रतकालीं उपयोग न झाला तरी पुढें झाल्यावांचून रहात नाहीं. ॥ ४६ ॥

आत्मविचार व्यर्थ कसा होत नाहीं, हें स्वतः भगवानांनींच सांगितलें आहे. तें असें:—

**प्राप्य पुण्यकृतां लोकानात्मतत्त्वविचारतः ॥**
**शुचीनां श्रीमतां गेहे साभिलाषोऽभिजायते ॥ ४७ ॥**

**अन्वय:**—आत्मतत्त्वविचारतः पुण्यकृतां लोकान् प्राप्य साभिलाषः शुचीनां श्रीमतां गेहे अभिजायते ।

**अर्थ:—आत्मतत्त्वविचाराच्या योगानें पुण्यवानांच्या ( स्वर्गादि ) लोकांप्रत प्राप्त होऊन सकाम पुरुष शुद्ध व श्रीमंत कुलांत उत्पन्न होतो. ॥ ४७ ॥**

**विवरण:**—प्रतिबंधामुळें जरी आत्मसाक्षात्कार न झाला तरी आत्मविचाराचा महिमा अचिन्त्य असल्यामुळें, त्यास--यज्ञयागादि इष्ट, विहिर, तळें इत्यादि पूर्त व दत्त कर्में करून अपरिमित पुण्यसंचय करणारे लोक ज्या लोकीं जातात, त्या स्वर्ग-संज्ञक लोकाची प्राप्ति होते. तेथें पुष्कळ दिवस सुखोपभोग घेऊन पुढें तो इहलोकीं जन्म घेतो. पण मरणसमयीं त्याच्या मनांत जर ऐहिक भोगाविषयीं इच्छा राहिलेली असली, तर तो अतिशुद्ध व संपन्न अशा कुळांत जन्म घेतो. ॥ ४७ ॥

आतां मरणसमयीं जे वैराग्ययुक्त असतात, त्यांना कोणत्या कुळांत जन्म होतो तें भगवद्वचनाच्या आधारानेंच सांगतात:-

**अथ वा योगिनामेव कुले भवति धीमताम् ॥**
**निःस्पृहो ब्रह्मतत्त्वस्य विचारात्तद्धि दुर्लभम् ॥ ४८ ॥**

अन्वय:—अथवा निःस्पृहः ब्रह्मतत्त्वस्य विचारात् धीमतां योगिनां एव कुले भवति । तत् दुर्लभं हि ।

अर्थ:—किंवा विरक्त साधक ब्रह्मतत्त्वाच्या विचारामुळें बुद्धिमान् दरिद्र्याच्याच कुळांत उत्पन्न होतो. ( खरोखर ) अशा प्रकारचा जन्म दुर्लभच होय. ॥ ४८ ॥

**विवरण:**—मरणसमयीं अंतःकरणांत पूर्ण विरक्ति उत्पन्न झाल्यास ब्रह्मविचाराच्या सामर्थ्यानें साधक स्वर्गलोकीं तर जातोच. पण तेथील भोग संपतांच तो धन्य महात्मा इहलोकीं उत्तम पण दरिद्रि ब्राह्मणकुळांत उत्पन्न होतो. खरोखर असा जन्म प्राप्त होणें हें एक अघटितच होय. ॥ ४८ ॥

हा जन्म दुर्लभ कसा तें आतां सांगतात:-

**तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ॥**
**यतते च ततो भूयस्तस्मादेतद्धि दुर्लभम् ॥ ४९ ॥**

अन्वय:—हि तत्र पौर्वदेहिकं तं बुद्धिसंयोगं लभते । च ततः भूयः यतते । तस्मात् एतत् दुर्लभं ।

**अर्थः—ज्या अर्थी त्या जन्मांत त्यास पूर्व जन्मांतील तो बुद्धिसंयोग प्राप्त होतो, व तो फिरून त्याहून अधिक प्रयत्न करितो; त्या अर्थी हा जन्म दुर्लभ होय. ॥ ४९ ॥**

**विवरणः**—पूर्व देहांत असतांना त्याला जी आत्मतत्त्वविषयक बुद्धि झालेली होती, तिचाच दरिद्रानें पीडलेल्या कुलांत पुनः उदय होतो. व नंतर तो पुनरपि झपाट्यानें प्रयत्न करून आपल्या जन्माचें सार्थक करून घेतो. एवढ्याकरितांच अशा प्रकारच्या जन्मास दुर्लभ ह्मटलें आहे. जो योगभ्रष्ट श्रीमंताच्या कुलांत निर्माण झालेला असतो, त्यास जरी पौर्वदेहिक बुद्धि झाली तरी त्याची परिस्थिति अनुकूल नसल्यामुळें तिचा विकास होत नाहीं. ॥ ४९ ॥

दरिद्री व शुद्ध ब्राह्मणाच्या कुलांत उत्पन्न झालेल्या माहात्म्याच्या मनाचा कल पुनरपि अभ्यासाकडे कां होतो, तें आतां सांगतातः—

**पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ॥**
**अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ५० ॥**

**अन्वयः**—तेन पूर्वाभ्यासेन एव अवशः अपि ह्रियते । एवं अनेकजन्मसंसिद्धः सः ततः परां गतिं याति ।

**अर्थः—त्या पूर्वाभ्यासाकडूनच तो अस्वतंत्र असा साधकही आकर्षिला जातो. व ह्याप्रमाणें अनेक जन्मीं पुण्यकरून पूर्ण सिद्ध झालेला तो महात्मा तत्वज्ञानाच्या योगानें श्रेष्ठ गतीस जातो. ॥ ५० ॥**

**विवरणः**—योगभ्रष्ट पुरुषाचा पूर्वाभ्यास व्यर्थ होत नसल्यामुळें, तो अभ्यासच त्यास परतंत्र करून सोडतो व आपल्या अनुष्ठानांत प्रवृत्त करितो. आणि ह्याप्रमाणें अनेक सहस्रजन्मांतील पुण्यसंचयामुळें तो उत्तम प्रकारें सिद्ध होऊन जन्ममरण-परंपरेंतून सुटतो. ॥ ५० ॥

आगामिप्रतिबंध आणखी एका प्रकारचा असतो; असें आतां सांगतातः—

**ब्रह्मलोकाभिवाञ्छायां सम्यक् सत्यां निरुद्ध्य ताम् ॥**
**विचारयेद्य आत्मानं न तु साक्षात्करोत्ययम् ॥ ५१ ॥**

अन्वयः—ब्रह्मलोकाभिवाञ्छायां सम्यक् सत्यां तां निरुध्य यः आत्मानं विचारयेत् । अयं तु न साक्षात् करोति ।

**अर्थः—ब्रह्मलोकाची इच्छा दृढ असतांना तिचा निरोध करून जो आत्म्याविषयीं विचार चालवितो, त्यास आत्मसाक्षात्कार होत नाहीं. ॥ ५१ ॥**

विवरणः—ब्रह्मलोकाविषयीं दृढ इच्छा असतांना तिचा निरोध करणें चांगलें नव्हे; असें सांगण्याकरितां हा श्लोक प्रवृत्त झालेला नसून ती असतांना जरी विचार केला, तरी प्रतिबंध क्षयानंतर मोक्ष अवश्य मिळतोच, हें सांगण्याकरितां व इष्ट लोक मिळवून देण्याचेंही सामर्थ्य विचारामध्यें आहे हें सुचविण्याकरितां प्रवृत्त झाला आहे. ५१

तर मग असल्या आगामिप्रतिबंधाचा क्षय कधीं होतो ? असें कोणी विचारील म्हणून सांगतातः—

**वेदांतविज्ञानसुनिश्चितार्था इति शास्त्रतः ॥**
**ब्रह्मलोके स कल्पान्ते ब्रह्मणा सह मुच्यते ॥ ५२ ॥**

अन्वयः—'वेदान्तविज्ञानसुनिश्चितार्थाः' इति शास्त्रतः सः ब्रह्मलोके कल्पान्ते ब्रह्मणा सह मुच्यते ।

**अर्थः—"वेदान्तविज्ञान०" इत्यादि श्रुतिरूप शास्त्रावरून तो ब्रह्मलोकीं ब्राह्मकल्पाच्या अंतीं ब्रह्मदेवासह मुक्त होतो. ॥ ५२ ॥**

विवरणः—'वेदान्ताच्या पूर्ण ज्ञानामुळें ज्यांनीं पुरुषार्थाचा उत्तम प्रकारें निश्चय केला आहे, असे परोक्षज्ञानी भावी प्रतिबंधामुळें ब्रह्मलोकीं जातात व तेथें राहून ब्राह्मकल्पाच्या अंतीं ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतात' अशा अर्थाच्या श्रुति व स्मृति असल्यामुळें असले साधक ब्रह्मलोकाच्या क्षयानंतर स्वरूपांत लीन होतात; असा निर्णय करावा ॥ ५२ ॥

ह्याप्रमाणें तत्त्वविचार जरी केला तरी प्रतिबंधामुळें साक्षात्कार होत नाहीं, असें सांगून, आतां प्रतिबंध असल्यास 'तत्त्वविचार करावा अशी इच्छाही होत नाहीं' असें सांगतातः—

**केषांचित्स विचारोऽपि कर्मणा प्रतिबध्यते ॥**
**श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्य इति श्रुतेः ॥ ५३ ॥**

अन्वयः—'श्रवणायापि बहुभिः यः न लभ्यः' इति श्रुतेः केषां चित् सः विचारः अपि कर्मणा प्रतिबध्यते ।

अर्थः—'**जो परमात्मा पुष्कळ पुरुषांस केवळ ऐकावयासही मिळण्यासारखा नाहीं' अशा अर्थाची श्रुति असल्यामुळें कित्येकांचा तो विचारही कर्मांच्या योगानें प्रतिबद्ध होतो. ॥ ५३ ॥**

**विवरणः**—'कर्में विचारासही प्रतिबंध करितातः' हें ह्मणणें श्रुतिसिद्ध आहे. शिवाय आत्मविचार करणारे पुरुष क्वचित् आढळतात; व अनात्मविचार करणारे तर प्रायः सर्वच असतात; असा अनुभवही आहे. ॥ ५३ ॥

ह्याप्रमाणें गेल्या पंधरा श्लोकांत—प्रतिबंध असल्यास तत्त्वसाक्षात्कार व साधनभूत विचार संभवत नाहीं—असें सांगून आतां अठ्ठाविसाव्या श्लोकाच्या उत्तरार्धांत जी प्रतिज्ञा केली होती, तिचें उपपादन करितातः—

**अत्यंतबुद्धिमांद्याद्वा सामग्र्या वाऽप्यसंभवात् ॥**
**यो विचारं न लभते ब्रह्मोपासीत सोऽनिशम् ॥ ५४ ॥**

अन्वयः—अत्यंतबुद्धिमांद्यात् वा सामग्र्याः असंभवात् वा यः विचारं न लभते सः ब्रह्म अनिशं उपासीत ।

अर्थः—**अत्यंत बुद्धिमंदत्वामुळें किंवा सामग्रीच्या असंभवामुळें ज्यास विचार होत नाहीं; त्यानें ब्रह्माची सतत उपासना करावी. ॥ ५४ ॥**

*विवरणः*—गुरु, शास्त्र, इत्यादिकांचाच लाभ न झाल्यास विचार होणें असंभवनीय आहे. सारांश आपल्या हातून विचार होत नाहीं; किंवा तो करितां येत नाहीं; असें वाटल्यास त्या साधकानें ब्रह्माची सतत उपासना करावी. अठ्ठाविसाव्या श्लोकाचा उत्तरार्ध—विचार करण्यास असमर्थ असलेले पुरुष गुरुमुखांतून तें ऐकून उपासना करितात—अशा अर्थाचा आहे हें सुज्ञ वाचक विसरले नसतीलच. ॥ ५४ ॥

'पण निर्गुण ब्रह्माची उपासना कशी करितां येईल?' या प्रश्नाचें आतां उत्तर देतातः—

**निर्गुणब्रह्मतत्त्वस्य न ह्युपास्तेरसंभवः ॥**
**सगुणब्रह्मणीवात्र प्रत्ययावृत्तिसंभवात् ॥ ५५ ॥**

अन्वयः—सगुणब्रह्मणि इव अत्र प्रत्ययावृत्तिसंभवात् निर्गुणब्रह्मतत्त्वस्य उपास्तेः असंभवः न हि ।

अर्थः—सगुणब्रह्माप्रमाणें यामध्येंही प्रत्ययाची आवृत्ति संभवनीय असल्यामुळें निर्गुणब्रह्मतत्त्वाच्या उपासनेचा असंभव नाहीं. ॥ ५५ ॥

विवरणः—ब्रह्म अमुक अमुक गुणांनीं युक्त आहे; असें समजून त्याचें वारंवार स्मरण करणें ही सगुण उपासना होय. या उपासनेमध्यें ब्रह्माचें जसें स्मरण करितां येतें तसेंच तें निर्गुण उपासनेमध्येंही करितां येणें शक्य आहे. अर्थात् निर्गुण उपासना असंभवनीय आहे असें समजणें व्यर्थ होय. ॥ ५५ ॥

अहो, पण तें निर्गुणब्रह्म, वाणी व मन यांस अगोचर आहेना? मग त्याची स्मरणरूप उपासना तरी कशी होईल?

या शंकेचें आतां समाधान करितातः—

**अवाङ्मनसगम्यं तन्नोपास्यमिति चेत्तदा ॥**
**अवाङ्मनसगम्यस्य वेदनं न च संभवेत् ॥ ५६ ॥**

अन्वयः—तत् अवाङ्मनसगम्यं न उपास्यं इति चेत् तदा अवाङ्मनसगम्यस्य वेदनं च न संभवेत् ।

अर्थः—तें वाणी व मन यांस गोचर न होणारें ब्रह्म उपासना करण्यास योग्य नाहीं, असें जर ह्मटलें तर वाणी व मन यांस गोचर न होणाऱ्या ब्रह्माचें ज्ञानही संभवणार नाहीं. ॥ ५६ ॥

विवरणः—उपासना ह्मणजे वारंवार स्मरण करणें, असें मागच्या श्लोकाच्या विवरणांत सांगितलेंच आहे. आतां–वाणी व मन यांस निर्गुण ब्रह्म विषय होत नाहीं व त्यामुळें त्याचें स्मरणही होणें शक्य नाहीं. कारण स्मरण ही तरी एक मनाची वृत्तीच आहे.—असें जर ह्मटलें तर त्याचें ज्ञान होणेंही अशक्य आहे, असें ह्मणावें लागेल. कारण ज्ञान ही सुद्धां एक अंतःकरणाची वृत्तीच आहे. ॥ ५६ ॥

आतां, वाणी, मन इत्यादि साधनांस तें अगोचर आहे असें जाणतां येतें, असें जर ह्मणावें तर त्याच स्वरूपाच्या भावनेनें त्याची उपासनाही करितां येते, असें

ह्मणण्यास काय प्रत्यवाय आहे ? असा प्रश्न करून—वाणी व मन यांस तें अगोचर आहे,—असेंच त्याचें चिंतन करावें; असें सुचवितातः—

**वागाद्यगोचराकारमित्येवं यदि वेत्त्यसौ ॥**
**वागाद्यगोचराकारमित्युपासीत नो कुतः ॥ ५७ ॥**

**अन्वयः**—वागाद्यगोचराकारं इति एवं यदि असौ वेत्ति तर्हि वागाद्यगोचराकारं इति कुतः न उपासीत ।

**अर्थः**—त्याचा आकार वाणी इत्यादिकांस विषय होण्यासारखा नाहीं, असें जर हा साधक जाणतो, तर वागादिकांस ज्याचा आकार अगोचर आहे, अशा ब्रह्माची तो उपासना कां करणार नाहीं. ? ॥ ५७ ॥

**विवरणः**—तात्पर्य, ब्रह्म अशा अशा प्रकारचें आहे, असें जर साधकास जाणतां येतें तर तसेंच त्याचें चिंतनरूप भजन कां करितां येऊं नये. ॥ ५७ ॥

'त्याची जर उपासना करितां येऊं लागली तर तें सगुण होईल.' या शंकेचें आतां समाधान करितातः—

**सगुणत्वमुपास्यत्वाद्यदि वेद्यत्वतोऽपि तत् ॥**
**वेद्यं चेल्लक्षणावृत्त्या लक्षितं समुपास्यताम् ॥ ५८ ॥**

**अन्वयः**—यदि उपास्यत्वात् सगुणत्वं तर्हि वेद्यत्वतः अपि तत् भविष्यति एव । लक्षणावृत्त्या वेद्यं चेत् लक्षितं समुपास्यताम् ।

**अर्थः**—जर उपास्यत्वामुळें सगुणतेची प्राप्ति होईल, असें ह्मटलें तर वेद्यत्वामुळेंही तिची प्राप्त होईलच. तें लक्षणावृत्तीनें वेद्य आहे, असें जर ह्मटलें तर लक्षाणवृत्तीनें ज्ञात होणाऱ्या त्याचीच उत्तम प्रकारें उपासना करावी. ॥ ५८ ॥

**विवरणः**—सगुण ब्रह्मच उपासनेस योग्य असल्यामुळें—'निर्गुण ब्रह्म उपास्य आहे' असें ह्मटल्यास तें सगुण होईल—असें ह्मणणेंही योग्य नव्हे. कारण तें वेद्य (ह्मणजे जाणण्यास योग्य) आहे, असें ह्मटल्यासही हा दोष येणारच. आतां—ब्रह्माचें लक्षणावृत्तीनें ज्ञान होतें—असें ह्मटल्यानें प्रस्तुत दोष येत नाहीं, अशी जर

युक्ति लढविली तर ती उपासनेमध्येंही लागू पडत असल्यामुळें आह्मांस इष्टच आहे. ह्मणजे लक्षणेनें लक्षित असें जें निर्गुण ब्रह्म त्याचीच उपासना करावी ह्मणजे झालें.

'अहो, पण निर्गुण ब्रह्माच्या उपासनेचा श्रुतीनें निषेध केला आहे.' अशी आतां वादी शंका करितोः—

**ब्रह्म विद्धि तदेव त्वं न त्विदं यदुपासते ॥**
**इति श्रुतेरुपास्यत्वं निषिद्धं ब्रह्मणो यदि ॥ ५९ ॥**

अन्वयः—तत् एव त्वं ब्रह्म विद्धि । यत् इदं उपासते तत् न इति श्रुतेः ब्रह्मणः उपास्यत्वं निषिद्धं इति यदि ।

अर्थः—कोणात्याही ज्ञानसाधनास विषय न होणारें असें जें कांहीं आहे तेंच तूं ब्रह्म जाण. ज्याची साधक उपासना करीत आहे; तें नव्हे. अशी श्रुति असल्यामुळें ब्रह्माचें उपास्यत्व निषिद्ध आहे असें जर ह्मणावें ? ॥ ५९ ॥

विवरणः—सामवेदाच्या तलवकार शाखेच्या केनोपनिषदांत प्रस्तुत श्रुति आहे; व तिच्यावरून ब्रह्म उपासनेचा विषय होत नाहीं असें स्पष्ट होतें, असें वाद्याचें ह्मणणें आहे. याचें उत्तर पुढच्या श्लोकांत दिलें आहे ॥ ५९ ॥

पूर्वोक्तशंकेचें आतां समाधान करितातः—

**विदितादन्यदेवेति श्रुतेर्वेद्यत्वमस्य न ॥**
**यथा श्रुत्यैव वेद्यं चेत्तथा श्रुत्याऽप्युपास्यताम् ॥ ६० ॥**

अन्वयः—विदितात् अन्यत् एव इति श्रुतेः अस्य वेद्यत्वं न निषिद्धं किं ? यथा श्रुत्या एव वेद्यं चेत् तथा श्रुत्या अपि उपास्यताम् !

अर्थः—'ज्ञातवस्तूंहून तें भिन्नच आहे,' अशी श्रुति असल्यामुळें त्याचें वेद्यत्व निषिद्ध नाहीं का ? पण तें जसें श्रुतीमुळें वेद्य आहे, तसें श्रुतीमुळें उपास्यही आहे. ॥ ६० ॥

विवरणः—पूर्वोक्तश्रुतीनेंच त्याच्या वेद्यत्वाचाही निषेध केला आहे. वेद्यत्व ह्मणजे ज्ञानाचा विषय होण्याचा स्वभाव. आतां अन्यश्रुतीनें 'तें वेद्य आहे' असें सांगितलें असल्यामुळें त्याच्या वेद्यत्वाचें आह्मी ग्रहण करितों; असें जर ह्मणाल तर

–अन्यश्रुतीनें त्याच्या उपास्यत्वाचाही निर्देश केलेला असल्यामुळें त्याची उपासना करावी–असें आह्मीही ह्मणूं!! उपास्यत्व ह्मणजे उपासनेचा विषय होण्याचा स्वभाव. ॥ ६० ॥

आतां–त्याचें वेद्यत्व वास्तवीक नव्हे–असें जर ह्मणाल; तर उपास्यत्वाचीही तशीच कल्पना करा. असें सुचवितातः–

**अवास्तवी वेद्यता चेदुपास्यत्वं तथा न किम् ॥**
**वृत्तिव्याप्तिर्वेद्यता चेदुपास्यत्वेऽपि तत्समम् ॥ ६१ ॥**

**अन्वयः**—वेद्यता अवास्तवी चेत् उपास्यत्वं तथा न किं। वृत्तिव्याप्तिः वेद्यता चेत् उपास्यत्वे अपि तत् समम् ।

**अर्थः**—'वेद्यत्व सत्य नव्हे' असें जर ह्मटलें तर उपास्यता तशी कां नव्हे? बरें, वृत्तीचा विषय होणें ह्मणजेच वेद्यता होय; असें जर ह्मटलें तर उपास्यते-च्या ठायींही तें सारखेंच लागूं आहे. ॥ ६१ ॥

**विवरणः**—उपासना व ज्ञान यामध्यें फरक आहे. ज्ञानामध्यें अंतःकरणाची वृत्ति ब्रह्माकार होत असते. पण उपासनेमध्यें तशी होत नाहीं. असें शंकाकाराचें ह्मणणें आहे. त्यावर सिद्धान्ती ह्मणतात कीं– तें बरोबर नाहीं. कारण ज्ञानाप्रमाणें उपासनेमध्येंही अंतःकरण ब्रह्माकार होतें. या आमच्या ह्मणण्यास श्रुतीचा आधार आहे. आह्मी उगीच कांहीं तरी सांगत आहों; असें समजूं नका. ॥ ६१ ॥

पण या निर्गुण ब्रह्माच्या उपासनेविषयीं तुमचा इतका आग्रह कां? असें वादी विचारील, ह्मणून 'जशास तसें' या न्यायानें सिद्धान्ती ह्मणतातः–

**का ते भक्तिरुपास्तौ चेत्कस्ते द्वेषस्तदीरय ॥**
**मानाभावो न वाच्योऽस्यां बहुश्रुतिषु दर्शनात् ॥ ६२ ॥**

**अन्वयः**—उपास्तौ ते का भक्तिः इति चेत् त कः द्वेषः तत् ईरय । बहुश्रुतिषु दर्शनात् अस्यां मानाभावः न वाच्यः ।

**अर्थः—उपासनेमध्यें तुझी ( एवढी दृढ ) भक्ति कां? असें जर ह्मणशील तर तुझा एवढा द्वेष कां तें सांग पाहूं? अनेक श्रुतीमध्यें निर्देश आढळत असल्यामुळें हिच्याविषयीं प्रमाण नाहीं; असेंही ह्मणतां येणार नाहीं. ॥६२॥**

विवरण:—उपासनेविषयीं कांहीं प्रमाण नसल्यामुळें मी द्वेष करितों असेंही ह्मणणें युक्त नाहीं. कारण अनेकश्रुति याविषयीं प्रमाण आहेत. ॥ ६२

'उपासनेविषयीं श्रुतिप्रमाण कोठें आहे, तें दाखवा पाहूं.' असें कोणी ह्मणेल ह्मणून श्री भारतीतीर्थ ह्मणतात:–

**उत्तरस्मिंस्तापनीये शैब्यप्रश्नेऽथ काठके ॥**
**माण्डुक्यादौ च सर्वत्र निर्गुणोपास्तिरीरिता ॥ ६३ ॥**

अन्वयः—उत्तरस्मिन् तापनीये, शैब्यप्रश्ने, अथ काठके च मांडुक्यादौ सर्वत्र निर्गुणोपास्तिः ईरिता अस्ति ।

अर्थ:—अथर्ववेदाच्या नृसिंहोत्तरतापनीयनामक उपनिषदांत; प्रश्नोपनिषदाच्या पांचव्या शैब्यप्रश्नांत; काठकोपनिषदाच्या दुसऱ्या वल्लींत; मांडुक्याच्या आरंभींच व तैत्तिरीयादि दुसऱ्याही अनेक उपनिषदांत निर्गुण उपासना सांगितलेली आहे. ॥ ६३ ॥

विवरण:—उत्तरतापनीयामध्यें "देव प्रजापतीस ह्मणाले, हे भगवन्, अणूहून अणुरूप असलेल्या ह्या ओंकाररूप आत्म्याचें आह्मांस स्वरूप सांग" अशी देवांनीं प्रजापतीची प्रार्थना केली आहे; व त्यानें त्या निर्गुणाच्या उपासनेचा देवांस उपदेश केला आहे. प्रश्नोपनिषदांत सत्यकामनामक शैब्यानें पिप्पलादांस प्रश्न केला आहे, व त्या गुरूंनीं "जो ह्या परम पुरुषाचें ॐ या तीन मात्रांनीं युक्त अशा अक्षराच्या द्वारा ध्यान करितो" इत्यादि प्रकारें उपदेश केला आहे. कठवल्लींतही यमानें नचिकेतास "हें अक्षरच ब्रह्म आहे" इत्यादि सांगितलें आहे. मांडुक्यांतही "ॐच हें सर्व आहे." असा आरंभ करून शेवटीं तुरीयाच्या उपासनेविषयीं उपदेश केला आहे. सारांश अशा अनेक श्रुतीमध्यें निर्गुणउपासना सांगितलेली आहे. यास्तव ती अप्रमाण आहे, असें ह्मणण्याचें साहस करूं नये. ॥ ६३ ॥

पण, निर्गुणउपासनेचें अनुष्ठान कसें करितां येईल? या शंकेचें आतां समाधान करितात:—

**अनुष्ठानप्रकारोऽस्याः पंचीकरण ईरितः ॥**
**ज्ञानसाधनमेतच्चेन्नेति केनात्र वारितम् ॥ ६४ ॥**

**अन्वयः**—अस्याः अनुष्ठानप्रकारः पंचीकरणे ईरितः अस्ति । एतत् ज्ञानसाधनं इति चेत् अन्य न इति केन वारितम् ।

**अर्थः**—हिच्या अनुष्ठानाचा प्रकार पंचीकरणांत सांगितला आहे. शंकाः– अहो, पण हें तर ज्ञानसाधन आहे ! समाधान–मग, होय. त्याविषयीं 'नाहीं' असें कोण ह्मणतो आहे ? ॥ ६४ ॥

विवरणः—माण्डुक्यादि उपनिषदांवरील भाष्यांत ठिकठिकाणीं आचार्यांनीं या उपासनेचा निर्देश केला आहे. पण तो सर्व एके ठिकाणीं ज्यांना पहावयाचा असेल त्यांनीं श्रीसुरेश्वराचार्यांचें पंचीकरण पहावें. आतां–ही उपासना मुक्तीचें साक्षात् साधन नाहीं–असें जर कोणी ह्मणेल तर तें आह्मांसही इष्टच आहे. कारण ज्ञान हें मुक्तीचें साक्षात् साधन व उपासना ज्ञानाचें साधन हें आह्मांस अक्षरशः मान्य आहे. ॥ ६४ ॥

" अहो, पण या तुमच्या निर्गुणउपासनेचें कोणीच अनुष्ठान करीत नाहीं. बहुतेक साधक सगुणोपासकच आढळतात. " या शंकेचें आतां थोडक्यांत समाधान करितातः–

**नानुतिष्ठति कोऽप्येतदिति चेन्माऽनुतिष्ठतु ॥**
**पुरुषस्यापराधेन किमुपास्तिः प्रदुष्यति ॥ ६५ ॥**

**अन्वयः**—कः अपि एतत् न अनुतिष्ठति इति चेत् मा अनुतिष्ठतु । पुरुषस्य अपराधेन उपास्तिः प्रदुष्यति किम् ।

**अर्थः**—कोणीही हिचें अनुष्ठान करीत नाहीं; असें जर ह्मणशील तर, न करिनात. पुरुषाच्या अपराधामुळें उपासना दूषित होते कीं काय ? ॥ ६५ ॥

**विवरणः**—या श्रुतीनें सांगितलेल्या उपासनेचें जर कोणी अनुष्ठान न केलें तर त्यांत त्या उपासनेची कोणती हानि होणार आहे ? साधकाच्या अपराधामुळें साधनांची कधीं हानि होत नसते ! ! ॥ ६५ ॥

आतां—कोणी अनुष्ठानच करीत नसल्यामुळें जरी ती श्रुतिप्रोक्त असली तरी त्याज्य होय; असें ह्मणणें युक्त नव्हे–असें दृष्टान्त देऊन सांगतातः–

**इतोऽप्यतिशयं मत्वा मंत्रान्वश्यादिकारिणः ॥**
**मूढा जपंतु तेभ्योऽतिमूढाः कृषिमुपासताम् ॥ ६६ ॥**

**अन्वयः**—मूढाः इतः अपि अतिशयं मत्वा वश्यादिकारिणः मंत्रान् जपन्तु । अथवा तेभ्यः अतिमूढाः कृषिं उपासताम् ।

**अर्थः**—मूढ पुरुष या सगुणोपासनेहूनही लाभदायक मानून वशीकरणादि मंत्रांचा जप करोत; किंवा त्याहूनही अतिमूर्ख शेतकी करोत ! ! ! ॥ ६६ ॥

**विवरण**:—या श्लोकाचें तात्पर्य असें:—ज्ञानद्वारा मोक्षदायक निर्गुण उपासनेपेक्षां थोड्या कष्टांनीं साध्य होणारी सगुण उपासनाच बरी असें मानून जसे बरेच अविवेकी साधक सगुणोपासना करितात, त्याप्रमाणें कांहीं मूर्ख—बऱ्याच अवकाशानें स्वर्गादि पारलौकिक फल देणाऱ्या सगुण उपासनेपेक्षां येथल्या येथेंच फल देणाऱ्या जारणमारण, उच्चाटन, वशीकरण इत्यादि मंत्रांचा जप खुशाल करोत. पण कांहीं मूर्ख सगुणोपसना सोडतात, ह्मणून सर्वच जसे ती सोडीत नाहींत, त्याप्रमाणेंच बरेच अविवेकी निर्गुण उपासना सोडितात ह्मणून आश्चर्याप्रमाणें क्वचित् आढळणारे मुमुक्षूही तिचा त्याग करितील अशी आशा करणें व्यर्थ आहे. किंवा वशीकरणादि मंत्रांमध्यें नियमादिकांचा फार निर्बंध आहे, असें जाणून नियमादिकांची अपेक्षा न करणारीं शेतकीसारखीं कर्मे कांहीं अतिमूर्ख करितात, पण त्यामुळें सर्वच जसे मंत्रादिकांचा जप टाकीत नाहींत; त्याप्रमाणें संसारि पुरुष निर्गुण उपासना करीत नाहींत, ह्मणून उत्तम साधकांनींही तिचा त्याग करावा; हें ह्मणणें न्याय्य होणार नाहीं. ॥ ६६ ॥

असो; आतां प्रसंगप्राप्त चर्चेचा उपसंहार करून प्रकृतविषयाकडे वळतातः—

**तिष्ठंतु मूढाः प्रकृता निर्गुणोपास्तिरीर्यते ॥**
**विद्यैक्यात्सर्वशाखास्थान् गुणानत्रोपसंहरेत् ॥ ६७ ॥**

**अन्वयः**—मूढाः तिष्ठन्तु । प्रकृता निर्गुणोपास्तिः ईर्यते । विद्यैक्यात् सर्वशाखास्थान् गुणान् अत्र उपसंहरेत् ।

**अर्थः**—मूर्खांच्या गोष्टी आतां राहूं देत. प्रकृत निर्गुणोपासना सांगूं या. ही विद्यासंज्ञक निर्गुण उपासना सर्वत्र एकरूपच असल्यामुळें, सर्व शाखेंतील गुण येथें घ्यावेत. ॥ ६७ ॥

विवरणः—उपासनेस विद्या हें नांव आहे. व ' सर्व उपनिषदांतील उपासना एक-रूपच आहे. कारण विधानादि प्रकार सर्वत्र सारखाच आहे ' अशा अर्थाच्या शारीरक मीमांसेच्या तिसऱ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाच्या पहिल्या सूत्रांत सर्व शाखेंतील उपासना एकच आहे, असें ठरविलें आहे. यास्तव सर्व शाखेंतील उपनिषदांत सांगितलेले उपासनेचे भिन्न भिन्न गुण प्रत्येक उपासनेत घ्यावे. ॥ ६७ ॥

हें आमचें ह्मणणें संप्रदायास सोडून आहे, असें कोणास वाटूं नये व कोणत्या गुणांचा उपसंहार करण्याविषयीं तुह्मीं सांगत आहां ? असा कोणी प्रश्न करूं नये, ह्मणून ग्रंथकार ह्मणतातः—

**आनंदादेर्विधेयस्य गुणसंघस्य संहृतिः ॥**
**आनंदादय इत्यस्मिन् सूत्रे व्यासेन वर्णिता ॥ ६८ ॥**

अन्वयः—आनंदादेः विधेयस्य गुणसंघस्य संहृतिः ' आनंदादयः० ' इति अस्मिन् सूत्रे व्यासेन वर्णिता ।

अर्थः—आनंदादि विधान करण्यास योग्य अशा गुणसमूहांचा उपसंहार करावा; असें ' आनंदादयः० ' या सूत्रांत भगवान् व्यासांनीं वर्णन केलें आहे. ॥ ६८ ॥

विवरणः—हे गुण दोन प्रकारचे आहेत. एक विधेय ह्मणजे विधिवाक्यांवरून समजण्यासारखे व दुसरे निषेध्य ह्मणजे निषेध वाक्यांवरून समजण्यासारखे. त्यांतील 'ब्रह्म आनंदरूप आहे ' ' ब्रह्म विज्ञानरूप व आनंदरूप आहे ' ' शुद्ध, बुद्ध, मुक्त, सत्य, निरंजन, विभु, द्वैतशून्य, आनंद, पर, सर्वान्तर्यामी, एकरस, इत्यादि भिन्न भिन्न शाखेंतील विधिवाक्यांवरून ज्ञात होणाऱ्या अनेक धर्मांचा प्रत्येक शाखेंतील निर्गुण उपासनेंत संग्रह करावा; असें ' आनंदादयः प्रधानस्य ' या पूर्वोक्त अध्याय व पादाच्या अकराव्या सूत्रांत सांगितलें आहे. ' ब्रह्माचे आनंदादिक सर्व गुण सर्व शाखेंतील उपासनेंत समजावे ' असा त्या सूत्राचा अर्थ आहे. ॥ ६८ ॥

विधेय गुणांप्रमाणें निषेध्य गुणांचाही उपसंहार करावा, असें श्रीव्यासानींच सांगितलें आहे; असें आतां सांगतातः—

**अस्थूलादेर्निषेध्यस्य गुणसंघस्य संहृतिः ॥**
**तथा व्यासेन सूत्रेऽस्मिन्नुक्ताऽक्षरधियां त्विति ॥ ६९ ॥**

**अन्वयः**—तथा व्यासेन ' अक्षरधियां तु० ' इति अस्मिन् सूत्रे अस्थूलादेः निषेध्यस्य गुणसंघस्य संहृतिः उक्ता ।

**अर्थः**—त्याचप्रमाणें व्यासमहर्षींनीं 'अक्षरधियां तु० ' ह्या सूत्रामध्यें अस्थूलादि निषेध्य गुणसमूहाचा उपसंहार करण्याविषयीं सांगितलें आहे. ॥ ६९ ॥

**विवरणः**—' अस्थूलादि ' येथील आदिशब्दानें " अनणु, अन्हस्व, अदृश्य, आग्राह्य, अशब्द, अस्पर्श, अरूप, अव्यय इत्यादि भिन्न भिन्न शाखेंतील निषेध्या पदें घ्यावीं. ' अक्षरधियां तु० ' या पूर्वोक्त अध्याय व पादाच्या तेतिसाव्या सूत्राचा अर्थः—' अक्षरधी ह्मणजे ब्रह्मसंज्ञक धर्मीच्या ठायीं जी द्वैतविषयक विशेषांच्या निषेधाची बुद्धि, ती सर्व उपनिषदांत सारखीच आहे. कारण सर्व द्वैतविशेषांचें निराकरण करणें, हा ब्रह्माच्या प्रतिपादनाचा प्रकार सर्वत्र सारखाच आहे, व सर्व उपनिषदांचें प्रतिपाद्य जें ब्रह्म त्याचा अभेद आहे अशी प्रतिज्ञा केली आहे. ' इत्यादि आहे. ॥ ६९ ॥

सारांश अशारीतीनें गुणोपसंहार करण्याविषयीं श्रीसूत्रकारांनींच सांगितलेलें असल्यामुळें ' निर्गुण ब्रह्मविद्येमध्यें गुणांचा उपसंहार कसा होऊं शकेल ' हा प्रश्न त्यांना करावयास पाहिजे; मला नव्हे. असें हंसत हंसत श्रीभारतीतीर्थ वाद्यास सांगतातः—

**निर्गुणब्रह्मतत्त्वस्य विद्यायां गुणसंहृतिः ॥**
**न युज्येतेत्युपालंभो व्यासं प्रत्येव मां न तु ॥ ७० ॥**

**अन्वयः**—निर्गुणब्रह्मतत्त्वस्य विद्यायां गुणसंहृतिः न युज्येत इति उपालंभः व्यासं प्रति एव । मां प्रति तु न ।

**अर्थः**—निर्गुण ब्रह्मतत्त्वाचा विद्येमध्यें गुणोपसंहार युक्त नव्हे, अशा प्रकारचा दोष व्यासांस लागणार; मला नव्हे. ( त्यांना दोष देण्याइतकें जर तुझ्यामध्यें धैर्य असलें तर तूं स्वसंतोषाकरितां तसें खुशाल कर, असें याचें तात्पर्य. ) ॥ ७० ॥

पूर्वोक्तरीत्या व्यासांकडेच दोष जातो, असें समजतांच वादी सावध होऊन अनुकूल मत देतो; व सिद्धान्ती त्याचें अभिनंदन करितातः—

**हिरण्यश्मश्रुसूर्यादिमूर्तीनामनुदाहृतेः ॥**
**अविरुद्धं निर्गुणत्वमिति चेत्तुष्यतां त्वया ॥ ७१ ॥**

अन्वयः—हिरण्यश्मश्रुसूर्यादिमूर्तीनां अनुदाहृतेः निर्गुणत्वं अविरुद्धं इति चेत् त्वया तुष्यताम् ।

अर्थः—हिरण्याची श्मश्रु इत्यादि लक्षणांनीं युक्त अशा सूर्यादि मूर्तींचा उल्लेख केलेला नसल्यामुळें आनंदादि रूप ब्रह्माच्या निर्गुणत्वाला विरुद्ध नाहीं असें जर ह्मणशील तर तूं संतुष्ट हो. ॥ ७१ ॥

विवरणः—छान्दोग्यादि उपनिषदांतून सगुणोपासनेचें प्रकरण चाललें असतां ' सूर्याची श्मश्रु सोन्याची आहे ' इत्यादि प्रकारें उपास्याचें जसें वर्णन केलेलें आढळतें, तसें निर्गुणप्रकरणीं आढळत नाहीं. तेव्हां आनंद, सत्, चित् इत्यादि रूप ब्रह्म निर्गुण आहे, असें ह्मणतां येण्यासारखें आहे; असें जर ह्मणत असशील तर तें आह्मांस फारसें अनिष्ट नसल्यामुळें ' तूं तसेंच समज व आनंद मानून रहा ' असें आह्मी मोठ्या प्रसन्नतेनें सांगतों. ॥ ७१ ॥

पण आनंदादि विधेय व अस्थूलादि निषेध्य गुणांचा उपास्य तत्त्वामध्यें प्रवेश होणें शक्य नसल्यामुळें त्या त्या गुणांनीं युक्त अशा ब्रह्माची उपासना कशी करितां येईल ? या शंकेचें आतां समाधान करितातः—

**गुणानां लक्षकत्वेन न तत्त्वेऽन्तःप्रवेशनम् ॥**
**इति चेदस्त्वेवमेव ब्रह्मतत्त्वमुपास्यताम् ॥ ७२ ॥**

अन्वयः—गुणानां लक्षकत्वेन तत्त्वे अन्तः प्रवेशनम् न भवति इति चेत् एवं एव अस्तु । ब्रह्मतत्त्वं उपास्यताम्

अर्थः—गुणांस लक्षकता असल्यामुळें तत्त्वामध्यें त्यांचा प्रवेश होत नाहीं, असें जर ह्मणशील तर ठीक आहे. तसाच प्रकार असो. पण ब्रह्मतत्त्वाची उपासना करावी. ॥ ७२ ॥

विवरणः—आनंदादि गुणांचा ब्रह्मामध्यें प्रवेश होत नाहीं. तर ते गुण त्याचें लक्षण करणारे ह्मणजे त्याची ओळख करून देणारे, ( त्यास सुचविणारे ) आहेत, असें जर ह्मणशील तर तसें कां असेना. आनंदादि गुणांविषयीं कशीही जरी कोणी कल्पना

केली तरी त्यापासून आमची कांहीं हानि होत नाहीं. त्या गुणांच्या योगानें लक्षित हो-णाऱ्या ब्रह्माचीच उपासना करावी. एवढें मात्र आह्मीं सांगूं ॥ ७२ ॥

तात्पर्य—

**आनंदादिभिरस्थूलादिभिश्चात्माऽत्र लक्षितः ॥**
**अखंडैकरसः सोऽहमस्मित्येवमुपासते ॥ ७३ ॥**

अन्वयः—अत्र आनंदादिभिः च अस्थूलादिभिः लक्षितः यः अखंडैकरसः आत्मा सः अहं अस्मि। इति एवं मुमुक्षुः उपासते।

**अर्थः—या सर्व उपनिषदांतून आनंदादिक व अस्थूलादिक गुणांच्या योगानें ज्याचें लक्षण केलें आहे, असा अखंड, एकरस आत्माच मी आहें अशा प्रकारें मुमुक्षु उपासना करितात ॥ ७३ ॥**

विवरणः—सर्व उपनिषदांत सांगितलेल्या गुणांवरून ज्याचा बोध झाला आहे असें 'अखंड ब्रह्मच मी आहें' अशी निरंतर भावना करणें हीच निर्गुण उपासना होय. हिलाच अहंग्रहोपासना ह्मणतात. ॥ ७३ ॥

आतां आत्मसाक्षात्कार व उपासना यांमध्यें कोणता विशेष आहे तें सांगतातः—

**बोधोपास्त्योर्विशेषः क इति चेदुच्यते शृणु ॥**
**वस्तुतंत्रो भवेद्बोधः कर्तृतंत्रमुपासनम् ॥ ७४ ॥**

अन्वयः—बोधोपास्त्योः कः विशेषः इति चेत् उच्यते शृणु। बोधः वस्तुतंत्रः भवेत् उपासनं तु कर्तृतंत्रं अस्ति।

**अर्थः—बोध व उपासना यांच्या मध्यें कोणता विशेष आहे, असें जर विचारशील तर सांगतों ऐक. बोध वस्तुतंत्र असतो व उपासना कर्त्याच्या अधीन असते. ॥ ७४ ॥**

विवरणः—बोध ह्मणजे ज्ञान. तें जसा पदार्थ असेल तसेंच होणें शक्य आहे. आणि तसें न झाल्यास तें यथार्थ ज्ञानच नव्हे. पण उपासनेची स्थिति तशी नसते. तर ती कर्त्याच्या भावनेवर अवलंबून असते. ह्मणजे शालिग्राम शिलेमध्यें विष्णूची भावना करणें किंवा न करणें हें मनुष्याच्या हातांत असतें हें उघड आहे. ॥ ७४ ॥

पूर्व श्लोकांत सांगितलेल्या विशेषाचेंच अधिक स्पष्टीकरण करण्याकरितां प्रथमतः दोन श्लोकांत बोधाचें स्वरूप सांगतातः-

**विचाराज्जायते बोधोऽनिच्छा यं न निवर्तयेत् ॥**
**स्वोत्पत्तिमात्रात्संसारे दहत्यखिलसत्यताम् ॥ ७५ ॥**

अन्वयः—विचारात् बोधः जायते । यं अनिच्छा न निवर्तयेत् । स्वोत्पत्तिमात्रात् संसारे अखिलसत्यतां दहति ।

**अर्थः—विचारापासून बोध उत्पन्न होतो व त्याचें निवारण अनिच्छा करूं शकत नाहीं. आपल्या उत्पत्तीबरोबरच तो संसाराच्या ठिकाणची सर्व सत्यता जाळून टाकितो. ॥ ७५ ॥**

विवरणः—विचाराचा स्वभावच असा आहे, कीं तो बोधास अवश्य उत्पन्न करितोच. विचार केल्यावर बोध होऊं नये अशी जरी विचार करणाराची दृढ इच्छा असली, तरी ती त्यास हटवूं शकत नाहीं. व ह्या विचारजन्य बोध उत्पन्न होतां-क्षणींच संसार सत्य आहे, अशाप्रकारची भावना तो निःशेष घालवितो. ॥ ७५ ॥

आणि—

**तावता कृतकृत्यः सन्नित्यतृप्तिमुपागतः ॥**
**जीवन्मुक्तिमनुप्राप्य प्रारब्धक्षयमीक्षते ॥ ७६ ॥**

अन्वयः—तावता कृतकृत्यः सन् नित्यतृप्तिं उपागतः मुमुक्षुः जीवन्मुक्तिं अनुप्राप्य प्रारब्धक्षयं ईक्षते ।

**अर्थः—तेवढ्यानेंच कृत्यकृत्य होऊन नित्यतृप्ती प्रत प्राप्त झालेला मुमुक्षु जीवनमुक्तीस जाऊन पोंचतो व प्रारब्धाच्या क्षयाची वाट पहातो. ॥ ७६ ॥**

विवरणः—आत्मबोध होऊन संसाराच्या असत्यत्वाची भावना झाल्यानेंच साधक कृतकृत्य होतो. व ' मला आतां अधिक कांहीं कर्तव्य नाहीं. जें कांही कर्तव्य होतें तें सर्व मी करून सोडलें आहे ' अशी एकदां दृढ भावना झाली कीं त्या पुरुषास कधींही क्षीण न होणारी तृप्ति प्राप्त होते. अशाप्रकारच्या तृप्तीनंतर तो जीवन्मुक्तिसंज्ञक अवस्थेप्रत पोंचतो. व नंतर केवल प्रारब्धाचा क्षय केव्हां होतो आणि मी शरीर त्याग करून स्वरूपांत केव्हां मिळतों, एवढीच वाट पहात रहातो. ॥ ७६ ॥

आतां बोधाहून उपासना विलक्षण कशी आहे, तें सांगण्याकरितां ग्रंथकार उपासनेचें वर्णन करितातः—

**आप्तोपदेशं विश्वस्य श्रद्धालुरविचारयन् ॥**
**चिंतयेत् प्रत्ययैरन्यैरनंतरितवृत्तिभिः ॥ ७७ ॥**

अन्वयः—श्रद्धालुः आप्तोपदेशं विश्वस्य अविचारयन् अन्यैः प्रत्ययैः अनंतरितवृत्तिभिः चिन्तयेत्

**अर्थः—श्रद्धालु साधकानें आप्तोपदेशावर विश्वास ठेऊन विचार न करितां दुसऱ्या प्रत्ययांच्या योगानें बाधित न होणाऱ्या वृत्तींच्या योगानें चिंतन करावें. ॥ ७७ ॥**

**विवरणः**—उपासनेमध्यें केवल श्रद्धाच कारण असते. तेथें विचाराचें कांहींएक चालत नाहीं. अथवा उपासनेविषयीं विचार करूं लागल्यास त्याचा इष्ट परिणाम होत नाहीं. त्यामुळें आप्तोपदेशाविषयींही अश्रद्धा उत्पन्न होते. यास्तव उपासकानें उपासनेविषयींच्या उपदेशाची विचाररूपी कसोटीवर परीक्षा न करितां केवल विश्वासानें अनुष्ठान करण्यास आरंभ करावा. आतां उपासना कशी करावी ह्मणून ह्मणाल, तर सांगतों. संसारिक पदार्थांच्या प्रत्ययांनीं उपास्याविषयींची वृत्ति विच्छिन्न न होऊं देतां ह्मणजे सतत उपास्याविषयींच अविच्छिन्न वृत्ति ठेवून त्याचें चिंतन करावे. ॥ ७७ ॥

आतां अशाप्रकारची उपासना किती दिवस करावी तें सांगतातः—

**यावच्चिंत्यस्वरूपत्वाभिमानः स्वस्य जायते ॥**
**तावद्विचिंत्य पश्चाच्च तथैवामृति धारयेत् ॥ ७८ ॥**

अन्वयः—यावत् स्वस्य चिंत्यस्वरूपत्वाभिमानः जायते । तावत् विचिंत्य पश्चात् च तथा एव आमृति धारयेत् ।

**अर्थः—जोंपर्यंत स्वतःला चिंत्यस्वरूपत्वाचा अभिमान होई तोंपर्यंत चिंतन करून नंतर तसेंच मरेपर्यंत त्यास धारण करावें. ॥ ७८ ॥**

**विवरणः—मी उपास्यरूपच आहें. ह्मणजे माझें उपास्यतत्त्व व मी भिन्न नाहीं तर दोघेंही एकच आहों, असा दृढ बोध होईतोंपर्यंत पूर्वोक्तरीत्या चिंतन करावें. आणि**

असा बोध झाल्यावरही मरेपर्यंत त्याचें धारण करावें; सोडूं नये. कारण एकदां बोध झाल्यानें काम भागत नसून, तो मरेपर्यंत सतत रहावा लागतो. ॥ ७८ ॥

मरेपर्यंत बोधाचें धारण करावें असें जें पूर्व श्लोकांत ह्मटलें आहे; त्याचेंच आतां दृष्टान्त देऊन स्पष्टीकरण करितात:—

**ब्रह्मचारी भिक्षमाणो युतः संवर्गविद्यया ॥**
**संवर्गरूपतां चित्ते धारयित्वा ह्यभिक्षत ॥ ७९ ॥**

अन्वय:—संवर्गविद्यया युतः ब्रह्मचारी भिक्षमाणः सन् चित्ते संवर्गरूपतां धारयित्वा हि अभिक्षत ।

अर्थ:—संवर्ग विद्येनें युक्त असा ब्रह्मचारी भिक्षा मागत असतां चित्तांत 'मी संवर्गरूप आहें,' अशी भावना धरूनच भिक्षा मागे ॥ ७९ ॥

**विवरण:**—संवर्ग या गुणांनीं युक्त असलेल्या प्राणाची उपासना करणारा कोणी एक ब्रह्मचारी प्राक्तनकर्मप्राप्त भिक्षाटण करीत असतां अभिप्रतारी नामक राजाच्या घरीं भिक्षा मागण्याकरितां गेला. तेथें मनांत धरलेलें आपलें संवर्गरूपत्व त्यानें प्रकट केलें. अशी आख्यायिका छांदोग्यांत आहे. वाणी, मन इत्यादि सर्व कार्यें वायूंत लीन होत असल्यामुळें त्यास संवर्ग असें ह्मणतात. असो; या आख्यायिकेवरून उपासक उपास्यरूप मी आहें; असा अभिमान यावज्जीव बाळगतो. असें ठरतें.

साधकाची इच्छा जरी नसली तरी विचारापासून बोधाची उत्पत्ति अवश्य होणारच; असें जें पूर्वीं म्हटलें आहे त्याच्याही विरुद्ध उपासना कशी आहे, तें आतां सांगतात:—

**पुरुषस्येच्छया कर्तुमकर्तुं कर्तुमन्यथा ॥**
**शक्योपास्तिरतो नित्यं कुर्यात्प्रत्ययसंततिम् ॥ ८० ॥**

अन्वय:—उपास्तिः पुरुषस्य इच्छया कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुं शक्या। अतः प्रत्ययसंततिम् नित्यं कुर्यात् ।

**अर्थ:—उपासना पुरुषाच्या इच्छेनें करण्यास, न करण्यास किंवा कशी तरी करण्यास शक्य आहे. यास्तव प्रत्ययाची संतति सतत करावी. ॥ ८० ॥**

**विवरणः**—उपासना पुरुषाच्या अधीन असते, असें पूर्वी चवऱ्याहात्तराव्या श्लोकांत सांगितलें होतें; त्याचेंच हें येथें व्याख्यान आहे. असें समजावें. उपासना करणें, न करणें, किंवा शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें न करितां अन्य रीतीनें करणें, हें उपासकाच्या अधीन आहे. यास्तव त्यानें सतत तत्त्वानुसंधान करावें. ॥ ८० ॥

पण, असें चिंतन केल्यानें कोणता लाभ होणार ? असें कोणी विचारील; म्हणून ग्रंथकार म्हणतातः—

**वेदाध्यायी ह्यप्रमत्तोऽधीते स्वप्नेऽधिवासतः ॥**
**जपिता तु जपत्येव तथा ध्याताऽपि वासयेत् ॥ ८१ ॥**

अन्वयः—यथा हि अप्रमत्तः वेदाध्यायी अधिवासतः स्वप्ने अधीते । अथवा जपिता तु जपति एव । तथा ध्याता अपि वासयेत् ।

**अर्थः—ज्याप्रमाणें व्यवहारांत सर्वदा वेदाध्ययन करणारा दृढ वासनेमुळें स्वप्नामध्येंही अध्ययन करितो, किंवा जप करणारा जप करितो, त्याप्रमाणें ध्यान करणारानेंही स्वप्नामध्यें सुद्धां ध्यान करावें. ॥ ८१ ॥**

**विवरणः**—जाग्रतींत मनापासून व सतत असें जर आपण एखादें कर्म करीत असलों, तर त्या कर्माच्या दृढ संस्कारामुळें आपण स्वप्नांतही तेंच करीत असतों, असा आपणास व कधीं कधीं दुसऱ्यासही प्रत्यय येतो. या श्लोकांत वेदाध्ययन व जप या दोन कर्मांचा दृष्टांत दिला आहे. स्वप्नांतील वेदाध्ययनाचा दुसऱ्यासही कधीं कधीं प्रत्यय येतो. पण जपाचा ज्याचा त्यालाच येणें शक्य आहे. सारांश, दृढवासनेच्या योगानें हा सर्व प्रकार घडत असल्यामुळें, सगुण किंवा निर्गुण ईश्वराचें ध्यान करणाऱ्यानें इतकें तल्लीन झालें पाहिजे आहे कीं, त्याला स्वप्नेंही ध्यानाचींच पडावीं. 'मनीं असे तें स्वप्नीं दिसे' ही लौकिक म्हण या ध्यानासही लागू पडण्यासारखी आहे. ॥ ८१ ॥

'ध्यान इतकें दृढ कधीं होणार कोण जाणें' असें म्हणून घाबरणाऱ्या शिष्यास किंवा वाचकास श्रीभारतीतीर्थ आतां जरा धीर देत आहेतः—

**विरोधिप्रत्ययं त्यक्त्वा नैरंतर्येण भावयन् ॥**
**लभते वासनावेशात्स्वप्नादावपि भावनाम् ॥ ८२ ॥**

**अन्वयः**—विरोधिप्रत्ययं त्यक्त्वा नैरंतर्येण भावयन् मुमुक्षुः वासनावेशात् स्वप्नादौ अपि भावनां लभते ।

**अर्थः**—ध्यानाच्या विरोधि प्रत्ययाचा त्याग करून सतत भावना करणारा मुमुक्षु संस्कारपटुत्वामुळें स्वप्नादि अवस्थेमध्येंही भावनेप्रत प्राप्त होतो. ॥८२॥

**विवरणः**—ज्या ज्या ज्ञानाचा ध्यानांशीं विरोध असेल, त्या त्या सर्व वैषयिक ज्ञानाचा निःशेष त्याग करून जर तूं ध्यान करूं लागलास, तर लवकरच त्याचा मनावर पूर्ण संस्कार होऊन त्यामुळें तुझें स्वप्नामध्येंही ध्यान होऊं लागेल. ॥ ८२ ॥

अहो, पण प्रारब्धकर्मामुळें प्राप्त होणाऱ्या विषयांचा उपभोग घेत असतांना ईश्वराचें ध्यान निरंतर कसें होऊं शकेल ? असें वादी विचारील ह्मणून ग्रंथकार ह्मणतातः—

**भुंजानोऽपि निजारब्धमास्थातिशयतोऽनिशम् ॥**
**ध्यातुं शक्तो न संदेहो विषयव्यसनी यथा ॥ ८३ ॥**

**अन्वयः**—यथा विषयव्यसनी तथा निजारब्धं भुंजानः अपि आस्थातिशयतः अनिशं ध्यातुं शक्तः अस्ति न संदेहः ।

**अर्थः**—विषयाचें जिला व्यसन लागलें आहे, अशा स्त्रीप्रमाणें आपल्या कर्मांचा भोग घेणाराही दृढ आस्थेमुळें सतत ध्यान करूं शकतो. यांत कांहीं संशय नाहीं. ॥ ८३ ॥

**विवरणः**—प्राणी प्रारब्धकर्मांचें फल भोगीत असो, किंवा याहीपेक्षां आणखीं कांहीं करो; ज्याच्याविषयीं त्याच्या मनांत दृढ प्रेम असतें, तें तो हरतऱ्हेनें शेवटास नेतोच; असा व्यावहारिक अनुभवही आहे. तेव्हां जरी मनुष्य सुखदुःखादि भोग भोगीत असला, तरी त्याची दृढ आस्था असल्यास तो भोगसमयींही ध्यान करूं शकतो. याला व्यसनी स्त्रीचा दृष्टान्त दिला आहे. त्याचें पुढच्याच श्लोकांत व्याख्यान होणार असल्यामुळें मी येथें विस्तार करीत नाहीं. ॥ ८३ ॥

**परव्यसनिनी नारी व्यग्राऽपि गृहकर्मणि ॥**
**आस्वादयत्यंतः परसंगरसायनम् ॥ ८४ ॥**

अन्वयः—परव्यसनिनी नारी गृहकर्मणि व्यग्रा अपि अंतः तत् एव परसंगरसायनं आस्वादयति ।

अर्थः—परपुरुषाची जिला चटक लागली आहे, अशी एखादी स्त्री घरकामात जरी गुंतून गेली असली, तरी मनांत त्याच परसंगरूप रसायनाचा आस्वाद घेत असते ॥ ८४ ॥

विवरणः—एखाद्या चांगल्या किंवा वाईट कामाची मनुष्यास खोडी लागली कीं, ती जातां जात नाहीं. व त्यामुळें प्रस्तुत दृष्टांतांतील व्यभिचारिणी स्त्री जरी पतीच्या किंवा लोकांच्या किंवा घरांतील दुसऱ्या वडीलधाऱ्या माणसाच्या भीतीमुळें घरांतील कामांत निमग्न होत असली, तरी हातानें काम करीत असतांनाच मनांमध्यें त्या परपुरुषाच्या संगाची गोडी घेत असते. ह्मणजे–तो पुरुष असा असा सुंदर आहे, त्याचा संग मोठा सुखावह आहे; पुनः त्याच्याकडे जाण्यास केव्हां संधि मिळेल कोण जाणें!!–इत्यादि प्रकारें त्याच्याविषयीं आनंददायक विचार ती मनांतल्या मनांत करीत असते. ॥ ८४ ॥

पण, त्यामुळें गृहकृत्यांत कांहीं विच्छेद होत नाहीं!! असें आतां सांगतातः—

**परसंगं स्वादयंत्या अपि नो गृहकर्म तत् ॥**
**कुण्ठीभवेदपि त्वेतदापातेनैव वर्तते ॥ ८५ ॥**

अन्वयः—परसंगं स्वादयन्त्याः अपि तत् गृहकर्म नो कुंठी भवेत् । अपि तु एतत् आपातेन एव वर्तते ।

अर्थः—परसंगाचा आस्वाद घेणाऱ्याही त्या स्त्रीचें तें गृहकर्म अडून रहात नाहीं. पण तें वरवरच होत असतें. ॥ ८५ ॥

विवरणः—मनांमध्यें परपुरुषाच्या संगाचाच जी स्वाद घेत असते, तिचें घरकाम अडून रहातें, असें नाहीं. पण तें वेंठीचें होतें, मनापासून होत नाहीं. ॥ ८५ ॥

व्यसनी स्त्रीचें काम 'आपाततः' ह्मणजे वरवर होत असतें, असें जें पूर्व श्लोकांत ह्मटलें आहे, त्याचेंच स्पष्टीकरण करण्याकरितां आतां उलट दृष्टांत देतातः–

**गृहकृत्यव्यसनिनी यथा सम्यक्करोति तत् ॥**
**परव्यसनिनी तद्वत् करोत्येव सर्वथा ॥ ८६ ॥**

अन्वयः—गृहकृत्यव्यसनिनी यथा तत् सम्यक् करोति । तद्वत् परव्यसनिनी सर्वथा न करोति एव ।

अर्थः—घरच्या कामाचेंच जिला व्यसन लागलें आहे, ती जशी तें उत्तम प्रकारें करिते, त्याप्रमाणें परपुरुषाचें जिला व्यसन लागलें आहे, ती कधींच करीत नाहीं. ॥ ८६ ॥

विवरणः—तात्पर्य, कोणत्याही गोष्टीचें वेड लागून गेलें पाहिजे; ह्मणजेच ती उत्तम प्रकारें पार पडते. घरच्या कामाचीच जिला रुचि लागलेली असते, तिच्या व व्यसनी स्त्रीच्या कामांत कितीतरी अंतर असणार, हें उघडच आहे. ॥ ८६ ॥

आतां या पूर्वोक्त दृष्टांताची दार्ष्टांतिकाच्या ठायीं योजना करितातः—

**एवं ध्यानैकनिष्ठोऽपि लेशाल्लौकिकमारभेत् ॥**
**तत्त्ववित्त्वविरोधित्वाल्लौकिकं सम्यगाचरेत् ॥ ८७ ॥**

अन्वयः—एवं ध्यानैकनिष्ठः अपि लेशात् लौकिकं आरभेत् । तत्त्ववित् तु अविरोधित्वात् लौकिकं सम्यक् आचरेत् ।

अर्थः—ह्याप्रमाणें केवळ ध्याननिष्ठ पुरुषही अंशतः लौकिक कर्मांचें आचरण करितो. पण, तत्त्वज्ञानी लौकिक कर्म विरोधि नसल्यामुळें तें उत्तम प्रकारें करितो. ॥ ८७ ॥

विवरणः—ध्याननिष्ठानें परपुरुषाचें जिला व्यसन आहे, अशा स्त्रीप्रमाणें लौकिक कर्म करावें. व तत्त्वज्ञानी पुरुषानें केवल गृहकर्मामध्यें तत्पर असलेल्या स्त्रीप्रमाणें तें करावें. हा दृष्टांतांतील गूढार्थ आहे. याचें अधिक स्पष्टीकरण पुढें होणार आहे. ॥८७॥

आतां लौकिक कर्म तत्त्वज्ञानाच्या विरोधि कसें नाहीं तें सांगतातः—

**मायामयः प्रपंचोऽयमात्मा चैतन्यरूपधृक् ॥**
**इति बोधे विरोधः को लौकिकव्यवहारिणः ॥ ८८ ॥**

अन्वयः—अयं प्रपंचः मायामयः आत्मा तु चैतन्यरूपधृक् इति बोधे लौकिकव्यवहारिणः कः विरोधः ।

अर्थः—हा प्रपंच मायामय आहे व आत्मा चैतन्यरूपधारी आहे, असा बोध झाला असतां लौकिक व्यवहार करणारास कोणता विरोध असणार ? ॥८८॥

विवरण:—संसार व आत्मा यांचें एकदा यथार्थ स्वरूप समजलें की, लौकिक व्यवहार करण्यास कांहीं हरकत नाहीं. यास गारुड्याच्या खेळाचा प्रसिद्ध दृष्टांत आहे, व त्याचें पूर्वी ( प्र. ७ श्लोक १७६ ) वर्णन झालें आहे. ॥ ८८ ॥

आतां लौकिक व्यवहार व तत्त्वज्ञान यांचा विरोध कसा नाहीं तें सांगतात:—

**अपेक्षते व्यवहृतिर्न प्रपंचस्य वस्तुताम् ॥**
**नाप्यात्मजाड्यं किं त्वेषा साधनान्येव कांक्षति ॥ ८९ ॥**

**अन्वय:**—व्यवहृतिः प्रपंचस्य वस्तुतां न अपेक्षते । आत्मजाड्यं अपि न अपेक्षते । किंतु एषा साधनानि एव कांक्षति ।

**अर्थ:**—व्यवहार प्रपंचाच्या वस्तुत्वाची अपेक्षा करीत नाहीं. व आत्म्याच्या जडतेचीही अपेक्षा करीत नाहीं, परंतु तो साधनांची इच्छा करितो.

**विवरण:**—प्रपंच खरा आहे व आत्मा जड आहे, असें जर समजलें तरच व्यवहार होणार; नाहीं पेक्षां होणार नाहीं? असा जर नियम असता तर तत्त्वज्ञान व व्यवहार यांचा विरोध सिद्ध झाला असता. पण तसा कांहीं प्रकार नाहीं. शिवाय या व्यवहारास साधनांचीच अपेक्षा असते. तस्मात् साधनें असल्यास तत्त्वज्ञानकालींही व्यवहार होणें शक्य आहे. ॥ ८९ ॥

व्यवहाराचीं साधनें कोणतीं तें आतां सांगतात:—

**मनोवाक्कायतद्बाह्यपदार्थाः साधनानि तान् ॥**
**तत्त्वविन्नोपमृद्गाति व्यवहारोऽस्य नो कुतः ॥ ९० ॥**

**अन्वय:**—मनोवाक्कायतद्बाह्यपदार्थाः साधनानि । तान् तत्त्ववित् न उपमृद्गाति अतः अस्य व्यवहारः कुतः नो भवति ।

**अर्थ:**—मन, वाणी, शरीर व त्यांच्या बाहेरचे पदार्थ हीं व्यवहाराचीं साधनें आहेत. त्यांस तत्त्ववेत्ता नाहींसें करीत नाहीं. तेव्हां त्याचा व्यवहार कां नाहीं होणार ! ॥ ९० ॥

**विवरण:**—जग सत्य आहे, असें वाटलें तरच व्यवहार होणार असें समजणें युक्त नव्हे. कारण ती बुद्धि व्यवहाराचें कारण आहे; असें म्हणतां येणें शक्य नाहीं. जग,

वाणी, शरीर व घर, शेत, स्त्री, पुत्र इत्यादि व्यवहाराचीं खरी साधनें आहेत. त्यामुळें तीं असेपर्यंत व्यवहार होणारच. शिवाय ज्ञानाबरोबर ज्ञान्याच्या व्यवहारसाधनांचा नाश होत असतो, असा कोठेंही अनुभव नाहीं. तेव्हां साधनें असतांना व्यवहार कां बरें होऊं नये ? अवश्य झालाच पाहिजे. ॥ ९० ॥

पूर्वोक्त व्यवहारसाधनांचा नाश करण्याचें ज्ञान्याच्या स्वाधीन नाहीं, हें जरी खरें आहे तरी चित्ताचा निरोध करण्यास त्यास काय हरकत आहे ? चित्ताचा एकदां नाश केला कीं, सर्वच व्यवहार एकदम नाहींसा होईल !! मग आणखीं त्याकरितां निराळा प्रयत्न करण्याचें कारण नाहीं. असें कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार ह्मणतात:–

**उपमृद्गाति चित्तं चेद्ध्याताऽसौ न तु तत्त्ववित् ॥**
**न बुद्धिमर्दयन् दृष्टो घटतत्त्वस्य वेदिता ॥ ९१ ॥**

**अन्वय:**—चित्तं उपमृद्गाति चेत् असौ ध्याता न तु तत्त्ववित् । घटतत्त्वस्य वेदिता बुद्धिं अर्दयन् न दृष्ट: ।

**अर्थ:**—पुरुष चित्ताचा निरोध जर करीत असेल, तर तो ध्याता होय. तत्त्ववेत्ता नव्हे. कारण घटाचें स्वरूप जाणणारा कोणीही पुरुष बुद्धीचा निरोध करीत आहे, असें दिसत नाहीं. ॥ ९१ ॥

**विवरण:**—वस्तुत: चित्ताचा नाश ह्मणजे त्याचा निरोध होय. जो चित्ताचा निरोध करीत असतो, त्यास ध्यान करणारा असें ह्मणतात. तत्त्वज्ञानी असें कोणी ह्मणत नाहीं. कारण चित्ताचा निरोध व ज्ञान यांचें एकाच कालीं अस्तित्व संभवत नाहीं. समजा कीं,–एखादा मनुष्य एखादा पदार्थ पहात आहे व त्याचा त्यास पूर्ण प्रत्यय येत आहे. तर त्याच वेळीं त्याचें चित्त एकाग्र झालें आहे, असें ह्मणतां येईल कां ? नाहीं. कारण एकाग्रसमयीं तें वृत्तिशून्य होऊनच रहात असतें. ॥ ९१ ॥

प्रस्तुत दृष्टांत बरोबर नाहीं, अशी शंका घेऊन सिद्धान्ती तिचा निरास करितात:—

**सकृत्प्रत्ययमात्रेण घटश्चेद्भासते सदा ॥**
**स्वप्रकाशोऽयमात्मा किं घटवच्च न भासते ॥ ९२ ॥**

**अन्वय:**—सकृत्प्रत्ययमात्रेण घट: सदा भासते इति चेत् अयं स्वप्रकाश: आत्मा घटवत् न भासते किं ।

अर्थः—एकदा ज्ञान झाल्यानेंच घट सर्वदा भासतो, असें जर म्हटलें तर हा ( साक्षात् ) स्वप्रकाशरूप आत्माही घटाप्रमाणेंच कां भासणार नाहीं. ९२

विवरणः—याचें तात्पर्य असें:—'घट हा स्थूल पदार्थ असल्यामुळें स्पष्ट आहे. त्यामुळें त्याच्या ज्ञानास चित्ताच्या ऐकाग्र्याची अपेक्षा नसते. पण अति सूक्ष्म ब्रह्म तसें स्पष्ट नसल्यामुळें, त्याच्या ज्ञानास चित्तैकाग्र्याची आवश्यकता आहे' असें जर कोणी म्हणेल तर तें बरोबर नव्हे. कारण जड घटासही जर 'स्पष्ट' म्हणून म्हणतां येतें, तर या स्वयंप्रकाश साक्षात् आत्म्यास 'अति स्पष्ट' म्हणावयास नको का! व स्पष्ट अशा घटादि जड पदार्थांच्या ज्ञानास जर चित्तैकाग्र्याची जरूर नाहीं, तर अति स्पष्ट व स्वप्रकाश आत्म्याच्या ज्ञानास त्याची जरूर नाहीं; हे काय सांगावें!

आतां पुनः याविषयींही शंका घेऊन समाधान करितात:—

स्वप्रकाशतया किं ते तद्बुद्धिस्तत्त्ववेदनम् ॥
बुद्धिश्च क्षणनाश्येति चोद्यं तुल्यं घटादिषु ॥ ९३ ॥

अन्वयः—स्वप्रकाशतया ते किं । तद्बुद्धिः तत्त्ववेदनं च बुद्धिः क्षणनाश्या इति चोद्यं घटादिषु तुल्यं ।

अर्थः—आत्म्याच्या स्वप्रकाशत्वाच्या योगानें तुला कोणता लाभ होणार, आत्मविषयक बुद्धिच तत्त्वज्ञान आहे व बुद्धि तर क्षणभंगुर आहे असा जर प्रश्न केलास तर तो घटादिकांमध्येंही सारखाच आहे. ॥ ९३ ॥

विवरणः—वादीः—अहो पण आत्मा जरी स्वप्रकाश असला, तरी तद्विषयक बुद्धीच्या वृत्तीलाच तत्वज्ञान म्हणणार कीं नाहीं? ती तर क्षणिक आहे. तेव्हां तिची क्षणो क्षणीं आत्म्याच्या ठायीं स्थापना केलीच पाहिजे. त्यावांचून ज्ञान कसें होईल? सिद्धान्तीः—मग हाच प्रश्न घटाच्या ज्ञानाविषयींही नाहींका उद्भवत? ॥ ९३ ॥

पूर्व श्लोकांतील सिद्धान्त्याच्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा प्रयत्न वादी करीत आहे. पण, त्यांतही कांहीं अर्थ नाहीं असें सिद्धान्ती सांगतात:—

घटादौ निश्चिते बुद्धिर्नश्यत्येव यदा घटः ॥
इष्टो नेतुं तदा शक्य इति चेत्सममात्मनि ॥ ९४ ॥

**अन्वयः**—यदा घटादौ निश्चिते बुद्धिः नश्यति एव तदा इष्टः घटः नेतुं शक्यः इति चेत् आत्मनि समम् ।

**अर्थः—घटादि पदार्थांचा निश्चय झाला असतां, त्यांविषयींची बुद्धि जरी नष्ट झाली तरीही घट अन्यस्थळीं नेतां येतो, असें जर ह्मणशील तर आत्म्याचाही प्रकार तसाच आहे. ॥ ९४ ॥**

**विवरणः**—वादीः—घटादि पदार्थांचें ज्ञान जरी क्षणिक असलें तरी एकदां निश्चित झालेल्या घटाचा सर्वदा व्यवहार करितां येत असल्यामुळें त्याविषयीं चित्तस्थैर्याची अपेक्षा नाहीं. **सिद्धान्तीः**—आत्मज्ञानाचीही स्थिति तीच आहे. ह्मणजे एकदा आत्मनिश्चय झाला कीं, त्याचाही घटादिकाप्रमाणेंच व्यवहार करितां येतो. ९४

पूर्वोक्त गोष्टीचेंच आतां विस्तारपूर्वक वर्णन करितातः—

**निश्चित्य सकृदात्मानं यदापेक्षा तदैव तम् ॥**
**वक्तुं मंतुं तथा ध्यातुं शक्नोत्येव हि तत्त्ववित् ॥ ९५ ॥**

**अन्वयः**—आत्मानं सकृत् निश्चित्य यदा अपेक्षा तदा एव तं वक्तुं मन्तुं तथा ध्यातुं तत्त्ववित् शक्नोति एव हि ।

**अर्थः—आत्म्याचा एकदां निश्चय करून पुनः जेव्हां अपेक्षा होते, तेव्हां त्याच्याविषयीं बोलण्यास, मनन करण्यास व त्याचप्रमाणें ध्यान करण्यास तत्त्ववेत्ता समर्थ होतोच. ॥ ९५ ॥**

**विवरणः**—घटाप्रमाणेंच आत्म्याचा एकदां निश्चय झाला कीं, त्याच्याविषयींची बुद्धि जरी नष्ट झाली असली, तरी त्या ज्ञान्यास जेव्हां मनास वाटेल तेव्हां आत्म्याविषयीं बोलतां येतें, मनन करितां येतें; व ध्यानही करितां येतें. ॥ ९५ ॥

आतांः—

**उपासक इव ध्यायँल्लौकिकं विस्मरेद्यदि ॥**
**विस्मरत्वेव सा ध्यानाद्विस्मृतिर्न तु वेदनात् ॥ ९६ ॥**

**अन्वयः—उपासकः इव ध्यायन् ज्ञानी यदि लौकिकं विस्मरेत् तर्हि विस्मरतु एव । सा विस्मृतिः ध्यानात् न तु वेदनात् ।**

अर्थः—उपासकाप्रमाणेंच ध्यान करणारा ज्ञानीही जर जगास विसरत असला; तर खुशाल विसरो. ती विस्मृति ध्यानामुळेंच होय. ज्ञानामुळें नव्हे.

विवरण:—उपासक, उपासनाकाळीं आत्म्याचें अनुसंधान करीत असल्यामुळें जसा जगास विसरतो, तसाच हा ध्यान करणारा ज्ञानीही जगास विसरतो, असें जर कोणी म्हटलें तर तें आह्मांस अनिष्ट नाहीं. कारण जगास विसरणें हें ध्यानाचें फळ आहे; ज्ञानाचें नव्हे. ॥ ९६ ॥

सारांश:—

ध्यानं त्वैच्छिकमेतस्य वेदनान्मुक्तिसिद्धितः ॥
ज्ञानादेव तु कैवल्यमिति शास्त्रेषु डिण्डिमः ॥ ९७ ॥

अन्वयः—वेदनात् मुक्तिसिद्धितः एतस्य ध्यानं तु ऐच्छिकं । ज्ञानात् एव तु कैवल्यं इति शास्त्रेषु डिण्डिमः ।

अर्थ:—ज्ञानाच्या योगानें मुक्ति सिद्ध होत असल्यामुळें त्याचें ध्यान इच्छाप्रयुक्त होय. ज्ञानाच्या योगानेंच कैवल्य मिळतें, असा शास्त्रामध्यें घोष आहे. ॥ ९७ ॥

विवरण:—आत्मज्ञानी पुरुषास जर ध्यान करावेंसें वाटतच असलें, तर तो तें खुशाल करो. पण त्याचा मोक्षास कांहीं उपयोग नाहीं. मोक्ष ज्ञानामुळेंच प्राप्त होत असतो. आतां ध्यानामुळें जगाचा विसर पडून त्यामुळें दुःखादि क्लेश कमी व्हावे अशा इच्छेनेंच ज्याला तें कर्तव्य असेल, त्याला आह्मी मोठ्या आनंदानें अनुमोदन देतों. ' ध्यानाचा खरा उपयोग ज्ञानाच्या पूर्वी असतो. व तें झाल्यावर त्याच्या योगानेंच मोक्ष मिळतो, ' असा वेदान्त घोष करून राहिले आहेत. ॥ ९७ ॥

आतां तत्त्ववेत्त्यास ध्यान करावयास पाहिजेच, असा कांहीं नियम नाहीं. असें जें गेल्या श्लोकांत सुचविलें आहे, त्याविषयीं शंका घेऊन समाधान करितात:-

तत्त्वविद्यदि न ध्यायेत्प्रवर्तेत तदा बहिः ॥
प्रवर्ततां सुखेनायं को बाधोऽस्य प्रवर्तने ॥ ९८ ॥

अन्वयः—तत्त्ववित् यदि न ध्यायेत् तदा बहिः प्रवर्तेत । अयं सुखेन प्रवर्ततां अस्य प्रवर्तने कः बाधः ।

**अर्थः—वादी—तत्त्वज्ञानें जर ध्यान न केलें तर तो बाहेर विषयांकडे प्रवृत्त होईल ! सिद्धांती–हा खुशाल प्रवृत्त होवो. ह्याच्या नुस्त्या प्रवृत्तीनें कोणता बाध होणार आहे ? ॥ ९८ ॥**

**विवरणः**—तत्त्वज्ञान्यास ध्यानाची अवश्यकता आहेच, कारण त्यानें जर ध्यान न केलें तर तो प्राकृताप्रमाणें विषयामध्येंच निमग्न होऊं लागेल. मग त्याच्या ज्ञानाचा त्याला कोणता लाभ होणार? असें वाद्याचें ह्मणणें आहे. पण तें बरोबर नाहीं. कारण ज्ञानी जरी व्यवहारांत प्रवृत्त झाला, तरी त्यापासून त्याच्या ज्ञानास बाध येत नाहीं. कारण प्रवृत्तिचीं साधनें जीं देह, इंद्रियें इत्यादि तीं असेपर्यंत प्रवृत्ति होणारच हें उघड आहे. ॥ ९८ ॥

असें जर मानिलें तर मोठा अनर्थ होऊं लागेल. कारण तत्त्ववेत्ता मद्यपानादि निषिद्ध कर्मांमध्येंही प्रवृत्त होईल. अशी शंका घेऊन ग्रंथकार तिचें खंडन करितातः—

**अतिप्रसंग इति चेत् प्रसंगं तावदीरय ॥**
**प्रसंगो विधिशास्त्रं चेन्न तत्तत्त्वविदं प्रति ॥ ९९ ॥**

**अन्वयः**—अतिप्रसंगः इति चेत् प्रसंगं तावत् ईरय । विधिशास्त्रं प्रसंगः इति चेत् तत् तत्त्वविदं प्रति न ।

**अर्थः—अतिप्रसंग होईल असें जर ह्मणशील, तर प्रसंग कोणता तें अगोदर सांग पाहूं. विधिशास्त्र प्रसंग होय ह्मणून जर ह्मणशील, तर तें तत्त्ववेत्त्याकरितां नव्हे. ॥ ९९ ॥**

**विवरणः**—अतिप्रसंग ह्मणजे अनियम होय. 'तत्त्ववेत्ता बाहेर प्रवृत्त होईना' असें जर ह्मटलें तर त्याची प्रवृत्ति यथेच्छ होऊं लागेल. असें वाद्याचें आहे. पण सिद्धान्ती त्यास ह्मणतात कीं, इंद्रियांच्या द्वारा अंतःकरणाची प्रवृत्ति बाहेर होऊं दिल्यास प्रवृत्तीचा नियम रहाणार नाहीं, ह्मणून जें तूं ह्मणतोस त्याच्या पूर्वी नियम कोणता तें प्रथम सांग पाहूं ! या प्रश्नाचें उत्तर देण्याकरितां वादी ह्मणतो–विधिशास्त्र हा नियम आहे. येथें विधि व निषेधशास्त्र ही प्रवृत्तीची मर्यादा आहे असें समजावें. पण सिद्धांती ह्मणतात कीं, तत्त्ववेत्ता विधिनिषेधाच्या मर्यादेपलीकडे गेलेला असल्यामळें त्याचा तो नियम होऊं शकत नाहीं. ॥ ९९ ॥

कारण:—

**वर्णाश्रमवयोवस्थाभिमानो यस्य विद्यते ॥**
**तस्यैव च निषेधाश्च विधयः सकला अपि ॥ १०० ॥**

अन्वय:—यस्य वर्णाश्रमवयोवस्थाभिमानः विद्यते तस्य एव च निषेधाः च सकलाः अपि विधयः ।

अर्थ:—ज्याला वर्ण, आश्रम, वय, अवस्था इत्यादिकांचा अभिमान असतो त्यालाच सर्व निषेध व विधिही लागू असतात. ॥ १०० ॥

विवरण:—शास्त्रोक्त निषेध व विधि जे वर्णाश्रमादिकांचे अभिमानी असतात, त्यांसच लागू असतात. त्रिगुणरहित झालेल्या परिव्राजकावर त्यांचा अंमल चालत नाही.

कारण:—

**वर्णाश्रमादयो देहे मायया परिकल्पिताः ॥**
**नात्मनो बोधरूपस्येत्येवं तस्य विनिश्चयः ॥ १ ॥**

अन्वय:—वर्णाश्रमादयः देहे मायया परिकल्पिताः सन्ति । न बोधरूपस्य आत्मनः इति एवं तस्य विनिश्चयः वर्तते ।

अर्थ:—वर्ण, आश्रम इत्यादिक भाव देहाच्या ठायीं मायेच्या योगानें कल्पिलेले आहेत. ते बोधरूप आत्म्याचे नव्हेत. असा त्याचा निश्चय असतो. ॥ १ ॥

विवरण:—ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि वर्ण व ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य इत्यादि आश्रम देहाच्या ठायीं, अज्ञानामुळें मानिले गेले आहेत. त्यांचा आत्म्याशीं कांहीं, संबंध नाहीं, असा ज्ञानी पुरुषाचा दृढ निश्चय असतो. ॥ १०१ ॥

सारांश:—

**समाधिमथ कर्माणि मा करोतु करोतु वा ॥**
**हृदयेनास्तसर्वास्थो मुक्त एवोत्तमाशयः ॥ २ ॥**

**अन्वय:—यः हृदयेन अस्तसर्वास्थः उत्तमाशयः सः मुक्तः एव । अतः सः समाधिं अथ कर्माणि करोतु वा मा करोतु ।**

अर्थ:— ज्यानें मनापासून सर्व आस्था टाकिल्या आहेत व त्यामुळें ज्याचें चित्त उत्तम झालें आहे, तो मुक्तच आहे. यास्तव तो समाधि व कर्मे करो कीं न करो. ॥ १०२ ॥

विवरण:—अंत:करण निस्तृष्ण झालें असतां तें अति निर्मल होतें व ही अमूल्य संपत्ति ज्याला मिळाली आहे, तो मुक्तच होय यांत शंका नाहीं. सारांश अशा पुरुषानें ध्यान, कर्में इत्यादि केलीं तरी काय न केलीं तरी काय सारखेंच. ॥ १०२ ॥

विद्वानांस कर्तव्याची अवश्यकता नाहीं याविषयीं प्रमाण देतात:—

**नैष्कर्म्येण न तस्यार्थस्तस्यार्थोऽस्ति न कर्मभि: ॥**
**न समाधानजप्याभ्यां यस्य निर्वासनं मन: ॥ ३ ॥**

अन्वय:—यस्य मन: निर्वासनं अभूत् तस्य नैष्कर्म्येण न अर्थ: च तस्य कर्मभि: न अर्थ: । च समाधानजप्याभ्यां न अर्थ: अस्ति ।

अर्थ:—ज्याचें मन वासना शून्य झालेलें असतें त्यास संन्यासापासून लाभ नाहीं; तसाच कर्मांपासून लाभ नाहीं व समाधि आणि जप यांपासूनही काहीं लाभ नाहीं. ॥ १०३ ॥

विवरण:—ज्याच्या अंत:करणांतील द्वैत विषयक संस्कार बाधित झाले आहेत, त्या धन्य पुरुषास संन्यास, कर्में, समाधि, जप इत्यादिकांतील कशाचाही उपयोग नाहीं. ॥ १०३ ॥

आतां–विद्वानानें वासनेची निवृत्ति होण्याकरितां ध्यान केलें पाहिजे, असें जर ह्मणावें, तर ज्याला यथार्थ आत्मज्ञान झालें आहे, त्याच्या अंत:करणांत वासनाच रहात नसल्यामुळें, तें युक्त नव्हे.–असें सांगतात:–

**आत्मासंगस्ततोऽन्यत्स्यादिंद्रजालं हि मायिकम् ॥**
**इत्यचंचलनिर्णीते कुतो मनसि वासना ॥ ४ ॥**

अन्वय:—आत्मा असंग: तत: अन्यत् इंद्रजालं मायिकं हि स्यात् । इति अचंचलनिर्णीते मनसि वासना कुत: स्यात् ।

अर्थः—" आत्मा असंग आहे. व त्यावाचून दुसरें सर्व भासमान जगत् मायिकच आहे " असा दृढनिश्चय झाला असतां, मनामध्यें वासना का राहील ? ॥ १०४ ॥

विवरणः—जोंपर्यंत चिदाभास व अंतःकरण यांचे अविवेकामुळें ऐक्य होऊन राहिलेलें असतें तोंपर्यंतच वासनेस थारा मिळतो. आणि चिदाभास व अंतःकरण हे परस्पर विलक्षण असे दोन पदार्थ आहेत, असें एकदां समजलें कीं त्यांना राहण्यास जागाच मिळत नसल्यामुळें ज्ञानी पुरुषाच्या अंतःकरणांत वासना रहात नाहींत; असा सिद्धांत आहे. ॥ १०४ ॥

सारांशः—

**एवं नास्ति प्रसंगोऽपि कुतोऽस्यातिप्रसंजनम् ॥**
**प्रसंगो यस्य तस्यैव शंक्येतातिप्रसंजनम् ॥ ५ ॥**

अन्वयः—एवं अस्य प्रसंगः अपि नास्ति । अतिप्रसंजनं कुतः । यस्य प्रसंगः तस्य एव अतिप्रसंजनं शंक्येत ।

अर्थः— ह्याप्रमाणें ज्ञान्यास मर्यादाच जर नाहीं, तर अतिप्रसंग कोठून असणार ? कारण ज्याला प्रसंग असतो त्याच्याच अतिप्रसंगाविषयीं शंका येते ॥ १०५ ॥

विवरणः—गेल्या चार श्लोकांत विद्वानाचा व्यवहार अनियमित किंवा मनसोक्त होऊं लागेल, असें जें वाद्यानें झटलें होतें त्याचें खंडन केलें; व या श्लोकांत त्याचाच उपसंहार केला आहे. या सर्व प्रतिपादनाचें तात्पर्य ' ज्ञानी विधिनिषेधातीत आहे ' या एका वाक्यांत आलें आहे. ॥ १०५ ॥

प्रसंग नसल्यास अति प्रसंगही कसा नसतो तें दृष्टांतपूर्वक सांगतात:—

**विध्यभावान्न बालस्य दृश्यतेऽतिप्रसंजनम् ॥**
**स्यात्कुतोऽतिप्रसंगोऽस्य विध्यभावे समे सति ॥ ६ ॥**

अन्वयः—विध्यभावात् बालस्य अतिप्रसंजनं न दृश्यते । विध्यभावे समे सति अस्य अतिप्रसंगः कुतः स्यात् ।

आतां व्यासांसारख्या महात्म्यामध्यें दोन्ही प्रकार आढळतात हें खरें पण त्याचें कारण तसेंच आहे, असें आतां सांगतातः—

**द्वयं यस्यास्ति तस्यैव सामर्थ्यज्ञानयोर्जनिः ॥**
**एकैकं तु ततः कुर्वन्नेकैकं लभते फलम् ॥ १०॥**

अन्वयः—यस्य द्वयं अस्ति तस्य एव सामर्थ्यज्ञानयोः जनिः । ततः एकैकं तु कुर्वन् एकैकं फलं लभते ।

अर्थः— ज्याचें दोन्ही प्रकारचें तप असतें, त्याला सामर्थ्य व ज्ञान हीं दोन्ही प्राप्त होतात. आणि तसेंच एक एक तप करणाऱ्यास एक एक फल मिळतें. ॥ १० ॥

विवरणः—कारण जसें असेल तसें कार्य होतें. ज्यानें प्रस्तुत सामार्थ्यास कारण होणारें व ज्ञानास कारण होणारेंही तप केलें असेल, त्यास पूर्वोक्त सामर्थ्य व ज्ञान या दोघांचीही प्राप्ति होते. पण ज्यानें यांतील एक एकच केलें असेल, त्यास त्या तपाप्रमाणें एकेकच फल मिळतें हें उघड आहे. ॥ ११० ॥

आतां सामर्थ्यहीन ज्ञानी विधिशून्य असल्यामुळें निंद्य होईल असें कोणी ह्मणतील ह्मणून ग्रंथकार सांगतातः—

**सामर्थ्यहीनो निंद्यश्चेद्यतिभिर्विधिवर्जितः ॥**
**निन्द्यन्ते यतयोऽप्यन्यैरनिशं भोगलंपटैः ॥ ११ ॥**

अन्वयः—सामर्थ्यहीनः विधिवर्जितः यतिभिः निंद्यः चेत् यतयः अपि अन्यैः भोगलंपटैः अनिशं निन्द्यन्ते ।

अर्थः—सामर्थ्यहीन अशा त्या ज्ञान्याची तो विधिशून्य असल्यामुळें, दुसरे कर्मठ निंदा करितात म्हणून जर म्हणावें, तर त्या कर्मठांचीही दुसऱ्या भोगलंपट पुरुषांकडून सतत निंदा होते. ॥ ११ ॥

विवरणः—ज्ञानी जर सामर्थ्यशून्य असला तर कर्मठ "अरे हा ढोंगी आहे! ज्ञानी कसला? शास्त्रोक्त कर्में करावयास नकोत ह्मणून त्यानें ज्ञान्याचें सोंग घेतलें आहे" असें स्पष्टपणें ह्मणतात. ह्मणून जर ह्मणावें तर कर्मठांची निंदा विषयी लोक नाहींका

करीत ! " काय हो हा अर्वाच्य मनुष्य आहे ! सकाळीं स्नान करून दोन दोन तास नाक धरून बसतो. असले लोक जगाच्या अगदीं निरुपयोगी असून ते काळाचा अपव्यय करीत असतात. काय म्हणे रोज गीता, उपनिषदें, सूत्रें, यांचा चार चार तास पाठ करीत बसतो ! पुनः पुनः तेंच तें घोटीत बसण्यांत त्याला काय मौज वाटते असेल ती असो ! अमुक अमुक मोठा धार्मिक आहे. कारण तो रोज हजार गायत्रीचा जप करितो. पण त्यापासून राष्ट्रास कोणता लाभ होत असेल, तें हरि जाणे " इत्यादि वाक्यें सामान्य मनुष्यासही अपरिचित असतीलसें वाटत नाहीं. सारांश, एकानें दुसऱ्याची निंदा करणें हें कांहीं मोठेसें प्रमाण नव्हे. कारण खरोखरी पहातां हा अज्ञानाचा परिणाम आहे. ॥ १११ ॥

आतां भोगामुळें होणाऱ्या संतोषाकरितां विषयांचा संग्रह करण्यास काय प्रत्यवाय आहे ? अशी शंका घेऊन व तिचा उपहास करून समाधान करितात:—

**भिक्षावस्त्रादी रक्षेयुर्यद्येते भोगतुष्टये ॥**

**अहो यतित्वमेतेषां वैराग्यभरमंथरम् ॥ ११२ ॥**

अन्वयः—यदि एते भोगतुष्टये भिक्षावस्त्रादि रक्षेयुः तर्हि अहो एतेषां वैराग्यभरमंथरं यतित्वम् ।

अर्थः—जर हे भोगजन्य संतोषार्थ भिक्षा, वस्त्र इत्यादि पदार्थांचें रक्षण करित असले, तर वैराग्याच्या भारानें जड झालेलें त्यांचें यतित्व मोठें स्तुत्यच ( तारिफ करण्यासारखें ) होय. ॥ ११२ ॥

विवरणः—भोगजन्य सुखाकरितां जर वस्त्रादिकांचा संग्रह करावयास कोणी यति प्रवृत्त झाला, तर त्याच्या वैराग्याची कितीशी स्तुति करावी; हेंच समजत नाहीं.

आतां भोगलंपटांनीं जरी कर्मठांची निंदा केली तरी त्यापासून त्यांची कांहीं हानि नाहीं, असें कोणी म्हणेल म्हणून श्रीभारतीतीर्थ म्हणतात:—

**वर्णाश्रमपरान्मूढा निंदंत्वित्युच्यते यदि ॥**

**देहात्ममतयो बुद्धं निंदंत्वाश्रममानिनः ॥ ११३ ॥**

अन्वयः—मूढाः वर्णाश्रमपरान् निंदन्तु । इति यदि उच्यते । तर्हि आश्रममानिनः देहात्ममतयः बुद्धं निंदन्तु ।

अर्थः—मूढ, वर्ण व आश्रम यांप्रमाणें चालणारांची खुशाल निंदा करोत. असें जर म्हटलें तर आश्रमाचा अभिमान बाळगणारे देहात्मबुद्धि पुरुषही ज्ञान्याची खुशाल निंदा करोत ( असें आम्ही म्हणतों ). ॥ ११३ ॥

विवरणः—मूढांच्या निंदेनें वर्णाश्रमाभिमान्याची जशी कांहीं हानि होत नाहीं, तशीच वर्णाश्रमाभिमान्यांच्या निंदेनें ज्ञानी पुरुषाचीही कांहीं हानि नाहीं. ॥ ११३॥

तात्पर्यः—

तदित्थं तत्त्वविज्ञाने साधनानुपमर्दनात् ॥
ज्ञानिनाऽऽचरितुं शक्यं सम्यग्राज्यादि लौकिकम् ॥ १४ ॥

अन्वयः—तत् इत्थं तत्त्वविज्ञाने सति साधनानुपमर्दनात् ज्ञानिना लौकिकं राज्यादि सम्यक आचरितुं शक्यम् ।

अर्थः—ह्याप्रमणें तत्त्वसाक्षात्कार झाला असतां देह, इंद्रियें इत्यादि साधनांचा ध्वंस होत नसल्यामुळें ज्ञान्यास लौकिक राज्य इत्यादि कर्म उत्तम प्रकारें करितां येणें शक्य आहे. ॥ ११४ ॥

विवरणः—ह्या प्रकरणाच्या सत्यायशींव्या श्लोकांत ज्ञानी लौकिक कर्म उत्तम प्रकारें करूं शकतो, असें जें ह्मटलें होतें त्यावर येणाऱ्या शंकांचें एवढा वेळ समाधान केलें; व आतां त्यांचा येथें उपसंहार करीत आहेत. ॥ ११४ ॥

अहो, पण—प्रपंच मिथ्या आहे—असें ज्ञान झाल्यामुळें तत्त्ववेत्त्यास त्याविषयीं इच्छाच होणें अशक्य आहे. असें ह्मणणेंही युक्त नव्हे,—असें आतां सांगतातः—

मिथ्यात्वबुद्ध्या तत्रेच्छा नास्ति चेत्तर्हि माऽस्तु तत् ॥
ध्यायन्वाऽथ व्यवहरन्यथाऽऽरब्धं वसत्वयम् ॥ १५ ॥

अन्वयः—मिथ्यात्वबुद्ध्या तत्र इच्छा नास्ति इति चेत् तर्हि तत् मा अस्तु । अयं ध्यायन् अथवा व्यवहरन् सन् यथारब्धं वसतु ।

अर्थः—मिथ्यात्वबुद्धीमुळें प्रपंचाविषयीं इच्छाच नसते असें जर म्हणावें तर ती नसेना. हा ध्यान किंवा व्यवहार करीत प्रारब्धाप्रमाणें राहो. ॥ ११५ ॥

विवरणः—'प्रपंच मिथ्या आहे' असें समजल्यामुळें ज्ञान्यास प्रपंचांतील कोणत्याही पदार्थाची इच्छा होणार नाहीं; असें जरी ह्मटलें, तरी तें आह्मांस इष्टच आहे. कारण

प्रपंचाविषयीं ह्यास इच्छा झालीच पाहिजे असा आमचा कोठें आग्रह आहे ? ती न झाली तर चांगलेंच. पण ज्ञान्यासही इच्छा होते असा प्रत्यय येत असल्यास ती कां होते व तिच्यामुळें ज्ञानास बाध येतो कीं काय हें सांगणें आमचें काम आहे. व प्रारब्धाचें अतिक्रमण कोणाच्यानेंही होणें शक्य नसल्यामळें ज्ञानी त्यास अनुसरून पाहिजे तर ध्यान करो किंवा, व्यवहार करो. प्रारब्ध कर्म विचित्र असल्यामुळें त्यानें अमुकच करावें असा आह्मांस नियम करितां येत नाहीं. ॥ ११५ ॥

आतां, उपासकाची स्थिति याहून भिन्न कशी ह्मणून ह्मणाल तर सांगतो:—

**उपासकस्तु सततं ध्यायन्नेव वसेद्यतः ॥**

**ध्यानेनैव कृतं तस्य ब्रह्मत्वं विष्णुतादिवत् ॥ १६ ॥**

अन्वयः—उपासकः तु सततं ध्यायन् एव वसेत् । यतः विष्णुतादिवत् तस्य ब्रह्मत्वं ध्यानेन एव कृतम् ।

अर्थः—परंतु उपासकानें सदा ध्यान करीतच असावें. कारण विष्णुता॰दिकांप्रमाणें त्याचें ब्रह्मत्व ध्यानाच्या योगानें केलेलें आहे. ॥ ११६ ॥

विवरणः—उपासकास ब्रह्मत्वानें सदा ध्यानच करावयास पाहिजे. कारण सगुणोपासकाची विष्णुत्व, शिवत्व इत्यादि उपास्य देवताविषयींची भावना जशी ध्यानानेंच होत असते, तशीच ब्रह्मत्वाविषयींची भावनाही त्याच्या ध्यानाच्या योगानेंच होणें शक्य आहे, पण ध्यानाच्या योगानें होणारी कोणतीही भावना पारमार्थिक नसते. ॥ ११६ ॥

कारणः—

**ध्यानोपादानकं यत्तद्ध्यानाभावे विलीयते ॥**

**वास्तवी ब्रह्मता नैव ज्ञानाभावे विलीयते ॥ १७ ॥**

अन्वयः—यत् ध्यानोपादानकं तत् ध्यानाभावे विलीयते । वास्तवी ब्रह्मता तु ज्ञानाभावे न विलीयते एव ।

अर्थः—ज्याचें ध्यान हेंच उपादान कारण असतें, तें ध्यानाच्या अभावीं नष्ट होतें. पण परमार्थिक ब्रह्मता ज्ञानाच्या अभावीं कधींही लीन होत नाहीं.

विवरणः—विष्णु, शिव, इत्यादि इष्ट ध्येय किंवा वाणी ही धेनु आहे; श्रद्धा पत्नी आहे, इत्यादि आरोपित ध्येय सर्वदा ध्यानावर अवलंबून असतें. ह्मणजे औप-

र्यंत त्या त्या ध्येयाचें साधक इतर वृत्तिशून्य मनानें चिंतन करीत असतो तोंपर्यंतच त्यांचें अस्तित्व असतें. व वृत्ति अन्य विषयाकडे गेली कीं ध्येय त्या ध्यानाबरोबरच लीन होतें. पण ब्रह्मत्वाची अशी स्थिति नसते. तें पारमार्थिक सत्य असल्यामुळें त्याविषयीं वृत्तिरूप प्रमाणभूत ज्ञान जरी नसलें तरी ब्रह्मता लीन होत नाहीं. ॥ ११७ ॥

शिवाय:–

**ततोऽभिज्ञापकं ज्ञानं न नित्यं जनयत्यदः ॥**
**ज्ञापकाभावमात्रेण न हि सत्यं विलीयते ॥ १८ ॥**

**अन्वय:**—यतः अदः ब्रह्मत्वं नित्यं ततः अभिज्ञापकं ज्ञानं तत् न जनयति । च सत्यं ज्ञापकाभावमात्रेण न विलीयते हि ।

**अर्थ:**—ज्याअर्थी हें ब्रह्मत्व नित्य आहे त्याअर्थी अवबोधक ज्ञान त्यास उत्पन्न करीत नाहीं. व जें सत्य असतें तें केवल त्याचा बोध करविणारें नाहीं एवढ्याच कारणानें लीन होत नाहीं. ॥ ११८ ॥

**विवरण:**—परम नित्य जें ब्रह्म त्यास वृत्तिज्ञान उत्पन्न करूं शकत नाहीं. तर तें त्याचा केवल बोध करूं शकतें. व तो तरी अज्ञानवस्थ मनुष्यालाच होणार हें उघड आहे. अर्थात् केवल ज्ञापक ज्ञान नसलें कीं, या सत्य ब्रह्मत्वाचाही लोप होतो हें ह्मणणें व्यर्थ आहे. उदाहरणार्थ–असें पहा कीं आपण एखादे वेळीं एखादें पुस्तक वाचण्यांत निमग्न होऊन गेलेले असतों. व त्यामुळें तेथें असलेल्या सूर्याच्या किंवा दिव्याच्या प्रकाशाचें आपणांस त्यावेळीं भानही नसतें. पण तेवढ्यामुळें ज्या प्रकाशामुळें आह्मी वाचूं शकलों तो प्रकाश नव्हता असें ह्मणतां येईल का ? कधींही नाहीं. तसाच प्रकार येथेंही समजावा. वृत्ति एकदेशी असल्यामुळें ती सर्वच पदार्थांचें एकदम ग्रहण करूं शकत नाहीं. ॥ ११८ ॥

मग ज्ञान्याप्रमाणें उपासकाचेंही ब्रह्मत्व पारमार्थिक आहे असें ह्मणण्यास कोणता प्रत्यवाय आहे ? अशी शंका घेऊन तिचें आतां समाधान करितात:—

**अस्त्येवोपासकस्यापि वास्तवी ब्रह्मतेति चेत् ॥**
**पामराणां तिरश्चां च वास्तवी ब्रह्मता न किम् ॥ १९ ॥**

न्वयः—उपासकस्य अपि वास्तवी ब्रह्मता अस्ति एव इति चेत् पामराणां च [illegible]वी ब्रह्मता न किं ।

[illegible] [illegible] तीही पारमार्थिक ब्रह्मता आहेच असें जर म्हटलें, तर [illegible]मी लोक व पशु, पक्षी इत्यादि तिर्यक् प्राणी यांची वास्तविक ब्रह्मता [illegible] कां ? ॥ ११९ ॥

[illegible]वरण:—उपासक अन्य दृष्टीनें पामरादिकांहून कितीही जरी श्रेष्ठ असला तरी [illegible]तत्वाच्या दृष्टीनें त्यांच्या वर्गांतच येतो. असें यानें तात्पर्य समजावें. ॥ ११९ ॥

कारण:—

**अज्ञानादपुमर्थत्वमुभयत्रापि तत्समम् ॥**

**उपवासाद्यथा भिक्षा वरं ध्यानं तथान्यतः ॥ २० ॥**

अन्वयः—अज्ञानात् यत् अपुमर्थत्वं तत् उभयत्र अपि समम् । यथा उपवासात् भिक्षा तथा अन्यतः ध्यानं वरं ।

अर्थ:—अज्ञानामुळें जो अपुरुषार्थपणा तो दोन्हीं ठिकाणीं सारखाच आहे. सारांश उपवासापेक्षां जशी भिक्षा बरी, तसेंच दुसऱ्या साधनांहून ध्यान बरें होय. ॥ १२० ॥

विवरण:—आत्मसाक्षात्कार न झाल्यामुळें होणारा जो बंध तो ध्यान करणारा उपासक व पामर, पशु, पक्षी इत्यादि प्राणी यांना सारखाच होणार. आतां एवढें मात्र खरें की 'उपवासापेक्षां भिक्षा बरी' असें जसें लोक म्हणतात, त्याप्रमाणें अगदींच पशुतुल्य राहण्यापेक्षां किंवा दुसऱ्या क्षुद्र उपायांचें अनुष्ठान करण्यापेक्षां ध्यान करणें चांगलें. ॥ १२० ॥

आतां उपायांचा क्रम सांगतात:-

**पामराणां व्यवहृतेर्वरं कर्माद्यनुष्ठितिः ॥**

**ततोऽपि सगुणोपास्तिर्निर्गुणोपासना ततः ॥ २१ ॥**

अन्वयः—पामराणां व्यवहृतेः कर्माद्यनुष्ठितिः वरम् । ततः अपि सगुणोपास्तिः । ततः निर्गुणोपासना ।

अर्थः—मंत्रादि, मूर्तीचें ध्यान इत्यादिकांसही ज्ञानकारणता आहे, जर ह्मटलें तर ती असेना. पण निर्गुण उपासनेमध्यें ज्ञानाची [illegible] हें. [illegible] ध्यानाबरो विशेष आहे. ॥ १२५ ॥

विवरणः—मंत्राचा जप, विष्णु, कृष्ण, राम इत्यादि मूर्तीचें ध्यान इत्यादि उपायही ज्ञानसाधनें आहेत यांत शंका नाहीं. पण निर्गुण उपासना ज्ञानाच्या अगदीं समीप आहे. अर्थात् जप, ध्यान इत्यादिकांपेक्षां यांत कांहीं विशेष आहे. ॥ १२५ ॥

आतां निर्गुण उपासना ब्रह्मज्ञानाजवळ कशी आहे तें सांगतातः—

निर्गुणोपासनं पक्वं समाधिः स्याच्छनैस्ततः ॥
यः समाधिर्निरोधाख्यः सोऽनायासेन लभ्यते ॥ २६ ॥

अन्वयः—निर्गुणोपासनं यदा पक्वं भवति तदा समाधिः स्यात् । ततः शनैः निरोधाख्यः यः समाधिः सः अनायासेन लभ्यते ।

अर्थः—निर्गुण उपासना जेव्हा पक्व होते, तेव्हां सविकल्प समाधि होते. व नंतर हळु हळु प्राप्त होणारी जी निरोध नामक समाधि ती सहज प्राप्त करून घेतली जाते. ॥ १२६ ॥

विवरणः—निर्गुण उपासनेचा परिणाम सविकल्प समाधीमध्यें व तिचा निर्विकल्पसमाधीमध्यें होतो. आतां योग्यांची निर्विकल्पसमाधि व वेदान्त्यांचा आत्मसाक्षात्कार यांत किंचित् फरक आहे. पण त्याचा आतां क्रमानेंच विचार व्हावयाचा असल्यामुळें येथें विस्तार करण्याचें कांहीं कारण नाहीं. ॥ १२६ ॥

निर्विकल्पसमाधीपासून कोणता लाभ होतो तें सांगतातः—

निरोधलाभे पुंसोऽन्तरसङ्गं वस्तु शिष्यते ॥
पुनः पुनर्वासितेऽस्मिन्वाक्याज्जायेत तत्त्वधीः ॥ २७ ॥

अन्वयः—निरोधलाभे सति पुंसः अंतः असंगं वस्तु शिष्यते । अस्मिन् पुनः पुनः वासिते सति वाक्यात् तत्त्वधीः जायेत

या निर्विकल्प समाधीचा लाभ झाला असतां पुरुषाच्या शरीरांत अवशिष्ट रहातें. व तिचेंच पुनः पुनः भावना केली असता वाक्यावरून तत्त्वज्ञान उत्पन्न होतें. ॥ १२७ ॥

विवरणः—प्रस्तुत समाधींत सर्व वृत्तींचा निरोध होत असतो, व त्यामुळेंच पतंजलींनीं हिला निर्बीज समाधि असें म्हटलें आहे. हिचा लाभ झाला असतां अर्थातच असंग वस्तु म्हणजे निरुपाधिक कूटस्थ चैतन्य रहातें. व त्याचीच वारंवार भावना केली असतां 'तत्त्वमसि' इत्यादि महावाक्यांच्या श्रवणानें त्या मुख्य अधिकारी पुरुषास आत्मसाक्षात्कार होतो. ॥ १२७ ॥

आतां तत्वज्ञानाचें स्वरूप सांगतातः—

निर्विकारासङ्गनित्यस्वप्रकाशैकपूर्णताः ॥

बुद्धौ झटिति शास्त्रोक्ता आरोहन्त्यविवादतः ॥ २८ ॥

अन्वयः—शास्त्रोक्ताः निर्विकारासंगनित्यस्वप्रकाशैकपूर्णताः बुद्धौ झटिति अविवादतः आरोहन्ति ।

अर्थः—शास्त्रोक्त निर्विकारित्व, असंगत्व, नित्यत्व, प्रकाशत्व, एकत्व व पूर्णत्व हे भाव बुद्धीमध्यें तात्काल निःशंकपणें उभे राहतात. ॥ १२८ ॥

विवरणः—निर्विकल्पसमाधीच्या सतत अभ्यासामुळें शास्त्रानें सांगितलेले आत्म्याचे सर्व कल्पित धर्म आत्म्याच्या ठायीं कसे रहातात, तें समजतें. व त्यामुळें आत्म्याचें लक्ष्यरूप प्रत्ययास येतें. ॥ १२८ ॥

योगाभ्यासस्त्वेतदर्थोऽमृतबिन्द्वादिषु श्रुतः ॥

एवं च दृष्टद्वारापि हेतुत्वादन्यतो वरम् ॥ २९ ॥

अन्वयः—अमृतबिंद्वादिषु तु योगाभ्यासः एतदर्थः श्रुतः अस्ति । एवं च दृष्टद्वारा अपि हेतुत्वात् अन्यतः वरम् ।

अर्थः—अमृतबिंदु, कठ, इत्यादि उपनिषदांमध्यें तरी योगाभ्यास ज्ञाकरितांच सांगितलेला आहे. सारांश, दृष्टद्वाराहि हिला ज्ञानहेतुत्व असल्यामुळें ही ( निर्गुण उपासना ) अन्य साधनांहून श्रेष्ठ आहे. ॥ १२९ ॥

विवरणः—अमृतबिंदु, कठ, कैवल्य इत्यादि अनेक उपनिषदांतून योगा करण्याविषयीं जें सांगितलेलें आढळतें, तें तरी या निर्विकल्पसमाधीकरितांच होय हें. समाधीच्याद्वारा पुढें अपरोक्ष ज्ञान होतें. सारांश दृष्ट व अदृष्ट या दोघांच्याही द्वारा निर्गुण उपासना आत्मसाक्षात्कारास कारण होत असल्यामुळें ती—कर्में, सगुण उपासना, इत्यादिकांहून श्रेष्ठ होय. ज्याचें फल या जन्मींच किंवा तात्काल मिळतें तें दृष्ट व ज्याचें परलोकीं किंवा कालांतरानें मिळतें तें अदृष्ट होय. कर्मादि उपायांचें फल अदृष्ट असतें व निर्गुण उपासनेचें प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष किंवा दृष्ट व अदृष्ट असतें. तस्मात् ती ज्ञानाच्या समीप असते असें ह्मणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. त्यामुळेंच ती श्रेष्ठ होय. ॥ १२९ ॥

आतां, अशा या निर्गुण उपासनेचा त्याग जे करून तीर्थयात्रादि दुसऱ्या क्षुद्र उपायांचें अनुष्ठान करीत असतात, त्यांची ग्रंथकार निंदा करितातः—

**उपेक्ष्य तत्तीर्थयात्राजपादीनेव कुर्वताम् ॥**
**पिंडं समुत्सृज्य करं लेढीति न्याय आपतेत् ॥ ३० ॥**

अन्वयः—तत् उपेक्ष्य तीर्थयात्राजपादीन् एव कुर्वताम् 'पिंडं उत्सृज्य करं लेढि' इति न्यायः आपतेत् ।

अर्थः—त्या निर्गुण उपासनेची उपेक्षा करून तीर्थयात्रा, जप इत्यादि करणारांवर 'लोण्याचा गोळा टाकून हात चाटतो' या न्यायाप्रमाणें दोष येईल. ॥ १३० ॥

विवरणः—निर्गुण उपासना परम फलदायक आहे. पण सर्वांनाच ती आवडत नाहीं. बरेच लोक तिचा त्याग करून तीर्थयात्रा, जप, इष्टपूर्त कर्में इत्यादिकांतच निमग्न होऊन रहातात. पण हातांतील लोण्याचा गोळा टाकून देऊन हात चाटीत बसण्याप्रमाणें त्यांचें तें कृत्य उपहासास्पद होय. ॥ १३० ॥

आतां तत्वविचार सोडून निर्गुणोपासनाच करीत बसणारावरही हा पूर्वोक्त दोष येतो हें खरें, पण विचाराचा जर लाभ होत नाहीं असें वाटलें; तर त्याच्या जवळची निर्गुण उपासना करणें बरें नव्हे का ? असें विचारण्याच्या उद्देशानें ग्रंथकार ह्मणतातः—

**उपासकानामप्येवं विचारत्यागतो यदि ॥**
**बाढं तस्माद्विचारस्यासंभवे योग ईरितः ॥ ३१ ॥**

य:—विचारत्यागतः उपासकानां अपि यदि एवं । बाढं । तस्मात् एव असंभवे योगः ईरितः अस्ति ।

अर्थः—विचाराच्या त्यागामुळें उपासकाकडेही प्रस्तुत दोष येतो असें जर म्हणाल तर तें खरें आहे. पण त्याकरितांच विचाराचा असंभव झाल्यास योग सांगितलेला आहे. ॥ १३१ ॥

विवरण:—या श्लोकांतील योग या शब्दाचा—उपासना किंवा अभ्यास योग—असा अर्थ करावा. पूर्वोक्त दोष निर्गुण उपासकांवरही येतो हें खरें; पण काय करावें ? त्यावांचून विचारच होत नाहीं असें समजल्यामुळें शास्त्रकारांनीं निर्गुण उपासनेचें विधान केलें आहे. सारांश, विचार जर आपोआप होता, तर प्रस्तुत उपासनेची अवश्यकता नाहीं असें म्हणतां आलें असतें. ॥ १३१ ॥

'उपासनेवांचून तत्त्वविचार संभवत नाहीं' असें म्हणण्याचें कारण आतां सांगतात:—

बहुव्याकुलचित्तानां विचारात्तत्त्वधीर्न हि ॥
योगो मुख्यस्ततस्तेषां धीदर्पस्तेन नश्यति ॥ १३२ ॥

अन्वय:—बहुव्याकुलचित्तानां हि विचारात् तत्त्वधीः न । ततः तेषां योगः मुख्यः । तेन धीदर्पः नश्यति ।

अर्थः—ज्यांचें चित्त अतिशय व्याकुळ झालेलें असतें, त्यांना त्याअर्थी विचारामुळें तत्त्वज्ञान होत नाहीं; त्याअर्थी योगच मुख्य आहे. त्याच्या योगानें बुद्धीचा दर्प नष्ट होतो. ॥ १३२ ॥

विवरण:—चित्त मलिन असल्यास विचारच होऊं शकत नाहीं. मग त्याच्या योगानें प्राप्त होणारें तत्त्वज्ञान तर दूरच राहिलें. यास्तव अशा व्यग्र चित्ताच्या लोकांकरितां प्रस्तुत योग मुख्य आहे. कारण त्याच्या योगानें उपासकाच्या बुद्धींतील दोष नष्ट होत असतो. ॥ १३२ ॥

पण, ज्याचें चित्त व्याकुळ नसतें त्यांना विचारच मुख्य होय; असें आतां सांगतात:—

**अव्याकुलधियां मोहमात्रेणाच्छादितात्मनाम् ॥**
**सांख्यनामा विचारः स्यान्मुख्यो झटिति सिद्धिदः ॥ ३३ ॥**

**अन्वयः**—मोहमात्रेण आच्छादितात्मनां अव्याकुलचित्तानां झटिति सिद्धिदः सांख्यनामा विचारः मुख्यः स्यात् ।

**अर्थः**—केवल मोहाच्या योगानें ज्यांचा अंतरात्मा आच्छादित झालेला आहे अशा शांत बुद्धीच्या पुरुषांस तात्काल सिद्धि देणारा सांख्यनामक विचार मुख्य होय. ॥ १३३ ॥

**विवरणः**—ज्यांच्या बुद्धीमध्यें विक्षेप राहिला नसेल पण केवळ मोहामुळें आत्मा आच्छादित झाल्यासारखा होऊन राहिला असेल, त्या उत्तम अधिकाऱ्यांकरितां सांख्य हें नांव आहे ज्याला असा तत्त्वविवेक मुख्य होय; असें सांगितलेलें आहे. कारण प्रस्तुत विचार साधकास तात्काल सिद्धि देतो. ॥ १३३ ॥

याविषयीं भगवद्वचन प्रमाण देतातः—

**यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ॥**
**एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ३४ ॥**

**अन्वयः**—यत् स्थानं सांख्यैः प्राप्यते तत् योगैः अपि गम्यते । अतः यः सांख्यं च योगं च एकं पश्यति सः पश्यति ।

**अर्थः**—जें स्थान सांख्यांकडून प्राप्त करून घेतलें जातें तें योग्यांकडून-ही मिळविलें जातें. यास्तव जो सांख्य व योग एकच आहे असें समजतो, तोच डोळस होय. ॥ १३४ ॥

**विवरणः**—सांख्य म्हणजे तत्त्वज्ञानरूप योग व योग म्हणजे निष्कर्मरूप योग असें सर्व अद्वैतवाद्यांस मान्य आहे. हे दोन्ही एकच फल देणारे असल्यामुळें भिन्न नाहींत; असें ज्यास समजतें त्यासच खरा शास्त्रार्थ समजतो असें ज्ञानी म्हणतात. पंडित अच्युतरायांनीं सांख्य म्हणजे कापिल शास्त्र व योग म्हणजे पातंजल शास्त्र; आणि 'ब्रह्म व आत्मा एक आहेत' ह्या ज्ञानास प्रतिबंध करणाऱ्या दोषांचा नाश करणें हें त्यांचें एक फल—असें म्हटलें आहे. व तोच अर्थ ग्रंथकारांसही येथें मान्य आहे असें पुढच्या श्लोकावरून दिसतें. ॥ १३४ ॥

[illegible] आमच्या म्हणण्यास श्रुतीचेंही पाठबळ आहे; असें मुमुक्षुजनांकरितां तिचा निर्देश करितात:—

**तत्कारणं सांख्ययोगाभिगम्यमिति हि श्रुतिः ॥**

**यस्तु श्रुतेर्विरुद्धः स आभासः सांख्ययोगयोः ॥ १५ ॥**

अन्वयः—'तत्कारणं सांख्ययोगाभिगम्यं' इति हि श्रुतिः अस्ति । यः तु सांख्ययोगयोः श्रुतेः विरुद्धः अर्थः सः आभासः ।

अर्थ:—'तत्कारणं सांख्य०' इत्यादि, श्रुति प्रसिद्ध आहे. पण श्रुतीच्या विरुद्ध असा जो सांख्य व योग शास्त्रामध्यें अर्थ आहे तो आभास होय. ॥ १३५ ॥

विवरण:—श्वेताश्वतरोपनिषदामध्यें सहाव्या अध्यायाच्या तेराव्या मंत्राचा उत्तरार्ध—जगाच्या सृष्ट्यादिकांचें कारण व सांख्य व योग यांच्या योगानें प्राप्त होण्यासारखें असें जें स्वयंप्रकाश तत्त्व आहे त्यास जाणिलें असतां पुरुष मुक्त होतो—अशा अर्थाचा आहे. व तेंच आमच्या या पूर्वोक्त प्रतिपादनास प्रबल प्रमाण होय. आतां शारीरक मीमांसेमध्यें योग व सांख्य या शास्त्रांचें खंडन केलें आहे हें खरें; पण त्याचा अर्थ असा समजावयाचा कीं, श्रुतिविरुद्ध असें जें त्या शास्त्रांतून प्रतिपादन केलेलें आहे, तें वेदान्तास मान्य नाहीं. ॥ १३५ ॥

आतां उपासना करीत असतां जरी मरणाची पाळी आली तरी साधकाची हानी होत नाहीं, असें सांगतात:—

**उपासनं नातिपक्वमिह यस्य परत्र सः ॥**

**मरणे ब्रह्मलोके वा तत्त्वं विज्ञाय मुच्यते ॥ १६ ॥**

अन्वयः—यस्य उपासनं इह न अतिपक्वं सः परत्र मरणे, ब्रह्मलोके वा तत्त्वं विज्ञाय मुच्यते ।

अर्थ:—ज्याची उपासना या जन्मीं अति परिपक्व होत नाहीं तो दुसऱ्या जन्मीं तत्त्वज्ञ होऊन मुक्त होतो; उपासना परिपक्व झाली असल्यास त्यास मरणसमयीं ज्ञान होतें किंवा ब्रह्मलोकप्राप्तिविषयीं वासना राहिलेली असल्यास तो ब्रह्मलोकीं जातो व तेथें त्यास ज्ञान होऊन मुक्ति मिळते. ॥ १३६ ॥

मरणसमयीं तत्त्वज्ञान होतें अशाविषयीं प्रमाण देतात:—

**यं यं वाऽपि स्मरन् भावं त्यजत्यंते कलेवरम् ॥**
**तं तमेवैति यच्चित्तस्तेन यातीति शास्त्रतः ॥ १७ ॥**

अन्वयः—अपि वा यं यं भावं स्मरन् अंते कलेवरं त्यजति तं तं एव एति च यच्चित्तः तेन याति इति शास्त्रतः ।

अर्थः—किंवा ज्या ज्या भावाचें स्मरण करीत अंतकाळीं प्राणी शरीर सोडतो त्या त्या भावाप्रत तो जातो; व 'जसें त्याचें चित्त होतें त्याच्या द्वाराच तो जातो' इत्यादि शास्त्रवचनें असल्यामुळें अंतसमयीं उपासना परिपक्व झाल्यास ज्ञान होणेंही शक्य आहे. ॥ १३७ ॥

विवरणः—उपासना परिपक्व झालेली नसल्यास साधकास पुनर्जन्म घ्यावा लागतो व ती परिपक्व झालेली असल्यास व कोणत्याही प्रकारची इच्छा राहिलेली नसल्यास त्यास मरणसमयीं तत्त्वज्ञान होतें व ब्रह्म लोकाची वगैरे इच्छा राहिलेली असल्यास त्यास ब्रह्मलोकीं गेल्यावर कांहीं कालानें ज्ञान होतें. याविषयीं श्रुति व स्मृतिप्रमाण आहे. येथें घेतलेलें 'यं यं वा' इत्यादि वचन भगवद्गीतेंतील आहे. व 'यच्चित्तः' इत्यादि काण्वश्रुति आहे. ॥ १३६, १३७ ॥

वादीः—पण, पूर्वोक्त श्रुति व स्मृतिवचन अंत्य प्रत्ययाप्रमाणें पुढचा जन्म मिळतो एवढेंच सांगत आहे. ज्ञानाच्या योगानें मोक्ष होतो असें सांगत नाहीं.

सिद्धान्तीः—

**अन्त्यप्रत्ययतो नूनं भावि जन्म तथा सति ॥**
**निर्गुणप्रत्ययोऽपि स्यात्सगुणोपासने यथा ॥ ३८ ॥**

अन्वयः—नूनं अन्त्यप्रत्ययतः भावि जन्म तथा सति यथा सगुणोपासने तथा निर्गुणप्रत्ययः अपि स्यात् ।

अर्थः—अंतकाळच्या भावनेमुळें पुढचा जन्म मिळतो हें खरें, पण एवढा निश्चय झाला असतां ज्याप्रमाणें सगुणोपासनेमध्यें होतें त्याप्रमाणेंच निर्गुणोपासकासही निर्गुण ब्रह्माचें ज्ञान होतें. ॥ १३८ ॥

:—पूर्वोक्त वाक्यांवरून–पुढच्या जन्मास या जन्मांतील अन्त्य कालची वासनाच कारण आहे–एवढें ठरतें. व त्यावरून यावत जीव सगुणोपासना करीत असतां जसा अंतकाळीं पूर्वाभ्यासामुळें सगुणाचा साक्षात्कार होतो, त्याप्रमाणेंच निर्गुणोपासकासही उपासना परिपक्व झालेली असल्यास व कोणतीही इच्छा राहिलेली नसल्यास मरणसमयीं निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार होतो; असें ठरवितां येतें. ॥ ११८ ॥

वादी:—असें खरें; निर्गुण उपासनेच्या योगानें निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार होणें शक्य आहे. पण त्यावरून त्याला मुक्ति मिळते हें कसें ठरवितां येईल?

सिद्धान्ती:–

नित्यनिर्गुणरूपं तन्नाममात्रेण गीयताम् ॥
अर्थतो मोक्ष एवैष संवादिभ्रमवन्मतः ॥ ३९ ॥

अन्वय:—तत् नित्यनिर्गुणरूपं नाममात्रेण गीयताम् । अर्थतः तु संवादिभ्रमवत् एषः मोक्षः एव मतः ।

अर्थ:—तें नित्य व निर्गुणरूप आहे असें केवल शब्दानें खुशाल म्हणा! पण अर्थतः संवादि भ्रमाप्रमाणें हा मोक्षच होय असें मानलेलें आहे. ॥ ११९ ॥

विवरण:—पर ब्रह्म नित्य व निर्गुण आहे, असें जर कोणास म्हणावयाचें असलें तर त्यानें खुशाल म्हणावें. कारण ज्याला आम्ही मोक्ष म्हणतों त्यालाच तुम्ही निर्गुण ब्रह्म म्हणतां. म्हणजे शब्दांमध्यें जरी भेद असला तरी अर्थ एकच आहे. तस्मात् संवादी भ्रमास जरी भ्रम म्हटलें तरी तो जसा यथार्थ ज्ञानरूपच असतो, त्याप्रमाणें यास जरी निर्गुण ब्रह्म म्हटलें तरी तो मोक्षच होय. ॥ ११९ ॥

वादी:—पण निर्गुण उपासना ही एक मनाची क्रिया असल्यामुळें ती मोक्षाचें साधन आहे; असें म्हणणें युक्त नव्हे.

सिद्धांती:—उपासना साक्षात्कारास कारण होते, व साक्षात्कार मोक्षाचें साधन आहे; असें सांगितलेलें असल्यामुळें आमचें म्हणणें अयुक्त नव्हे; असें आतां सप्रमाण सांगतात:—

तत्सामर्थ्याज्जायते धीर्मूलाविद्यानिवर्तिका ॥
अविमुक्तोपासनेन तारकब्रह्मबुद्धिवत् ॥ ४० ॥

**अन्वयः**—अविमुक्तोपासनेन तारकब्रह्मबुद्धिवत् तत्सामर्थ्यात् मूलवि- धीः जायते ।

**अर्थ**:—सगुण ब्रह्माची उपासना केल्यामुळें जसें तारक ब्रह्माचें ज्ञान होतें, त्याप्रमाणें निर्गुणोपासनेच्या सामर्थ्यामुळें मूल अविद्येस निवृत्त करणारी विद्या उत्पन्न होते. ॥ १४० ॥

**विवरण**:—लघुजाबालोपनिषदामध्यें बृहस्पतींनीं याज्ञवल्क्यास अविमुक्तोपासना सांगितली आहे व तिच्या योगानें तारक ब्रह्माचें ज्ञान होतें असा तेथेंच उल्लेख आहे. यास्तव या श्रुतिप्रोक्त उपासनेचा व तिच्या फलाचा दृष्टान्त देऊन निर्गुण उपासनेमुळें विद्या प्राप्त होतें असें येथें सांगितलेलें आहे. ॥ १४० ॥

**वादी**:—निर्गुणोपासनेचें मोक्ष हेंच फल आहे, याविषयीं प्रमाण काय ?

**सिद्धान्ती**:—सांगतों:—

**सोऽकामो निष्काम इति ह्यशरीरो निरिंद्रियः ॥**
**अभयं हीति मुक्तत्वं तापनीये फलं श्रुतम् ॥ ४१ ॥**

**अन्वयः**—' सः अकामः निष्कामः ' इति तथा हि " अशरीरः निरिंद्रियः " इति तथा हि ' अभयं ' इति तापनीये मुक्तत्वं फलं श्रुतम् अस्ति ।

**अर्थ**:—" तो अकाम व निष्काम " असें; त्याचप्रमाणें तो ' शरीररहित, इंद्रियशून्य ' असें व ' अभयरूप ' असें म्हणून तापनीय श्रुतींमध्यें मुक्तत्व हें निर्गुण उपासनेचें फल सांगितलेलें आहे. ॥ १४१ ॥

**विवरण**:—येथें ' सः अकामः ' इत्यादि जें वचन घेतलेलें आहे तें बृहदारण्यकांतील व ' अशरीरः ' इत्यादि नृसिंहोत्तरतापनीयांतील आहे; असें अच्युतराय म्हणतात. पण, ' सः अकामः ' इत्यादि वचन नृसिंहोत्तरतापनीयांतही आहे. या दोन्ही वचनांचा सारांश असाः–हा आत्मा सर्व कार्यांमध्यें ओतप्रोत भरून राहिलेला आहे; व हाच नृसिंहरूप ब्रह्म आहे; असें जो जाणतो तो मुक्त, निस्तृष्ण, ज्याला सर्व काम प्राप्त झाले आहेत असा व त्यामुळें जो केवळ आत्मकाम आहे असा होतो. तसाच हा शरीररहित, इंद्रियरहित, प्राणरहित, मनरहित, सच्चिदानंद मात्र व स्वयंप्रकाश आहे, असें जो जाणतो; तसेंच हा ओंकार चिन्मय आहे व सर्व कार्यजातही चिन्मय आहे, तस्मात्

हें सर्व परमेश्वररूपच आहे. आणि हें सर्व अमृत, अभय आहे. हें ब्रह्म अभय आहे. असें जो जाणतो तो निरुपाधिक व ब्रह्म होतो. इत्यादि. ॥ १४१ ॥

वादीः--अहो पण उपासनेच्या योगानेंच जर मुक्ति होते असें म्हटलें तर ' नान्यः पन्था० ' इत्यादि श्रुतीची काय वाट ? ती अप्रमाण आहे असें म्हणणार कीं काय ? सिद्धांतीः—नाहीं. श्रुतीस अप्रमाण म्हणण्याचें आमचें शील नाहीं. आम्ही विरोधी वाक्यांची व्यवस्था लावीत असतों. पण प्रस्तुत वाक्य तर निर्गुण उपासनेशीं अविरोधी आहे. कसें म्हणून म्हणाल तर सांगतों:-

उपासनस्य सामर्थ्याद्विद्योत्पत्तिर्भवेत्ततः ॥
नान्यः पंथा इति ह्येतच्छास्त्रं नैव विरुध्यते ॥ ४२ ॥

अन्वयः--हि उपासनस्य सामर्थ्यात् विद्योत्पत्तिः भवेत् ततः ' नान्यः पन्था० ' इति एतत् शास्त्रं न विरुध्यते एव ।

अर्थः—ज्याअर्थी उपासनेच्या सामर्थ्यामुळें विद्येची उत्पत्ति होते, त्याअर्थी 'नान्यः पन्था०' इत्यादि शास्त्र तिच्याशीं विरोधच करीत नाहीं. ॥ १४२ ॥

विवरणः—उपासना साक्षात्कारास कारण होते असें यापूर्वी अनेक वेळां सांगितलेलें आहे. व साक्षात्कारावांचून मुक्तीचें अन्य साधन नाहीं असेंही श्रुति म्हणत आहे. म्हणजे त्या दोघांचाही परस्पर भिन्न विषय आहे. व त्यामुळें त्यांच्यामध्यें विरोधच येत नाहीं. ॥ १४२ ॥

सारांशः—

निष्कामोपासनान्मुक्तिस्तापनीये समीरिता ॥
ब्रह्मलोकः सकामस्य शैब्यप्रश्ने समीरितः ॥ ४३ ॥

अन्वयः—तापनीये निष्कामोपासनात् मुक्तिः समीरिता । तथा शैब्यप्रश्ने सकामस्य ब्रह्मलोकः समीरितः ।

अर्थः—तापनीयोपनिषदामध्यें निष्काम उपासनेपासून मुक्ति मिळते असें सांगितलेलें आहे. त्याचप्रमाणें शैब्य प्रश्नामध्यें सकाम पुरुषास ब्रह्मलोक मिळतो असें म्हटलें आहे. ॥ १४३ ॥

विवरणः—प्रश्नोपनिषदामध्यें शैब्याचा प्रश्न असून त्याचें उत्तर देतांना पिप्पलाद मुनींनीं सकाम उपासकास ब्रह्मलोक प्राप्ति होते; असें सांगितलें आहे. ॥ १४३ ॥

आतां–पूर्वोक्त प्रश्नोपनिषदांतील वाक्यच अर्थातः येथें घेतातः—

य उपास्ते त्रिमात्रेण ब्रह्मलोके स नीयते ॥
स एतस्माज्जीवघनात्परं पुरुषमीक्षते ॥ ४४ ॥

अन्वयः—यः त्रिमात्रेण उपास्ते सः ब्रह्मलोके नीयते । सः एतस्मात् जीवघनात् परं पुरुषं ईक्षते ।

अर्थः—जो अ, उ, व म्, या तीन मात्रांनीं युक्त अशा ओंकाराच्या योगानें परम पुरुषाचें ध्यान करितो त्यास ब्रह्मलोकीं घेऊन जातात. व पुढें तो त्या समष्टिरूप हिरण्यगर्भाहून श्रेष्ठ अशा निरुपाधिक पुरुषास पहातो. ॥ १४४ ॥

विवरणः—जो कामी पुरुष ब्रह्मलोकाच्या इच्छेनें त्रिमात्र ओंकाराच्या द्वारा परमपुरुषाचें सतत चिंतन करितो तो सामांकडून ब्रह्मलोकीं पोंचविला जातो. व तेथें गेल्यावर समष्टिरूप हिरण्यगर्भाहून श्रेष्ठ अशा नित्य शुद्ध व चैतन्यघन आत्म्याचा त्यास साक्षात्कार होतो. ॥ १४४ ॥

आतां–सकाम निर्गुणोपासक ब्रह्मलोकीं जातो–अशाविषयीं शारीरकसूत्राचें प्रमाण देतातः–

अप्रतीकाधिकरणे तत्क्रतुन्याय ईरितः ॥
ब्रह्मलोकफलं तस्मात्सकामस्येति वर्णितम् ॥ ४५ ॥

अन्वयः—अप्रतीकाधिकरणे तत्क्रतुन्यायः ईरितः । तस्मात् सकामस्य ब्रह्मलोकफलं इति वर्णितम् ।

अर्थः—अप्रतीकाधिकरणांत तत्क्रतु नामक न्याय सांगितलेला आहे. व म्हणूनच सकाम उपासकास ब्रह्मलोक हें फळ मिळतें; असें वर्णन केलें आहे ॥ १४५ ॥

विवरणः—शारीरकाच्या चवथ्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाचें सहावें अधिकरणच अप्रतीकाधिकरण होय. त्याचा सारांश–प्रतीकोपासकांस सोडून इतर सर्व विकारोपासकांस अमानव पुरुष ब्रह्मलोकीं पोंचवितो. असें बादरायण मुनि मानतात.

[illegible]मुळें पूर्वोक्त ' अनियमः सर्वासाम् ' या सिद्धांताशीं विरोध येत नाहीं. कारण सर्व शब्दा[illegible] प्रतीकोपासकांहून अन्य उपासक असा करितां येतो. शिवाय ज्याचा जो संकल्प असतो त्यास त्याचीच प्राप्ति होते.—असा आहे. म्हणजे या अधिकरणांत संकल्पाप्रमाणें प्राप्त्यास फल मिळतें असें ठरविलें आहे व त्यास अनुसरूनच येथें कामनेप्रमाणें ब्रह्मलोक इत्यादि फल मिळतें असें म्हटलें आहे. ॥ १४५ ॥

पण, असें जरी आहे तरी त्यास पुढें तत्त्वज्ञान होतें असें आतां सांगतात:—

**निर्गुणोपास्तिसामर्थ्यात्तत्र तत्त्वमवेक्षते ॥**

**पुनरावर्तते नायं कल्पांते च विमुच्यते ॥ ४६ ॥**

अन्वय:—तत्र निर्गुणोपास्तिसामर्थ्यात् तत्त्वं अवेक्षते च अयं पुनः न आवर्तते च कल्पान्ते विमुच्यते ।

अर्थ:—तेथें निर्गुण उपासनेच्या सामर्थ्यामुळें त्यास तत्त्वसाक्षात्कार होतो. तदनंतर हा पुनरपि जन्मास येत नाहीं, आणि कल्पाच्या शेवटीं मुक्त होतो. ॥ १४६ ॥

विवरण:—निर्गुणोपासनेचें सामर्थ्यच कांहीं विचित्र असल्यामुळें ब्रह्मलोकीं गेल्यावरही उपासकास तत्त्वसाक्षात्कार होतो; ज्ञान झाल्यामुळें तो पुनरपि जन्ममरण परंपरेंत पडत नाहीं; व ब्रह्मलोकाच्या लयाबरोबर त्याचाही नित्य शुद्ध ब्रह्मांत लय होतो; असें याचें तात्पर्य समजावें. ॥ १४६ ॥

प्रणवोपासनेचें प्रकरण चाललेलें असल्यामुळें तिचा अवांतर भेदही सांगतात:—

**प्रणवोपास्तयः प्रायो निर्गुणा एव वेदगाः ॥**

**क्वचित्सगुणताप्युक्ता प्रणवोपासनस्य हि ॥ ४७ ॥**

अन्वय:—वेदगाः प्रणवोपास्तयः प्रायः निर्गुणाः एव । हि प्रणवोपासनस्य सगुणता अपि क्वचित् उक्ता ।

अर्थ:—वेदोक्त प्रणवोपासना बहुतकरून निर्गुणच आहेत. पण प्रणवोपासनेस सगुणत्वही आहे असें क्वचित् सांगितलेलें आहे. ॥ १४७ ॥

विवरण:—वेदामध्यें बहुतकरून प्रणवोपासना निर्गुणच आढळते. पण हा अबाधित नियम आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण कोठें कोठें प्रणवाची सगुण उपासनाही आढळते. ॥ १४७ ॥

आतां—याविषयीं प्रमाण काय असें कोणी विचारील म्हणून सांगतातः—

**परापरब्रह्मरूप ओंकार उपवर्णितः ॥**

**पिप्पलादेन मुनिना सत्यकामाय पृच्छते ॥ ४८ ॥**

अन्वयः—पिप्पलादेन मुनिना पृच्छते सत्यकामाय परापरब्रह्मरूपः ओंकारः उपवर्णितः ।

अर्थः—पिप्पलाद मुनींनीं प्रश्न करणाऱ्या शैब्यास पर व अपर ब्रह्मरूप ओंकार आहे; असें सांगितलें आहे. ॥ १४८ ॥

विवरणः—प्रश्नोपनिषदाच्या पांचव्या प्रश्नांत प्रस्तुत प्रकरण आहे. शिबिपुत्र सत्यकामानें आपल्या पिप्पलादनामक पूज्य गुरुस ओंकाराच्या उपासनेविषयीं प्रश्न केलेला असून गुरूंनीं ' हे सत्यकामा, जो ओंकार तेंच हे पर व अपर ब्रह्म आहे. ' असें उत्तर दिलें आहे. ॥ १४८ ॥

कठवल्लीमध्येंही अशा प्रकारचें वर्णन आहे; असें सांगतातः—

**एतदालंबनं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ॥**

**इति प्रोक्तं यमेनापि पृच्छते नचिकेतसे ॥ ४९ ॥**

अन्वयः—पृच्छते नचिकेतसे यमेन अपि ' एतदालंबनं ज्ञात्वा यो यत् इच्छति तस्य तत् ' इति प्रोक्तम् ।

अर्थः—प्रश्न करणाऱ्या नचिकेतास यमानेंही ' या आलंबनास जाणून जो ज्याची इच्छा करितो तें त्यास मिळतें ' असें सांगितलें आहे. ॥ १४९ ॥

विवरणः—कठोपनिषदाच्या पहिल्या अध्यायाच्या दुसऱ्या वल्लीचा सोळावा श्लोक " हें अक्षरच अपर व पर ब्रह्म आहे. या अक्षराचीच ब्रह्मभावनेनें उपासना केली असतां ज्याला ज्याची इच्छा असते त्यास त्याची प्राप्ति होते. " अशा अर्थाचा आहे. व त्यावरून प्रणवोपासना दोन प्रकारची आहे असें ठरतें. ॥ १४९ ॥

सारांशः—

**इह वा मरणे वाऽस्य ब्रह्मलोकेऽथ वा भवेत् ॥**

**ब्रह्मसाक्षात्कृतिः सम्यगुपासीनस्य निर्गुणम् ॥ ५० ॥**

—अस्य निर्गुणं सम्यक् उपासीनस्य ब्रह्मसाक्षात्कृतिः इह वा मरणे वा अथवा ब्रह्मलोके भवेत् ।

अर्थः—या उत्तमप्रकारें निर्गुणउपासना करणाऱ्या पुरुषास ब्रह्मसाक्षात्कार या जन्मीं, किंवा मरणसमयीं, किंवा ब्रह्मलोकीं होतो. ॥ १५० ॥

विवरणः—निर्गुण उपासना आत्मसाक्षात्काराचें कारण आहे व प्रतिबंधाचा क्षय होतांच तो ( आत्मसाक्षात्कार ) होतो. अर्थात् तो केव्हां व कोठें होईल याचा नियम नाहीं. एकशें छत्तिसाव्या श्लोकांत ' येथें मरणसमयीं, पुढच्या जन्मीं किंवा ब्रह्मलोकीं तत्त्वज्ञान होतें ' असें जें म्हटलें होतें, त्याचाच पुन्हा येथ विचार करून येथें उपसंहार केला आहे. ॥ १५० ॥

' सतत आत्मचिंतन करावें ' असें आत्मगीतेंतही सांगितलेलें आहे. असें आतां सांगतातः—

अर्थोऽयमात्मगीतायामपि स्पष्टमुदीरितः ॥
विचाराक्षम आत्मानमुपासीतेति संततम् ॥ ५१ ॥

अन्वयः—विचाराक्षमः संततं आत्मानं उपासीत इति अयं अर्थः आत्मगीतायां अपि स्पष्टं उदीरितः अस्ति ।

अर्थः—विचारास असमर्थ असलेल्या पुरुषानें सतत निर्गुणब्रह्माचें ध्यान करावें असा हा अर्थ आत्मगीतेमध्येंही स्पष्टपणें सांगितला आहे. ॥ १५१ ॥

विवरणः—आत्मगीतेंतील प्रस्तुत प्रसंगाच्या उपयोगी अशीं तीन वाक्यें यापुढेंच घेतलेलीं आहेत. म्हणून त्यांचा येथें विस्तार करीत नाहीं. ॥ १५१ ॥

साक्षात्कर्तुमशक्तोऽपि चिंतयेन्मामशंकितः ॥
कालेनानुभवारूढो भवेयं फलितो ध्रुवम् ॥ ५२ ॥

अन्वयः—साक्षात्कर्तुं अशक्तः अपि मां अशंकितः चिंतयेत् । कालेन अहं अनुभवारूढः च फलितः ध्रुवं भवेयम् ।

अर्थः—साक्षात् जाणण्यास असमर्थ असलेल्या पुरुषानेंही माझें निःशंकपणें चिंतन करावें. योग्य समय आला असतां मी अनुभवारूढ व फलरूप अवश्य होईन. ॥१५२ ॥

यथाऽगाधनिधेर्लब्धौ नोपायः खननं विना ॥

मल्लाभेऽपि तथा स्वात्मचिंतां मुक्त्वा न चापरः

अन्वयः—यथा अगाधनिधेः लब्धौ खननं विना उपायः न अस्ति तथा मल्लाभे अपि स्वात्मचिंतां मुक्त्वा अपरः उपायः न वर्तते ।

अर्थः—ज्याप्रमाणें फार खोल असलेल्या भांडाराची प्राप्ति करून घेण्यास खणण्यावांचून उपाय नसतो. त्याप्रमाणें माझ्या लाभाकरितांही स्वरूपभूत आत्म्याच्या चिंतनास सोडून दुसरा उपाय नाहीं ॥ १५३ ॥

देहोपलमपाकृत्य बुद्धिकुद्दालकात्पुनः ॥

खात्वा मनोभुवं भूयो गृह्णीयान्मां निधिं पुमान् ॥ ५४ ॥

अन्वयः—पुमान् देहोपलं अपाकृत्य पुनः बुद्धिकुद्दालकात् मनोभुवं खात्वा मां निधिं गृह्णीयात् ।

अर्थः—पुरुषानें देहरूप मोठ्या शिळेस दूर करून पुनरपि विवेकरूप कुदळीनें मनोरूप जमीन खणून मज निधीस यथेच्छ लुटावें. ॥ १५४ ॥

विवरणः—आत्मगीतेंतील या तीन श्लोकांत–ज्याला विचार करण्याचें सामर्थ्य नसेल त्यानें ब्रह्माचें सतत चिंतन करावें. ह्मणजे विचाराचें फल जो आत्मसाक्षात्कार तो योग्य समयीं सहज होतो. ज्याप्रमाणें जमिनींत खोल पुरलेली संपत्ति जमीन खोदूनच वर काढावी लागते त्याप्रमाणें आत्मचिंतनरूप खननानेंच आत्म्याची प्राप्ति करून घ्यावी लागते. जेथें भांडार पुरलेलें असतें त्याच्यावर एक मोठी शिळा असते तसाच हा देह आत्मसाक्षात्कारावरील अति जड झांकण आहे. यास्तव भांडारावरील दगडाप्रमाणें या देहाचा निरास अगोदर करावा. ह्मणजे प्रथम देहाभिमान सोडावा. तदनंतर विवेकरूप कुदळीनें संकल्पात्मक मनास खणावें ह्मणजे त्याची कल्पनाशक्ति (विक्षेप) नाहींशी करून टाकावी. आणि असें झालें असतां जमीन खोदल्यावर जसें भांडार सांपडतें त्याप्रमाणें सर्वेश्वर हातीं लागतो. तात्पर्य, सतत आत्मानुसंधान केल्यास आत्मज्ञान झाल्यावांचून रहात नाहीं. ॥ ५२, ५३, १५४ ॥

आतां–ज्ञान जरी तात्काल न झालें तरी शेवटपर्यंत ध्यान सोडूं नये–असें सांगतात:–

अनुभूतेरभावेऽपि ब्रह्मास्मीत्येव चिन्त्यताम् ॥
अप्यसत्प्राप्यते ध्यानान्नित्याप्तं ब्रह्म किं पुनः ५५ ॥

अन्वय:—अनुभूतेः अभावे अपि ' अहं ब्रह्म अस्मि ' इति एव चिन्त्यताम् । ध्यानात् असत् अपि प्राप्यते किं पुनः नित्याप्तं ब्रह्म ।

अर्थ:—अनुभवाचा जरी अभाव असला तरी ' मी ब्रह्म आहें ' असेंच चिंतन करावें. कारण ध्यानाच्या योगानें असत् वस्तुही जर मिळविली जाते तर मग नित्य प्राप्त ब्रह्माविषयीं काय सांगावें ! ॥ १५५ ॥

विवरण:—आत्म्याचा अनुभव येत नाहीं म्हणून आत्मचिंतनही सोडणें चांगलें नव्हे. कारण त्याचा कधीं तरी उपयोग झाल्यावांचून रहात नाहीं असा शास्त्रनियम आहे. शिवाय ध्यानामुळें पूर्वी नसलेलें देवत्वही जर प्राप्त होतें तर ध्यान करणाऱ्या पुरुषाच्या आत्मरूप व सर्वदा सर्वत्र असणारें ब्रह्म ध्यानामुळें प्राप्त होईल हें काय सांगावें ! देवाचें चिंतन केल्यास साधक देव होतो; असें श्रुतीमध्यें सांगितलें आहे; पण ब्रह्म आत्मरूप असल्यामुळें साधकास जसें तें ध्यानापूर्वी व ध्यानासमयींही प्राप्त असतें तें देवत्व नसतें. म्हणूनच त्यास ' असत् ' व ब्रह्मास ' नित्य आप्त ' असें या श्लोकांत म्हटलें आहे. ॥ १५५ ॥

ध्यानाचें फल दृष्ट आहे. याकरितां त्याचा अनादर करणें अगदीं उचित नव्हे. असें आतां सांगतात:-

अनात्मबुद्धिशैथिल्यं फलं ध्यानाद्दिने दिने ॥
पश्यन्नपि न चेद्ध्यायेत्कोऽपरोऽस्मात्पशुर्वद ॥ ५६ ॥

अन्वय:—ध्यानात् दिने दिने अनात्मबुद्धिशैथिल्यं फलं पश्यन् अपि पुरुषः न ध्यायेत् चेत् अस्मात् अपरः कः पशुः वद ।

अर्थ:—ध्यानामुळें प्रतिदिनीं मिळणारें अनात्मबुद्धिशैथिल्यरूप फळ पाहत असूनही जर पुरुष ध्यान न करील तर त्याच्याहून दुसरा पशु कोण सांग पाहूं. १५६ ॥

विवरण:—ध्यानाचें फळ दृष्ट आहे. जसें जसें ध्यान दृढ होत जातें तसतसा देहादिकांवरील आत्माभिमान नाहींसा होत जातो. म्हणजे देह आत्मा नव्हे;

बुद्धीही जड आहे; इत्यादि शास्त्रांत सांगितलेल्या गोष्टींचा प्रत्यय येऊं लागतो. व असें प्रतिदिनीं अनुभवास येत असतांही जो नराकृति ध्यान करीत नाहीं व बाह्य विषयामध्येंच निमग्न होऊन रहातो त्यास मनुष्य तरी कसें म्हणावें ? हा मोठाच प्रश्न आहे. ॥ १५६ ॥

सारांश:—

देहाभिमानं विध्वस्य ध्यानादात्मानमद्वयम् ॥
पश्यन्मर्त्योऽमृतो भूत्वा ह्यत्र ब्रह्म समश्नुते ॥ ५७ ॥

अन्वय:—ध्यानात् देहाभिमानं विध्वस्य अद्वयं आत्मानं पश्यन् मर्त्यः अमृतः भूत्वा अत्र हि ब्रह्म समश्नुते ।

अर्थ:—ध्यानाच्या योगानें देहाभिमानाचा विध्वंस करून अद्वय आत्म्यास पहाणारा मर्त्य अमर होऊन येथेंच ब्रह्मानंद भोगतो. ॥ १५७ ॥

विवरण:—ध्यानामुळें सर्व अनर्थास कारण होणारा अभिमान नष्ट होतो. त्याच्या नाशानंतर मनामध्यें विक्षेपाचें कारणच न राहिल्यामुळें साधकास आत्मसाक्षात्कार होतो. 'जो ब्रह्मास जाणतो तो ब्रह्म होतो' अशी श्रुति असल्यामुळें आत्मसाक्षात्काराच्या योगानें मनुष्यधर्मवान् साधक अमर होतो; व या शरीरांत असतांनाच जीवन्मुक्तीचा अनुभव घेतो. सारांश, ध्यान हें परम फलदायक आहे. ॥ १५७ ॥

आतां अशा प्रकाराच्या अभ्यासाचें फल सांगून नवव्या ध्यानदीपाची समाप्ति करितात:—

ध्यानदीपमिमं सम्यक्परामृशति यो नरः ॥
मुक्तसंशय एवायं ध्यायति ब्रह्म संततम् ॥ १५८ ॥

अन्वय:—यः नरः इमं ध्यानदीपं सम्यक् परामृशति अयं मुक्तसंशयः एव सततं ब्रह्म ध्यायति ।

अर्थ:—जो पुरुष या ध्यानदीपाचा उत्तम प्रकारें विचार करितो तो संशयशून्य होत्साता सतत ब्रह्माचें ध्यान करूं लागतो. ॥ १५८ ॥

विवरण:—ह्या ध्यानदीपाच्या विषयाचें ग्रंथकारांनीं इतक्या उत्तम प्रकारें वर्णन केलें आहे कीं जो याचें दोन वेळ लक्ष्यपूर्वक चिंतन करील त्याची ध्यानाविषयीं श्रद्धा अवश्य वाढेल व तो खचित ब्रह्मचिंतनांत निमग्न होईल. त्यास ध्यानाविषयीं

कोणत्याही प्रकारचा संशय येणार नाहीं. सारांश, अति अभागी पुरुषावांचून दुसऱ्या कोणीही जरी या प्रकरणाचें निरभिमान मनानें चिंतन केलें तरी त्याच्या मनांत आत्मचिंतनाविषयीं अनुराग उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. ज्ञानप्रतिबंधाचा क्षय व्हावा अशी ज्याची इच्छा असेल त्यानें श्रुतिस्मृतिप्रोक्त ध्यानाचें अवश्य अनुष्ठान करावें. चित्ताच्या नाशाचे दोन उपाय आहेत. एक 'योग' व दुसरा 'ज्ञान'. योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध व ज्ञान म्हणजे बरोबर समजूत. पण सर्वांस साधकांस हे उपाय साध्य होत नाहींत. यास्तव ज्यास जो साध्य होण्यासारखा असेल त्यानें त्याचा अंगीकार करावा. पण स्वतःचा उद्धार करून घेतल्यावांचून राहूं नये. हें या सर्व प्रकरणाचें प्रमेय सहा तात्पर्यबोधक लिंगावरूनही सिद्ध होत आहे. पण विस्तार-भयास्तव त्याचा येथें अक्षरशः उल्लेख करीत नाहीं. ॥ १५८ ॥

याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या ध्यानदीप नामक नवव्या प्रकरणाचें श्रीशंकराचार्यभक्त 'विष्णु वामन बापटकृत' सान्वयार्थ मराठी विवरण समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

विचार करावा अशी इच्छा होते. इच्छेचा परिणाम प्रवृत्तीमध्यें होत असल्यामुळें विचारानंतर माया नष्ट होते. माया हा एक मोठा बलवान् रोग असल्यामुळें त्याच्या नाशार्थ विचारही तितक्या योग्यतेचाच करावयास पाहिजे हें उघड आहे. मायेचा नाश झाला असतां शेवटीं एक आत्माच अवशिष्ट राहतो. सारांश, सर्व द्वैतप्रपंचाचा निषेध हाच अपवाद होय. विचार हें त्याचें साधन आहे. अपवादानंतर एकट्या आत्म्यानें राहाणें ह्मणजे ही मुक्तस्थितिच होय, यांत कांहीं शंका नाहीं. ॥ ३ ॥

आतां बंध व मोक्ष ह्मणजे काय तें स्वतः ग्रंथकार सांगतात:—

**अद्वयानंदरूपस्य सद्वयत्वं च दुःखिता ॥**
**बंधः प्रोक्तः स्वरूपेण स्थितिर्मुक्तिरितीर्यते ॥ ४ ॥**

अन्वय:—अद्वयानन्दरूपस्य सद्वयत्वं च दुःखिता बंधः प्रोक्तः । तथा स्वरूपेण स्थितिः मुक्तिः इति ईर्यते ।

अर्थ:—अद्वय व आनंदरूप आत्म्याचें सद्वयत्व व दुःखित्व हाच बंध होय. तसेंच, त्याची स्वरूपानें स्थिति होणें हीच मुक्ति होय. असें सांगितलें आहे. ॥ ४ ॥

विवरण:— वस्तुतः आत्मा अद्वय ह्मणजे सर्वभेदशून्य व आनन्दरूप आहे. पण असें असतांनाही तो प्रतिशरीरीं भिन्न व मायाकार्यामुळें भेदयुक्त असल्यासारखा दिसतो व तो दुःखितही झाला आहे असें अनुभवास येतें; पण हाच बंध आहे. व त्या आत्म्यानें निरुपाधिक अवस्थेंत असणें हीच मुक्ति होय. ॥ ४ ॥

वादी:— पण ' जनकादि राजे कर्मांच्या योगानेंच सिद्ध झाले ' असें भगवानांनीं सांगितलें आहे. तेव्हां कर्मामुळेंच मुक्ति मिळते असें ह्मणण्यास काय प्रत्यवाय आहे! व प्रत्यवाय जर नसेल तर विचाराचीच काय अवश्यकता आहे ?

सिद्धान्ती:—

**अविचारकृतो बंधो विचारेण निवर्तते ॥**
**तस्माज्जीवपरात्मानौ सर्वदैव विचारयेत् ॥ ५ ॥**

अन्वय:— अविचारकृतः बंधः विचारेण निवर्तते । तस्मात् जीवपरात्मानौ सर्वदा एव विचारयेत् ।

अर्थ:—अविचारामुळें होणारा बंध विचाराच्या योगानें निवृत्त होतो. यास्तव जीव व परमात्मा यांच्याविषयीं सर्वदांच विचार करावा. ॥ ५ ॥

विवरण:— आत्म्याला जो बंध होत असतो तो अविवेकामुळेंच होत असतो. अर्थात् विचारायांचून त्याची निवृत्ति होणें शक्य नाहीं. यास्तव बंध निवृत्त व्हावा असें ज्याला वाटत असेल, त्यानें जीव व परमात्मा यांचा कसा संबंध झाला आहे याविषयीं विचार करणेंच उचित होय. आतां भगवानांनीं 'जनकादिक सिद्ध झाले' असें जें म्हटलें आहे; त्यांतील सिद्ध या शब्दाचा मुक्त असा अर्थ न करितां चित्तशुद्धियुक्त असा करावा. म्हणजे त्या वचनाचा सिद्धान्ताशीं विरोध येणार नाहीं. ॥ ५ ॥

जीव व परमात्मा यांच्याविषयीं विचार करावा असें पूर्वी म्हटलें आहे. पण जीवाचें स्वरूप काय आहे? असा सहजच कोणी प्रश्न करील; असें वाटल्यामुळें ग्रंथकार म्हणतात:—

अहमित्यभिमन्ता यः कर्ताऽसौ तस्य साधनम् ॥
मनस्तस्य क्रिये अंतर्बहिर्वृत्ती क्रमोत्थिते ॥ ६ ॥

अन्वय:—यः अहं इति अभिमन्ता असौ कर्ता । तस्य साधनं मनः । क्रमोत्थिते अंतर्बहिर्वृत्ती तस्य क्रिये ।

अर्थ:—जो मी असा अभिमान बाळगणारा तो कर्ता होय. त्याचें साधन मन आहे; व क्रमानें उत्पन्न होणाऱ्या अंतर्बहिर्वृत्ती ह्याच त्याच्या क्रिया आहेत. ॥ ६ ॥

विवरण:—देहादिकांस उद्देशून 'मी' असें जो म्हणतो तोच कर्ता होय. "अत्राहं प्रत्ययी कर्तेत्येवं लोकव्यवस्थितिः ।" प्र० यांतील अहं असा प्रत्यय करणारा कर्ता होय. इत्यादि प्रकारें पूर्वींही ( प्र. २ श्लोक १६ ) श्रीविद्यारण्यांनीं सांगितलें आहे. हा अभिमानी कर्तृत्वादि धर्मविशिष्ट असल्यामुळें जीव होय. कर्ता साधनावांचून कोणतीच क्रिया करूं शकत नाहीं. म्हणून मन हें त्याचें क्रिया-साधन आहे. म्हणजे मनाच्या द्वारा जीव सर्व क्रिया करितो. मन हा एक अंतःकर-णाचा भाग आहे हें निराळें सांगावयास नकोच. पण मनाच्या क्रिया कोणत्या? असें कोणी विचारील म्हणून ग्रंथकार म्हणतात—क्रमाक्रमानें उत्पन्न होणाऱ्या अंतर्बहिर्वृत्ति

याच मनाच्या क्रिया होत. त्या एकाच कालीं उत्पन्न होत नसतात. तर एका वृत्तीचा निरोध करून दुसरी उत्पन्न होत असते. ॥ ६ ॥

आतां–या दोन प्रकारच्या वृत्तीचें स्वरूप व विषय सांगतातः–

अंतर्मुखाऽहमित्येषा वृत्तिः कर्तारमुल्लिखेत् ॥
बहिर्मुखेदमित्येषा बाह्यं वस्त्विदमुल्लिखेत् ॥ ७ ॥

अन्वयः—अहं इति एषा अंतर्मुखा वृत्तिः कर्तारं उल्लिखेत् तथा इदं इति एषा बहिर्मुखा वृत्तिः इदं बाह्यं वस्तु उल्लिखेत् ।

अर्थः—'मी' अशी ही अंतर्मुख वृत्ति कर्त्यास विषय करिते. तसेंच 'हें' अशी ही बहिर्मुख वृत्ति ह्या बाह्य वस्तूंस विषय करिते. ॥ ७ ॥

विवरणः—मनाची 'मी' ही अंतर्मुख वृत्ति व 'हें' ही बहिर्मुख वृत्ति होय. अंतर्मुख वृत्तीचा विषय बुद्धींतील चिदाभास व बहिर्मुख वृत्तीचा बुद्धि इत्यादि सर्व जड वर्ग होय. श्रीमद्भाष्यकारांनीं या उभयविध विषयांसच शारीरक भाष्याच्या आरंभीं 'अस्मत्प्रत्ययगोचर व युष्मत्प्रत्ययगोचर' असें ह्मटलें आहे. पण स्थूल दृष्टया देहांतील विषयांस अंतर् व देहाच्या बाहेरील विषयांस बहिर् विषय असें ह्मणण्याचा प्रघात आहे. व तो कांहीं अंशीं बरोबर आहे. कारण व्यावहारिक अवस्थेंत चिदाभास कर्ता; बुद्धि, मन, इंद्रियें इत्यादि साधनें (करण); व देहाच्या बाहेरील पदार्थ कार्य असें ह्मणत असतात ॥ ७ ॥

वादीः—मनच सर्व क्रिया करितें असा तुमच्या या ह्मणण्याचा अर्थ दिसतो. व तो जर खरा असला तर चक्षुरादि इंद्रियांचा काय उपयोग ?

सिद्धान्ती—

इदमो ये विशेषाः स्युर्गन्धरूपरसादयः ॥
असांकर्येण तान्भिन्द्याद् घ्राणादींद्रियपंचकम् ॥ ८ ॥

अन्वयः—इदमः ये गंधरूपरसादयः विशेषाः स्युः तान् घ्राणादींद्रियपंचकं असांकर्येण भिंद्यात् ।

अर्थः—'हें' या बहिर्वृत्तीच्या विषयाचे जे गंध, रूप, रस इत्यादि भेद असतात त्यांस घ्राणादि पांच इंद्रियें आपापलीं भिन्न भिन्न करितात. ॥ ८ ॥

विवरण:—'हें' या शब्दाचा अर्थ–'मी' या एका वृत्तीहून इतर सर्व कार्यजात–असा आहे. पण–प्रस्तुत प्रसंगी देहाच्या बाहेरील विषयवर्ग–असा त्याचा अर्थ करावा. या सर्व विषयवर्गाचें सामान्यतः ग्रहण मन करितें; पण त्याचें 'हा गंध आहे, हें रूप आहे,' अशा प्रकारें जीवास विशेष ज्ञान करून देण्यास त्यास इतर साधनांचीही जरूर असते. अर्थात् श्रोत्र, त्वक्, नेत्र इत्यादि इंद्रियें पांच नसून विषयांचें पृथक् पृथक् ज्ञान करून देण्यास त्यांची फार अवश्यकता आहे. सारांश 'अहं' असा अभिमान करणारा जीव मन व इंद्रियें यांच्या द्वारा सर्व व्यावहारिक क्रिया करितो. ॥ ८ ॥

असो; याप्रमाणें गेल्या तीन श्लोकांत जीवाचें व त्याच्या साधनांचें निरूपण करून, आतां परमात्म्याचें स्वरूप सांगतात:–

कर्तारं च क्रियां तद्वद्व्यावृत्तविषयानपि ॥
स्फोरयेदेकयत्नेन योऽसौ साक्ष्यत्र चिद्वपुः ॥ ९ ॥

अन्वय:—कर्तारं च क्रियां तद्वत् व्यावृत्तविषयान् अपि यः एकयत्नेन स्फोरयेत् असौ चिद्वपुः अत्र साक्षी ।

अर्थ:—कर्ता, व क्रिया आणि त्याचप्रमाणें भिन्न भिन्न विषयही यांस जो एकाच प्रयत्नानें प्रकाशित करितो, तो चिद्रूप कूटस्थ येथें साक्षी होय.॥९॥

विवरण:—जीव, मनाच्या दोन प्रकारच्या वृत्ति व गंध, रस, रूप इत्यादि परस्पर भिन्न असलेले विषय यांस जो एकाच कालीं प्रकाशित करितो, तो चैतन्यरूप आत्माच वेदान्तशास्त्रांतील साक्षी होय. असा याचा भावार्थ समजावा. एकप्रयत्नेन या शब्दाचा उपयोग करून ग्रंथकारांनी–हा चिद्रूप आत्मा आपली सर्व क्रिया एकदम करितो. मनाप्रमाणें यास त्या क्रमाक्रमानें कराव्या लागत नाहींत; असें सुचविलें आहे. ॥ ९ ॥

आतां–साक्षी, कर्ता, क्रिया व विषय यांस एकाच कालीं कसा प्रकाशित करितो तें दृष्टांत सांगतात:–

ईक्षे शृणोमि जिघ्रामि स्वादयामि स्पृशाम्यहम् ॥
इति भासयते सर्वं नृत्यशालास्थदीपवत् ॥ १० ॥

**अन्वयः**—अहं ईक्षे, शृणोमि, जिघ्रामि, स्वादयामि, स्पृशामि इति नृत्यशालास्थ-दीपवत् सर्वं भासयते ।

**अर्थः**— मीं पाहतों, ऐकतों, वास घेतों, चाखतों व स्पर्श करितों अशा-रीतीनें नृत्यशाळेंतिल दीपाप्रमाणें तो सर्व प्रकाशित करितों. ॥ १० ॥

**विवरणः**—'मी पाहतों, इत्यादि वाक्यांत पाहणारा, विषय व साधन या तिघांची प्रतीति होते. व ती एकाच कालीं होत असते, असें स्पष्ट भासत असल्यामुळें आत्म्यास त्यांतील प्रत्येकास प्रकाशित करण्याकरितां भिन्न भिन्न कालीं भिन्न भिन्न प्रयत्न करावा लागतो; असें ह्मणतां येत नाहीं. आतां तो एकाच कालीं सर्वांस कसा प्रकाशित करूं शकतो ? ही एक शंका आहे. पण तिचें उदाहरणानें समाधान करितां येतें; व त्याकरितांच ग्रंथकारांनीं नृत्यशाळेंतिल दीपाचा दृष्टांत दिला आहे. या दृष्टांताचें पुढच्याच श्लोकांत स्पष्टीकरण व्हावयाचें असल्यामुळें मी येथें विस्तार करीत नाहीं. ॥ १० ॥

**नृत्यशालास्थितो दीपः प्रभुं सभ्यांश्च नर्तकीम् ॥**
**दीपयेदविशेषेण तदभावेऽपि दीप्यते ॥ ११ ॥**

**अन्वयः**—नृत्यशालास्थितः दीपः प्रभुं सभ्यान् च नर्तकीं अविशेषेण दीपयेत् । तथा तदभावे अपि दीप्यते ।

**अर्थः**—नृत्यशाळेंतील दीप सभेचा अध्यक्ष, सभासद, व नाचणारी स्त्री यांस एकसारखेंच प्रकाशित करितो. तसेंच त्यांतील कोणी नसलें तरीही तो स्वतः प्रकाशित होतो. ॥ ११ ॥

**विवरणः**—प्रकाश पाडणें हें दिव्याचें काम आहे. व तें तो कोणत्याही समयीं सारखेंच करूं शकतो. व तें करीतं असतांना त्यास भिन्न भिन्न प्रयासही पडत नाहींत. समजा कीं—एका मोठ्या थोरल्या नाटकगृहांत एक विद्युद्दीप लावून ठेविला आहे. व तेथें नाटक चाललें आहे. आपल्या प्रकाशाच्या हद्दींत जें जें येईल त्या त्यास प्रकाशित करणें एवढेंच त्याचें काम असल्यामुळें, तो नाटकांतील पात्रें, सभासद, सूत्रधार इत्यादि सर्वांस एकाचकालीं प्रकाशित करील; हें उघडच

---

१ या श्लोकांत हा शब्द [illegible] ठाकून आला आहे. २ विजेचा दिवा.

आहे. तेव्हां नाटक संपून सर्व आपापल्या घरीं जरी गेले तरी तो दीप स्वतः प्रकाशित होणारच. कारण नाटकगृहांत कोणी असलें तरी काय व नसलें तरी काय त्याला सारखेंच. ॥ ११ ॥

आणि, ह्या पूर्वोक्त दृष्टान्ताप्रमाणेंचः—

> अहंकारं धियं साक्षी विषयानपि भासयेत् ॥
> अहंकाराद्यभावेऽपि स्वयं भात्येव पूर्ववत् ॥ १२ ॥

अन्वयः—साक्षी अहंकारं धियं विषयान् अपि भासयेत् तथा अहंकाराद्यभावे अपि पूर्ववत् स्वयं भाति एव ।

अर्थः—साक्षी, आत्मा, अहंकार, बुद्धि व विषय या सर्वांसही प्रकाशित करितो व तसेंच, अहंकारादि नसतांनाही तो पूर्वीप्रमाणें आपणच प्रकाशित होतो. ॥ १२ ॥

विवरणः—सारांश, आपणापुढें आलेल्या पदार्थांस किंवा त्यांच्या अभावास प्रकाशित करणें हा प्रकाशरूप वस्तूंचा स्वभावच आहे. त्यामुळें आपल्यापुढें कितीही जरी वस्तु आल्या तरी त्यांस एकसमयावच्छेदें प्रकाशित करण्यास त्यांस मुळींच श्रम पडत नाहींत. किंवा त्यांतील एकालाच प्रकाशित करावें ! बाकीच्यांस करूं नये, हा व्यावहारिक क्षुद्र भेदही ते करीत नाहींत. अथवा आपल्यापुढें कांहीं नसलें तर 'कांहींएक नाहीं' असें दाखविण्यासही त्यांस त्रास वाटत नाहीं. साक्षी आत्मा स्वयंप्रकाश कसा ? हें पूर्वी अनेकवेळां होऊन गेलें आहेच. सारांश; साक्षी जीव, बुद्धिवृत्ति, विषय व सर्वांचा अभाव यांस एकाचकालीं प्रकाशित करूं शकतो.॥१२॥

वादीः—'सत्व गुणांपासून ज्ञान होतें' असें श्रीभगवद्गीतावाक्य असल्यामुळें व सांख्यशास्त्रकारही तसेंच मानीत असल्यामुळें त्यांच्यामध्यें सत्वगुण प्रधान आहे, व रज आणि तम गौण आहेत अशी बुद्धीच जीवादि सर्व भावांस प्रकाशित करिते असें ह्मणणें सयुक्तिक होय. कारण असें मानिल्यानें बुद्धीहून भिन्न साक्षीची कल्पना करावी लागणार नाहीं.

सिद्धांतीः—खरें आहे. तुमच्या ह्मणण्याप्रमाणें चालल्यास साक्षीची कल्पना करावी लागणार नाहीं हें खरें ! पण शास्त्र व अनुभवी पुरुष तसें मानीत नाहींत, त्याला काय करावें ! तर मग शास्त्र व ज्ञानी यांचें काय मत आहे, ह्मणून विचारशील तर सांगतोः—

**निरंतरं भासमाने कूटस्थे ज्ञप्तिरूपतः ॥**
**तद्भासा भास्यमानेयं बुद्धिर्नृत्यत्यनेकधा ॥ १३ ॥**

**अन्वयः**—कूटस्थे ज्ञप्तिरूपतः निरंतरं भासमाने सति तद्भासा भासमाना इयं बुद्धिः अनेकधा नृत्यति ।

**अर्थः**—कूटस्थ आत्मा, ज्ञप्तिरूप असल्यामुळें तो निरंतर भासमान होत असतां त्याच्या प्रकाशाच्या योगानें प्रकाशित होणारी ही बुद्धि अनेक प्रकारें नाचते. ॥ १३ ॥

**विवरणः**—केवळ ज्ञान हेंच कूटस्थाचें स्वरूप आहे. त्यामुळें तो एकसारखा प्रकाशमान होत असतो. त्याला सूर्यादि तेजोमय पदार्थांचा एकदेशी दृष्टान्त पुष्कळ ठिकाणीं दिलेला आढळतो. असो; त्याच्या प्रकाशामुळेंच प्रकाशित होणारी बुद्धि नानाप्रकारचे खेळ करिते. ह्मणजे विषयादिकांस प्रकाशित करण्याची शक्ति बुद्धीची नसून ती आत्म्याचीच होय. पण ती आत्म्याच्या अगदीं जवळ असल्यामुळें व अति स्वच्छ असल्यामुळें त्याचा तो गुण तेव्हांच उचलते; व मीच प्रकाशमय आहें असें बिचाऱ्या दुधखुळ्या अज्ञानी लोकांस सांगते ( दाखविते ). व अनेक सोंगें घेऊन एकसारखी क्रीडा करीत राहते. काम, क्रोध, सुख, दुःख, ज्ञान, अज्ञान इत्यादि सर्व हिचे निरनिराळे वेश ( पार्ट ) च होत. आतां भगवद्गीतेचें वाक्य प्रमाण घेऊन वाद्यानें जी शंका केली होती तिचें निरंतरं या शब्दानेंच समाधान केलें आहे. ह्मणजे बुद्धि सर्वदाच सत्त्वगुण प्रधान असते असा कांहीं नेम नाहीं. तर ती रज आणि तम यांच्या द्वारा क्षणोक्षणीं बदलतही असते, तेव्हां ती विषयादिकांस निरंतर कशी प्रकाशित करूं शकेल ? अर्थात् सतत प्रकाशरूप साक्षी आत्म्याची कल्पना अवश्य करावयास पाहिजे. याविषयीं शारीरकाच्या पांचव्या अधिकरणांत श्रीमच्छंकराचार्यांनीं पुष्कळ विवेचन केलें आहे. पण विस्तारभयास्तव येथें त्याचा अधिक उल्लेख करीत नाहीं. ॥ १३ ॥

आतां–पूर्वोक्त सर्व प्रकार रूपकाच्या द्वारा स्पष्ट करितातः—

**अहंकारः प्रभुः सभ्या विषया नर्तकी मतिः ॥**
**तालाद्यधारीण्यक्षाणि दीपः साक्ष्यवभासकः ॥ १४ ॥**

**अन्वयः**—अहंकारः प्रभुः, विषयाः सभ्याः, मतिः नर्तकी, अक्षाणि तालादिधारीणि च साक्षी अवभासकः दीपः ।

**अर्थः**—अहंकार अध्यक्ष, विषय सभासद, बुद्धि नाचणारी स्त्री, इंद्रियें ताल धरणारीं मागचीं माणसें व साक्षी प्रकाशक दीप होय. ॥ १४ ॥

**विवरणः**—अध्यक्षावर सर्व जबाबदारी असते व लाभ आणि हानि हीं त्याचींच होतात. जीवाच्या ठिकाणीं प्रस्तुत सादृश्य असल्यामुळें त्यास अध्यक्ष असें म्हटलें आहे. नाच, तमाशा, इत्यादि प्रेक्षणीय प्रकार पहाणारांवर अवलंबून असतात. पण त्यांनीं नाचणारांस कांहीं द्रव्यादिकांची लालुच दाखविल्यावांचून नाच होत नाहीं. विषय हे अध्यक्ष जो जीव त्यास भोगाची लालुच दाखवितात व त्यामुळें तो आपल्या अंकित असलेल्या किंवा आपल्या म्हणण्याप्रमाणें वागणाऱ्या बुद्धीस वृत्तिरूपानें नाचावयास लावितो. नाचास रंग आणणारीं वाद्यें वाजविणारीं व सूर देणारीं माणसें लागतात व तींहीं नाचणाऱ्या स्त्रीच्या मागोमाग जात असतात. म्हणजे नाचामध्यें कांहीं वैगुण्य येईल, असें तीं कधींच करीत नाहींत. त्याप्रमाणें इंद्रियें बुद्धीच्या मागोमाग तिच्या वृत्तिरूप नाचास साह्य करीत असतात. व ह्या सर्वांस एकाच कालीं भासविणारा जसा रंगशाळेंत दीप असतो तसाच हा सर्वावभासक साक्षी होय. सारांश, नाटकाचें रूपक या शरीरस्थितीमध्यें पूर्णपणें लागू पडतें. ॥ १४ ॥

**वादीः**—अहो, पण साक्षी अहंकारादिकांचा अवभासक आहे कीं नाहीं ? झाले तर, तो विकारी आहे असें तुमच्याच तोंडानें सिद्ध होत आहे.

**सिद्धान्तीः**—जो अवभासक असतो तो विकारीच असतो, असा कांहीं नियम नाहीं. कारणः—

**स्वस्थानसंस्थितो दीपः सर्वतो भासयेद्यथा ॥**
**स्थिरस्थायी तथा साक्षी बहिरन्तः प्रकाशयेत् ॥ १५ ॥**

**अन्वयः**—स्वस्थानसंस्थितः दीपः यथा सर्वतः भासयेत् तथा स्थिरस्थायी साक्षी बहिः अंतः प्रकाशयेत् ।

**अर्थः—आपल्या ठिकाणींच असणारा दीप जसा सर्व बाजूंस प्रकाश पाडतो, त्याप्रमाणें स्थिर रहाणारा साक्षी आंतील व बाहेरील विषयांस प्रकाशित करितो. ॥ १५ ॥**

**विवरणः**—दिवा कोठें तरी ठेवितात व त्याचा चोहोंकडे प्रकाश पडून तेथील सर्व पदार्थ प्रकाशित होतात; हें सर्वांस ठाऊक आहे. पण पदार्थांस प्रकाशित केल्यामुळें दिव्यास कांहीं विकार होत असल्याचें दिसत नाहीं. तसाच आत्माही देहांतील व देहाच्या बाहेरील विषयांस प्रकाशित करीत असतांना स्वतः विकारी होत नाहीं. पदार्थ प्रकाशित होणें हें त्याच्या प्रकाशाचें केवळ माहात्म्यच आहे. ॥ १५ ॥

आतां–विषयांस 'आंतिल व बाहेरील' असें जें ह्मटलें आहे त्याचें कारण सांगतातः–

**बहिरंतर्विभागोऽयं देहापेक्षो न साक्षिणि ॥**
**विषया बाह्यदेशस्था देहस्यांतरहंकृतिः ॥ १६ ॥**

**अन्वयः**—अयं अंतर्बहिर्विभागः देहापेक्षः साक्षिणि न वर्तते । विषयाः देहस्य बाह्यदेशस्थाः अहंकृतिः अंतःस्था ।

**अर्थः**—हा अंतर्बहिर्विभाग देहाच्या अपेक्षेनें असल्यामुळें साक्षीमध्यें रहात नसतो. विषय देहाच्या बाह्यप्रदेशीं रहाणारे व अहंकार आंत राहाणारा आहे. ॥ १६ ॥

**विवरणः**—शब्दस्पर्शादि विषय देहाच्या बाहेर असतात हें उघड आहे. व अहंकार अंतःकरणावर रहात असल्यामुळें तो देहांत असतो; हेंही असत्य नव्हे. अर्थात् अंतर्विषय व बहिर्विषय असा जो हा भेद झालेला आहे तो देहामुळें होय, साक्षीमुळें नव्हे. ॥ १६ ॥

**वादीः**—आंतील व बाहेरील विषयांस स्थिर रहाणारा साक्षीच प्रकाशित करितो; हें ह्मणणें युक्त नव्हे. कारण, विकाररहित साक्षी अमुक एक क्रिया करितो हें ह्मणणें सदोष आहे. शिवाय 'मी घटास पहातों' इत्यादि वाक्यांतील 'मी' जो अहंकार त्यास प्रथमतः प्रकाशित करून नंतर तो चैतन्यरूप साक्षीच घटाकार वृत्तीच्या स्फुरणरूपानें इंद्रियांच्या द्वारा बाहेर पडतो; असा सर्वांचा अनुभवही आहे. तेव्हां तो निर्विकार आहे हें ह्मणणें बरोबर नाहीं.

**सिद्धान्तीः**—

**अंतःस्था धीः सहैवाक्षैर्बहिर्याति पुनः पुनः ॥**
**भास्यबुद्धिस्थचांचल्यं साक्षिण्यारोप्यते वृथा ॥ १७ ॥**

**अन्वय:**—अंतःस्था धीः अक्षैः सह एव पुनः पुनः बहिः याति । तथा च भास्य-बुद्धिस्थचांचल्यं साक्षिणि वृथा एव आरोप्यते ।

**अर्थ:**—आंत असणारी बुद्धि इंद्रियांसह वारंवार बाहेर जाते. आणि असें असतांना प्रकाशित होणाऱ्या बुद्धींतील चंचलता साक्षीच्या ठायीं उगीच आरोपित केली जाते. ॥ १७ ॥

**विवरण:**—बुद्धि देहांत असते हें आबालवृद्धांस ठाऊक आहे. ती साक्षी-कडून सर्वदां प्रकाशित होत असते. म्हणजे चंद्रांतील तेज जसें खुद्द त्याचें नसून तें सूर्यापासून मिळालेलें असतें त्याप्रमाणें बुद्धिमध्यें दिसणारें चैतन्य खुद्द बुद्धीचें नसून तें आत्म्यापासून तिला मिळालेलें असतें. व त्या उसन्या चैतन्याच्या जोरावर ती क्षणो-क्षणीं इंद्रियांच्या द्वारा बाहेर पडून पदार्थांस व्यापिते. अर्थात् चंचलता हा बुद्धीच, धर्म होय. आत्म्याचा नव्हे. पण, जे तुझ्या सारखे अविवेकी असतात त्यांना हा सूक्ष्म विचार कोणी सांगितल्यावांचून समजत नाहीं. व त्यामुळें ते बुद्धीचा विकार आत्म्याच्या माथीं मारितात. ॥ १७ ॥

हीच गोष्ट आतां दृष्टान्ताच्या द्वारा स्पष्ट करितात:-

> गृहांतरगतः स्वल्पो गवाक्षादातपोऽचलः ॥
> तत्र हस्ते नर्त्यमाने नृत्यतीवातपो यथा ॥ १८ ॥
> निजस्थानस्थितः साक्षी बहिरंतर्गमागमौ ॥
> अकुर्वन् बुद्धिचांचल्यात्करोतीव तथा तथा ॥ १९ ॥

**अन्वय:**—गवाक्षात् गृहांतरगतः स्वल्पः आतपः अचल एव वर्तते किंतु तत्र हस्ते नर्त्यमाने सति यथा आतपः नृत्यति इव तथा निजस्थानस्थितः साक्षी बहिरंतर् गमा-गमौ अकुर्वन् एव सन् बुद्धिचांचल्यात् तथा करोति इव ।

**अर्थ:**—झरोक्यांतून गृहांमध्यें आलेलें लहानसें किरण (कवडसा) स्थिरच असतें. पण त्यांतून जर कोणी आपला हात हलवून तिकडे नाचवूं लागेल तर तें किरणच नाचत आहे, असा त्याप्रमाणें भास होतो; त्याप्रमाणें आपल्या स्थानींच असलेला साक्षी आंत बाहेर जात येत नसतांनाही बुद्धीच्या चंचलतेमुळें आंत बाहेर जात येत आहे; असें वाटतें. ॥ १८ ॥ ॥ १९ ॥

**विवरण:**—झरोक्यांतून घरांत पडणाऱ्या कवडशाशीं लहान लहान मुलें खेळत असतात. व तो एके ठिकाणींच असतांना हातांच्या नाचविण्यामुळें तोच नाचत आहे कीं काय असा भास होतो. तसाच या आत्म्याच्या विकाराचाही प्रकार आहे. ह्मणजे बुद्धीच्या चंचलतेमुळें त्या बिचाऱ्या निर्लेप आत्म्यावर विकारित्वाचा उगीच आरोप होतो. दुष्ट वस्तूंच्या संगतीचा असाच परिणाम व्हावयाचा. **निजस्थानस्थित:**-कूटस्थ साक्षीचें मुख्य स्थान ब्रह्मत्व ( जगदधिष्ठानत्व ) आहे. त्यांत असलेला ह्मणजे आपल्या मुख्य स्वरूपापासून च्युत न झालेला; विकार न पावलेला; असा याचा अर्थ समजावा. ॥ १८ ॥ १९ ॥

' निजस्थानस्थितः ' या शब्दाचें आतां स्वतः ग्रंथकार स्पष्टीकरण करितातः–

**न बाह्यो नांतरः साक्षी बुद्धेर्देशौ हि तावुभौ ॥**
**बुद्ध्याद्यशेषसंशांतौ यत्र भात्यस्ति तत्र सः ॥ २० ॥**

अन्वयः—साक्षी न बाह्यः । नच आंतरः । हि तौ उभौ बुद्धेः देशौ स्तः । अतः बुद्ध्याद्यशेषसंशांतौ यत्र भाति तत्र सः अस्ति ।

**अर्थः**—साक्षी बाह्य नाहीं व अंतरही नाहीं. कारण ते दोन्ही बुद्धीचे देश होत. यास्तव बुद्ध्यादि सर्वांची पूर्णपणें शांति झाली असतां जेथें तो भासतो, तेथेंच सदा असतो. ॥ २० ॥

**विवरण:**—साक्षी सदा स्वस्थानींच असतो ह्मणजे काय ? देहाच्या बाहेरील प्रदेश हें त्याचें स्थान नव्हे, व आंतील प्रदेश हेंही नव्हे. तर बुद्धि, इंद्रियें, प्राण, इत्यादि सर्व सूक्ष्म कार्यांचा प्रयत्नानें लय केला असतां तो जेथें दिसतो तेंच त्याचें खरें स्थान आहे. व्यवहारकालींही तो तेथेंच असतो. बुद्धि इत्यादि साधनांनीं इकडे काय पाहिजे तें जरी केलें तरी तो आपलें स्थान सोडीत नाहीं. तेथूनच आपली शक्ति त्यांस उसनी देत असतो. सारांश तो सर्वकालीं निर्विकारच आहे. व त्याला साक्षी ही जी संज्ञा येत असते ती तरी बुद्ध्यादि जड पदार्थांच्या अपेक्षेनेंच होय असें समजावें. ॥ २० ॥

**बुद्ध्यादि सर्वांचा लय झाल्यानंतर मुळीं प्रदेशच रहात नाहीं. मग ' जेथें तो भासतो ' इत्यादि ह्मणणें युक्तिक कसें होईल ? इत्यादि शंका घेऊन समाधान करितातः–**

**देशः कोऽपि न भासेत यदि तर्ह्यस्त्वदेशभाक् ॥**
**सर्वदेशप्रक्लृप्त्यैव सर्वगत्वं न तु स्वतः ॥ २१ ॥**

अन्वयः—यदि कः अपि देशः न भासेत तर्हि अदेशभाक् अस्तु । सर्वदेश-प्रक्लृप्त्या एव सर्वगत्वं स्वतः तु न ।

अर्थः— जर कोणताहि देश भासत नाहीं असें ह्मणशील तर साक्षी देशरहितच असो. सर्वदेशाच्या कल्पनेमुळेंच त्याला सर्वगत्व आहे; स्वभावतः नव्हे. ॥ २१ ॥

विवरणः—सर्वांचा प्रलय झाल्यावर साक्षीस रहाण्यास मुळीं जागाच उरत नाहीं, असें जर ह्मटलें तर तें आह्मांस इष्ट आहे. कारण देशादि व्यावहारिक पदार्थांच्या अधिष्ठानास देशादिकांची मुळीं गरजच नसते. ह्मणजे देशादि कल्पना बाह्य व अर्वाचीन आहेत.

वादीः—तरमग त्या परमात्म्यास तुह्मी सर्वगत कसें ह्मणतां ?

सिद्धान्तीः—देशादि सर्व पदार्थांची त्याच्याठायींच कल्पना झालेली असल्यामुळें तो सर्वांचें अधिष्ठान आहे. व अधिष्ठान आरोपित पदार्थास व्यापून टाकीत असतें असा न्याय व अनुभव आहे, आणि त्यामुळें त्यास सर्वगत, सर्वशक्ति, सर्वांतर्यामी इत्यादि सर्व नांवें प्राप्त झालीं आहेत. पण तीं त्याच्या स्वभावभूत नव्हेत. ॥ २१ ॥

त्याचें सर्वसाक्षित्व हें नांवही खरें नव्हे असें आतां सांगतातः-

**अंतर्बहिर्वा सर्वं वा यं देशं परिकल्पयेत् ॥**
**बुद्धिस्तद्देशगः साक्षी तथा वस्तुषु योजयेत् ॥ २२ ॥**

अन्वयः—बुद्धिः अंतः वा बहिः वा सर्वं वा यं देशं परिकल्पयेत् तद्देशगः साक्षी वस्तुषु तथा योजयेत् ।

अर्थः—बुद्धि आंतील देश, बाहेरील देश, सर्व देश इत्यादि ज्या देशाची कल्पना करील त्या देशामध्यें जाणारा साक्षी वस्तूंच्या ठायीं तशा [illegible] [illegible]. ॥ २२ ॥

**विवरणः**—देशादि सर्व पदार्थांची कल्पना अनादि अज्ञानामुळें बुद्धि करिते सर्व कल्पनांचे अधिष्ठान कूटस्थ आत्माच आहे. अर्थात् बुद्धि जी जी कल्पना करिते तिच्या तिच्या मुळाशीं हा असतोच आणि त्यामुळें तो सर्व कल्पनांचा साक्षी होऊन 'हा अहंकार, हे बाहेरील घटादि पदार्थ' इत्यादि भासवितो. तात्पर्य सर्व-साक्षित्व हाही एक आरोप आहे. ॥ २२ ॥

सारांशः—

**यद्यद्रूपादि कल्प्येत बुद्ध्या तत्तत्प्रकाशयन् ॥**
**तस्य तस्य भवेत्साक्षी स्वतो वाग्बुद्ध्यगोचरः ॥ २३ ॥**

**अन्वयः**—बुद्ध्या यत् यत् रूपादि कल्प्येत तत् तत् प्रकाशयन् स्वतः वाग्बुद्ध्यगोचरः तस्य तस्य साक्षी भवेत् ।

**अर्थः**—बुद्धीकडून ज्या ज्या रूपादि विषयाची कल्पना केली जाते, त्या त्या विषयास प्रकाशित करणारा स्वतः वाणी व बुद्धि यांचा विषय नसतां-नाही त्याचा त्याचा साक्षी होतो. ॥ २३ ॥

**विवरणः**—बुद्धि विषयांची कल्पना करिते व आत्मा त्या सर्वांस प्रकाशित करितो. आणि त्यामुळेंच तो त्यांचा साक्षी होतो. पण वस्तुतः तो वाणी व मन यांना विषय होणारा नाहीं. ह्मणजे अशा आत्म्यास साक्षी ह्मणणें हें सुद्धां गौणच होय. पण काय करणार ? त्यावांचून व्यवहार होऊंच शकत नाहीं. ॥ २३ ॥

आतां—आत्मा जरी वस्तुतः कोणत्याही साधनाचा विषय होत नसला तरी मुमुक्षूस त्याचें कसें ज्ञान होऊं शकतें ? तें प्रश्नपूर्वक सांगतातः—

**कथं तादृङ्मया ग्राह्य इति चेन्मैव गृह्यताम् ॥**
**सर्वग्रहोपसंशांतौ स्वयमेवावशिष्यते ॥ २४ ॥**

**अन्वयः**—तादृक् मया कथं ग्राह्यः इति चेत् मा गृह्यतां एव । सर्वग्रहोपसंशांतौ सः स्वयं एव अवशिष्यते ।

**अर्थः**—अशाप्रकारच्या आत्म्याचें मला कसें ग्रहण करितां येईल ? असें जर विचारशील तर तं मुळीं ग्रहण करूंच नकोस; असें आम्ही सांगतों

अइणकरिता येणाऱ्या सर्व वस्तूंची उत्तमप्रकारें शांति झाली असतां तो आपोआप अवशिष्ट रहातो. ॥ २४ ॥

विवरण:—"वाणी व मन हीं दोन्ही ज्ञानाचीं फार उत्तम साधनें आहेत. पण त्यांच्या योगानें तर आत्म्याचें ज्ञान होत नाहीं; असें म्हणतां! तेव्हां त्याचें ज्ञान व्हावें तरी कसें? तें सर्व, आत्मज्ञान अशक्य आहे असें मी समजतों." असें जर तूं म्हणशील तर तें आम्हांस इष्टच आहे. कारण त्याचें जर बुद्धिद्वारा ज्ञान होऊं लागलें, तर घटादि जड पदार्थ व आत्मा यांच्यामध्यें मुळींच अंतर राहणार नाहीं. म्हणजे तो जड आहे; असें म्हणावें लागेल. वास्तव त्याचें ज्ञान साधनांच्या योगानें होत नाहीं हेंच म्हणणें आम्हांस पूर्ण मान्य आहे. तर मग मुमुक्षु कृतार्थ कसे होतील? म्हणून जर विचारशील तर सांगतों—आत्मा व अनात्मवर्ग यांचा दीर्घकाल (बाध) विचार करून त्यांच्या विषयीं पूर्ण विवेक झाला म्हणजे सर्व अनात्मवर्गाचा लय होतो व तदनंतर आत्मा स्वतःच अवशिष्ट रहातो. आणि तो स्वयंप्रकाश असल्यामुळें त्याचें ग्रहण कसें करितां येईल ही शंकाच येत नाहीं. ॥ २४ ॥

कारण:—

न तत्र मानापेक्षाऽस्ति स्वप्रकाशस्वरूपतः ॥
तादृग्व्युत्पत्त्यपेक्षा चेच्छ्रुतिं पठ गुरोर्मुखात् ॥ २५ ॥

अन्वय:—स्वप्रकाशस्वरूपतः तत्र मानापेक्षा न अस्ति। तादृक् व्युत्पत्त्यपेक्षा चेत् गुरोः मुखात् श्रुतिं पठ।

अर्थ:—आत्मा स्वप्रकाशस्वरूप असल्यामुळेंच त्यास इंद्रियसंज्ञक प्रमाणाची अपेक्षा नसते. आतां, अशा प्रकारच्या ज्ञानाचीच जर अपेक्षा असेल तर गुरुमुखानें श्रुतीचें पठण कर. ॥ २५ ॥

विवरण:—जड पदार्थांच्या ज्ञानास इंद्रियांची अपेक्षा असते व स्वप्रकाश पदार्थास त्यांची अपेक्षा नसते. पण आत्मा स्वयंज्योति आहे, हें अगोदर समजलें पाहिजे. व त्याकरितां गुरुमुखानें वेदान्ताध्ययन करणें अति अवश्य आहे. ॥ २५ ॥

'हा सर्व उत्तमाधिकाऱ्याकरितां उपदेश आहे. माझ्यासारख्या मंदाकरितां नव्हे.' म्हणून जर म्हणशील तर तुझ्याकरितांही उपाय सांगतों, ऐक:—

यदि सर्वग्रहत्यागोऽशक्यस्तर्हि धियं व्रज ॥
शरणं तदधीनोऽन्तर्बहिर्वैषोऽनुभूयताम् ॥ २६ ॥

अन्वयः—यदि सर्वग्रहत्यागः अशक्यः तर्हि धियं शरणं व्रज । तदधीनः अंतः वा बहिः एषः अनुभूयताम् ।

अर्थः—सर्व प्रत्ययरूप ग्रहाचा त्याग करणें अशक्य आहे, असें जर तुला वाटत असलें; तर तूं बुद्धीस शरण जा. व बुद्धीच्या अधीन राहणाऱ्या ह्या साक्षीचा अंतरविषयांमध्यें किंवा बाह्य विषयांमध्यें अनुभव घे. ॥ २६ ॥

विवरण:—ज्यांना चित्ताच्या ऐकाग्र्याची युक्ति ठाऊक नसते त्यांना देह व इंद्रियें जोंपर्यंत अस्तित्वांत आहेत तोंपर्यंत विषयजन्य ज्ञान झाल्यावांचून रहाणार नाहीं असें वाटतें, ह्मणून त्यांच्याकरितां येथें दुसरा उपाय सांगितला आहे. सर्व ज्ञानाचा बाध होणें शक्य नाहीं असें वाटत असल्यास बुद्धीचाच आश्रय करणें हा अगदीं सोपा उपाय आहे. आतां बुद्धीचाच आश्रय केल्यास कोणता लाभ होणार ? ह्मणून जर विचारशील तर सांगतों. बुद्धि ज्या ज्या बाह्य किंवा आंतर विषयाची कल्पना करिते तिचा साक्षी जो परमात्मा त्याचा सर्वदां अनुभव घ्यावा. थोडक्या विचारानेंच या साक्षीची ओळख होणें शक्य असल्यामुळें हा अगदीं सोपा उपाय आहे; असें ह्मटलें आहे. मुक्तिरूप फलविषयींचा मतभेद नाहींसा करणें हा या प्रकरणाचा मुख्य उद्देश आहे; व सहा तात्पर्य लिंगावरूनही हीच गोष्ट निश्चित होत आहे. ॥ २६ ॥

ह्याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या नाटकदीपाख्य दहाव्या प्रकरणाचें श्रीमच्छंकराचार्यभक्त 'विष्णु वामन बापटकृत' सान्वयार्थ मराठी विवरण समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु. ॥

# अथ ब्रह्मानन्दे योगानन्दः ।

श्रीभारतीतीर्थांनीं दहाव्या प्रकरणाच्या शेवटीं ‘ बुद्धीचा आश्रयकर ’ असें म्हटलें आहे. पण त्याप्रमाणें वागणाऱ्या साधकास बुद्धीचा आश्रय सहज कसा करितां येईल? हें सांगण्याकरितां पंचदशीचें हें अकरावें प्रकरण प्रवृत्त झालें आहे.

ब्रह्मानंदं प्रवक्ष्यामि ज्ञाते तस्मिन्नशेषतः ॥
ऐहिकामुष्मिकानर्थव्रातं हित्वा सुखायते ॥ १ ॥

अन्वयः—ब्रह्मानन्दं प्रवक्ष्यामि । तस्मिन् अशेषतः ज्ञाते सति ऐहिकामुष्मिकानर्थव्रातं हित्वा सुखायते ।

अर्थः—ब्रह्मानन्दाचें व्याख्यान करितों. त्याचें निःशेष ज्ञान झालें असतां ऐहिक व पारलौकिक अनर्थ समूह सोडून साधक सुखी होतो. ॥ १ ॥

विवरणः—या पुढील पांचही प्रकरणास ब्रह्मानंद ही संज्ञा आहे. व त्यांतील योगानन्दसंज्ञक हें प्रकरण त्याच्या प्रथमाध्यायासारखें आहे. ‘ ब्रह्मानन्दाचें वर्णन करितों ’ असें प्रथमतःच ह्मणून ग्रंथकारांनीं विषयाची प्रतिज्ञा व ब्रह्म या पदार्थाचें उच्चारणरूप मंगल ही दोन्ही येथें केलीं आहेत. पण, जोंपर्यंत कोणत्याही कामाचें फल समजत नाहीं तोंपर्यंत प्राण्याची त्यांत प्रवृत्तिही होत नाहीं, असा नियम असल्यामुळें ब्रह्मानन्दाच्या ज्ञानापासून कोणता लाभ होणार; हेंही येथें स्पष्टपणें सांगितलें आहे. ऐहिका०—पुत्र, स्त्री इत्यादि पदार्थांच्याठायीं अभिमान ठेविल्यामुळें प्राप्त होणाऱ्या अनर्थास ऐहिक व परलोकीं गेल्यावर तेथें पापकर्मामुळें भोगाव्या लागणाऱ्या दुःखांस पारलौकिक अनर्थ ह्मणतात. पण, ब्रह्मानन्दाच्या ज्ञानानें या सर्वांचा नाश होत असल्यामुळें प्रत्येक मनुष्यानें त्याचें ज्ञान करून घ्यावें. ॥ १ ॥

‘ ब्रह्मज्ञानाच्या योगानें अनिष्टनिवृत्ति व इष्टप्राप्ति होते. या आमच्या ह्मणण्यास अनेक श्रुति व स्मृति प्रमाण आहेत. ’ हें सुचविण्याकरितां या दुसऱ्या श्लोकांत ग्रंथकार दोन श्रुतिवाक्यें अर्थतः घेतात:—

ब्रह्मवित्परमाप्नोति शोकं तरति चात्मवित् ॥
रसो ब्रह्मरसं लब्ध्वाऽऽनंदीभवति नान्यथा ॥ २ ॥

**अन्वयः**—ब्रह्मवित् परं आप्नोति । च आत्मवित् शोकं तरति । असौ रसः । ब्रह्मरसं लब्ध्वा आनंदी भवति न अन्यथा ।

**अर्थः—ब्रह्मज्ञानी आनंदरूप ब्रह्मास मिळतो. व आत्मज्ञानी दुःखांतून पार जातो. हा आत्मा रस आहे व आनंदरूपब्रह्मासच प्राप्त होऊन हा आनंदित होतो. दुसऱ्या कोणत्याही प्रकारें होत नाहीं. ॥ २ ॥**

**विवरणः**—ब्रह्मास जो जाणतो तो ब्रह्मवित्. अर्थात् ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे असा पुरुष अति श्रेष्ठ जें ब्रह्म तद्रूपच होऊन जातो. हें तैत्तिरीयोपनिषदांतील वाक्य आहे. ' देश, काल व वस्तु यांच्या योगानें मर्यादित न होणारें भूमसंज्ञक ब्रह्म मी आहें, अशा रीतीनें आत्म्यास जो जाणतो त्याचा तमोमूलक संसार नष्ट होतो. ' हें छान्दोग्यांतील वाक्य आहे. तैत्तिरीयांत तर पुढें असेंही ह्मटलें आहे कीं–हा आत्माच रस ( ह्मणजे आनंदरूप ) आहे. व या ब्रह्मरूप रसास जाणूनच ( ह्मणजे दोघांचें ऐक्य आहे असें समजल्यामुळेंच ) तो आनंदी ( निरतिशय सुखरूप ) होतो. पूर्ण आनंदी होण्यास अशाप्रकारच्या आत्मज्ञानावांचून दुसरा उपायच नाहीं. २

शिवाय प्रस्तुत श्रुतींत असेंही सांगितलें आहे कीं,

**प्रतिष्ठां विंदते स्वस्मिन् यदा स्यादथ सोऽभयः ॥**
**कुरुतेऽस्मिन्नंतरं चेदथ तस्य भयं भवेत् ॥ ३ ॥**

**अन्वयः**—यदा स्वस्मिन् प्रतिष्ठां विंदते अथ सः अभयः स्यात् । अस्मिन् अंतरं कुरुते चेत् अथ तस्य भयं भवेत् ।

**अर्थः—ज्या वेळीं यास स्वरूपीं जागा मिळते तेव्हां तो निर्भय होतो. व यानें जर त्याच्या स्वरूपांत कोठें भेद पाहिला तर त्याच्यावर मोठें भय ओढवतें. ॥ ३ ॥**

**विवरणः—ज्यावेळीं हा मुमुक्षु या विद्वदनुभवगम्य, इंद्रियागोचर, स्वकीयत्व या भावावांचून, शब्दातीत, निराधार व द्वितीयत्व नसल्यामुळें अभय अशा वस्तूच्या ठिकाणीं ' मी ब्रह्मच आहें. ' अशा भावनेनें दृढ स्थित होतो त्याच वेळीं तो निर्भय व अद्वितीय अशा ब्रह्माचे स्वरूपीं मिळतो. आणि ज्यावेळीं हा या पूर्वोक्त गुणवान् आत्म्याच्याठायीं थोडासाही मंदभाव धरितो त्याचवेळीं त्याच संसारयुक्त दुःख होतें.**

अर्थात् आत्मस्वरूपीं भेदद्दष्टी ठेवणें हाच अनर्थाचा पाया आहे; व अनर्थांतून सुट-ण्याचा पूर्वोक्त गुणयुक्त आत्म्याचें ज्ञान हाच एक उपाय आहे. ॥ ३ ॥

आतां ईश्वराच्या स्वरूपांत उपास्य, उपासक, श्रेष्ठ, कनिष्ठ, इष्ट, अनिष्ठ इत्यादि भेदभाव ठेवणाऱ्या प्राण्यांस अनर्थ प्राप्ति कशी होते, तें आतां सांगतात:—

**वायुः सूर्यो वन्हिरिंद्रो मृत्युर्जन्मांतरेंतरम् ॥**
**कृत्वा धर्मं विजानंतोऽप्यस्माद्भीत्या चरंति हि ॥ ४ ॥**

अन्वय:—वायुः, सूर्यः, वह्निः, इंद्रः च मृत्युः जन्मान्तरे धर्मं विजानन्तः अपि अंतरं कृत्वा अस्मात् भीत्या चरंति हि ।

अर्थ:—वायु, सूर्य, अग्नि, इंद्र व यम हे पूर्व जन्मीं धर्माचें ज्ञानपूर्वक अनुष्ठान करणारे जरी होते तरी भेददृष्टि केल्यामुळें या जन्मीं या ब्रह्माच्या भीतीनें आपापलें काम करितात. ॥ ४ ॥

विवरण:—वायु, सूर्य इत्यादि जगाच्या नियमन करणाऱ्या देवता आहेत; हें प्रसिद्ध आहे. पण त्यांनाही कोणा जबरदस्त शक्तीची भीति असावी असें त्यांच्या नियमित वर्तनावरून अनुमान होतें. व 'याच्या भीतीनेंच वायु वहातो' इत्यादि तैत्तरीय श्रुतीही या ब्रह्माच्या भीतीनें सर्व देवता आपापल्या कामांत निमग्न होतात असें सांगत आहे. अर्थात्–या त्यांच्या भीतीस कांहीं तरी कारण असलेंच पाहिजे. व तें ईश्वराच्या स्वरूपांत भेददृष्टि ठेवणें हेंच होय.—असा पूर्वापर संबंध पाहिला असतां श्रुतीवरूनच निश्चय होत असतो. सारांश, जरी कोणी कोणत्याही प्रकारचा धर्म कितीही ज्ञानपूर्वक केला तरी आत्मस्वरूपांत भेदभाव ठेविल्यास त्याचें भीति हें फल मिळाल्या वांचून रहात नाहीं. ॥ ४ ॥

'ज्याला आत्म्याच्या आनंदाचें ज्ञान होतें त्याला कोणत्याही प्रकारची भीति नसते; व त्याला अंतकालीं पश्चात्तापही होत नाहीं.' असें आतां प्रस्तुत श्रुतीच्या आधारानेंच सांगतात:–

**आनंदं ब्रह्मणो विद्वान्न बिभेति कुतश्चन ॥**
**एतमेव तपेन्नैषा चिंता कर्माग्निसंभृता ॥ ५ ॥**

अन्वयः—ब्रह्मणः आनंदं विद्वान् कुतश्चन न बिभेति। एषा कर्माग्निसंभवा चिंता एतं न तपेत् एव।

अर्थः—ब्रह्माचा आनंद ज्याला समजतो तो कोणालाही भीत नाहीं. व ही कर्मरूप अग्नीपासून निर्माण होणारी चिंता त्याला ताप देत नाहींच. ॥५॥

विवरणः—ब्रह्म आनंदरूप असल्यामुळे 'ब्रह्माचा आनंद' हा शब्दप्रयोग राहूचें शिर या शब्दाप्रमाणें गौण आहे. अर्थात् आनंदरूप ब्रह्माचा ज्या धन्य पुरुषास साक्षात्कार होतो, त्यास ऐहिक व्याघ्रादि व पारलौकिक पापादि यांची भीति वाटत नाहीं. व त्यामुळें अज्ञ पुरुषास मरणसमयीं उत्पन्न होणारी–अरेरे! मी आजपर्यंत पुण्यच कां केलें नाहीं. पाप कशाकरितां केलें–इत्यादि प्रकारची चिंता पडत नाहीं. जे सदा पाप करणारे व पुण्य न करणारे असतात त्यांस अशा प्रकारचा पश्चात्ताप अवश्य होतो. पण अंत्यसमय जवळ आल्यामुळे त्याचा कांहीं इलाज चालत नाहीं. यास्तव शहाण्यानें वेळीच सावध होऊन पुरुषार्थाच्या उद्योगास लागावें; हें चागले. ॥ ५ ॥

पुण्य व पाप ज्ञान्यास अंतकालीं ताप कां देत नाहीं, हें आतां श्रुतीच्या आधारानें सांगतात:—

एवं विद्वान्कर्मणी द्वे हित्वाऽऽत्मानं स्मरेत्सदा ॥
कृते च कर्मणी स्वात्मरूपेणैवैष पश्यति ॥ ६ ॥

अन्वयः—एवं विद्वान् द्वे कर्मणी हित्वा सदा आत्मानं स्मरेत्। च एषः कृते कर्मणी स्वात्मरूपेण एव पश्यति।

अर्थः—अशा प्रकारें जाणणारा पुरुष पुण्य व पापरूप दोन्हीं कर्मांचा त्याग करून सर्वदा आत्म्याचें चिंतन करितो. व नंतर हा केलेल्या कर्मांस आत्मरूपानें पहातो. ॥ ६ ॥

विवरणः—या शरीरांतील व सूर्यांतील चैतन्य पुरुष एकच आहे; असें जो जाणतो, व पुण्यपापरूप कर्में आत्म्याशीं संबंध ठेवित नसल्यामुळें माझा व त्यांचा कांहीं संबंध नाहीं असें जो निःसंशय समजतो, आणि नंतर सर्वसंगपरित्याग करून जो सतत आत्मचिंतन करितो, त्याला अंत्यसमयीं पूर्वोक्त प्रकारें चिंता पडत नाहीं.

वादीः—आत्मज्ञानानंतर होणाऱ्या कर्मांची तुम्ही सांगता तशी व्यवस्था होते, असें जरी मानलें तरी ज्ञानापूर्वी घडलेल्या संचित कर्मांची काय वाट होते? सिद्धान्तीः—ज्ञानानंतर हा आत्मज्ञ पुरुष सर्व संचित कर्मांस आत्मरूपानेंच पाहतो. म्हणजे आत्मा एक व सर्वव्यापी असल्यामुळें त्यास सोडून कोणीही कधीं राहूं शकत नाहीं. अर्थात् मागीं संचित कर्मेंही आत्मरूपच होत, असें तो जाणतो.

वादीः—पण 'कर्म भोगल्यावाचून सुटत नाहीं' असें शास्त्रवचन आहे. शिवाय असंख्य जन्मामध्यें घडलेली असंख्य कर्में केवळ आत्मज्ञान होतांच नष्ट होतात, हें म्हणणें युक्त कसें होईल? सिद्धान्तीः—कर्में असंख्य व ज्ञान एकटें या दिशेनेंच जर तर्क करूं लागलें तर आमचें म्हणणें अयुक्त ठरेल हें खरें. पण, दुसऱ्याही कांहीं गोष्टींचा विचार केल्यास एक महाबलवान् पदार्थ असंख्य अतिक्षुद्र पदार्थांस भारी असतो असेंही ध्यानांत येईल. पण, आम्हांस त्याच्याशीं काय कर्तव्य आहे. साक्षात् श्रुति माउलीच हें सांगत असल्यामुळें तर्कतः कांहीही जरी ठरत असलें तरी तें आम्हांस मान्य नाहीं. 'मुण्डक श्रुति' आत्मज्ञानाच्या योगानें कर्में नष्ट होतात असें स्पष्टपणें सांगत आहे. कोठें म्हणून म्हणशील तर पहाः—

भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥
क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ ७ ॥

अन्वयः—तस्मिन् परावरे दृष्टे सति अस्य हृदयग्रंथिः भिद्यते। सर्वसंशयाः छिद्यंते। च कर्माणि क्षीयन्ते।

अर्थः—हिरण्यगर्भादिकांहूनही श्रेष्ठ अशा त्या परमात्म्याचा साक्षात्कार झाला असतां त्या पुरुषाची हृदयग्रंथी नष्ट होते; सर्व संशय निवृत्त होतात; व पुण्यपापरूप सर्व संचित कर्में क्षीण होतात. ॥ ७ ॥

विवरणः—परावरे० हिरण्यगर्भादिकांच्या स्थानास परं असें म्हणतात. पण तेंही ज्याच्यापुढें निकृष्ट आहे अशा ब्रह्मतत्त्वाचा साक्षात्कार होतांच हृदय–ग्रंथि सुटते. म्हणजे बुद्धि व आत्मा यांचा अनादि अज्ञानामुळें जो अन्योन्याध्यास झालेला असतो तो निवृत्त होतो. सारांश जड चैतन्याचें ऐक्य हीच ग्रंथि व त्यांचा विवेक हाच तिचा भेद होय. आत्मज्ञान होतांच मिळणारें हें पहिलें फल होय. पुढें—आत्मा नैय्यावि-

**इत्यादि श्रुतयो बह्व्यः पुराणैः स्मृतिभिः सह ॥**
**ब्रह्मज्ञानेऽनर्थहानिमानंदं चाप्यघोषयन् ॥ १० ॥**

**अन्वयः**—इत्यादि बह्व्यः श्रुतयः पुराणैः च स्मृतिभिः सह ब्रह्मज्ञाने सति अनर्थहानिं च आनंदं अपि अघोषयन् ।

**अर्थः**—इत्यादि अनेक श्रुति पुराणें व स्मृति यांसह ब्रह्मज्ञान झालें असतां अनर्थाचा नाश होतो. व आनंदही प्राप्त होतो, असा घोष करीत आहेत. ॥ १० ॥

**विवरणः**—'आत्मसाक्षात्कार झाला असतां अनर्थांची सर्वथैव निवृत्ति व परमानंदाची प्राप्ति हीं दोन फलें निश्चयानें मिळतात.' असें एवढ्याच श्रुति सांगत आहेत असें नाहीं. तर अशा असंख्य श्रुति, स्मृति व पुराणेंही ही गोष्ट कंठरवानें सांगत आहेत. पण दुर्दैवी लोक तिकडे लक्ष्य देत नाहींत. ॥ १० ॥

प्रकरणाच्या आरंभापासून एवढा वेळपर्यंत आत्मसाक्षात्काराचें 'परमानन्दप्राप्ति' हें फल आहे असें निरनिराळ्या शाखेंतील श्रुतींच्या आधारानें सांगितलें. व आतां यापुढें आनंद कितीप्रकारचे आहेत इत्यादि प्रकारें ब्रह्मानन्दाचें व्याख्यान करण्याकरितां आरंभ करीत आहेतः-

**आनंदस्त्रिविधो ब्रह्मानंदो विद्या सुखं तथा ॥**
**विषयानंद इत्यादौ ब्रह्मानंदो विविच्यते ॥ ११ ॥**

**अन्वयः**—ब्रह्मानन्दः विद्यासुखं तथा विषयानन्द इति त्रिविधः आनन्दः अस्ति । किंतु आदौ ब्रह्मानंदः विविच्यते ।

**अर्थः**—ब्रह्मानन्द, विद्यानन्द, व विषयानन्द असा तीन प्रकारचा आनंद आहे. पण प्रथमतः ब्रह्मानन्दाचें विवेचन केलें जात आहे. ॥ ११ ॥

**विवरणः**—आनंद जरी मुख्यतः तीन प्रकारचा आहे तरी ब्रह्मानन्दामुळेंच दुसरे आनंद प्राप्त होत असल्यामुळें प्रथम तीन अध्यायांत ब्रह्मनन्दाचेंच विवेचन करावयाचें आहे. आतां, प्रत्येक अध्यायांत योगानन्द, आत्मानन्द इत्यादि जीं निरनिराळीं नांवें दिलेलीं आढळतात तीं त्याचे अवान्तर भेद दाखविण्याकरितां होत. ॥ ११ ॥

तैत्तरीयश्रुतीचें अवलोकन केलें असतां ब्रह्म आनंदरूप आहे, असें समजतें. असें आतां सांगतातः–

**भृगुः पुत्रः पितुः श्रुत्वा वरुणाद्ब्रह्मलक्षणम् ॥**

**अन्नप्राणमनोबुद्धीस्त्यक्त्वाऽऽनंदं विजज्ञिवान् ॥ १२ ॥**

**अन्वयः**—पुत्रः भृगुः वरुणात् पितुः ब्रह्मलक्षणं श्रुत्वा अन्नप्राणमनोबुद्धीः त्यक्त्वा आनंदं विजज्ञिवान् ।

**अर्थः**—भृगुसंज्ञक पुत्र वरुणनामक पित्याच्या तोंडून ब्रह्माचें लक्षण ऐकून व अन्न, प्राण, मन व बुद्धि यांचा त्याग करून आनंदास जाणता झाला.॥१२॥

विवरणः—तैत्तिरीय अरण्यांतील शीक्षा, ब्रह्मविदा व भृगु अशीं तीन उपनिषदें शुद्ध आत्मस्वरूपाचें प्रतिपादन करितात. व त्यांतील भृगुसंज्ञक उपनिषदांतील आख्यायिकेचा येथें उल्लेख केला आहे. भृगुसंज्ञक पुत्र आपल्या वरुणनामक पित्याकडे गेला व "मला ब्रह्मोपदेश करा" म्हणून त्यास म्हणाला. तेव्हां त्यानें आपल्या प्रिय पुत्रास ब्रह्माचें लक्षण सांगितलें. तें असें–ज्याच्यापासून हीं भूतें उत्पन्न होतात; ज्याच्यामुळें उत्पन्न झालेलीं भूतें जिवंत रहातात व नाशसमयीं ज्याच्याकडे जाऊन ज्यांत लीन होतात तें जाणण्याची इच्छा कर. तेंच ब्रह्म आहे. पण हें लक्षण सांगण्यापूर्वी शरीर, प्राण, इंद्रियें; मन व वाणी हीं त्याच्या ज्ञानाचीं द्वारें आहेत असें त्यानें सांगितलें होतें. पित्याच्या या उपदेशानंतर भृगु एकांतांत जाऊन बसला व विचार करूं लागला. पूर्ण विचार केल्यावर त्यास शरीरादिकांच्या ठायीं ब्रह्मलक्षण नसल्यामुळें त्यांस अनात्म बुद्धीनें सोडून आनंदाचा ब्रह्मबुद्धीनें स्वीकार करावा लागला. ॥ १२ ॥

त्यानें आनंदाच्या ठायीं ब्रह्मलक्षणाची कशी योजना केली म्हणून म्हणशील तर सांगतो:—

**आनंदादेव भूतानि जायंते तेन जीवनम् ॥**

**तेषां लयश्च तत्रातो ब्रह्मानंदो न संशयः ॥ १३ ॥**

**अन्वयः—आनंदात् एव भूतानि जायन्ते । तेषां तेन एव जीवनं भवति च लयः तत्र एव । अतः सः ब्रह्मानन्दः न संशयः ।**

**अर्थः**—आनंदापासूनच भूतें उत्पन्न होतात. त्यांचें आनंदाच्या योगानेंच जीवन होतें व लय त्यातच होतो. यास्तव तो ब्रह्मानन्दच होय. यांत संशय नाहीं. ॥ १३ ॥

विवरणः—स्त्रीपुरुष संयोगजन्य आनंदापासून प्राणी उत्पन्न होतात. विषयभोगजन्य आनंदाच्या योगानेंच जीवंत रहातात व त्यांचा लयही सुषुप्तिकालीन आनंदांत होतो. तस्मात् आनंद हेंच ब्रह्मस्वरूप होय, यांत कांहीं शंका नाहीं. ॥ १३ ॥

केवल, तैत्तिरीय श्रुतीवरूनच प्रस्तुत गोष्ट सिद्ध होते असें नाहीं तर छान्दोग्यांतील सनत्कुमार व नारद यांच्या संवादावरूनही ती सिद्ध होते असें आतां सांगतातः—

**भूतोत्पत्तेः पुरा भूमा त्रिपुटीद्वैतवर्जनात् ॥**
**ज्ञातृज्ञानज्ञेयरूपा त्रिपुटी प्रलये हि नो ॥ १४ ॥**

अन्वयः—भूतोत्पत्तेः पुरा त्रिपुटीद्वैतवर्जनात् भूमा आसीत् । प्रलये ज्ञातृज्ञानज्ञेयरूपा त्रिपुटी नो हि ।

**अर्थः**—आकाशादि भूतांच्या उत्पत्तीपूर्वीं त्रिपुटीरूप द्वैताचा अभाव असल्यामुळें भूमा नामक परमात्मा होता. ज्ञाता, ज्ञान, व ज्ञेयरूप त्रिपुटी प्रलय कालीं नसते. हें सर्व वेदान्तांस मान्य आहे. ॥ १४ ॥

विवरणः—आकाश, वायु इत्यादि स्थूल सूक्ष्म भूतें व त्यांचीं जरायुज, अंडज इत्यादि कार्यें यांच्या उत्पत्तिपूर्वी द्वैताचा अभाव असतो ही गोष्ट निर्विवाद होय. पण, त्यावेळींही देशतः कालतः, व वस्तुतः परिच्छिन्न न होणारा परमात्मा होता. आतां—द्वैत नव्हतें म्हणून कशावरून असें म्हणाल तर सांगतों—ज्ञाता, ज्ञान, ज्ञेय इत्यादिरूपच द्वैत असतें, व ती त्रिपुटी प्रलयकालीं नसते, याविषयीं कोणाचाही वाद नाहीं. शिवाय सर्व उपनिषदेंही हेंच सांगत आहेत. ॥ १४ ॥

आतां ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय यांचें स्वरूप सांगतातः—

**विज्ञानमय उत्पन्नो ज्ञाता ज्ञानं मनोमयः ॥**
**ज्ञेयाः शब्दादयो नैतत्त्रयमुत्पत्तितः पुरा ॥ १५ ॥**

**अन्वयः—उत्पन्नः विज्ञानमयः ज्ञाता, मनोमयः ज्ञानं च शब्दादयः ज्ञेयाः । एतत् त्रयं उत्पत्तितः पुरा न आसीत् ।**

अर्थ.—उत्पन्न झालेला विज्ञानमय ज्ञाता, मनोमय ज्ञान व शब्दादि विषय ज्ञेय होय. हें त्रिकूट उत्पत्तीच्या पूर्वी नव्हतें. ॥ १५ ॥

विवरण.—परमात्म्यापासून उत्पन्न होणाऱ्या बुद्ध्युपाधिक जीवास विज्ञानमय किंवा ज्ञाता ह्मणतात. मनामध्यें प्रतिबिंबित झालेल्या मनोमयनामक चैतन्यास ज्ञान व शब्दादि सर्व विषयांस ज्ञेय ह्मणतात. पण हें सर्व कार्यरूप असल्यामुळें उत्पत्तीच्या पूर्वी कारणांत लीन होतें. ॥ १५ ॥

तात्पर्यः—

त्रयाभावे तु निर्द्वैतः पूर्णएवानुभूयते ॥
समाधिसुप्तिमूर्छासु पूर्णः सृष्टेः पुरा तथा ॥ १६ ॥

अन्वयः—त्रयाभावे तु समाधिसुप्तिमूर्छासु निर्द्वैतः पूर्णः एव अनुभूयते। तथा सृष्टेः पुरा पूर्णः।

अर्थः—ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान या त्रिपुटीचा अभाव असतांना जसा समाधि निद्रा व मूर्च्छा या अवस्थामध्यें द्वैतशून्य व पूर्ण असाच आत्मा अनुभवास येतो, त्याप्रमाणेंच तो सृष्टीच्या पूर्वी पूर्ण असतो. ॥ १६ ॥

विवरणः—त्रिपुटी हेंच द्वैत होय; असें चवदाव्या श्लोकांत स्पष्टपणें ह्मटलें आहे. अर्थात् जेव्हां त्रिपुटी नसते तेव्हां द्वैतही नसतें असें ह्मणणें युक्तच होत. आणि त्यामुळेंच समाधि, गाढ निद्रा, इत्यादि अवस्थांमध्यें द्वैताचें भान होत नाहीं. तर द्वैतशून्य व पूर्ण अशा आत्म्याचा त्यावेळीं प्रत्यय येतो. आतां समाधि व मूर्च्छा यांचा अनुभव सर्वांसच नसतो हें जरी खरें आहे तरी गाढ निद्रेचा अनुभव यावत् प्राणीमात्रास आहे. व त्यामुळें त्रिपुटी नसतांना पूर्ण आत्म्याचा कसा अनुभव येतो हें विस्तारपूर्वक सांगावयास नको. सारांश प्रलयकालींही त्रिपुटीचा अभाव असल्यामुळें सुषुप्तींतील आत्म्याच्या स्वरूपाप्रमाणेंच त्यावेळच्या आत्म्याचें स्वरूप असतें, असें समजावें. ॥ १६ ॥

आतां—आत्मा पूर्ण जरी असला तरी तो त्यावरून आनंदरूप आहे; हें कसें ठरतें ? या प्रश्नाचें श्रुतीच्या आधारानेंच उत्तर देतातः—

यो भूमा स सुखं नाल्पे सुखं त्रेधा विभेदिनि ॥
सनत्कुमारः प्राहैवं नारदायातिशोकिने ॥ १७ ॥

अन्वयः—यः भूमा सः सुखं त्रेधा विभेदिनि अल्पे सुखं न अस्ति । एवं सनत्कुमारः अतिशोकिने नारदाय प्राह ।

अर्थ:—जो भुमा नामक परमात्मा तो सुखच होय. कारण तीन प्रकारें भिन्न होणाऱ्या अल्प द्वैतामध्यें सुख नसतें, असें सनत्कुमार अतिशय शोक करणाऱ्या नारदास सांगता झाला. ॥ १७ ॥

विवरण:—छान्दोग्याच्या सातव्या अध्यायांत नारद व सनत्कुमार यांच्या संवादाची आख्यायिका आहे. नारद अतिकष्टी होऊन सनत्कुमाराकडे गेला. व "मला अतिशय असमाधानरूपी शोक होत आहे तरी आपण मला या शोकांतून पार करा" असें त्यास म्हणाला, तेव्हां अनेक पर्यायांच्या योगानें नारदास उपदेश केल्यावर शेवटीं 'यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति' असें त्यांनीं सांगितलें. त्याचाच येथें उल्लेख केला आहे. "देश काल व वस्तु यांच्या योगानें मर्यादित होणाऱ्या या क्षुद्र द्वैतामध्यें सुखाचा लेशही नसून या सर्वांचें अधिष्ठान जो भूमानामक परमात्मा तो स्वतः सुखरूप आहे" असें या श्लोकाच्या पूर्वार्धाचें व प्रस्तुत श्रुति वचनाचें तात्पर्य आहे. ॥ १७ ॥

नारदास अतिशय शोक होण्याचें श्रुतीमध्यें जें कारण सांगितलें आहे त्याचाच येथें उल्लेख करितात:—

सपुराणान् पंच वेदान् शास्त्राणि विविधानि च ॥
ज्ञात्वाऽप्यनात्मवित्त्वेन नारदोऽतिशुशोच ह ॥ १८ ॥

अन्वयः—सपुराणान् पंच वेदान् च विविधानि शास्त्राणि ज्ञात्वा अपि अनात्मवित्त्वेन नारदः अतिशुशोच ह ।

अर्थ:—पुराणांसह पांच वेद व नाना प्रकारचीं शास्त्रें यांस जाणूनही आत्मज्ञ नसल्यामुळें नारद अतिशय शोक करिता झाला. ॥ १८ ॥

विवरण:—सर्व पुराणें, स्मृतिग्रंथ, चारी वेद व अनेक शास्त्रें यांमध्यें जरी ते [illegible] निष्णात होता तरी एक आत्मज्ञान नसल्यामुळें त्याच्या [illegible] [illegible] वाटेना

व त्यामुळेंच तो शोक करूं लागला. इत्यादि प्रकार पूर्वोक्त उपनिषदांत विस्तृतपणें सांगितला आहे. ॥ १८ ॥

वादीः—इतक्या ग्रंथांचें अध्ययन करूनही त्याच्या शोकाची निवृत्ति झाली नाहीं ! ह्मणून ह्मणतां हें मोठें आश्चर्य आहे !

सिद्धान्तीः—यांत आश्चर्य कसचें ? कारणः–

वेदाभ्यासात्पुरा तापत्रयमात्रेण शोकिता ॥
पश्चात्त्वभ्यासविस्मारभंगगर्वैश्च शोकिता ॥ १९ ॥

अन्वयः— वेदाभ्यासात् पुरा तापत्रयमात्रेण शोकिता । च पश्चात् तु अभ्यास-विस्मारभंगगर्वैः शोकिता ।

अर्थः—वेदाभ्यास करण्याच्या पूर्वी केवळ त्रिविध तापांमुळेंच दुःख होत होतें. पण नंतर अभ्यास, विस्मरण, तिरस्कार, व गर्व यांच्या योगानें आणखी दुःख होऊं लागलें. ॥ १९ ॥

विवरणः—जोंपर्यंत त्यानें वेदशास्त्रांचें अध्ययन केलें नव्हतें तोंपर्यंत त्यास आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक तापांच्या योगानेंच दुःख होत होतें. ह्मणजे अध्ययनाच्या पूर्वी त्याच्या दुःखाचें एकच कारण होतें. पण अध्ययनानंतर तें तयार ठेवण्याकरितां करावा लागणारा अभ्यास, केलेल्या अध्ययनाचें होणारें विस्मरण, अधिक विद्वानानें केलेला अपमान; आपल्यापेक्षां कोणी कमी विद्वान् आढळल्यास त्याच्या समोर वाहवा लागणारा गर्व, इत्यादि अनेक कारणांमुळें अधिकच दुःख होऊं लागलें.

तेव्हां सनत्कुमारांकडे जाऊन नारद ह्मणालाः–

सोऽहं विद्वन्प्रशोचामि शोकपारं नयात्र माम् ॥
इत्युक्तः सुखमेवास्य पारमित्यभ्यधादृषिः ॥ २० ॥

अन्वयः—हे विद्वन् सः अहं प्रशोचामि अत्र मां शोकपारं नय । इति उक्तः ऋषिः ' सुखं एव अस्य पारं ' इति अभ्यधात् ।

अर्थः—हे विद्वाना, तो मी अति दुःख भोगीत आहें. यांतून मला पार कर. असें नारदानें ज्यास सांगितलें आहे असा तो ऋषि 'सुख हेंच याचें पैलतीर आहे' असें सांगता झाला. ॥ २० ॥

**विवरणः**—'महाराज मी जरी सर्व शास्त्रें, सर्व वेद, सर्व विद्या इत्यादि[illegible] निष्णात झालों आहे तरी मला अति कष्ट होत आहेत. यास्तव मला या शोकसागरांतून पार करा.' हें नारदाचें वचन ऐकून सनत्कुमार ह्मणाले–भूमानामक ब्रह्माचा साक्षात्कार झाला असतां प्राणी सर्व दुःखांतून पार निघून जातो. यास्तव तूं ब्रह्मज्ञान संपादन कर. तोच एक शोकाच्या नाशाचा उपाय आहे ॥ २० ॥

आतां–विषयांपासूनही कांहीं सुख होतें हें खरें; पण तत्त्वतः पाहूं गेलें असतां तें दुःखच आहे, असें समजून त्यांनीं नारदास काय सांगितलें तें सांगतातः–

**सुखं वैषयिकं शोकसहस्रेणावृतत्वतः ॥**
**दुःखमेवेति मत्वाऽऽह नाल्पेऽस्ति सुखमित्यसौ ॥ २१ ॥**

**अन्वयः**—वैषयिकं सुखं शोकसहस्रेण आवृतत्त्वतः दुःखं एव इति मत्वा अल्पे सुखं न अस्ति इति असौ आह ।

**अर्थः**—विषयांच्या भोगापासून होणारें सुख हजारों शोकांनीं भरलेलें असल्यामुळें दुःखच होय; असें मानून 'क्षुद्र द्वैतामध्यें सुख नाहीं' असें तो ह्मणाला. ॥ २१ ॥

**विवरणः**—आदि व अंत यांमध्यें जें दुःखरूप तें मध्यें जरी सुखरूप भासलें तरी दुःखच होय. विषयांचें अर्जन दुःखरूप व त्यांचा वियोगही दुःखरूप. यास्तव त्यांचा संयोगही दुःखरूपच आहे, असा निश्चय करावा. ॥ २१ ॥

असें जर आहे तर अद्वैतामही दुःखरूप कां ह्मणूं नये ? अशी शंका घेतातः–

**ननु द्वैते सुखं मा भूदद्वैतेऽप्यस्ति नो सुखम् ॥**
**अस्ति चेदुपलभ्येत तथा च त्रिपुटी भवेत् ॥ २२ ॥**

**अन्वयः**—ननु द्वैते सुखं मा भूत् । अद्वैते अपि सुखं नो अस्ति । अस्ति चेत् उपलभ्येत तथा च त्रिपुटी भवेत् ।

**अर्थः**—द्वैतामध्यें एक सुख नसो. पण अद्वैतामध्येंही तें नाहीं. कारण जर तें असलें तर प्रत्ययास येईल. पण मग त्रिपुटी झाली. ॥ २२ ॥

**विवरणः**—मग द्वैतामध्यें असें सुख नाहीं तसेंच तें अद्वैतामध्येंही नाहीं. बरें, आहे, असें जरी मानलें तरी त्याचा प्रत्यक्ष अनुभव येणें अशक्य आहे. कारण त्याचा

अनुभव ——— नुसतें तोंडानें ह्मटलें की त्रिपुटी आलीच. त्रिपुटी वांचून कोणत्याही पदार्थाचा अनुभव येणें अगदीं अशक्य आहे. ॥ २२ ॥

आतां पूर्वोक्त शंकेचें सिद्धान्ती समाधान करितातः—

**मास्त्वद्वैते सुखं किं तु सुखमद्वैतमेव हि ॥**

**किं मानमिति चेन्नास्ति मानाकांक्षा स्वयंप्रभे ॥ २३ ॥**

अन्वयः—अद्वैते सुखं मा अस्तु। किंतु अद्वैतं सुखं एव। हि किं मानं इति चेत् स्वयंप्रभे मानाकांक्षा न अस्ति।

अर्थः—अद्वैतामध्यें सुख नसेना. पण अद्वैत हें स्वतः सुखच आहे हें श्रुतिप्रसिद्ध आहे. आतां, याविषयीं प्रमाण काय ह्मणून विचारशील तर स्वयंप्रकाश पदार्थाविषयीं प्रमाणाची अपेक्षाच नाहीं ॥ २३ ॥

विवरणः—अद्वैत हा एक धर्मी पदार्थ व सुख हा त्याचा धर्म असा यांमध्यें धर्मधर्मी संबंध नाहींच. तर अद्वैत हें सुखच होय. आतां, या श्रुतिप्रसिद्ध अर्थाविषयीं जर 'प्रमाण काय' ह्मणून विचारूं लागलास तर जड पदार्थास जशी प्रमाणाची अपेक्षा असते तशी स्वयंप्रकाश वस्तूस नसते, हेंच आह्मी उत्तर देणार. ॥ २३ ॥

आतां, अद्वैत स्वयंप्रकाश आहे याविषयीं तरी काय प्रमाण? अशी शंका घेऊन उत्तर देतातः—

**स्वप्रभत्वे भवद्वाक्यं मानं यस्माद्भवानिदम् ॥**

**अद्वैतमभ्युपेत्यास्मिन्सुखं नास्तीति भाषते ॥ २४ ॥**

अन्वयः—यस्मात् भवान् इदं अद्वैतं अभ्युपेत्य अस्मिन् सुखं नास्ति इति भाषते तस्मात् अस्य स्वप्रभत्वे भवद्वाक्यं मानं।

अर्थः—ज्याअर्थी आपण या अद्वैताचा स्वीकार करून यामध्यें सुख नाहीं असें सांगता, त्याअर्थी याच्या स्वयंप्रकाशपणाविषयीं तुमचें वाक्यच प्रमाण होय. ॥ २४ ॥

विवरणः—अरे पण, भल्या गृहस्था! तूं अद्वैताचा अंगीकार करितोसना? व नंतरच त्यांत सुख नाहीं ह्मणून ह्मणतोस ना! असें जर असेल तर तुझें भाषणच त्याच्या स्वप्रभत्वाविषयीं प्रमाण आहे असें समज. कारण तें जर स्वयंप्रकाश नसतें

तर त्याचा तुला स्वीकारही करितां आला नसता व त्यांत सुख नाहीं असेंही आलें नसतें. ॥ २४ ॥

पण, मी तुमच्या अद्वैताचा स्वीकार कोठें करीत आहें? असा वाद्याचा आक्षेप घेऊन त्यांस आतां उलट प्रश्न करितात:–

**नाभ्युपैम्यहमद्वैतं त्वद्वचोऽनूद्य दूषणम् ॥**
**वच्मीति चेत्तदा ब्रूहि किमासीद्द्वैततः पुरा ॥ २५ ॥**

अन्वयः—अहं अद्वैतं न अभ्युपैमि किंतु त्वद्वचः अनूद्य दूषणं वच्मि इति चेत् तदा द्वैततः पुरा किं आसीत्। तत् ब्रूहि।

अर्थ:—मी अद्वैताचा स्वीकार करीत नाहीं. तर तुमच्या भाषणाचा अनुवाद करून केवळ त्यावर दूषण देत आहें, असें जर ह्मणशील तर द्वैताच्या पूर्वी काय होतें तें सांग पाहूं! ॥ २५ ॥

विवरण:—वादी अद्वैताचा अंगीकारच करीत नाहीं असें पाहून सिद्धान्ती त्यास निरुत्तर करण्याकरितां अन्य प्रकारें प्रश्न करीत आहेत. ॥ २५ ॥

पूर्वोक्त प्रश्नासंच सिद्धान्ती अधिक स्पष्टीकरण करितात:—-

**किमद्वैतमुत द्वैतमन्यो वा कोटिरन्तिमः ॥**
**अप्रसिद्धो न द्वितीयोऽनुत्पत्तेः शिष्यतेऽग्रिमः ॥ २६ ॥**

अन्वयः—किं अद्वैतं उत द्वैतं वा अन्यः कोटिः। अंतिमः अप्रसिद्धः। अनुत्पत्तेः न द्वितीयः। अतः अग्रिमः शिष्यते।

अर्थ:—द्वैताच्या पूर्वी अद्वैत होतें; कीं द्वैत होतें कीं अन्य कांहीं प्रकार होता? अन्य एकादा प्रकार होता ह्मणून ह्मणावें, तर तो मुळीं अप्रसिद्धच आहे. बरें द्वैत होतें ह्मणून ह्मणावें, तर त्याची मुळीं उत्पत्तिच झालेली नसल्यामुळें तेंही बरोबर नाहीं. यास्तव, पूर्वी अद्वैत होतें हाच एक पक्ष अवशिष्ट रहातो. ॥ २६ ॥

विवरण:—सृष्टीच्या पूर्वी अद्वैत होतें कीं द्वैत होतें कीं या द्वैताद्वैताहून तिसराच प्रकार होता. तिसराच होता ह्मणून ह्मणावें, तर त्याची कोणालाच ओळख नस-

मुळें तो होता असें ह्मणणेंही युक्त नव्हे. द्वैताचें तर द्वैतरूप सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी अस्तित्वच संभवत नाहीं व त्यामुळें पूर्वी अद्वैतच होतें असा निश्चय करावा लागतो. त्याचा अनुभव केव्हां येतो, हें पूर्वी सोळाव्या श्लोकांत सांगितलेंच आहे. ॥ २६ ॥

आतां 'हें तुमचें अद्वैत युक्तीनें सिद्ध होतें हें खरें; पण त्याच्या अनुभवाविषयीं मतभेद आहे.' अशी शंका घेऊन तिच्या समाधानाकरितांही प्रयत्न करितातः—

**अद्वैतसिद्धिर्युक्त्यैव नानुभूत्येति चेद्वद ॥**
**निर्दृष्टांता सदृष्टांता वा कोऽन्यंतरमत्र नो ॥ २७ ॥**

अन्वयः—अद्वैतसिद्धिः युक्त्या एव न अनुभूत्या इति चेत् निर्दृष्टान्ता सदृष्टान्ता वा वद। अत्र कोऽन्यंतरं नो अस्ति।

अर्थः—अद्वैताची सिद्धि युक्तीच्या योगानेंच होत असते, अनुभवाच्या योगानें नाहीं; असें जर ह्मणत असशील तर ती युक्ती सदृष्टान्त आहे कीं दृष्टान्तावांचून आहे सांग पाहूं! याच्याहून अन्य प्रकार तर संभवत नाहीं. ॥२७॥

विवरणः—युक्तिद्वाराच अद्वैतसिद्धि होते. त्यावांचून तिचा दुसरा उपाय नाहीं. असें जर तुला वाटत असलें तर आह्मी तुला असें विचारितों कीं, ज्या युक्तीच्याद्वारा तूं अद्वैतसिद्धि करणार ती युक्ति दृष्टान्तयुक्त आहे कीं, दृष्टान्तावांचून आहे. दृष्टान्तावांचूनही आहे व त्यासहही आहे, असें तर तुला मुळीं ह्मणतांच येणार नाहीं. कारण, असा प्रकार कोठेंही दिसत नाहीं. ॥ २७ ॥

यास्तव, आमची अद्वैतसिद्धि करणारी युक्ती दृष्टान्तशून्य आहे असें जर ह्मणशील, तर—

**नानुभूतिर्न दृष्टान्त इति युक्तिस्तु शोभते ॥**
**सदृष्टतान्त्वपक्षे तु दृष्टान्तं वद मे मतम् ॥ २८ ॥**

अन्वयः—न अनुभूतिः न दृष्टान्तः इति युक्तिः तु शोभते। सदृष्टांतत्वपक्षे तु मे मतं दृष्टान्तं वद।

अर्थः—अनुभवही नाहीं व जिला दृष्टांतही नाहीं असली युक्ती फारच शोभते. युक्ती दृष्टान्तयुक्त आहे हा दुसरा पक्ष जर तुला स्वीकारावयाचा असला तर मला मान्य होईल असा दृष्टान्त सांग पाहूं! ॥ २८ ॥

**विवरणः**—अद्वैताची सिद्धि केवल युक्तिद्वाराच होणें शक्य आहे असें ह्मणणारा वादी वेदान्तसिद्ध अनुभवाचा अंगीकार करणार नाहीं हें उघडच आहे. पण, ती युक्ति दृष्टान्तावांचून आहे असें जर तो ह्मणूं लागला तर तें अयोग्यच होणार! कारण, दृष्टान्तावांचून युक्तिसिद्धि होत नसते. बरें; ती आमची युक्ति दृष्टान्तयुक्त आहे असें जर ह्मणशील तर कोणता दृष्टान्त देतोस तो दे पाहूं. कोणताही दृष्टान्त वादी व प्रतिवादी या उभयतांस मान्य असावा लागतो, हें तूं विसरला नसशीलच. ॥ २८ ॥

आतां, वादी पूर्वी सिद्धान्त्यांनीं दिलेलाच दृष्टान्त देतो. पण सिद्धान्ती पुनः त्याविषयीं दृष्टान्त विचारितातः—

**अद्वैतः प्रलयो द्वैतानुपलंभेन सुप्तिवत् ॥**
**इति चेत्सुप्तिरद्वैतेत्यत्र दृष्टांतमीरय ॥ २९ ॥**

**अन्वयः**—प्रलयः अद्वैतः, द्वैतानुपलंभेन सुप्तिवत्, इति चेत् सुप्तिः अद्वैता इत्यत्र दृष्टान्तं ईरय ।

**अर्थः**—प्रलयकाल द्वैतशून्य आहे. द्वैताची उपलब्धि होत नसल्यामुळें, सुषुप्तिनामक तिसऱ्या अवस्थेप्रमाणें. असें जर अनुमान करीत असशील तर सुषुप्ति अद्वैत आहे; याविषयीं दृष्टान्त दे पाहूं! ॥ २९ ॥

**विवरणः**—या श्लोकांतील युक्तिसंज्ञक अनुमानांत प्रलयकाल हा पक्ष आहे. द्वैताचें शून्यत्व किंवा अद्वैतत्व हें साध्य आहे. द्वैताची प्रतीति येत नाहीं ह्मणून, इत्यादि हेतु आहे व सुषुप्तीमध्यें जसा द्वैताचा अभाव असतो त्याप्रमाणें; हा दृष्टान्त आहे. अर्थात् हें अनुमान तर बरोबर आहे. पण, सिद्धान्ती वाद्यास विचारतात कीं, तूं जो सुषुप्तीचा दृष्टान्त देत आहेस तो कोणाच्या सुषुप्तीचा? आपल्या कीं दुसऱ्याच्या? आपल्या सुषुप्तीचा जर दृष्टान्त देत असलास तर ती दुसऱ्याच्या अनुभवास येण्यासारखी नसल्यामुळें तिची सिद्धीही तुला युक्तिद्वाराच करावी लागणार, हें उघड आहे. वास्तव, त्या युक्तीकरितां तूं कोणता दृष्टान्त देतोस तो दे पाहूं? ॥ २९. ॥

वादी या पूर्वोक्त प्रश्नाचें उत्तर देतो. पण सिद्धान्ती त्याचा उपहास करितातः—

**दृष्टांतः परसुप्तिश्चेदहो ते कौशलं महत् ॥**
**यः स्वसुप्तिं न वेत्त्यस्य परसुप्तौ तु का कथा ॥ ३० ॥**

अन्वयः—परसुप्तिः दृष्टान्तः इति चेत् अहो ते महत् कौशलं। यः स्वसुप्तिं न वेत्ति अस्य परसुप्तौ तु का कथा।

**अर्थः—दुसऱ्याची सुषुप्ति हाच माझ्या सुषुप्तीस दृष्टान्त आहे असें जर ह्मणशील, तर तुझ्या चातुर्याची स्तुतीच करावी लागेल!! कारण जो आपल्या सुषुप्तीसही जाणत नाहीं, तो दुसऱ्याच्या सुषुप्तीविषयीं काय बोलणार!॥३०॥**

विवरणः—वाद्यास अद्वैताचा अनुभव मान्य नसल्यामुळेंच हा असा उडवा-उडवीचा जबाब द्यावा लागत आहे. सुषुप्तीमध्यें जें अद्वैत असतें त्याची सिद्धि युक्तीच्या द्वारा होते अनुभवाच्या द्वारा नव्हे, असें त्याचें मत असल्यामुळें त्यास अद्वैतसिद्धि करितांना निर्दोष दृष्टान्त मिळत नाहीं. आणि त्यामुळें असा हा उपहास होतो. ॥ ३० ॥

दुसऱ्याच्या सुषुप्तिविषयीं आह्मी अनुमान करितों असें यावर वाद्याचें ह्मणणें येणार असें जाणून 'श्रीभारतीतीर्थ' प्रथम त्याचा अनुवाद करितात. व नंतर त्यास उत्तर देतातः—

**निश्चेष्टत्वात्परः सुप्तो यथाऽहमिति चेत्तदा ॥**
**उदाहर्तुः सुषुप्तेस्ते स्वप्रभत्वं बलाद्भवेत् ॥ ३१ ॥**

अन्वयः—यथा अहं तथा परः निश्चेष्टत्वात् सुप्तो अस्ति इति चेत् तदा उदाहर्तुः ते सुषुप्तेः स्वप्रभत्वं बलात् भवेत्।

**अर्थः—ज्याप्रमाणें मी त्याप्रमाणें दुसराही निश्चेष्टपणामुळें सुषुप्तीमध्यें असावा असें जर अनुमान करूं लागलास तर उदाहरण देणाऱ्या तुझ्या सुषुप्तीचें स्वयंप्रकाशत्व बलात्कारानें सिद्ध होईल. ॥ ३१ ॥**

विवरणः—दुसऱ्याच्या सुषुप्तीविषयीं अनुमान कसें करितां येतें तें अगोदर दाखवून नंतर त्याच्यावर दोष दिला पाहिजे. 'हा ( दुसरा ) पुरुष यावेळीं सुषुप्तीमध्यें आहे. कारण तो निश्चेष्ट आहे. जो जो प्राणयुक्त असूनही निश्चेष्ट असतो तो तो सुषुप्तीमध्यें असतो. जसा—मी' या अनुमानावरून आपल्या सुषुप्तीच्या दृष्टान्तावरून दुसऱ्याच्या सुषुप्तीची सिद्धि होते असें जर ह्मणशील तर 'माझ्या समजुतीकरितां सुषुप्तीस दृष्टान्त बनविणाऱ्या तुझ्या सुषुप्तीच्या ठायीं तुझी इच्छा

नसली तरी स्वयंप्रकाशत्व येईल. कारण, ती स्वयंप्रकाश असल्यावांचून तुला तिचा दृष्टान्त देतां येणार नाहीं. ॥ ३१ ॥

कां ! ह्मणून विचारशील तर सांगतों:—

**नेंद्रियाणि न दृष्टांतस्तथाऽप्यंगीकरोषि ताम् ॥**
**इदमेव स्वप्रभत्वं यद्भानं साधनैर्विना ॥ ३२ ॥**

अन्वयः—इंद्रियाणि न । दृष्टान्तः न । तथापि तां अंगीकरोषि । यत् साधनैः विना भानं इदं एव स्वप्रभत्वं ।

अर्थः—इंद्रियें नाहींत; योग्य दृष्टान्त नाहीं; तरी तूं त्या सुषुप्तीचा अंगीकार करितोस. यास्तव जें साधनांवांचून भान तेंच स्वप्रभत्व होय. ॥ ३२ ॥

विवरणः—निद्रासमयीं सर्व इंद्रियें आपल्या कारणामध्यें लीन होत असल्यामुळें तीं सुषुप्तीचें ग्रहण करीत नाहींत; हें उघडच आहे. तसाच दोघांनाही मान्य होण्यासारखा दृष्टान्तही पण नाहीं; तरी सुद्धां तूं तिचा अंगीकार करितोस ! अर्थात् सुषुप्तींतील अद्वैत स्वप्रकाशरूप आहे असें शब्दांनीं जरी नाहीं तरी तें पर्यायानें तूं कबूल करितोस असें होतें. कारण, साधनांवांचून भान होणें ( प्रत्यय येणें ) हेंच स्वप्रकाशत्व होय. ॥ ३२ ॥

आतां सुषुप्तीमध्यें अद्वैत व स्वप्रभत्व असतें असें मानल्यावांचून गत्यंतरच नाहीं असें पाहून वादी त्यांचा अंगीकार करून सुखाविषयीं प्रश्न करीत आहे:—

**स्तामद्वैतस्वप्रभत्वे वद सुप्तौ सुखं कथम् ॥**
**शृणु दुःखं तदा नास्ति ततस्ते शिष्यते सुखम् ॥ ३३ ॥**

अन्वयः—अद्वैतस्वप्रभत्वे स्तां । किंतु सुप्तौ सुखं कथं । शृणु । तदा दुःखं नास्ति । ततः ते सुखं शिष्यते ।

अर्थः—अद्वैत व स्वप्रभत्व हे दोन धर्म असोत. पण सुषुप्तींत सुख कसें असतें ? ऐक. त्यावेळीं दुःख नसतें व त्यामुळेंच सुख रहातें. ॥ ३३ ॥

विवरणः—या श्लोकाच्या दुसऱ्या अर्धांत वाद्याच्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे. प्राण्याच्या दोन अवस्था असतात. एक सुख व दुसरी दुःख. त्यांपैकीं एक असते

तेव्हां दुसरी नसते व दुसरी असते तेव्हां पहिली नसते, असा नियम आहे. त्यामुळें सुषुप्तींत दुःख नसल्यामुळें बाकी रहाणारें सुख असतें असा निश्चय करितां येतो.॥ ३३॥

पण–याविषयीं प्रमाण काय ह्मणून जर ह्मणशील तर सांगतों:–

**अंधः सन्नप्यनंधः स्याद्विद्धोऽविद्धोऽथ रोग्यपि ॥**
**अरोगीति श्रुतिः प्राह तच्च सर्वे जना विदुः ॥ ३४ ॥**

**अन्वयः**—अंधः सन् अपि अनंधः स्यात्। विद्धः अविद्धः स्यात्। अथ रोगी अपि अरोगी इति श्रुतिः प्राह। च तत् सर्वे जनाः विदुः।

**अर्थः**—अंध असूनही डोळस होतो, विद्ध असूनही अविद्ध होतो, रोगी असूनही निरोगी होतो असें श्रुति सांगते व तें सर्व लोक अनुभवावरून जाणतात. ॥ ३४ ॥

**विवरणः**—छान्दोग्यामध्यें–ह्या सेतूवरून पार गेल्यावर आंधळ्यास दिसूं लागतें. ह्मणजे त्याचा उपाधिजन्य दोष निवृत्त होतो. ज्याला जखम झालेली असते तो नग होतो. रोगी रोगरहित होतो–इत्यादि प्रकारें वर्णन केलें आहे. अर्थात् हें श्रुति-प्रमाण झालें व सर्व लोकांचा असाच अनुभव असल्यामुळें याविषयीं अनुभव हेंही एक दुसरें प्रमाण आहे. ॥ ३४ ॥

पण–जेथें दुःख नसतें तेथें सुख असतेंच असा कांहीं नियम नाहीं;–अशी वादी आतां शंका घेतो:—

**न दुःखाभावमात्रेण सुखं लोष्टशिलादिषु ॥**
**द्वयाभावस्य दृष्टत्वादिति चेद्विषमं वचः ॥ ३५ ॥**

**अन्वयः**—लोष्टशिलादिषु द्वयाभावस्य दृष्टत्वात् तत्र दुःखाभावमात्रेण न सुखं इति चेत् विषमं वचः।

**अर्थः**—लोष्टशिलादिकांच्या ठायीं दोघांचाही अभाव असतो असा अनुभव येत असल्यामुळें, सुषुप्तीमध्यें केवल दुःखाचा अभाव असतो. एवढ्यावरूनच सुख सिद्ध होत नाहीं असें जर ह्मणशील तर तें विषम वचन आहे. ॥ ३५ ॥

**विवरणः**—या श्लोकांत इतर सर्व भाग शंकारूप असून 'विषमं वचः' एवढाच भाग उत्तररूप आहे. दुःख व सुख एकाच कालीं एके ठिकाणीं राहूं शकतात;

असें दाखविण्याकरितां वाद्यानें येथें मातीचें ढेकूळ, दगड इत्यादिकांचा दृष्टान्त दिला आहे. ॥ ३५ ॥

पण 'तुझा दृष्टान्त बरोबर नाहीं' असें सिद्धान्ती सांगतातः—

मुखदैन्यविकासाभ्यां परदुःखसुखोहनम् ॥
दैन्याद्यभावतो लोष्टे दुःखाद्यूहो न संभवेत् ॥ ३६ ॥

अन्वयः—मुखदैन्यविकासाभ्यां परदुःखसुखोहनं भवति । किंतु लोष्टे दैन्याद्य-भावतः दुःखाद्यूहः न संभवेत् ।

अर्थः—मुख दीन होणें व तें प्रसन्न असणें, यांवरून दुसऱ्याच्या दुःख-सुखाचा तर्क होतो. पण मातीच्या ढेकळामध्यें दैन्यादिकांचा अभाव असल्या-मुळें दुःखादिकांचा तर्क संभवत नाहीं. ॥ ३६ ॥

विवरणः—ज्याचें मुख उतरलेलें असतें तो दुःखी आहे व ज्याचें प्रसन्न असतें तो सुखी आहे असा तर्क होतो. पण दगड, मातीचें ढेकूळ यांच्या ठिकाणीं यांतील एकही चिन्ह नसल्यामुळें जड पदार्थ सुखी आहेत किंवा दुःखी आहेत असा नियम करितां येत नाहीं. ॥ ३६ ॥

ही झाली दुसऱ्याच्या सुखदुःखांच्या तर्काविषयींची गोष्ट. पण स्वतःच्या सुखा-दिकांचा प्रत्यय याहून निराळ्या प्रकारें येतो. कसा तो सांगतोः—

स्वकीये सुखदुःखे तु नोहनीये ततस्तयोः ॥
भावो वेद्योऽनुभूत्यैव तदभावोपि नान्यतः ॥ ३७ ॥

अन्वयः—स्वकीये सुखदुःखे तु न ऊहनीये । ततः तयोः भावः अनुभूत्या एव वेद्यः । तदभावः अपि अन्यतः न ।

अर्थः—आपलें सुखदुःख तर तर्क करितां येण्यासारखें नाहीं. यास्तव त्यांचें सत्त्व अनुभवावरूनच सिद्ध होणार. व त्यांचा अभावही अनुभवा-वांचून दुसऱ्या कशामुळेंही समजत नाहीं. ॥ ३७ ॥

विवरणः—प्रत्येक प्राण्यास त्याच्या दुःखाचा व सुखाचा साक्षात् अनुभव येत असल्यामुळें त्यांच्याविषयीं तर्क करितां येणें अशक्य आहे. त्याचें अस्तित्व व नास्तित्व या उभयतांचेंही अनुभवावरूनच ज्ञान होत असतें. ॥ ३७ ॥

तात्पर्य—

**तथा सति स्वसुप्तौ च दुःखाभावोऽनुभूतितः ॥**
**विरोधिदुःखराहित्यात्सुखं निर्विघ्नमिष्यताम् ॥ ३८ ॥**

अन्वयः—तथा सति स्वसुप्तौ दुःखाभावः अपि अनुभूतितः सिद्धः । अतः विरोधि-दुःखराहित्यात् निर्विघ्नं सुखं इष्यताम् ।

अर्थः—सुखादि अनुभवगम्य आहेत असें सिद्ध झालें असतां आपल्या सुषुप्तींतील दुःखाचा अभाव अनुभवावरूनच सिद्ध होतो. यास्तव विरोधि दुःखाचाही अभावच असल्यामुळें निर्बाध सुखाचा स्वीकार करावा. ॥ ३८ ॥

विवरणः—सुखदुःख अनुभवास येण्यासारखें आहे; असा एकदां निश्चय झाला कीं, सुषुप्तींतील दुःखाच्या अभावाचाही अनुभवच आला पाहिजे हें ठरतें. पण त्या अवस्थेंत सुखाशीं विरोध करणाऱ्या दुःखाचा लेशही नसल्यामुळें अबाधित सुखाचा अंगीकार करावा, ह्मणजे तेथें अशा प्रकारचें सुख आहे असें मानावें. ॥ ३८ ॥

सुषुप्तीमध्यें सुखच असतें असा निश्चय करण्यास आणखी एक कारण आहे. कोणतें ह्मणून विचारशील तर सांगतों:—

**महत्तरप्रयासेन मृदुशय्यादिसाधनम् ॥**
**कुतः संपाद्यते सुप्तौ सुखं चेत्तत्र नो भवेत् ॥ ३९ ॥**

अन्वयः—तत्र सुप्तौ सुखं नो भवेत् चेत् तर्हि महत्तरप्रयासेन मृदुशय्यादि-साधनं कुतः संपाद्यते ।

अर्थः—त्या सुषुप्तीमध्यें सुख जर नसतें तर अति प्रयासानें मृदु शय्या इत्यादि साधनांचें संपादन मनुष्यानें कां केलें असतें ? ॥ ३९ ॥

विवरणः—मोठा थोरला बिछाना, पलंग, गाद्या, गिरद्या, उशा इत्यादि पदार्थ प्राणाहून प्रिय असें द्रव्य खर्चूनही मनुष्य मिळवीत असतो; हें सुप्रसिद्ध आहे. निद्रे-मध्यें खरोखरीच जर सुख नसतें तर त्यानें हें कधीं तरी केलें असतें का ? सती जाणारी स्त्री, माझ्या खालीं मऊ मऊ लांकडें घाला असें कधीं ह्मणत नाहीं. ॥ ३९ ॥

**दुःखनाशार्थमेवैतदिति चेद्रोगिणस्तथा ॥**
**भवत्वरोगिणस्त्वेतत्सुखायैवेति निश्चिनु ॥ ४० ॥**

अन्वयः—एतत् दुःखनाशार्थं एव इति चेत् रोगिणः तथा अस्तु। अरोगिणः तु एतत् सुखाय एव इति निश्चिनु।

अर्थः—हें दुःखाच्या नाशाकरितांच आहे असेंही ह्मणतां येईल. पण रोग्याविषयीं जरी तसा प्रकार असला तरी हें सर्व साहित्य निरोगी पुरुषाच्या सुखाकरितांच आहे असा निश्चय कर. ॥ ४० ॥

विवरणः—रोगी पुरुषानेंच जर मऊ मऊ गाद्या वगैरे यांची इच्छा केली असती तर ती दुःखाच्या नाशार्थंच आहे असें आम्हीं ह्मटलें असतें. पण रोग्यापेक्षां निरोग्यासच त्यांची मोठी हांव असल्याचें दिसतें. अर्थात् शय्यादि साधनें सुखाकरितांच आहेत. केवल दुःखनिवारणाकरितां नव्हेत. ॥ ४० ॥

पुनः याविषयीं शंका घेऊन समाधान करितातः—

**तर्हि साधनजन्यत्वात्सुखं वैषयिकं भवेत् ॥**
**भवत्वेवात्र निद्रायाः पूर्वं शय्यासनादिजम् ॥ ४१ ॥**

अन्वयः—तर्हि साधनजन्यत्वात् इदं वैषयिकं सुखं भवेत्। अत्र निद्रायाः पूर्वं शय्यासनादिजं भवतु एव।

अर्थः—तर मग साधनांपासून उत्पन्न होणारें असल्यामुळें हें विषयसंबंधी सुख होणार ! निद्रेच्या पूर्वी शय्या आसन इत्यादिकांच्या योगानें होणारें सुख विषयसंबंधीं खुशाल असो. ॥ ४१ ॥

विवरणः—साधनांच्या द्वारा जें सुख होतें तें वैषयिक होय. असा तुमचा नियम असल्यामुळें शय्या इत्यादि साधनांमुळें होणारें सुखही वैषयिक आहे असें ह्मणावयास पाहिजे. असें वादी ह्मणत आहे. पण तें आह्मांस इष्टच असल्यामुळें त्याविषयीं वाद करण्याचें कांहीं कारण नाहीं असें सिद्धान्ती या श्लोकाच्या उत्तरार्धात सांगत आहेत. 'निद्रा लागण्यापूर्वी गाद्यागिरद्यांमुळें जें सुख होत असतें तें विषयसंबंधींच होय. पण निद्रा लागल्यानंतर जें होतें तें साधनजन्य नसल्यामुळें वैषयिक नव्हे' असा या उत्तरार्धाचा भाव समजावा. ॥ ४१ ॥

निद्रेंतील सुख वैषयिक नव्हे यांविषयीं आतां कारण सांगतात:–

**निद्रायां तु सुखं यत्तज्जन्यते केन हेतुना ॥**
**सुखाभिमुखधीरादौ पश्चान्मज्जेत्परे सुखे ॥ ४२ ॥**

**अन्वय:**—निद्रायां तु यत् सुखं तत् केन हेतुना जन्यते । आदौ सुखाभिमुखधीः पश्चात् परे सुखे मज्जेत् ।

**अर्थ:**—निद्रेमध्यें जें सुख असतें तें कोणत्या साधनामुळें उत्पन्न होतें सांग पाहूं ? ( कोणत्याही नाहीं. ) तात्पर्य; निद्रेपूर्वी ज्याची बुद्धि सुखाभिमुख झालेली असते तोच नंतर परम सुखामध्यें निमग्न होतो. ॥ ४२ ॥

**विवरण:**—निद्रेंतील सुख हें वैषयिक नाहीं. कारण तें कोणत्याही साधनापासून उत्पन्न होत नसतें. वादी:—मग असें जर आहे तर त्या सुखाचा इतर वैषयिक सुखांप्रमाणें अनुभव कां येत नाहीं? सिद्धान्ती:—निद्रेमध्यें सुखाचा अनुभव घेणाराच सुखामध्यें निमग्न होऊन जात असल्यामुळें विषयसुखाप्रमाणें त्याचा अनुभव येत नाहीं. सारांश निद्रा लागण्यापूर्वी मनुष्याची बुद्धि सुखाभिमुख झालेली असते व नंतर निद्रा लागतांच तो स्वरूपसुखामध्यें निमग्न होतो. ॥ ४२ ॥

पूर्व श्लोकांत संक्षेपतः सांगितलेला प्रकार या पुढील तीन श्लोकांत अधिक स्पष्ट करितात:—

**जाग्रद्व्यावृत्तिभिः श्रांतो विश्रम्याथ विरोधिनि ॥**
**अपनीते स्वस्थचित्तोऽनुभवेद्विषये सुखम् ॥ ४३ ॥**

**अन्वय:**— जाग्रद्व्यावृत्तिभिः श्रांतः विश्रम्य अथ विरोधिनि अपनीते सति स्वस्थचित्तः सन विषये सुखं अनुभवेत् ।

**अर्थ:**—जाग्रदवस्थेंतील व्यापारांच्या योगानें थकून गेलेला जीव मृदु शय्यादिकांच्या ठायीं शयन करून व्यापारांच्या योगानें होणाऱ्या दुःखाचें निवारण झालें असतां स्वस्थ चित्त होऊन शय्यादि विषय सुखाचा अनुभव घेतो. ॥ ४३ ॥

**विवरण:**—उजाडल्यापासून दिवस मावळेपर्यंत श्रम करून थकलेल्या अग राञीं विश्रांति घ्यावी अशी इच्छा होते. व नंतर तो मऊ बिछान्यावर पडून

स्वस्थ होतो व त्यामुळें त्याचे श्रम कमी होतात. पुढें चित्त स्वस्थ झाल्यामुळें व पूर्वींच्या दुःखाचा वेग कमी झाल्यामुळें त्यास त्या मऊ गाद्यागिरद्यांपासून सुख होऊं लागतें. ॥ ४३ ॥

**आत्माभिमुखधीवृत्तौ स्वानंदः प्रतिबिंबति ॥**
**अनुभूयैनमत्रापि त्रिपुट्या श्रांतिमाप्नुयात् ॥ ४४ ॥**

**अन्वयः**—आत्माभिमुखधीवृत्तौ स्वानंदः प्रतिबिंबति। अत्र अपि एनं अनुभूय त्रिपुट्या श्रांतिं आप्नुयात्।

**अर्थः**—आत्म्याच्या सन्मुख झालेल्या बुद्धीवृत्तींत स्वानंद प्रतिबिंबित होतो. पण या वेळींही या विषयानंदाचा अनुभव घेऊन त्रिपुटीमुळें त्यास श्रम होतात. ॥ ४४ ॥

**विवरणः**—जाग्रतींत अश्रांत श्रम करून दुःखी झालेला जीव त्याच्या निवृत्तीकरितां मृदु शय्येवर पडला असतां त्याची बुद्धि अंतर्मुख होते. नंतर मुखासमोर आलेल्या आरशांत मुख जसें प्रतिबिंबित होतें त्याप्रमाणें बुद्धीवृत्तीमध्यें स्वरूपभूत आनंद प्रतिबिंबित होतो, यासच विषयानंद ह्मणतात. पण या आनंदाचा अनुभव घेतांनाही त्रिपुटीच्या द्वारा जीवास श्रम होतात. ह्मणजे त्या वेळींही अनुभव घेणारा, खुद्द अनुभव व अनुभवाचा विषय अशा त्रिपुटीचें अस्तित्व असल्यामुळें त्याच्या योगानें जीवास त्रास होतो. कारण अद्वैतानंदाची चटक लागल्यामुळें त्यास त्रिपुटीही कंटाळवाणी वाटणार हें उघड आहे. ॥ ४४ ॥

आणि असा प्रकार होत असल्यामुळें:—

**तच्छ्रमस्यापनुत्त्यर्थं जीवो धावेत्परात्मनि ॥**
**तेनैक्यं प्राप्य तत्रत्यो ब्रह्मानंदः स्वयं भवेत् ॥ ४५ ॥**

**अन्वयः**—तच्छ्रमस्य अपनुत्त्यर्थं जीवः परात्मनि धावेत्। तथा च तेन ऐक्यं प्राप्य तत्रत्यः ब्रह्मानन्दः स्वयं भवेत्।

**अर्थः**—त्या श्रमाच्या निराकरणार्थ जीव परमात्म्यामध्यें धांव मारितो. आणि त्यामुळें त्याच्याशीं ऐक्यरूप होऊन तेथील ब्रह्मानंद हा स्वतः होतो.

**विवरण:**—या पूर्वोक्त किंचित् भ्रमाचाही नाश करण्याकरितां जीव परमात्म्याचा आश्रय करितो. कारण 'परमात्मा आनंदरूप आहे व तेथें गेल्यासच माझ्या या दुःखाचें निवारण होणार' असें त्यास पक्केपणीं ठाऊक नसलें तरी तसा अनुभव येत असतो. व्यवहारांतहि आपण दुःखाच्या भीतीनें समर्थांचा आश्रय करीत असतोंच. परमात्म्याकडे जाऊन त्याच्या स्वरूपांत एकदां मिळून गेल्यावर हा जीवच स्वतः ब्रह्मानन्द होतो. ॥ ४५ ॥

या सुषुप्तींतील आनंदाच्या स्पष्टीकरणार्थ स्वतः श्रुतीनेंच अनेक दृष्टान्त दिले आहेत, असें आतां सांगतात:—

**दृष्टांताः शकुनिः श्येनः कुमारश्च महानृपः ॥**
**महाब्राह्मण इत्येते सुप्त्यानंदे श्रुतीरिताः ॥ ४६ ॥**

**अन्वय:**—सुप्त्यानन्दे शकुनिः, श्येनः, कुमारः, महानृपः, महाब्राह्मणः इति एते दृष्टान्ताः श्रुतीरिताः सन्ति ।

**अर्थ:**—सुषुप्तींतील आनंदाविषयीं शकुनि, श्येन, बालक, नृपति व महा ब्राह्मण असे दृष्टान्त श्रुतीनें सांगितले आहेत. ॥ ४६ ॥

**विवरण:**—या श्लोकांतील सर्व दृष्टान्तांचें व्याख्यान आतां पुढें क्रमानेंच होणार आहे. व त्यावेळीं कोणता दृष्टान्त कोणत्या उपनिषदांतील आहे; हेंही स्पष्ट होईल.

आतां, शकुनि नामक पक्ष्याचा छान्दोग्यस्थ दृष्टान्त या पुढील दोन श्लोकांत स्पष्ट करितात:—

**शकुनिः सूत्रबद्धः सन् दिक्षु व्यापृत्य विश्रमम् ॥**
**अलब्ध्वा बंधनस्थानं हस्तस्तंभाद्युपाश्रयेत् ॥ ४७ ॥**
**जीवोपाधिमनस्तद्वद्धर्माधर्मफलाप्तये ॥**
**स्वप्ने जाग्रति च भ्रान्त्वा क्षीणे कर्मणि लीयते ॥ ४८ ॥**

**अन्वय:**—शकुनिः सूत्रबद्धः सन् दिक्षु व्यापृत्य विश्रमं अलब्ध्वा हस्तस्तंभादि बंधनस्थानं यथा उपाश्रयेत् तद्वत् जीवोपाधि मनः धर्माधर्मफलाप्तये स्वप्ने च जाग्रति भ्रांत्वा कर्मणि क्षीणे सति लीयते ।

**अर्थ:**—पक्षी जसा दोरीनें बांधलेला असतांनाच चोंहोकडे फिरून कोठें आश्रय न मिळाल्यामुळें हात, स्तंभ इत्यादि बंधनस्थानाचा परत जेऊन

आश्रय करितो, त्याप्रमाणें जीवाची उपाधि असें हें मन धर्म व अधर्म यांच्या फळाच्या प्राप्त्यर्थ स्वप्नामध्यें व जाग्रतींत भ्रमण करून कर्म क्षीण झालें असतां आपल्या कारणभूत अज्ञानाचा आश्रय करितें. ॥ ४७, ४८ ॥

विवरणः—पक्ष्याच्या पायांस दोरी बांधून तिचें दुसरें टोंक एकाद्या खांबास किंवा बोटासच बांधून त्याची कशी गंमत होते तें कांहीं शोकी पहात बसतात. पण अशा वेळीं तो बिचारा पक्षी या काळाच्या हातांतून सुटण्याकरितां इकडे तिकडे उडून पहातो; पण व्यर्थ. पुढें निराश होऊन तो बिचारा बंधनस्थानीं येऊन बसतो. ह्या दृष्टान्ताप्रमाणेंच मन धर्माधर्मादिकांचें फल भोगण्याकरितां स्वप्न व जाग्रती या दोन विक्षेपरूप अवस्थेंत फिरून, शेवटीं आपल्या कारणांत लीन होतें. या स्थळीं मन पक्ष्याच्या स्थानीं, स्वप्न व जागर दिशांच्या स्थानीं, अज्ञान बंधनाच्या स्थानीं व धर्माधर्म सूत्राच्या स्थानीं आहेत असें समजावें. ॥ ४७,४८ ॥

आतां, श्येनाचा दृष्टान्त स्पष्ट करितातः—

**श्येनो वेगेन नीडैकलंपटः शयितुं व्रजेत् ॥**
**जीवः सुप्त्यै तथा धावेद्ब्रह्मानंदैकलंपटः ॥ ४९ ॥**

अन्वयः—यथा श्येनः शयितुं नीडैकलंपटः सन् वेगेन व्रजेत् तथा जीवः ब्रह्मानंदैकलंपटः सन् सुप्त्यै धावेत् ।

अर्थः—जसा ससाणा विश्रांतीकरितां केवळ आपल्या घरट्यामध्यें लंपट होऊन वेगानें जातो, तसा जीव केवल ब्रह्मानंदामध्यें लंपट होऊन सुषुप्तीकरितां धांव मारतो. ॥ ४९ ॥

विवरणः—बृहदारण्यकामध्यें “ज्याप्रमाणें श्येन किंवा गरुड पक्षी आकाशांत चोहोंकडे उडून श्रांत होत्साता आपले पंख सारखे जुळून आपल्या घरट्याचा रस्ता धरितो, त्याप्रमाणेंच हा पुरुष या आनंदाकरितां धांवतो.” इत्यादि प्रकारें वर्णन आहे. व त्याच्या आधारानेंच ग्रंथकारांनीं येथेंही उल्लेख केला आहे. या दृष्टान्तांतील श्येन पक्ष्याच्या ठायीं दार्ष्टान्तिकांतील जीव असून तो जसा घरट्याचे ठायीं लंपट होतो तसा हा ब्रह्मानंदाचे ठायीं लंपट होतो. त्याला असें आकाशांत फिरल्यामुळें श्रम होतात तसे यास विक्षेपरूप पूर्वोक्त दोन्ही अवस्थांमध्यें फिरत असतांना श्रम

होतात. तो जसा घरट्यामध्यें शिरतो तसा हा हृदयाकाशांत शिरतो, तात्पर्य, भोग भोगून श्रांत झालेल्या जीवास आपल्या शांत स्वरूपाची इच्छा होते. ॥ ४९ ॥

आतां, ज्याच्यामध्यें कुमारादि तीन दृष्टान्त दिले आहेत अशा बालाकि ब्राह्मणांतील वाक्य या पुढील श्लोकांत अर्थतः घेतात:—

अतिबालः स्तनं पीत्वा मृदुशय्यागतो हसन् ॥
रागद्वेषाद्यनुत्पत्तेरानंदैकस्वभावभाक् ॥ ५० ॥

अन्वयः—यथा अतिबालः स्तनं पीत्वा मृदुशय्यागतः हसन् रागद्वेषाद्यनुत्पत्तेः आनंदैकस्वभावभाक् भवति ।

अर्थः—ज्याप्रमाणें अगदीं लहान मूल स्तन पाजवून मऊ शय्येवर निजविलें असतां हंसत असून राग द्वेषादिकांची उत्पत्ति न झाल्यामुळें केवळ आनंद स्वभाववान् होतें. ॥ ५० ॥

महाराजः सार्वभौमः संतृप्तः सर्वभोगतः ॥
मानुषानंदसीमानं प्राप्यानंदैकमूर्तिभाक् ॥ ५१ ॥

अन्वयः—सर्वभोगतः संतृप्तः सार्वभौमः महाराजः मानुषानन्दसीमानं प्राप्य आनंदैकमूर्तिभाक् भवति.

अर्थः—किंवा ज्याप्रमाणें सर्व भोगांमुळें पूर्ण तृप्त झालेला सार्वभौम महाराजा मृत्युलोकींच्या आनंदाच्या सीमेप्रत पोंचून केवळ आनंदमूर्तिरूप होतो. ॥ ५१ ॥

महाविप्रो ब्रह्मवेदी कृतकृत्यत्वलक्षणाम् ॥
विद्यानंदस्य परमां काष्ठां प्राप्यावतिष्ठते ॥ ५२ ॥

अन्वयः—अथवा यथा महाविप्रः ब्रह्मवेदी कृतकृत्यत्वलक्षणां विद्यानन्दस्य परमां काष्ठां प्राप्य अवतिष्ठते तथा सुप्तः अपि आनंदरूपः तिष्ठति ।

अर्थः—किंवा ज्याप्रमाणें महा ब्राह्मण ब्रह्मसाक्षात्कार झाल्यामुळें कृतकृत्यत्वरूप विद्यानंदाच्या पराकाष्ठेप्रत पोंचून राहतो तसा निद्रित पुरुष आनंदरूप होऊन राहतो. ॥ ५२ ॥

आश्रय करितो, त्याप्रमाणें जीवाची उपाधि असें हें मन धर्म व अधर्म यांच्या फळाच्या प्राप्त्यर्थ स्वप्नामध्यें व जाग्रतींत भ्रमण करून कर्म क्षीण झालें असतां आपल्या कारणभूत अज्ञानाचा आश्रय करितें. ॥ ४७, ४८ ॥

**विवरण:**—पक्ष्याच्या पायांस दोरी बांधून तिचें दुसरें टोंक एकाद्या खांबास किंवा बोटासच बांधून त्याची कशी गंमत होते तें कांहीं शोकी पहात बसतात. पण अशा वेळीं तो बिचारा पक्षी या काळाच्या हातांतून सुटण्याकरितां इकडे तिकडे उडून पहातो; पण व्यर्थ. पुढें निराश होऊन तो बिचारा बंधनस्थानीं येऊन बसतो. ह्या दृष्टान्ताप्रमाणेंच मन धर्माधर्मादिकांचें फल भोगण्याकरितां स्वप्न व जाग्रती या दोन विक्षेपरूप अवस्थेंत फिरून, शेवटीं आपल्या कारणांत लीन होतें. या स्थळीं मन पक्ष्याच्या स्थानीं, स्वप्न व जागर दिशांच्या स्थानीं, अज्ञान बंधनाच्या स्थानीं व धर्माधर्म सूत्राच्या स्थानीं आहेत असें समजावें. ॥ ४७,४८ ॥

आतां, श्येनाचा दृष्टान्त स्पष्ट करितातः—

**श्येनो वेगेन नीडैकलंपटः शयितुं व्रजेत् ॥**
**जीवः सुप्त्यै तथा धावेद्ब्रह्मानंदैकलंपटः ॥ ४९ ॥**

**अन्वय:**—यथा श्येनः शयितुं नीडैकलंपटः सन् वेगेन व्रजेत् तथा जीवः ब्रह्मानंदैकलंपटः सन् सुप्त्यै धावेत् ।

**अर्थ:**—जसा ससाणा विश्रांतीकरितां केवळ आपल्या घरट्यामध्यें लंपट होऊन वेगानें जातो, तसा जीव केवल ब्रह्मानंदामध्यें लंपट होऊन सुषुप्तीकरितां धांव मारतो. ॥ ४९ ॥

**विवरण:**—बृहदारण्यकामध्यें " ज्याप्रमाणें श्येन किंवा गरुड पक्षी आकाशांत चोहोंकडे उडून श्रांत होत्साता आपले पंख सारखे जुळून आपल्या घरट्याचा रस्ता धरितो, त्याप्रमाणेंच हा पुरुष या आनंदाकरितां धांवतो. " इत्यादि प्रकारें वर्णन आहे. व त्याच्या आधारानेंच ग्रंथकारांनीं येथेंही उल्लेख केला आहे. या दृष्टान्तांतील श्येन पक्ष्याच्या ठायीं दार्ष्टान्तिकांतील जीव असून तो जसा घरट्याचे ठायीं लंपट होतो तसा हा ब्रह्मानंदाचे ठायीं लंपट होतो. त्याला जसें आकाशांत फिरल्यामुळें श्रम होतात तसे याच विक्षेपरूप पूर्वोक्त दोन्ही अवस्थांमध्यें फिरत असतांना श्रम

होतात. तो जसा घरट्यामध्यें शिरतो तसा हा हृदयाकाशांत शिरतो, तात्पर्य, भोग भोगून श्रांत झालेल्या जीवास आपल्या शांत स्वरूपाची इच्छा होते. ॥ ४९ ॥

आतां, ज्याच्यामध्यें कुमारादि तीन दृष्टान्त दिले आहेत अशा बालाकि ब्राह्मणांतलि वाक्य या पुढील श्लोकांत अर्थतः घेतातः—

अतिबालः स्तनं पीत्वा मृदुशय्यागतो हसन् ॥
रागद्वेषाद्यनुत्पत्तेरानंदैकस्वभावभाक् ॥ ५० ॥

अन्वयः—यथा अतिबालः स्तनं पीत्वा मृदुशय्यागतः हसन् रागद्वेषाद्यनुत्पत्तेः आनंदैकस्वभावभाक् भवति ।

अर्थः—ज्याप्रमाणें अगदीं लहान मूल स्तन पाजवून मऊ शय्येवर निज-विलें असतां हंसत असून राग द्वेषादिकांची उत्पत्ति न झाल्यामुळें केवळ आनंद स्वभाववान् होतें. ॥ ५० ॥

महाराजः सार्वभौमः संतृप्तः सर्वभोगतः ॥
मानुषानंदसीमानं प्राप्यानंदैकमूर्तिभाक् ॥ ५१ ॥

अन्वयः—सर्वभोगतः संतृप्तः सार्वभौमः महाराजः मानुषानन्दसीमानं प्राप्य आनंदैकमूर्तिभाक् भवति.

अर्थः—किंवा ज्याप्रमाणें सर्व भोगांमुळें पूर्ण तृप्त झालेला सार्वभौम महा-राजा मृत्युलोकींच्या आनंदाच्या सीमेप्रत पोंचून केवल आनंदमूर्तिरूप होतो. ॥ ५१ ॥

महाविप्रो ब्रह्मवेदी कृतकृत्यत्वलक्षणाम् ॥
विद्यानंदस्य परमां काष्ठां प्राप्यावतिष्ठते ॥ ५२ ॥

अन्वयः—अथवा यथा महाविप्रः ब्रह्मवेदी कृतकृत्यत्वलक्षणां विद्यानन्दस्य परमां काष्ठां प्राप्य अवतिष्ठते तथा सुप्तः अपि आनंदरूपः तिष्ठति ।

अर्थः—किंवा ज्याप्रमाणें महा ब्राह्मण ब्रह्मसाक्षात्कार झाल्यामुळें कृतकृत्य-त्वरूप विद्यानंदाच्या पराकाष्ठे प्रत पोंचून राहतो तसा निद्रित पुरुष आनंद-रूप होऊन राहतो. ॥ ५२ ॥

**विवरण:**—गेल्या तीन श्लोकांत तीन दृष्टान्त दिले आहेत. सर्व दृष्टांतामध्यें रागादि वृत्तींचा अभाव असल्यामुळें कुमारादि आनंदरूप असतात असें स्पष्टपणें म्हटलें आहे. अर्थात् रागादि वृत्ति हेंच दुःख व त्यांचा अभाव हेंच परम सुख होय. आतां आनंदाविषयीं श्रुतीनें या कुमारादि तिघांचाच दृष्टांत कां दिला, दुसऱ्याहि कांहीं आनंदी प्राण्यांचा दृष्टांत देण्यास कोणता प्रत्यवाय होता ? अशी एक शंका येथें उद्भवण्यासारखी आहे. पण तिचें समाधान पुढच्याच श्लोकांत केलेलें आहे. ॥ ५२ ॥

**मुग्धबुद्धातिबुद्धानां लोके सिद्धा सुखात्मता ॥**
**उदाहृतानामन्ये तु दुःखिनो न सुखात्मकाः ॥ ५३ ॥**

**अन्वय:**—उदाहृतानां मुग्धबुद्धातिबुद्धानां लोके सुखात्मता सिद्धा । अन्ये तु दुःखिनः न सुखात्मकाः ।

**अर्थ:**—वर ज्यांचा दृष्टान्त दिला आहे त्या मुग्ध, बुद्ध व अतिबुद्ध यांचीच सुखरूपता लोकामध्यें प्रसिद्ध आहे. याच्याहून अन्य तर दुःखीच होत. सुखी नव्हत. ॥ ५३ ॥

**विवरण:**—मुग्ध ह्मणजे अज्ञ; सर्व अज्ञांमध्यें लहान बालक सुखी होय. जे विवेकी आहेत त्यांच्यामध्यें सार्वभौम राजा सुखी असतो. व जे अति विवेकी असतात त्यांच्यामध्यें ज्याला आनंदरूप आत्म्याचा साक्षात्कार झालेला असतो तो सुखी होय. बाकी सर्व दुःखीच होत, यांत कांहीं संशय नाहीं. कारण ते रागादि वृत्तियुक्त असतात हें सर्वप्रसिद्ध आहे. ॥ ५३ ॥

तात्पर्य:—

**कुमारादिवदेवायं ब्रह्मानंदैकतत्परः ॥**
**स्त्रीपरिष्वक्तवद्वेद न बाह्यं नापि चांतरम् ॥ ५४ ॥**

**अन्वय:**—कुमारादिवत् एव अयं ब्रह्मानंदैकतत्परः । स्त्रीपरिष्वक्तवत् न बाह्यं न आंतरं अपि असौ वेद ।

**अर्थ:**—कुमारादिकांप्रमाणेंच हा ब्रह्मानन्दामध्येंच तत्पर होतो. प्रिय स्त्रीनें आलिंगन दिलेल्या विषयीं पुरुषाप्रमाणें हा बाहेरील किंवा आंतील कांहीं एक जाणत नाहीं. ॥ ५४ ॥

विवरणः—पूर्वोक्त दृष्टान्तांतील कुमार, व महाराजा व महाब्राह्मण हे जसे आनंदाचा अनुभव घेत असतात त्याप्रमाणें सुषुप्तीमध्यें हा जीवही केवळ आनंदांत निमग्न होतो. याविषयीं दृष्टान्त–ज्याप्रमाणें व्यवहारांत प्रिय स्त्रीनें आलिंगन दिलें असतां कामी पुरुष बाह्य व आंतर विषयज्ञानशून्य झाल्यामुळें केवळ सुखमय होऊन जातो, त्याप्रमाणें प्राज्ञसंज्ञक परमात्म्याशीं ऐक्य पावलेला जीव आनंदरूप होतो. प्रस्तुत अर्थाची काण्वश्रुतिही आहे. ॥ ५४ ॥

आतां, दृष्टान्त व दार्ष्टान्तिक यांतील बाह्य व आंतर या शब्दांचा अर्थ सांगतातः—

**बाह्यं रथ्यादिकं वृत्तं गृहकृत्यं यथांतरम् ॥**
**तथा जागरणं बाह्यं नाडीस्थः स्वप्न आंतरः ॥ ५५ ॥**

अन्वयः—यथा रथ्यादिकं वृत्तं बाह्यं च गृहकृत्यं आंतरं तथा जागरणं बाह्यं नाडीस्थः स्वप्नः आंतरः ।

अर्थः—ज्याप्रमाणें दृष्टांतांत राजमार्गादि संबंधीं वृत्तांत बाह्य व गृहकृत्य आंतर असतें त्याप्रमाणें दार्ष्टांतिकांतील जागरण बाह्य व नाडींतील स्वप्न आंतर होय. ॥ ५५ ॥

विवरणः—गेल्या श्लोकांतील दृष्टांतांत 'पुरुष आंतील व बाहेरील कांहीं जाणत नाहीं' असें ह्मटलें आहे. त्याचा अर्थ–स्त्रीशीं विलास करण्यांत निमग्न झालेल्या पुरुषास त्या क्षणीं घरांतील कोणतेंही कृत्य व बाहेरील कोणताही व्यवहार आठवत नाहीं.–असा समजावा. मन एकाच विषयांत गढून गेलें असतां इतर भान नष्ट होणें व तेवढ्यापुरतें सुख वाटणें हा स्वभावच आहे. त्याचप्रमाणें निद्रासमयीं जीव जाग्रतींतील व अति सूक्ष्म नाडीमध्यें भासणाऱ्या स्वप्नांतील सर्व वृत्तांत विसरून जाऊन आनंदांत निमग्न होतो. ॥ ५५ ॥

असो; गेल्या पांच दृष्टान्तांत सुषुप्तीमध्यें जीव ब्रह्मरूप होऊन रहातो असें सांगितलें, पण कांहीं कुतार्किक याविषयीं प्रमाण काय ह्मणून विचारतील ? कारण श्रुति हें मोठेंसें प्रमाण नसून प्रत्येक सिद्धान्त अनुमानद्वारा सिद्ध झाला पाहिजे असा त्यांचा हट्ट आहे. यास्तव " पिशाचास त्याच्या भाषेनेंच उपदेश केला पाहिजे " या न्यायानें आतां श्रुतियुक्त अनुमान सुचवितातः—

**पितापि सुप्तावपितेत्यादौ जीवत्ववारणात् ॥**
**सुप्तौ ब्रह्मैव नो जीवः संसारित्वासमीक्षणात् ॥ ५६ ॥**

**अन्वयः**—सुप्तौ पिता अपि अपिता भवति इत्यादौ जीवत्ववारणात् सुप्तौ सः ब्रह्म एव । संसारित्वासमीक्षणात् नो जीवः ।

**अर्थः—'सुषुप्तीमध्यें पिताही अपिता होतो' इत्यादि अर्थाच्या श्रुतींत जीवत्वाचें निवारण केलेलें असल्यामुळें सुषुप्तीमध्यें तो ब्रह्मच होय. संसारित्व दिसत नसल्यामुळें जीव नव्हे. ॥ ५६ ॥**

**विवरण:**—' निद्राकाळीं जो पिता असतो तो अपिता होतो; माता अमाता होते; लोक अलोक होतात; देव अदेव होतात ' इत्यादि प्रकारें श्रुतीमध्यें वर्णन आहे. त्यावरून निद्रेमध्यें जीव ब्रह्मरूप होतो हें निर्विवाद होतें. पण त्याविषयीं अनुमान कसें करितां येतें तें दाखविलें पाहिजे. निद्रेमध्यें जीव ब्रह्मच होतो. कारण तो संसारी आहे असा त्यावेळीं प्रत्यय येत नाहीं व जो जो असंसारी तो तो मुक्त किंवा ब्रह्मरूप, असतो; अशी व्याप्ति मिळते. सारांश, सुषुप्तींत जीव ब्रह्मरूप होतो; हें आमचें म्हणणें अनेक प्रमाणांनीं सिद्ध होतें. ॥ ५६ ॥

शिवाय-

**पितृत्वाद्यभिमानो यः सुखदुःखाकरः स हि ॥**
**तस्मिन्नपगते तीर्णः सर्वाञ्शोकान् भवत्ययम् ॥ ५७ ॥**

**अन्वयः**—यः पितृत्वाद्यभिमानः सः सुखदुःखाकरः हि । अतः तस्मिन् अपगते सति अयं सर्वान् शोकान् तीर्णः भवति ।

**अर्थः—जो पितृत्वादि अभिमान तीच सुखदुःखांची खाण होय. यास्तव तो अभिमान निघून गेला असतां हा सर्व शोकांतून पार निघून जातो. ॥५७॥**

**विवरण:—कोणत्याही प्राण्यास जें दुःख होत असतें तें देहादिकांच्या ठायीं अभिमान ठेविल्यामुळें होत असतें. अर्थात् तो अभिमान नष्ट झाला असतां प्राणी सर्व प्रकारच्या दुःखांतून मुक्त होतो. ॥ ५७ ॥**

याविषयीं प्रत्यक्ष श्रुतीही आहे. कोणती म्हणून म्हणशील तर सांगतों—

**सुषुप्तिकाले सकले विलीने तमसाऽऽवृतः ॥**
**सुखरूपमुपैतीति ब्रूते ह्याथर्वणी श्रुतिः ॥ ५८ ॥**

अन्वयः—सुषुप्तिकाले सकले विलीने सति तमसा आवृतः सः सुखरूपं उपैति इति आथर्वणी श्रुतिः आह ।

अर्थः—सुषुप्तिसमयीं सर्व प्रपंचाचा पूर्ण लय झाला असतां तमोगुणानें आवृत झालेला जीव सुखरूप होतो, असें अथर्ववेदाची एक श्रुति सांगत आहे. ५८

विवरणः—कैवल्योपनिषदांत प्रस्तुत अर्थाचें वाक्य आहे. व—जाग्रदादि विक्षेपरूप प्रपंचाचा तमःप्रधान प्रकृतीमध्यें लय झाला असतां त्या प्रकृतीनेंच आच्छादित झालेला जीव सुखरूप ब्रह्मास जाऊन मिळतो,—असा त्याचा भावार्थ आहे. ॥ ५८ ॥

याविषयीं अनुभवरूप प्रबल प्रमाणही आहे असें सांगतातः—

**सुखमस्वाप्समत्राहं न वै किंचिदवेदिषम् ॥**
**इति सुप्ते सुखाज्ञाने परामृशति चोत्थितः ॥ ५९ ॥**

अन्वयः—उत्थितः अहं अत्र सुखं अस्वाप्सं । किंचित् न वै अवेदिषं । इति सुप्ते सुखाज्ञाने परामृशति ।

अर्थः—झोंपेंतून उठलेला मनुष्य मी एवढावेळ सुखानें निजलों होतों. व मला कांहीं समजलें नाहीं. अशाप्रकारें निद्रेंतील सुख व अज्ञान यांचा परामर्श करितो. ॥ ५९ ॥

विवरणः—प्रत्येक मनुष्य निजून उठल्यावर मी सुखानें निजलों होतों व मला कांहीं समजलें नाहीं असें निःसंशय होऊन सांगतो. अर्थात् त्याला पूर्वी अनुभवलेल्या सुखाचें व अज्ञानाचें स्मरण होतें हें निर्विवाद आहे. याविषयीं बरेंचसें विवेचन पूर्वी प्रथम प्रकरणांतही होऊन गेलें आहे. ॥ ५९ ॥

आतां, हें प्रस्तुत स्मरण कसें होतें तें सांगतातः—

**परामर्शोऽनुभूतेऽस्तीत्यासीदनुभवस्तदा ॥**
**चिदात्मत्वात्स्वतो भाति सुखमज्ञानधीस्ततः ॥ ६० ॥**

अन्वयः—परामर्शः अनुभूते अस्ति इति हेतोः तदा अनुभवः आसीत् । चिदात्मत्वात् सुखं स्वतः भाति । ततः च अज्ञानधीः ।

अर्थः—स्मरण अनुभूत पदार्थाचेंच होतें; असा नियम असल्यामुळें त्या वेळीं अनुभव होता. चिद्रूप असल्यामुळें सुख स्वतः भासतें व त्यामुळेंच अज्ञान प्रतीत होतें. ॥ ६० ॥

विवरणः—अनुभव हें स्मरणाचें कारण आहे. अर्थात् सुषुप्तीमध्यें ज्याचा अनुभव आला होता त्याचेंच उठल्यावर स्मरण होतें असें ह्मणणें युक्त होय. पण सुषुप्तीमध्यें मन व इंद्रियें यांचा लय झाल्यानंतर सुखाचा व अज्ञानाचा अनुभव कोण घेणार ? असें जर विचारशील तर सांगतो:—सुख चिद्रूप असल्यामुळें तें आपोआप भासतें व नंतर त्या स्वयंप्रकाश सुखामुळेंच अज्ञानाची प्रतीति येते. अर्थात् त्यांच्या अनुभवास साधनांची गरज नाहीं. ॥ ६० ॥

पण, सुषुप्तींतील स्वयंप्रकाश सुखच ब्रह्मानन्दरूप आहे याविषयीं काय प्रमाण ? असें कोणी विचारील ह्मणून सांगतातः—

**ब्रह्म विज्ञानमानंदमिति वाजसनेयिनः ॥**
**पठंत्यतः स्वप्रकाशं सुखं ब्रह्मैव नेतरत् ॥ ६१ ॥**

अन्वयः—ब्रह्म विज्ञानं आनंदं इति वाजसनेयिनः पठन्ति । अतः स्वप्रकाशं सुखं ब्रह्म एव इतरत् न ।

अर्थः—ब्रह्म विज्ञान व आनंदरूप आहे असें वाजसनेयीय शाखाध्यायी पठण करीत आहेत. यास्तव स्वप्रकाश व सुखरूप ब्रह्मच आहे, अन्य कांहीं नाहीं. ॥ ६१ ॥

विवरणः—बृहदारण्यकामध्यें विज्ञान व आनंदरूप ब्रह्म आहे असा स्पष्ट उल्लेख आहे. तस्मात् आनंदरूप ब्रह्मच. अन्य कांहीं नाहीं. ॥ ६१ ॥

वादी—पण ज्याला अनुभव आलेला असतो त्यालाच त्याचें स्मरण होतें; असा नियम आहे. यास्तव निद्रेमध्यें जो सुखादिकांचा अनुभव घडतो तो जीवासच होय, असें ह्मटल्यास कोणता प्रत्यवाय आहे ?

सिद्धान्ती:—असें ह्मणणें सयुक्तिक नव्हे. कारणः—

**यदज्ञानं तत्र लीनौ तौ विज्ञानमनोमयौ ॥**
**तयोर्हि विलयावस्था निद्राऽज्ञानं च सैव हि ॥ ६२ ॥**

अन्वयः—यत् अज्ञानं तत्र तौ विज्ञानमनोमयौ लीनौ। हि तयोः विलयावस्था निद्रा। अज्ञानं अपि सा एव हि।

**अर्थः—स्मरणावरून ठरणारें जें अज्ञान त्यांत ते विज्ञामय व मनोमय कोश लीन होऊन जातात. कारण त्यांची लीन अवस्थाच निद्रा होय. व अज्ञानही तिलाच ह्मणतात. ॥ ६२ ॥**

विवरणः—जाग्रतींत 'मला कांहीं समजलें नाहीं' असें जें अज्ञानाचें स्मरण होत असतें तें अज्ञान तेथ असतें ह्मणनच होतें हें उघड आहे. व त्यामध्येंच प्रमाता व प्रमाण असें ज्यांस क्रमानें ह्मणतात ते विज्ञानमय व मनोमय कोश लीन होतात. त्यामुळे निद्रासमयीं जीव सुखानुभव घेणारा आहे असें ह्मणता येत नाहीं. जीवसंज्ञक विज्ञानमय व साधनसंज्ञक मनोमय कोशांची जी लीनावस्था तीच निद्रा होय. व निद्रेसच अज्ञान हेंही नाव आहे. कोशामध्येंही 'विज्ञानविरतिः सुप्तिः' विशेषज्ञानाचा लय हीच सुषुप्ति होय; असें ह्मटलें आहे. ॥ ६२ ॥

वादी:—मग असें जर आहे तर जीवास अज्ञानाचें स्मरण कसें होतें. कारण ज्यावेळीं अज्ञानाचा अनुभव आला त्यावेळीं जीव लीन होता, असें तुमच्याच तोंडानें होत आहे.

सिद्धान्ती:—खरें आहे. पण—

**विलीनघृतवत्पश्चात्स्याद्विज्ञानमयो घनः ॥**
**विलीनावस्थ आनंदमयशब्देन कथ्यते ॥ ६३ ॥**

अन्वयः—विलीनघृतवत् पश्चात् विज्ञानमयः घनः स्यात्। विलीनावस्थः आनंदमयशब्देन कथ्यते।

**अर्थः—पातळ झालेल्या तुपाप्रमाणें मागून विज्ञानमय घन होतो. व लीन अवस्थेंतील जीवच आनंदमय या शब्दानें बोलला जातो. ॥ ६३ ॥**

**विवरणः**—विलयावस्थेंत जीवाचा स्वरूपतः नाश होत नसतो. तर अग्निजवळ टेवलेलें तूप जसें अग्निसंयोगामुळें पातळ होतें व नंतर कांहीं वेळानें घट्ट होतें त्याप्रमाणें अज्ञानांत लीन झालेलें अंतःकरण कर्मामुळें जाग्रतींत विज्ञानमयरूपानें घन होतें; व त्यामुळें अंतःकरणच उपाधि आहे ज्याची अशा त्या आत्म्यास विज्ञानमय, जीव, प्रमाता असें ह्मणतात. व अंतःकरणाच्या लयसमयीं त्यासच आनंदमय ह्मणतात. तात्पर्य, जीवादि संज्ञा अंतःकरणावर अवलंबून आहेत. व त्यामुळें अनुभव घेणाऱ्याचा निद्राकालीं सर्वथैव अभाव होता असें ह्मणतां येत नाहीं. ॥ ६३ ॥

कारण—

**सुप्तिपूर्वक्षणे बुद्धिवृत्तिर्या सुखबिंबिता ॥**
**सैव तद्बिंबसहिता लीनानंदमयस्ततः ॥ ६४ ॥**

**अन्वयः**—सुप्तिपूर्वक्षणे या सुखबिंबिता बुद्धिवृत्तिः सा एव ततः तद्बिंबसहिता लीना आनंदमयः ।

**अर्थः**—सुषुप्तीच्या पूर्वक्षणीं जी सुखबिंबित बुद्धिवृत्ति तीच नंतर त्या प्रतिबिंबासह लीन झाली असतां आनंदमय होते. ॥ ६४ ॥

**विवरणः**—निद्रा लागण्याच्या पूर्वी एक क्षण बुद्धिवृत्ति अंतर्मुख होते. व त्यामुळें तिच्यामध्यें आत्म्याच्या आनंदाचें प्रतिबिंब पडतें. नंतर ती वृत्ति त्या प्रतिबिंबासह लीन झाली असतां तिलाच आनंदमय असें ह्मणतात. ॥ ६४ ॥

ह्याप्रमाणें आनंदमयाचें स्वरूप दाखवून तोच जाग्रत्कालीं विज्ञानमयरूपानें स्मरण करणारा आहे ही गोष्ट सिद्ध करण्याकरितां त्या वेळच्या त्याच्या सुखानुभवाचें उपपादन करितातः—

**अंतर्मुखो य आनंदमयो ब्रह्मसुखं तदा ॥**
**भुंक्ते चिद्बिम्बयुक्ताभिरज्ञानोत्पन्नवृत्तिभिः ॥ ६५ ॥**

**अन्वयः**—यः अंतर्मुखः आनंदमयः सः तदा चिद्बिम्बयुक्ताभिः अज्ञानोत्पन्नवृत्तिभिः ब्रह्मसुखं भुंक्ते ।

**अर्थः—जो अंतर्मुख झालेला आनंदमय तो त्यासमयीं चित्प्रतिबिंबयुक्त व अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या वृत्तींच्या द्वारा ब्रह्मानंदाचा उपभोग घेतो. ६५**

**विवरणः**—बुद्धि अंतर्मुख झाल्यामुळें तिचा अभिमानीही अंतर्मुख झाल्यासारखा वाटतो. व त्यालाच आनंदमय ह्मणतात. असला हा सोपाधिक आनंदमय अज्ञानापासून उत्पन्न झालेल्या चैतन्याभासयुक्त वृत्तींच्या द्वारा ब्रह्मानंदाचा अनुभव घेतो. सारांश, त्या वेळींही सूक्ष्म वृत्ति असतात. व त्यांच्या द्वारा निद्राकालीन सुखाचा आणि अज्ञानाचा अनुभव घडतो. ॥ ६५ ॥

**वादी**:—मग असें जर आहे तर जाग्रतीप्रमाणें मी या वेळीं सुख भोगीत आहें, असा भास कां होत नाहीं ? **सिद्धान्ती**:—

**अज्ञानवृत्तयः सूक्ष्मा विस्पष्टा बुद्धिवृत्तयः ॥**
**इति वेदान्तसिद्धांतपारगाः प्रवदन्ति हि ॥ ६६ ॥**

**अन्वयः**—अज्ञानवृत्तयः सूक्ष्माः च बुद्धिवृत्तयः विस्पष्टाः इति वेदान्तसिद्धान्तपारगाः प्रवदन्ति हि ।

**अर्थः**—अज्ञानाच्या वृत्ति सूक्ष्म ह्मणजे अस्पष्ट व बुद्धीच्या **वृत्ति** अति स्पष्ट असतात; असें वेदांत सिद्धांतांतील निष्णात पुरुष सांगतात. ॥ ६६ ॥

**विवरणः**—जाग्रतींत बुद्धीचें साम्राज्य असतें व तिच्या वृत्ति अति स्पष्ट असतात. त्यामुळें जाग्रतींतील भोगांचें स्पष्ट भान होतें. पण सुषुप्तींत अज्ञानाचें साम्राज्य असल्यामुळें आणि त्याच्या वृत्तिही अस्पष्ट असल्यामुळें त्या वेळेच्या भोगाचें स्पष्ट भान होत नाहीं. ही गोष्ट विवरणकारादि सर्व वेदान्ताचार्यांनीं सांगितली आहे. ॥ ६६ ॥

**वादी**:—पण आनन्दमय ब्रह्मानन्दाचा सूक्ष्म अविद्यावृत्तींच्या द्वारा भोग घेतो, याविषयीं कांहीं प्रमाण आहे ? **सिद्धान्ती**:—सांगतों:—

**मांडूक्यतापनीयादिश्रुतिष्वेतदतिस्फुटम् ॥**
**आनंदमयभोक्तृत्वं ब्रह्मानंदे च भोग्यता ॥ ६७ ॥**

**अन्वयः**—आनंदमयभोक्तृत्वं च ब्रह्मानन्दे भोग्यता इति एतत् मांडुक्यतापनीयादिश्रुतिषु अतिस्फुटम् अस्ति ।

**अर्थः—आनंदमयाचें भोक्तृत्व व ब्रह्मानंदाची भोग्यता हा प्रकार मांडुक्य, नृसिंहतापनीय इत्यादि श्रुतींमध्यें अति स्पष्टपणें सांगितला आहे. ॥ ६७ ॥**

**विवरणः**—भोक्ता आनंदमय व त्याचें भोग्य ब्रह्मानंद ही गोष्ट अनेक उपनिषदांत आहे. कैवल्यामध्यें 'त्रिषु धामसु०' इत्यादि श्रुतीमध्येंही ह्याच प्रकार सांगितलेला आहे. ॥ ६७ ॥

आतां मांडुक्यांतील 'सुषुप्तस्थान एकीभूतः०' इत्यादि वाक्य अर्थतः येथें घेतातः—

**एकीभूतः सुषुप्तस्थः प्रज्ञानघनतां गतः ॥**
**आनंदमय आनंदभुक्चेतोमयवृत्तिभिः ॥ ६८ ॥**

**अन्वयः**—एकीभूतः सुषुप्तस्थः प्रज्ञानघनतां गतः आनंदमयः चेतोमयवृत्तिभिः आनंदभुक् ।

**अर्थः**—जणुं काय एक झालेला, सुषुप्तिमध्यें रहाणारा, प्रज्ञानघनतेप्रत पोंचलेला आनंदमय चैतन्यभासयुक्त वृत्तींच्या योगानें आनंदाचा भोग घेणारा असतो. ॥ ६८ ॥

**विवरणः**—गाढ निद्रा लागली असतां हा आत्मा एकरूप होतो. पण तोच या अवस्थेचा अभिमानी आहे. तो सर्व सामान्य ज्ञानांचा जसा कांहीं एक गोळा होऊन राहतो. हा आनंदपूर्ण असतो व चैतन्याभासयुक्त अशा अज्ञानाच्या वृत्तींच्या द्वारा हा आनंदाचा भोग घेत असतो. ॥ ६८ ॥

आतां एकीभूत ह्मणून जें ह्मटलें आहे त्याचा अर्थ सांगतातः—

**विज्ञानमयमुख्यैर्यो रूपैर्युक्तः पुराधुना ॥**
**स लयेनैकतां प्राप्तो बहुतन्दुलपिष्टवत् ॥ ६९ ॥**

**अन्वयः**—पुरा यः विज्ञानमयमुख्यैः रूपैः युक्तः सः अधुना लयेन बहुतंदुलपिष्टवत् एकतां प्राप्तः भवति ।

**अर्थः**—पूर्वी जो विज्ञानमय इत्यादि रूपानीं युक्त होता तो ह्यावेळीं लयाच्या योगानें पुष्कळ तांदुळांच्या पिठाप्रमाणें एकतेप्रत प्राप्त होतो. ॥ ६९ ॥

**विवरणः**—जाग्रदवस्थेंत जो हा विज्ञानमय, प्राणमय, मनोमय, चक्षुर्मय, श्रोत्रमय, पृथ्वीमय, आपोमय, वायुमय, इत्यादिरूप असतो तोच, सुषुप्तिसमयीं विज्ञाना-

दि उपाधींचा अज्ञानांत लय झाल्यामुळें एकरूप होतो. याविषयीं तांदुळाच्या पिठाचा दृष्टांत दिला आहे. ह्मणजे ज्याप्रमाणें अनेक तांदुळ दळले असतां त्यांचें पीठरूपानें एकच रूप होतें त्याप्रमाणें या विज्ञानमयादिकांचा प्रकार होतो. ॥ ६९ ॥

आतां प्रज्ञानघन या शब्दाचा अर्थ सांगतातः—

**प्रज्ञानानि पुरा बुद्धिवृत्तयोऽथ घनोऽभवत् ॥**
**घनत्वं हिमबिंदूनामुदग्देशे यथा तथा ॥ ७० ॥**

अन्वयः—यथा उदग्देशे हिमबिंदूनां घनत्वं तथा पुरा प्रज्ञानानि बुद्धिवृत्तयः । अथ घनः अभवत् ।

अर्थः—ज्या प्रमाणें उत्तर देशांत दहिंवराच्या बिंदूंचा एक गोळा होतो त्याप्रमाणें जाग्रदादि कालीं ज्या प्रज्ञान नामक बुद्धिवृत्ति असतात त्याच्याच नंतर एक चिदात्मा होतो. ॥ ७० ॥

विवरणः—हिमालयाच्या आसपास पडलेल्या दवाचा जो एकच गोळा होतो, त्यास बर्फ ह्मणतात. अर्थात् अंतरिक्षांतून पडणाऱ्या भिन्न भिन्न थेंबांनें तें एक घन-रूप होय. ह्या दृष्टांताप्रमाणेंच जाग्रदादि समयीं घटादि पदार्थविषयीं ज्या बुद्धीच्या वृत्ति असतात त्यांस विज्ञानें असें ह्मणतात. विषय व वृत्ति अनेक असल्यामुळें विज्ञानेंही अनेक होतात. पण त्या सर्वांचा सुषुप्तीमध्यें एक गोळा होतो ह्मणजे तीं सर्व विज्ञानें एक चैतन्यरूप होतात. ॥ ७० ॥

आतां या साक्षीभावासच इतर लोक काय ह्मणतात तें सांगतातः—

**तद्घनत्वं साक्षिभावं दुःखाभावं प्रचक्षते ॥**
**लौकिकास्तार्किका यावद्दुःखवृत्तिविलोपनात् ॥ ७१ ॥**

अन्वयः—यत् साक्षिभावं घनत्वं तत् यावत् दुःखवृत्तिविलोपनात् लौकिकाः च तार्किकाः दुःखाभावं प्रचक्षते ।

अर्थः—हें जें साक्षित्वरूप प्रज्ञाघनत्व त्यासच सर्व दुःखवृत्तींचा लोप होत असल्यामुळें सामान्य लोक व वैशेषिकादि तार्किक दुःखाचा अभाव असें ह्मणतात. ॥ ७१ ॥

**विवरण:**—ज्यांना विचार करण्याची मुळींच संवय नाहीं असे सामान्य लोक व श्रुत्यर्थास सोडून मनसोक्त कल्पना करणारे वैशेषिक नैय्यायिक इत्यादि तार्किक या प्रज्ञानघनरूप अवस्थेसच दुःखाभाव असें ह्मणतात. कारण त्या अवस्थेंत जेवढ्या ह्मणून दुःखरूप वृत्ति आहेत त्या सर्वांचा लय झालेला असतो. ॥ ७१ ॥

आतां पूर्वोक्त श्रुतींतील चेतोमुख या शब्दाचा अर्थ सांगतात:-

**अज्ञानबिंबिता चित्स्यान्मुखमानन्दभोजने ॥**
**भुक्तं ब्रह्मसुखं त्यक्त्वा बहिर्यात्यथ कर्मणा ॥ ७२ ॥**

**अन्वय:**—आनंदभोजने अज्ञानबिंबिता चित् मुखं स्यात् । अथ कर्मणा भुक्तं ब्रह्मसुखं त्यक्त्वा बहिः याति ।

**अर्थ:**—आनंदाचा भोग घेण्याचें साधन अज्ञानामध्यें प्रतिबिंबित झालेलें चैतन्य होतें. पण पुढें कर्मवशात् भोगलेलें ब्रह्मसुख सोडून जीव बाहेर येतो. ॥ ७२ ॥

**विवरण:**—ज्याप्रमाणें एखादा कामगार काम करून थकला असतां विश्रांतीकरितां निजावयाच्या खोलींत जाऊन सुखोपभोग घेत मऊ बिछान्यावर पडतो; व थकवा गेल्यावर कामाची वेळ झाली असतां पुनः खोलींतून बाहेर पडून काम करावयास लागतो, त्याप्रमाणें ह्या जीवाची उपाधि विश्रांतीकरितां आपल्या अज्ञानसंज्ञक विश्रांतीच्या जागीं जाते. पुढें ती अज्ञानांत निमग्न झाली असतां अज्ञानांच्या वृत्तींत प्रतिबिंबित झालेल्या चैतन्याच्या द्वारा साक्षी आनंदानुभव घेतो. त्या ब्रह्मानंदास सोडूं नये. असें त्यास पुष्कळ वाटत असतें पण कर्माच्या अधीन असल्यामुळें त्यास बाहेर पडावें लागतें. अर्थात् ब्रह्मानंदास सोडून व जाग्रतींत येऊन तो जीव पुनरपि धर्माधर्माचें फल भोगूं लागतो. ॥ ७२ ॥

या विषयीं प्रमाण काय ह्मणून ह्मणाल तर सांगतों—

**कर्म जन्मांतरेभूद्यत्तद्योगाद्बुद्ध्यते पुनः ॥**
**इति कैवल्यशाखायां कर्मजो बोध ईरितः ॥ ७३ ॥**

**अन्वयः—यत् कर्म जन्मान्तरे अभूत् तद्योगात् पुनः बुध्यते इति कैवल्यशाखायां कर्मजः बोधः ईरितः अस्ति ।**

अर्थः—जें कर्म पूर्वजन्मीं झालेलें असतें त्याच्या योगानें जीव पुनः जाग्रतींत येतो अशा प्रकारें कैवल्यशाखेमध्यें कर्मापासून बोधावस्था सांगितलेली आहे. ॥ ७३ ॥

विवरणः—जन्मांतरीं घडलेल्या कर्मांमुळें जीवास ह्या जन्मांतील अवस्था भोगाव्या लागतात. अर्थात् जाग्रदादि सर्व अवस्थांस पूर्व कर्म कारण आहे. त्यामुळें जाग्रतीस कारण होणारें कर्म क्षीण झालें असतां स्वप्न किंवा सुषुप्ति प्राप्त होते व त्यांस कारण होणाऱ्या कर्मांचा क्षय झाला असतां जाग्रति प्राप्त होते. ॥ ७३ ॥

आतां सुषुप्तींत ब्रह्मानन्दाचा अनुभव येतो हें युक्तिसिद्धही आहे, असें सांगतातः—

**कंचित्कालं प्रबुद्धस्य ब्रह्मानंदस्य वासना ॥**
**अनुगच्छेद्यतस्तूष्णीमास्ते निर्विषयः सुखी ॥ ७४ ॥**

अन्वयः—प्रबुद्धस्य कंचित् कालं ब्रह्मानंदस्य वासना अनुगच्छेत् अतः सः निर्विषयः च सुखी सन् तूष्णीं आस्ते ।

अर्थः—जाग्रतींत आलेल्या पुरुषामध्यें कांहीं कालपर्यंत ब्रह्मानंदाची वासना अनुवृत्त होते. व त्यामुळेंच जाग्रतींत येतांच कांहीं वेळ तो विषयरहित व सुखी होऊन स्वस्थ रहातो. ॥ ७४ ॥

विवरणः—झोंपेंतून उठलेल्या मनुष्यामध्यें झोंपेंतील आनंदाचा कांहीं वेळ संस्कार रहातो. व त्यामुळें तो उठल्याबरोबर स्वस्थ, निश्चेष्ट, शांत व गंभीर दिसतो झोंपेंतून उठलेल्या एखाद्या मनुष्याकडे पाहिल्यास प्रस्तुत अनुभव येण्यासारखा आहे. ७४

मग असें जर आहे तर तो सदा तसाच कां राहत नाहीं असें कोणी म्हणेल म्हणून कांहीं वेळानें विक्षिप्त होण्याचें कारण सांगतातः—

**कर्मभिः प्रेरितः पश्चान्नानादुःखानि भावयन् ॥**
**शनैर्विस्मरति ब्रह्मानंदमेषोऽखिलो जनः ॥ ७५ ॥**

अन्वयः—पश्चात् कर्मभिः प्रेरितः एषः अखिलः जनः नानादुःखानि भावयन् ब्रह्मानंदं शनैः विस्मरति ।

अर्थः—पुढें कर्मांच्या योगानें प्रेरित होणारा असा हा सर्व प्राणिवर्ग अनेक दुःखांची भावना करीत ब्रह्मानंदास हळू हळू विसरतो. ॥ ७५ ॥

**विवरणः**—निजून उठतांच प्राणी शांत व सुखी असतो हें खरें, पण त्यास बलात्कारानें जाग्रतींत आणणारीं कर्में त्याच अवस्थेंत राहूं देत नाहींत. तर विचित्र भावनांच्या योगानें त्यास हळू हळू त्या आनंदांतून काढून दुःखरूप व्यवहारांत लोटितात. ही गोष्ट अनुभवगम्य आहे. प्रतिदिनीं झोंपेंतून उठतांच आपल्या मनाची स्थिति कशी असते व तिचा उत्तरोत्तर बदल कसा होतो हें थोड्याशा विचाराअंतीं प्रत्येकास समजण्यासारखें आहे ॥ ७५ ॥

ह्या ब्रह्मानंदाविषयीं वाद न करण्याचें आणखीं एक सबल कारण सांगतातः—

**प्रागूर्ध्वमपि निद्रायाः पक्षपातो दिने दिने ॥**
**ब्रह्मानंदे नृणां तेन प्राज्ञोऽस्मिन्विवदेत कः ॥ ७६ ॥**

**अन्वयः**—दिने दिने नृणां निद्रायाः प्राक् ऊर्ध्वं अपि ब्रह्मानन्दे पक्षपातः अस्ति । तेन कः प्राज्ञः अस्मिन् विवदेत ।

**अर्थः**—प्रतिदिनीं मनुष्यांचा निद्रेच्या पूर्वीं व नंतरही ब्रह्मनन्दामध्यें स्नेह दिसतो. तेव्हां कोणता शहाणा याविषयीं वाद करणार आहे ? ॥ ७६ ॥

**विवरणः**—निद्रेच्या पूर्वीं मऊ बिछाना इत्यादि साधनांची तयारी करण्यांत व नंतर झोंप व बिछाना सोडून न उठण्यांत प्रत्येक मनुष्याचा प्रतिदिनीं स्नेह आढळतो. निद्रेमध्यें जर खरोखरीच आनंद नसता तर प्राण्यास तिच्या विषयीं एवढें प्रेम कां वाटलें असतें ! रोग्यांना झोंप यावी ह्मणून वैद्य कसे खटपट करीत असतात; अवेळीं झोंपमोड झाल्यास मनुष्य कसा रागावतो; झोंपेपुढें सर्व ऐहिक विषय कसे तुच्छ वाटतात; व एक दिवस झोंप न आली तर बिचाऱ्या मेंदूची काय अवस्था होते याचा ज्यांना अनुभव असेल ते झोंपेंतील आनंदाविषयीं कधींच वाद करणार नाहींत ॥ ७६ ॥

हें सर्व विवेचन ऐकून वादी पुनः शंका घेत आहेः—

**ननु तूष्णीं स्थितौ ब्रह्मानंदश्चेद्भाति लौकिकः ॥**
**अलसाश्चरितार्थाः स्युः शास्त्रेण गुरुणात्र किम् ॥ ७७ ॥**

**अन्वयः**—ननु तूष्णीं स्थितौ ब्रह्मानंदः भाति चेत् अलसाः लौकिकाः चरितार्थाः स्युः । अत्र गुरुणा शास्त्रेण च किं ।

**अर्थः—अहो पण स्वस्थ अवस्थेंत ब्रह्मानन्दाचा जर भास होत असला तर आळसी लोकही कृतार्थ होतील. मग त्याच्याकरितां शास्त्र व गुरु यांचें काय प्रयोजन ? ॥ ७७ ॥**

**विवरण:**—कोणतीही क्रिया न करितां स्वस्थ बसणें हा तूष्णींस्थितीचा अर्थ आहे. व त्या अवस्थेंमध्यें जर ब्रह्मानंद होतो असें मानलें तर सर्वांच्या पूर्वी आळशी लोक मुक्त होतील. अर्थात् मग या कर्ठाण शास्त्राची व गुरूची काय गरज ! अहो आपल्या परड्यांतच जर भाजी मिळूं लागली तर बाजारांत जाऊन पैसे खर्चून ती काण आणील ! ॥ ७७ ॥

पूर्व श्लोकांतील शंकेचें सिद्धांती समाधान करितातः—

**बाढं ब्रह्मेति विद्युश्चेत्कृतार्थास्तावतैव ते ॥**

**गुरुशास्त्रे विनाऽत्यंतं गंभीरं ब्रह्म वेत्ति कः ॥ ७८ ॥**

अन्वयः—बाढं तत् ब्रह्म इति विद्युः चेत् तर्हि तावता एव ते कृतार्थाः स्युः किंतु गुरुशास्त्रे विना अत्यंतं गंभीरं ब्रह्म कः वेत्ति ।

अर्थः—खरें आहे; तें ब्रह्म आहे असें जर त्यास समजलें तर ते तेवढ्यानेंच कृतार्थ होतील. पण गुरु व शास्त्र यांच्यावांचून अत्यंत गंभीर ब्रह्मास कोण जाणणार ? ॥ ७८ ॥

**विवरण:**—तूष्णीं अवस्थेमध्यें ज्याचा प्रत्यय येतो तें ब्रह्मच होय असा जर त्यांस बोध झाला तर ते आळशीही तेवढ्या बोधानेंच मुक्त होतील यांत कांहीं शंका नाहीं. पण अनेक जन्म घेऊन अनेक साधनें केल्यानेंही प्राप्त न होणारें, वाणी व मन यांस अगोचर, सर्वज्ञ, सर्वान्तर्यामी, व सर्वात्मरूप अशा ब्रह्माचें गुरु व शास्त्र यांच्यावांचून दुसऱ्या कोणत्या उपायानें ज्ञान होणार आहे ? ब्रह्मज्ञानास दुसरा कोणताही इलाज चालत नाहीं. ॥ ७८ ॥

**‘ असें जर आहे तर तुमच्या तोंडून ब्रह्मनंदाचें श्रवण करणाऱ्या मला कृतार्थता कां प्राप्त होत नाहीं ? ’**

**या वादाच्या शंकेचा अनुवाद करून सिद्धांती हंसत हंसत त्यास उत्तर देतातः—**

**जानाम्यहं त्वदुक्त्याद्य कुतो मे न कृतार्थता ॥**
**शृण्वत्र त्वादृशो वृत्तं प्राज्ञंमन्यस्य कस्यचित् ॥ ७९ ॥**

अन्वयः—अहं त्वदुक्त्या अद्य जानामि मे कुतः न कृतार्थता । अत्र कस्यचित् त्वादृशः प्राज्ञंमन्यस्य वृत्तं शृणु ।

अर्थः—मी तुमच्या या भाषणावरून आज जाणत आहें पण मला कृतार्थता का प्राप्त होत नाहीं ? असें जर ह्मणशील तर याविषयीं कोणा एका तुझ्या सारख्याच प्राज्ञंमन्याचें वर्तमान सांगतों तें ऐक. ॥ ७९ ॥

विवरण:—ब्रह्मानंदाचें केवल शाब्दिक ज्ञानच कृतकृत्यतेस कारण आहे. असें समजणाऱ्या वाद्याची ही शंका कशी अप्रयोजक आहे हें सिद्धांती आतां गोष्टीच्या-रूपानें सांगणार आहेत. ॥ ७९ ॥

**चतुर्वेदविदे देयमिति शृण्वन्नवोचत ॥**
**वेदाश्चत्वार इत्येवं वेद्मि मे दीयतां धनम् ॥ ८० ॥**

अन्वयः—चतुर्वेदविदे देयं इति शृण्वन् अवोचत । वेदाः चत्वारः इत्येवं अहं वेद्मि अतः मे धनं दीयताम् ।

अर्थः—‘हें सर्व धन चार वेद जाणणारा जो असेल त्यास द्यावयाचें आहे’ असें ऐकून एक मनुष्य ह्मणाला “ चार वेद ” एवढें मी जाणतों यास्तव मला हें धन द्या. ॥ ८० ॥

विवरण:—कोणा एका श्रीमान् गृहस्थास आपलें सर्वस्व दान करावयाचें होतें, व त्यानें एका अक्षरशत्रु मनुष्याजवळ ‘ हें चारी वेद जाणणाऱ्यास द्यावयाचें आहे ’ असें ह्मटलें. पण तें ऐकून तो ह्मणतो “ महाराज ‘ चार वेद आहेत ’ हें मीही जाणतों तेव्हां हें सर्व धन मलाच द्या.” त्या मूर्खाचें हें भाषण ऐकून तो श्रीमान् हंसला. व ह्मणाला बाबारे नुसतें नांव ऐकल्यानेंच जर चतुर्वेदी होतां आलें असतें तर आज जगांत सर्वच चतुर्वेदी झाले असते. सारांश या गोष्टीप्रमाणेंच तुझी अवस्था आहे. ॥ ८० ॥

' असें कसें ह्मणतां ! तो तर नुस्ती वेदांची संख्याच जाणत होता. पण माझी तशी स्थिति नाहीं ' ह्या वाद्याच्या ह्मणण्याचा अनुवाद करून सिद्धान्ती आतां त्यास उत्तर देतात:–

**संख्यामेवैष जानाति न तु वेदानशेषतः ॥**
**यदि तर्हि त्वमप्येवं नाशेषं ब्रह्म वेत्सि हि ॥ ८१ ॥**

अन्वयः—एषः संख्यां एव जानाति । वेदान् तु अशेषतः न एवं यदि तर्हि त्वं अपि अशेषं ब्रह्म न वेत्सि हि ।

अर्थः—हा संख्या मात्र जाणतो. वेदांस संपूर्णपणें जाणत नाहीं, असें जर ह्मणशील तर तूंही निःशेष ब्रह्म जाणत नाहींस. ॥ ८१ ॥

विवरणः—पूर्वोक्त गोष्टींतील मनुष्य नुस्ती वेदांची संख्याच जाणतो; पण त्यास वेदांचें संपूर्ण ज्ञान नसतें. अर्थात् त्याची स्थिति माझ्यापेक्षां निराळी आहे. असें जर ह्मणशील तर तें बरोबर नाहीं. कारण तुला तरी ' ब्रह्मानन्द ' या शब्दाच्या पलीकडे काय ठाऊक आहे ? तुला ब्रह्मसाक्षात्कार थोडाच झाला आहे. सारांश त्या चार वेदांच्या अभिमान्याप्रमाणें तूंही फुकट ब्रह्मज्ञानाभिमान मानणारा आहेस. ॥८१॥

आतां याविषयींही वादी शंका घेतो:—

**अखंडैकरसानंदे मायातत्कार्यवर्जिते ॥**
**अशेषत्वसशेषत्ववार्तावसर एव कः ॥ ८२ ॥**

अन्वयः—मायातत्कार्यवर्जिते अखंडैकरसानन्दे अशेषत्वसशेषत्ववार्तावसरः एव कः अस्ति ।

**अर्थः—माया व मायाकार्य यांनीं रहित व अखंड–एक–रसानन्द ब्रह्म ब्रह्माच्या ठिकाणीं अशेषत्व सशेषत्व इत्यादि शब्दांस अवसर कोठें आहे. ॥८२॥**

**विवरणः—तुला अशेष ब्रह्मज्ञान झालेलें नाहीं असें वरच्या श्लोकांत ह्मटलें आहे व त्या ' अशेष ' शब्दावरच जोर देऊन वादी येथें शंका करीत आहे. माया व मायाकार्य यांनीं रहित; अखंड, एकरस, आनंद इत्यादि रूप ब्रह्माच्या ठायीं अशेषत्वादि शब्दांचा प्रयोग तरी कसा होऊं शकेल ? असा या शंकेचा भावार्थ आहे. ॥ ८२ ॥**

पण सिद्धान्ती या शंकेचेंही समाधान हंसत हंसत करितातः—

**शब्दानेव पठस्याहो तेषामर्थं च पश्यसि ॥**
**शब्दपाठेऽर्थबोधस्ते संपाद्यत्वेन शिष्यते ॥ ८३ ॥**

अन्वयः—शब्दान् एव पठसि आहो तेषां अर्थं पश्यसि । ते शब्दपाठे अर्थ-बोधः संपाद्यत्वेन शिष्यते ।

अर्थः—तूं केवल ब्रह्मविषयक शब्द पढतोस कीं त्यांचा अर्थही पहातोस ! केवल शब्दपाठ जर करीत असशील तर तुला अजून अर्थबोध करून घेणें राहिलें आहे. ॥ ८३ ॥

विवरणः—ब्रह्म अखंडैकरस, अद्वितीय, सच्चिदानन्दरूप आहे; इत्यादि नुस्ते शब्द मात्र तूं वाचतोस कीं त्यांच्या अर्थाकडेही तुझें ध्यान आहे ? केवल शब्दांचाच पाठ जर तूं करीत असशील तर त्यांच्या अर्थज्ञानाची अवश्यकता असल्यामुळें तें तुला संपादन करून घेतलें पाहिजे ॥ ८३ ॥

आणि—

**अर्थे व्याकरणाद्बुद्धे साक्षात्कारोऽवशिष्यते ॥**
**स्यात्कृतार्थत्वधीर्यावत्तावद्गुरुमुपास्व भोः ॥ ८४ ॥**

अन्वयः—व्याकरणात् अर्थे बुद्धे सति साक्षात्कारः अवशिष्यते । अतः यावत् कृतार्थत्वधीः स्यात् तावत् गुरुं उपास्व भोः ।

अर्थः—व्याकरणावरून अर्थज्ञान झालें असतां साक्षात्कार होण्याचें राहतें. यास्तव कृतार्थता बुद्धि होई तोंपर्यंत बाबारे तूं गुरूची उपासना कर ॥ ८४ ॥

विवरणः—व्याकरणादि शास्त्रांच्या साह्यानें तुला ब्रह्माचें परोक्ष ज्ञान झालें कीं संशयादिकांचें निरसन करून अपरोक्ष ज्ञान होणें अवशिष्ट रहाणार. सारांश मी आतां कृतकृत्य झालों असें वाटेपर्यंत तुला गुरूची उपासना करणेंच उचित आहे. व कृतार्थ बुद्धि झाली कीं संपूर्ण ब्रह्मज्ञान झालें म्हणून समज. ॥ ८४ ॥

याप्रमाणें प्रसंगोपात्त शंकांचें निरसन करून आतां प्रकृत विषयाकडे वळतातः—

**आस्तामेतद्यत्र यत्र सुखं स्याद्विषयैर्विना ॥**
**तत्र सर्वत्र विद्ध्येतां ब्रह्मानंदस्य वासनाम् ॥ ८५ ॥**

अन्वयः—एतत् आस्ताम्। यत्र यत्र विषयैः विना सुखं स्यात् तत्र सर्वत्र ब्रह्मानन्दस्य वासनां विद्धयेताम् ।

अर्थः—हें असो. ज्या ज्या समयीं विषयांवाचून सुख होतें त्या त्या सर्व काळीं ब्रह्मानंदाची वासना जाणावी. ॥ ८५ ॥

विवरणः—तात्पर्य; विषयानुभवावांचून आनंदाची प्रतीति होऊं लागली कीं तो ब्रह्मानंदाच्या वासनेचा आनंद आहे असें निःसंशय जाणावें ॥ ८५ ॥

ह्याप्रमाणें ब्रह्मानंद व वासनानंद यांचें दिग्दर्शन करून आतां तीन प्रकारचा आनंद आहे असा नियम करण्याकरितां पूर्वी चव्वेचाळिसाव्या श्लोकांत सांगितलेल्या विषयानंदाचा अनुवाद करितात:—

विषयेष्वभिलब्धेषु तदिच्छोपरमे सति ॥
अंतर्मुखमनोवृत्तावानन्दः प्रतिबिम्बति ॥ ८६ ॥

अन्वयः—विषयेषु अभिलब्धेषु तदिच्छोपरमे सति अन्तर्मुखमनोवृत्तौ आनंदः प्रतिबिंबति ।

अर्थः—विषय प्राप्त झाले असतां व त्यामुळें त्यांची इच्छा शांत झाली असतां अंतर्मुख मनोवृत्तीमध्यें जो आनंद प्रतिबिंबित होतो तो विषयानंद होय. ॥ ८६ ॥

विवरणः—इष्ट विषयांची पूर्णपणें प्राप्ति झाली असतां त्या त्या विषयाविषयींची इच्छा पूर्ण होते व त्यामुळें तिची शांति होते. तदनंतर त्या अंतर्मुख झालेल्या बुद्धिवृत्तीमध्यें आनंदाचें प्रतिबिंब पडतें; हाच विषयानन्द होय. ॥ ८६ ॥

तात्पर्यः—

ब्रह्मानन्दो वासना च प्रतिबिम्ब इति त्रयम् ॥
अंतरेण जगत्यस्मिन्नानन्दो नास्ति कश्चन ॥ ८७ ॥

अन्वयः—ब्रह्मानन्दः वासना च प्रतिबिंबः इति त्रयं अन्तरेण अस्मिन् जगति कश्चन आनंदः न अस्ति ।

अर्थः—ब्रह्मानन्द, वासनानन्द, व विषयानन्द या तीन आनंदांवांचून या जगांत कोणताही आनंद नाहीं. ॥ ८७ ॥

विवरणः—या श्लोकांत सांगितलेल्या ब्रह्मानंदादि तीन आनंदांवांचून जगांत आनंदच नाहीं. पण—पूर्वी ब्रह्मानन्द, विद्यासुख व विषयानंद अशा तीन प्रकारच्या आनंदांचा उल्लेख आहे, व त्याच्याशीं या प्रस्तुत श्लोकाचा विरोध दिसतो. त्याच-प्रमाणें मुख्यानंद, आत्मानंद, योगानंद, ब्रह्मानंद, अद्वैतानंद इत्यादि शब्दांचा या व पुढील प्रकरणांतून उल्लेख आहे. त्यामुळें प्रस्तुत श्लोकांतील निर्देश अयुक्त होय—असें कोणाल वाटेल, पण तें बरोबर नाहीं. कारण विद्यानंदाचा विषयानंदामध्येंच अंतर्भाव होत असून मुख्यानंदादि सर्व आनंद एकच आहे. ह्मणजे ब्रह्मानंदाचींच तीं भिन्न भिन्न नांवें आहेत. याविषयीं पुढें मूळ ग्रंथांतही स्पष्ट उल्लेख होणारच आहे.

आतां ब्रह्मानन्द व दुसरे दोन आनंद यांचा संबंध कसा आहे तें सांगतातः—

**तथा च विषयानंदो वासनानंद इत्यमू ॥**
**आनंदौ जनयन्नास्ते ब्रह्मानन्दः स्वयंप्रभः ॥ ८८ ॥**

अन्वयः—तथा च यः विषयानंदः च वासनानंदः इति अमू आनंदौ जनयन् आस्ते स स्वयंप्रभः ब्रह्मानन्दः ।

अर्थः—अर्थात् जो स्वयंप्रकाश आनंद विषयानंद व वासनानंद या दोन आनंदांस उत्पन्न करीत असतो तो ब्रह्मानंद होय. ॥ ८८ ॥

विवरणः—ब्रह्मानंद दुसऱ्या दोन्ही आनंदांचें उत्पत्तिस्थान आहे असें याचें तात्पर्य समजावें. ॥ ८८ ॥

पूर्वोक्त सर्व ग्रंथाचा सारांश सांगून आतां उत्तर ग्रंथास आरंभ करण्याची प्रतिज्ञा करितातः—

**श्रुतियुक्त्यनुभूतिभ्यः स्वप्रकाशचिदात्मके ॥**
**ब्रह्मानन्दे सुप्तिकाले सिद्धे सत्यन्यदा शृणु ॥ ८९ ॥**

अन्वयः—श्रुतियुक्त्यनुभूतिभ्यः सुप्तिकाले स्वप्रकाशचिदात्मके ब्रह्मानंदे सिद्धे सति अन्यदा शृणु ।

अर्थः—श्रुति, युक्ति व अनुभव यांवरून निद्रासमयीं स्वप्रकाश व चैतन्य-रूप ब्रह्मानन्दाची सिद्धि झाली असतां जो आणखी केव्हां होतो तो ऐक. ८९

विवरणः—अठावन्नाव्या श्लोकापासून येथपर्यंत श्रुतिप्रमाणें, युक्ती व सर्व प्राण्यांचे अनुभव यांवरून निद्रासमयीं ब्रह्मानन्द असतो असें सिद्ध केलें. आतां यापुढें जाग्रतींतही ब्रह्मानंदाचा कसा अनुभव येईल हें सांगावयाचें आहे. ॥ ८९ ॥

पण ब्रह्मानंदाचा उपाय सांगण्यापूर्वी जीवाच्या दुसऱ्या कोणत्या अवस्था आहेत तें सांगतात:—

**य आनन्दमयः सुप्तौ सविज्ञानमयात्मताम् ॥**
**गत्वा स्वप्नं प्रबोधं वा प्राप्नोति स्थानभेदतः ॥ ९० ॥**

अन्वयः—यः सुप्तौ आनंदमयः सः विज्ञानमयात्मतां गत्वा स्थानभेदतः स्वप्नं प्रबोधं वा प्राप्नोति।

अर्थः—जो निद्रासमयीं आनंदमय होता तोच विज्ञानमयतेप्रत प्राप्त होऊन भिन्न स्थानामुळें स्वप्न व जाग्रति या अवस्थांस प्राप्त होतो. ॥ ९० ॥

विवरणः—बुद्धीचा अज्ञानांत लय झाल्यामुळें जो आनंदमय या नांवानें बोलला जात होता, तोच बुद्धि अज्ञानांतून बाहेर आली असतां तिच्याशीं मिळून जातो व त्यामुळें त्यास विज्ञानमय ह्मणतात. या विज्ञानमय अवस्थेंत राहूनच तो स्वप्न व जाग्रति या दोन अवस्था भोगतो. शरीरांतील भिन्न भिन्न स्थानीं राहिल्यामुळें त्यास या दोन अवस्था प्राप्त होत असतात. ॥ ९० ॥

आतां कोणत्या स्थानीं राहिल्यानें यास कोणती अवस्था प्राप्त होते तें सांगतात:—

**नेत्रे जागरणं कंठे स्वप्नः सुप्तिर्हृदंबुजे ॥**
**आपादमस्तकं देहं व्याप्य जागर्ति चेतनः ॥ ९१ ॥**

अन्वयः—नेत्रे जागरणं कंठे स्वप्नः च हृदंबुजे सुप्तिः भवति। चेतनः आपादमस्तकं देहं व्याप्य जागर्ति।

अर्थः—नेत्रांत जागरण, कंठांत स्वप्न व हृदयकमलांत निद्रा होतो. हा जीव पायांपासून मस्तकापर्यंत देह व्यापून जागतो. ॥ ९१ ॥

विवरणः—विज्ञानमय जोंपर्यंत नेत्रांत असतो तोंपर्यंत त्याला जाग्रतीचा अनुभव येतो; जोंपर्यंत कंठस्थानीं असतो तोंपर्यंत स्वप्न व जेव्हां हृदयकमलांत असतो तेव्हां गाढ निद्रा तो अनुभवितो. पण जाग्रतींत नेत्रामध्यें राहून त्याला सर्व देहाचें भान

करें होतें, ह्मणून कोणी विचारील यास्तव ग्रंथकार ह्मणतातः–तो जीव देहास नखशिखांत व्यापून राहातो. ह्मणजे तो जरी नेत्ररूप एकदेशांत राहात असला तरी त्याचा अंमल सर्व शरीरावर चालतो. ॥ ९१ ॥

आतां हीच गोष्ट दृष्टान्तानें स्पष्ट करितातः–

देहतादात्म्यमापन्नस्तप्तायःपिंडवत्ततः ॥
अहं मनुष्य इत्येवं निश्चित्यैवावतिष्ठते ॥ ९२ ॥

अन्वयः—यतः तप्तायःपिंडवत् देहतादात्म्यं आपन्नः ततः अहं मनुष्यः इति एवं निश्चित्य एव अवतिष्ठते ।

अर्थः—ज्याअर्थी जीवात्मा तापलेल्या लोखंडाच्या पिंडाप्रमाणें देहाशीं तादात्म्य पावलेला असतो त्याअर्थीं 'मी मनुष्य' अशा प्रकारें निश्चय करूनच राहातो ॥ ९२ ॥

विवरणः—तापलेला लोखंडाचा गोळा अग्नीशीं तादात्म्य पावतो, ह्मणजे तो अग्निरूपच होतो. व त्यामुळें त्यास ' हा अग्नि आहे ' असें लोक ह्मणतात. हा दृष्टांत होय. ह्मणजे त्याप्रमाणेंच जीवात्मा देहाशीं तादात्म्य पावतो व त्यामुळें ' मी मनुष्य आहें, शहाणा आहें ' इत्यादि निश्चय करून तो व्यवहारांत राहातो ॥ ९२ ॥

या देह तादात्म्यामुळें दुसऱ्याही कोणत्या अवस्था होतात तें सांगतातः–

उदासीनः सुखी दुःखीत्यवस्थात्रयमेत्यसौ ॥
सुखदुःखे कर्मकार्ये त्वौदासीन्यं स्वभावतः ॥ ९३ ॥

अन्वयः—असौ उदासीनः सुखी दुःखी च इति अवस्थात्रयं एति । सुखदुःखे कर्मकार्ये औदासिन्यं तु स्वभावतः ।

अर्थः—हा उदासीन, सुखी व दुःखी इत्यादि तीन अवस्थांप्रत प्राप्त होतो. यांतील सुख व दुःख कर्मांचीं कार्यें आहेत. पण औदासिन्य स्वाभाविक आहे. ॥ ९३ ॥

विवरणः—हा जीवात्मा उदासीनता, सुखित्व, दुःखित्व या तीन अवस्थांप्रत प्राप्त होतो. पण सुख व दुःख कर्मफळ आहे. ह्मणजे पुण्याचें फळ सुख व पापाचें

दुःख आहे. औदासिन्याची मात्र तशी स्थिति नाहीं. तें आत्म्याच्या स्वभावभूत आहे. अर्थात् सुखदुःखाप्रमाणें अनित्य नव्हे. ॥ ९३ ॥

या सुखदुःखांचे आणखी दोन भेद कसे होतात व औदासिन्य केव्हां असतें, तें सांगतातः–

**बाह्यभोगान्मनोराज्यात्सुखदुःखे द्विधा मते ॥**
**सुखदुःखान्तरालेषु भवेत्तूष्णीमवस्थितिः ॥ ९४ ॥**

**अन्वयः**—बाह्यभोगात् च मनोराज्यात् सुखदुःखे द्विधा मते । सुखदुःखान्तरालेषु तूष्णीं अवस्थितिः भवेत् ।

**अर्थः**—बाह्य भोगांमुळें व मनोराज्यामुळें सुख व दुःख दोन प्रकारचें मानलेलें आहे आणि सुख व दुःख यांच्यामध्यें तूष्णीं स्थिति होते. ॥ ९४ ॥

**विवरणः**—एक बाह्य सुख व दुसरें आंतर. उन्हाळ्यांत अंगास थंड वारा लागला असतां सुख होतें; पुत्रास आलिंगन दिलें असतां सुख होतें; अत्तराचा वास घेतला असतां सुख होतें; सुंदर पदार्थ पाहून आनंद वाटतो व गोड किंवा इष्ट रस खाल्यावर आनंद होतो; हें बाह्य सुख. आणि मनोराज्यामुळें जें होतें तें आंतर होय. असेंच दुःखही दोन प्रकारचें आहे. या सुखदुःखांच्या मधील जी सुखदुःखरहित अवस्था असते, तिलाच उदासीनता ह्मणतात. ॥ ९४ ॥

आतां ज्या आनंदाकरितां जाग्रतादि अवस्थांचें वर्णन केलें त्यांचें प्रतिपादन करितातः–

**न कापि चिंता मेस्त्यद्य सुखमास इति ब्रुवन् ॥**
**औदासिन्ये निजानंदभानं वक्त्यखिलो जनः ॥ ९५ ॥**

**अन्वयः**—अद्य मे का अपि चिंता नास्ति । अहं सुखं आसे इति ब्रुवन् अखिलः जनः औदासिन्ये निजानंदभानं वक्ति ।

**अर्थः**—आतां मला कोणतीही चिंता नाहीं, मी सुखानें बसलों आहें, असें बोलणारे सर्व लोक औदासिन्यामधील निजानंदाचें भान सांगत असतात. ॥ ९५ ॥

विवरणः—उदासीन पुरुष निश्चिंत असतात व त्यामुळें त्यांस सर्वदा सुख होतें; आणि ते ही गोष्ट आपल्या तोंडानें सांगत असतात. अर्थात् उदासीन अवस्थेंतील आत्मानंद अनुभवसिद्ध आहे. ॥ ९५ ॥

'पण उदासीन अवस्थेंतील आनंदास जर निजानंद ह्मटलें, तर वासनानंद कोणचा ?' या शंकेचें आतां समाधान करितातः—

**अहमस्मीत्यहंकारसामान्याच्छादितत्त्वतः ॥**
**निजानन्दो न मुख्योयं किं त्वसौ तस्य वासना ॥ ९६ ॥**

अन्वयः—अहं अस्मि इति अहंकारसामान्याच्छादितत्त्वतः अयं मुख्यः निजानंदः न किंतु असौ तस्य वासना ।

अर्थः—'मी आहें' या सामान्य अहंकाराच्या योगानें आच्छादित झाल्यामुळें हा मुख्य निजानंद नव्हे; तर ही त्याची वासना होय. ॥ ९६ ॥

विवरणः—उदासीन अवस्थेंत जो आनंद भासतो, तो मुख्य नव्हे. कारण त्यावेळीं 'मी आहें' हें भान असतेंच. ह्मणजे तो आनंद या अहं अहंकारानें आच्छादित झालेला असतो. आणि त्यामुळें ती मुख्य ब्रह्मानन्दाची वासना आहे, असें ह्मणावें लागतें. ॥ ९६ ॥

मुख्य आनंदाहून निराळी अशी त्याची वासना असते असें आतां दृष्टांत देऊन स्पष्ट करितातः—

**नीरपूरितभांडस्य बाह्ये शैत्यं न तज्जलम् ॥**
**किं तु नीरगुणस्तेन नीरसत्तानुमीयते ॥ ९७ ॥**

अन्वयः—नीरपूरितभांडस्य बाह्ये यत् शैत्यं अस्ति तत् जलं न भवति । किंतु नीरगुणः तेन नीरसत्ता अनुमीयते ।

अर्थः—पाण्यानें भरलेल्या भांड्याच्या बाहेर जो थंडपणा असतो तें स्वतः पाणी नव्हे तर पाण्याचा गुण होय. पण त्यावरून पाण्याच्या अस्तित्वाचें अनुमान केलें जातें. ॥ ९७ ॥

विवरणः—पाण्यानें भरलेल्या भांड्यास बाहेरून हात लावून पाहिल्यास तें गार लागतें. पण तें पाणी नव्हे, तर तो त्याचा शीतगुण आहे हें कोणीही ह्मणेल. कारण

पाण्याचें स्वरूप जें द्रवत्व तें तेथें नसतें. अर्थात् हातास लागणारा गारवा पाण्याचा गुण होय. त्यावरून भांड्यांतील पाण्याचें अनुमान करितां येतें. थंडीच्या दिवसांत प्रस्तुत अनुभव चांगल्या प्रकारें येण्यासारखा आहे. ॥ ९७ ॥

आणि या दृष्टान्ताप्रमाणेंच—

**यावद्यावदहंकारो विस्मृतोभ्यासयोगतः ॥**
**तावत्तावत्सूक्ष्मदृष्टेर्निजानंदोनुमीयते ॥ ९८ ॥**

**अन्वयः**—यावत् यावत् अभ्यासयोगतः अहंकारः विस्मृतः तावत् तावत् सूक्ष्मदृष्टेः निजानंदः अनुमीयते ।

**अर्थः**—जसा जसा अभ्यासाच्या योगानें अहंकाराचा विसर पडतो, तशी तशी सूक्ष्म दृष्टी होत असल्यामुळें निजानंदाचें अनुमान केलें जातें. ॥ ९८ ॥

**विवरणः**—चित्ताच्या ऐकाग्र्याकरितां केल्या जाणाऱ्या अभ्यासाच्या योगानें अहंकारादि वृत्तींचा हळू हळू लोप होऊं लागतो. व तो जसा जसा अधिक वाढतो तशी तशी अंतर्दृष्टी अधिक सूक्ष्म होते व जशी जशी दृष्टि सूक्ष्म होत जाते, तसें तसें आत्मनंदाचें अनुमान होतें. सारांश; दृढ अभ्यासाच्या योगानें अहंकाराचा लय होतो. अहंकाराच्या लयामुळें दृष्टि सूक्ष्म होते. आणि सूक्ष्म दृष्टि झाली असतां आत्मानंदाचें निःशंकपणें अनुमान करितां येतें. ॥ ९८ ॥

आतां बुद्धि कोठपर्यंत सूक्ष्म होते तें सांगतातः—

**सर्वात्मना विस्मृतः सन्सूक्ष्मतां परमां व्रजेत् ॥**
**अलीनत्वान्न निद्रैषा ततो देहोपि नो पतेत् ॥ ९९ ॥**

**अन्वयः**—सर्वात्मना विस्मृतः सन् अहंकारः परमां सूक्ष्मतां व्रजेत् । अलीनत्वात् एषा निद्रा न । ततः देहः अपि न पतेत् ।

**अर्थः**—सर्व प्रकारें विस्मृत होत्साता अहंकार परम सूक्ष्मतेप्रत पोंहचतो. तो लीन झालेला नसल्यामुळें ही निद्रा नव्हे व त्यामुळें देहही पडत नाहीं. ॥ ९९ ॥

**विवरणः**—अहंकाराचा सर्व प्रकारें विसर पडला असतां तो अतिशय सूक्ष्म होतो. पण त्याचा लय झालेला नसल्यामुळें त्या सूक्ष्मावस्थेस निद्रा असेंही म्हणतां येत नाहीं. निद्रेचें मुख्य लक्षण शरीर शिथिल होणें हें आहे. झोंप आली असतां

शरीर भूमीवर पडूं लागतें, हें सर्व प्रसिद्ध आहे. पण प्रस्तुत अवस्था लयरूप नसल्यामुळें शरीर पडूं लागत नाहीं. ॥ ९९ ॥

सारांश:—

**न द्वैतं भासते नापि निद्रा तत्रास्ति यत्सुखम् ॥**
**स ब्रह्मानंद इत्याह भगवानर्जुनं प्रति ॥ १०० ॥**

**अन्वय:**— यत्र द्वैतं न भासते निद्रा अपि न तत्र यत् सुखं अस्ति सः ब्रह्मानंदः इति भगवान् अर्जुनं प्रति प्राह ।

**अर्थ:**—ज्या वेळीं द्वैत भासत नाहीं व निद्राही नसते त्या वेळीं जें सुख असतें तो ब्रह्मानन्द होय; असें भगवान् अर्जुनास सांगता झाला. ॥ १०० ॥

**विवरण:**—इष्ट द्वैताचें भान झालें असतां सुख होतें किंवा निद्रेमध्यें सुख होतें. पण यांतील एकही सुखाचें कारण नसतांना जें सुख होतें, तो ब्रह्मानन्दच होय, असें भगवंतांनीं गीतेच्या सहाव्या अध्यायांत सांगितलें आहे. ॥ १०० ॥

कोठें म्हणून विचारशील तर सांगतों:—

**शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ॥**
**आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिंतयेत् ॥ १ ॥**

**अन्वय:**—धृतिगृहीतया बुद्ध्या शनैः शनैः उपरमेत् च मनः आत्मसंस्थं कृत्वा किंचित् अपि न चिंतयेत् ।

**अर्थ:**—धैर्ययुक्त बुद्धीच्या योगानें हळु हळु शांत व्हावें. मनास आत्म्याचे ठायीं स्थिर करून नंतर कांहींही चिंतन करूं नये. ॥ १०१ ॥

**विवरण:**—धैर्ययुक्त बुद्धि हेंच अंतःकरणास शांत करण्याचें साधन आहे. यास्तव तिचा आश्रय करून हळु हळु शांत व्हावें. आतां अंतःकरणास कोठपर्यंत शांत करावें म्हणून म्हणशील तर सांगतों—मन अन्य सर्व विषयांस सोडून आत्म्यामध्येंच निश्चयपूर्वक स्थिर होईल तों असा अभ्यास करावा. व तें एकदा आत्मनिष्ठ झालें कीं सर्व मनोव्यापार सोडावे. ॥ १ ॥

पण, ही पूर्वोक्त सिद्धि प्राप्त करून घेण्याची ज्याला इच्छा असेल, त्यानें प्रथम जें करावें तें भगवानांच्या मुखानेंच सांगतात:—

**यतो यतो निश्चरति मनश्चंचलमस्थिरम् ॥**

**ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २ ॥**

**अन्वयः**--चंचलं अस्थिरं च मनः यतः यतः निश्चरति ततः ततः एतत् नियम्य आत्मनि एव वशं नयेत् ।

**अर्थः**—चंचल व त्यामुळेंच अस्थिर मन ज्या ज्या शब्दादि विषयास उद्देशून बाहेर पडतें, त्या त्या विषयांपासून त्याचें नियमन करून आत्म्याच्या अधीन करावें. ॥ २ ॥

**विवरणः**--मन स्वभावतःच चंचल आहे व त्यामुळें तें एकाच विषयांत स्थिर होऊन राहात नाहीं. पण तें ज्या ज्या विषयाच्या उद्देशानें वृत्तिद्वारा बाहेर पडत असेल त्या त्या विषयापासून त्यास मागें परतवून आत्म्याच्या स्वाधीन करावें. जसे राजपुरुष चोराला मुख्य कामगाराच्या हवालीं करितात, त्याप्रमाणें या दुष्ट मनाचा निग्रह करावा. ॥ २ ॥

पण मन शांत झालें असतां कोणाला लाभ होतो तें आतां सांगतातः-

**प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ॥**

**उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ ३ ॥**

**अन्वयः**—शांतरजसं प्रशांतमनसं अकल्मषं एनं योगिनं उत्तमं ब्रह्मभूतं सुखं उपैति ।

**अर्थः**—ज्याचें मन शांत आहे, ज्याचा रजोगुण नष्ट झाला आहे व जो निष्पाप आहे, अशा ह्या योग्यास ब्रह्मरूप उत्तम सुख प्राप्त होतें. ॥ ३ ॥

**विवरणः**—अभ्यासाच्या योगानें ज्याचे मोहादि क्लेश नष्ट झाले आहेत व त्यामुळेंच ज्याचें मन शांत झालें आहे आणि मन शांत झाल्यामुळें ज्याचें सर्व पापकर्म नष्ट झालें आहे. अशा त्या उत्तम योग्यासच ब्रह्मसुखाचा लाभ होतो. दुसऱ्या कोणासही होत नाहीं; सारांश आत्मचिंतन व आत्मध्यान हेंच या अक्षय सुखाचें कारण आहे. ॥ ३ ॥

**यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ॥**

**यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ ४ ॥**

सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतींद्रियम् ॥
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ ५ ॥
यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ॥
यस्मिँस्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ ६ ॥
तं विद्यादुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ॥
स निश्चयेन योक्तव्यो योगो निर्विण्णचेतसा ॥ ७ ॥

अन्वयः—यत्र योगसेवया निरुद्धं चित्तं उपरमते च यत्र आत्मना आत्मानं पश्यन् आत्मनि एव तुष्यति । यत्र च यत् बुद्धिग्राह्यं अतींद्रियं आत्यंतिकं सुखं तत् वेत्ति च यत्र स्थितः अयं तत्वतः न चलति एव । न यं लब्ध्वा अपरं लाभं ततः अधिकं न मन्यते, यस्मिन् स्थितः गुरुणा अपि दुःखेन न विचाल्यते तं दुःखसंयोग-वियोगं योगसंज्ञितं विद्यात् । सः योगः अनिर्विण्णचेतसा निश्चयेन योक्तव्यः ॥४।५।६।७॥

अर्थः—ज्या परिणामविशेषामध्यें दृढ योगाभ्यासामुळें एकाग्र झालेलें चित्त शात होतें; तसेंच ज्या परिणामविशेषामध्यें सत्वप्रधान अंतःकरणाच्या द्वारा प्रत्यगात्म्यास पाहाणारा साधक परमानंदघन आत्म्यामध्येंच संतुष्ट होतो; ज्या अवस्थेंत जें बुद्धिद्वाराच ग्रहण करण्यास योग्य अतींद्रिय ( इंद्रियें व विषय यांच्या संयोगापासून न होणारें ) व निरतिशय सुख त्यास साधक जाणतो; त्याचप्रमाणें ज्या अवस्थेंत स्थित झालेला पुरुष तत्त्वापासून ढळत नाहीं; ज्याची प्राप्ति झाल्यावर त्यास दुसरा कोणताही लाभ अधिक वाटत नाहीं; आणि ज्यामध्यें स्थित झालेला हा पुरुष मोठ्या दुःखांमुळेंही चंचल होत नाहीं त्या दुःखसंयोगाच्या वियोगास योग असें जाणावें. तो योग निर्वेदरहित अंतःकरणानें व निश्चयानें करावा ॥४॥५॥६॥७॥

विवरणः—पूर्व श्लोकांत जें उत्तम सुख प्राप्त होतें म्हणून सांगितलें होतें, त्याचाच भगवानांनीं पुढील चार श्लोकांत विस्तार केला आहे. हें सर्व प्रकरण भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांत आहे. या चारी श्लोकांचें तात्पर्य असें:—ब्रह्मानंदरूप सुख प्राप्त झालें असतां चित्त निश्चल होतें; आणि निर्मल अंतःकरणानें आत्म्याच

पाहून साधक त्याच्या स्वरूपभूत आनंदांतच गढून जातो; एकदा या स्वसंवेद्य व अतींद्रिय सुखाचा लाभ झाला असतां तो आत्मतत्त्वापासून ढळत नाहीं; त्याला दुसरा कोणताही लाभ या सुखाहून अधिक वाटत नाहीं; व त्यांच्यावर दुःखाचे डोंगर जरी पडले तरी तो डगमगत नाहीं. अशा प्रकारच्या या सुखाची प्राप्ति ह्मणजे दुःखाचा नाश होय. किंवा अगदीं मूळ शब्दास धरून बोलावयाचें असल्यास सुख-प्राप्ति ह्मणजे दुःखाच्या संयोगाचा वियोग होय, ह्मणजे दुःखाचा पुरुषाशीं पूर्वी जो संयोग झाला होता त्याचा विच्छेद होणें होय. यालाच शास्त्रांत योग असें ह्मटलें आहे. हा फार कठिण असल्यामुळें साधकास त्याच्या अनुष्ठानाचा त्यानें कंटाळा न करितां किंवा दीर्घकाल अनुष्ठान करूनही सिद्धि होत नाहीं ह्मणून न त्रासतां, दृढ निश्चयानें अभ्यास करावा. या जन्मीं साध्य न झाल्यास पुढच्या जन्मीं किंवा त्याच्या पुढच्या जन्मीं साध्य होईल. उगीच त्वरा करण्यांत काय तात्पर्य आहे ! अशी मनाची समजूत घालून जर या चंचल मनाच्या निग्रहास आरंभ केला, तर त्याचीं पूर्वोक्त मधुर फळें कधीं ना कधीं चाखावयास मिळतीलच मिळतील. यांत शंका नाहीं. ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥

तात्पर्य:—

युंजन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ॥
सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते ॥ ८ ॥

अन्वयः—एवं आत्मानं सदा युञ्जन् विगतकल्मषः योगी ब्रह्मसंस्पर्शं अत्यंतं सुखं सुखेन अश्नुते।

अर्थः—ह्याप्रमाणें आपल्या मनास सर्वदा शांत करणारा निष्पाप योगी ब्रह्मरूप अत्यंत सुखाचा अनायासानें भोग घेतो. ॥ ८ ॥

विवरण:—मनाच्या योगानेंच सर्व इंद्रियसमुदायाचा निरोध करून नंतर आपल्या मनासही अहोरात्र एकाग्र करणारा योगी निष्पाप होतो. आणि तदनंतर ब्रह्मरूप व त्यामुळेंच सर्वोत्कृष्ट सुख सहज भोगतो. ह्मणजे व्यावहारिक लोकांना व्यवहारांतील सुख भोगण्यास जसे प्रथम पुष्कळ आयासही करावे लागतात, तसे यास करावे लागत नाहींत. ॥ ८ ॥

'कंटाळा न करितां जर योगाभ्यास केला तर त्याचें फळ अवश्य मिळतें.' असें आतां श्रीगौडपादाचार्यांच्या कारिकेचा उल्लेख करूनच सांगतात:—

उत्सेक उदधेर्यद्वत्कुशाग्रेणैकबिन्दुना ॥
मनसो निग्रहस्तद्वद्भवेदपरिखेदतः ॥ ९ ॥

अन्वयः—यद्वत् कुशाग्रेण एकबिंदुना उदधेः उत्सेकः तद्वत् मनसः निग्रहः अपरिखेदतः भवेत् ।

अर्थः—कुशाच्या अग्रानें एक एक बिंदु काढला असतांही समुद्राचें शोषण ज्याप्रमाणें कालांतरानें होतें त्याप्रमाणें न त्रासल्यास मनाचा निग्रहही होतो.

विवरणः—एका टिटवीनें समुद्राच्या कांठीं आपलीं अंडीं घातलीं व ती चारा आणण्याकरितां कोठें निघून गेली. इतक्यांत समुद्रास भरती येऊन तीं अंडीं वाहून गेलीं. टिटवी जों परत येऊन पाहाते तों आपलीं अंडीं नाहींशीं झालीं आहेत व समुद्रावांचून दुसऱ्या कोणाचेंही हें काम नव्हे, असें तिला समजलें. अपत्य प्रेम मोठें कठिण आहे. वस्तुतः तो जरी एक लहानसा पक्षीच होता, तरी त्यास तें अपत्यनाशाचें दुःख सहन झाले नाहीं. त्या टिटवीनें समुद्राचा सूड घेण्याचें मनांत आणले व ती आपल्या बारिकशा चोंचीनें समुद्रांतून एक एक थेंब उचलून बाहेर फेंकूं लागली. तिचा हा एकसारखा चाललेला क्रम पाहून आकाश-मार्गानें जात असलेल्या नारदांस मोठें आश्चर्य वाटलें व तिच्याजवळ येऊन त्यांनीं 'तूं हें काय करीत आहेस?' असें विचारिलें, तेव्हां त्या दुःखी टिटवीनें आपली सर्व हकीकत त्यांस कळविली. तिचें वर्तमान ऐकून नारदास आश्चर्य वाटलें व 'एवढा थोरला समुद्र तुझ्यानें कसा शुष्क करवेल?' असेंही तिला विचारिलें. पण ती ह्मणाली 'कांहीं झालें तरी मी या मत्त झालेल्या समुद्रास आटवून सोडल्यावांचून राहाणार नाहीं.' हा तिचा दृढ निश्चय पाहून नारद गरुडाकडे गेले व त्यास त्यांनीं हा सर्व वृत्तांत कळविला. जात्यभिमान बहुतेक सर्वांमध्येंच असतो. समुद्राचें हें उन्मत्तपणाचें कृत्य गरुडासही सहन झालें नाहीं व तो त्या टिटवीच्या साह्यास आला. गरुड येतांच समुद्राचें पाणी हां हां ह्मणतां आटूं लागलें व त्यामुळें जलचर प्राण्यांस फार दुःख झालें. हा सर्व प्रकार पाहून समुद्रासही मोठी भीति वाटली, व तो गरुडास शरण आला. पुढें गरुडाच्या सांगण्यावरून समुद्रानें टिटवीचीं अंडीं परत दिलीं. सारांश, दृढ निश्चयामुळें टिटवीसारख्या प्राण्यासही सिद्धि मिळते. असो; या गोष्टीकडे लक्ष देऊन श्री गौडपादाचार्यांनीं प्रस्तुत कारिका मांडुक्यकारिकेंत लिहिली आहे. सारांश-दर्भाच्या अग्रावर येणारें पाणी पुष्कळ वेळपर्यंत फेंकीत राहू-

नहीं जसें समुद्राचें शोषण करण्याचें टिटवीनें मनांत आणिलें होतें, त्याप्रमाणें निश्चयानें व न कंटाळतां जर अभ्यास केला, तर मनाचाही निग्रह होणें शक्य आहे. ॥९॥

मनाची शांति झाली असतां ब्रह्मानंद प्राप्त होतो, याविषयीं श्रुतीचेंही प्रमाण देतातः—

**बृहद्रथस्य राजर्षेः शाकायन्यो मुनिः सुखम् ॥**
**प्राह मैत्राख्यशाखायां समाध्युक्तिपुरःसरम् ॥ १० ॥**

अन्वयः—मैत्राख्यशाखायां शाकायन्यः मुनिः बृहद्रथस्य राजर्षेः समाध्युक्ति पुरःसरं सुखं प्राह ।

अर्थः—मैत्रायणीय नामक यजुर्वेदाच्या शाखेंत शाकायन्य नामक मुनि-बृहद्रथ संज्ञक राजर्षीस प्रथम समाधिचा उपदेश करून, ब्रह्मसुख सांगता झाला. ॥ १० ॥

विवरणः—प्रस्तुत मुनीनें कसा उपदेश केला वगैरे सर्व प्रकार यापुढेंच सांगितलेला आहे. ॥ १० ॥

**यथा निरिंधनो वह्निः स्वयोनावुपशाम्यति ॥**
**तथा वृत्तिक्षयाच्चित्तं स्वयोनावुपशाम्यति ॥ ११ ॥**

अन्वयः—यथा निरिंधनः वह्निः स्वयोनौ उपशाम्यति तथा वृत्तिक्षयात् चित्तं स्वयोनौ उपशाम्यति ।

अर्थः—ज्याप्रमाणें काष्ठांस ज्यानें जाळून टाकिलें आहे असा अग्नि आपल्या जागींच लीन होतो त्याप्रमाणें वृत्तीचा क्षय झाल्यामुळें चित्त आपल्या योनींत लीन होतें. ॥ ११ ॥

विवरणः—इंधन ह्मणजे जळण. त्यास ज्यानें जाळून टाकिलें आहे असा अग्नि आपल्या कारणरूप तेजामध्यें लीन होतो. ह्मणजे ज्वाळादि विशेष आकार टाकून केवळ तेजोरूपांत मिळून जातो. या दृष्टांताप्रमाणेंच चित्तही, अभ्यासाच्या योगानें वृत्ति नष्ट झाल्या असतां आपल्या सत्वरूप कारणामध्यें मिळून जातें. ॥ ११ ॥

नंतर.—

**स्वयोनावुपशांतस्य मनसः सत्यकामिनः ॥**
**इंद्रियार्थविमूढस्यानृताः कर्मवशानुगाः ॥ १२ ॥**

अन्वयः—सत्यकामिनः स्वयोनौ उपशांतस्य इंद्रियार्थविमूढस्य मनसः कर्मवशानुगाः अनृताः स्युः ।

**अर्थः—सत्य ब्रह्माविषयीं इच्छा करणाऱ्या, आपल्या कारणामध्यें लीन झालेल्या व विषयविमुख झालेल्या मनास कर्माधीन जो जीव त्यास प्राप्त होणारे सुखादि भोग मिथ्या वाटतात. ॥ १२ ॥**

विवरणः—सत्य जें ब्रह्म त्याच्याविषयीं इच्छा करणाऱ्या मनास, जीवास प्राप्त होणारे सर्व भोग मिथ्या वाटतात. कारण एका ब्रह्माकडेच त्याचा कल असल्यामुळें तें आपल्या कारणांत लीन होतें. आणि त्यामुळें तें आपोआपच विषयविमुख होतें. पण जर कदाचित् तें व्यवहारांत आलें तर त्यास सर्वच द्वैत मिथ्या वाटत असल्यामुळें कर्मपरतंत्र जीवाचे भोगही मिथ्या वाटणें साहजिक आहे. ॥ १२ ॥

शिवाय—

**चित्तमेव हि संसारस्तत्प्रयत्नेन शोधयेत् ॥**
**यच्चित्तस्तन्मयो मर्त्यो गुह्यमेतत्सनातनम् ॥ १३ ॥**

अन्वयः—यतः चित्तं एव हि संसारः अतः तत् प्रयत्नेन शोधयेत् । यच्चित्तः तन्मयः मर्त्यः एतत् सनातनं गुह्यं अस्ति ।

**अर्थः—ज्या अर्थी चित्तच संसार आहे त्या अर्थी त्यास प्रयत्नानें शुद्ध करावें. 'ज्याच्या मध्यें मन असतें तद्रूप प्राणी होतो' हें अबाधित गुह्य आहे.**

विवरणः—चित्त हें स्वरूपतः जरी जगाचें कारण नसलें तथापि तें मात्र भोग्य आहे असें प्राण्यास चित्तामुळेंच वाटत असतें. म्हणून चित्त हाच संसार आहे; असा येथें निर्देश केला आहे. आणि असा प्रकार असल्यामुळें चित्ताचीच प्रथमतः शुद्धि केली पाहिजे. 'ज्या ज्या प्राण्याचें ज्या ज्या पुत्र कलत्रादि विषयामध्यें चित्त गढून गेलेलें असतें, तो तो तन्मय होत असतो' हा सिद्धांत कधींही बाधित न होणारा आहे. [illegible] चित्ताची शुद्धि झाली असतांच आत्मज्ञानाच्या संबंधाची [illegible] होणें

शक्य आहे. रजोगुण व तमोगुण यांचा सर्वथैव नाश करून चित्तास सत्त्वमय व एकाग्र करणें हीच त्याची शुद्धि होय. ॥ १३ ॥

'अहो, पण अनादि कालापासून प्रवृत्त झालेल्या जन्मांत घडलेलीं पुण्यपापरूप कर्में असेपर्यंत, चित्तशुद्धि जरी झाली तरी, संसाराची निवृत्ति कशी होईल?' या प्रश्नाचें आतां उत्तर देतातः—

चित्तस्य हि प्रसादेन हन्ति कर्म शुभाशुभम् ॥
प्रसन्नात्माऽऽत्मनि स्थित्वा सुखमक्षय्यमश्नुते ॥ १४ ॥

अन्वयः—चित्तस्य प्रसादेन हि शुभाशुभं कर्म हंति। तथा च प्रसन्नात्मा आत्मनि स्थित्वा अक्षय्यं सुखं अश्नुते।

अर्थः—साधक चित्ताच्या प्रसादानेंच शुभ व अशुभ कर्मांचा नाश करितो. व ज्याचें चित्त प्रसन्न झालें आहे तो स्वस्वरूपभूत ब्रह्मामध्यें निश्चल राहून अक्षय्य सुख भोगतो. ॥ १४ ॥

विवरणः—'ज्याप्रमाणें वाळलेल्या गवताची बारीक काडी पेटलेल्या अग्नींत टाकिली असतां हां हां म्हणतां जळून जाते, त्याप्रमाणें ह्या आत्मज्ञ पुरुषाचें सर्व पाप नष्ट होतें.' अशा अर्थाच्या श्रुति व स्मृतिही आहेत. त्यामुळें ज्याचें चित्त अति प्रसन्न झालें आहे आणि त्यामुळें ज्याचें आत्मानुसंधान अति दृढ झालें आहे, अशा पुरुषाचें पुण्यपापरूप सर्व कर्म नष्ट होतें असा सिद्धांत करितां येतो. पुढें ज्याचें चित्त तत्त्वज्ञानरूप अति शुद्ध परिणामाप्रत पोंचलें आहे, अशा ह्या आत्मज्ञ पुरुषास तो स्वरूपानंदांतच सर्वदा निमग्न रहात असल्यामुळें अक्षय्य सुख मिळतें. अक्षय्य म्हणजे क्षय होण्यास अशक्य. म्हणजे ज्याचा कधींही क्षय होत नाहीं असें नित्य सुख होतें. ॥ १४ ॥

आतां, हीच गोष्ट दृष्टान्त देऊन स्पष्ट करितातः—

समासक्तं यथा चित्तं जंतोर्विषयगोचरे ॥
यद्येवं ब्रह्मणि स्यात्तत्को न मुच्येत बंधनात् ॥ १५ ॥

अन्वयः—जंतोः चित्तं विषयगोचरे यथा समासक्तं भवति एवं ब्रह्मणि यदि स्यात् तत् कः बंधनात् न मुच्येत।

अर्थः---प्राण्याचें चित्त विषयमार्गामध्यें ज्याप्रमाणें अति आसक्त झालेलें असतें तसेंच ब्रह्मामध्यें जर तें आसक्त होईल तर बंधनापासून कोण मुक्त होणार नाहीं ? ॥ १५ ॥

विवरण:—प्राणी विषयामध्यें किती निमग्न झालेला असतो हें प्रत्येकास ठाऊक असल्यामुळें त्याचा विस्तार करणें नलगे. पण तो जसा विषयांमध्यें अहोरात्र गढून गेलेला असतो तसाच जर ब्रह्मामध्यें गढून जाईल, तर त्यास मुक्त होण्यास मुळींच विलंब लागणार नाहीं. ॥ १५ ॥

आतां ह्याच सिद्धांत दृढ होण्यास्तव मनाचे अवांतर भेद व त्याचें स्वरूप सांगतात:-

**मनो हि द्विविधं प्रोक्तं शुद्धं चाशुद्धमेव च ॥**
**अशुद्धं कामसंपर्काच्छुद्धं कामविवर्जितम् ॥ १६ ॥**

अन्वय:—शुद्धं च अशुद्धं एव च इति मनः द्विविधं प्रोक्तं । हि तत् कामसंपर्कात् अशुद्धं च कर्मविवर्जितं शुद्धं भवति ।

अर्थः—शुद्ध व अशुद्ध असें मन दोन प्रकारचें सांगितलें आहे. तें कामाशीं संबद्ध झाल्यामुळें अशुद्ध व कामरहित असलें की शुद्ध होतें. ॥ १६ ॥

विवरण:—मन हें काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादि दुष्ट वृत्तींनीं युक्त झालें कीं त्यास अशुद्ध ह्मणतात व ते केवळ सात्विक भावांच्या योगानें युक्त झालें कीं त्यास शुद्ध ह्मणतात. ॥ १६ ॥

सारांश:-

**मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥**
**बंधाय विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतम् ॥ १७ ॥**

अन्वय:—मनुष्याणां बंधमोक्षयोः मनः एव कारणं अस्ति । तत् विषयासक्तं बंधाय च निर्विषयं मुक्त्यै स्मृतम् ।

अर्थः—मनुष्यांच्या बंधमोक्षांला मनच कारण आहे. तें विषयासक्त झालें असतां बंधास व विषयरहित झालें असतां मुक्तीस कारण होतें असें सांगितलें आहे. ॥ १७ ॥

विवरण:—मनुष्याचें मनच बंधास व मोक्षास कारण होतें. या वाक्यांत मनुष्याचें असें ह्मणण्याचें कारण असें कीं—पुरुषार्थाविषयीं मनुष्याचाच अधिकार आहे. पशु, पक्षी इत्यादि तिर्यक् योनींतील प्राण्यांस मनाचा निरोध करितां येत नसल्यामुळें त्यांचा अधिकार नाहीं. ज्याचें मन विषयासक्त होतें त्यास बंध उत्पन्न होतो व ज्याचें मन, तत्त्वज्ञानाच्या योगानें विषय मिथ्या आहेत असें समजल्यामुळें विषयशून्य होतें त्यास मोक्ष मिळतो. अर्थात् मनुष्यास पशु इत्यादि अधोयोनींत घालविण्यास व देवादि उर्ध्वलोकीं घालविण्यास हें मनच समर्थ आहे. ॥ १७ ॥

याविषयीं श्रुतिचें प्रमाण देतात:—

**समाधिनिर्धूतमलस्य चेतसो निवेशितस्यात्मनि यत्सुखं भवेत् ॥**
**न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदंतःकरणेन गृह्यते ॥ १८ ॥**

अन्वय:—आत्मनि निवेशितस्य समाधिनिर्धूतमलस्य चेतसः यत् सुखं भवेत् तत् गिरा वर्णयितुं न शक्यते । तदा तत् स्वयं अंतःकरणेन गृह्यते ।

अर्थ:—प्रत्येक आत्म्यामध्यें स्थिर केलेल्या व समाधीच्या योगानें मलरहित झालेल्या अंतःकरणास जें सुख होतें; त्याचें वाणीनें वर्णन करवत नाहीं. तर तें त्या वेळीं स्वतः अंतःकरणाच्या योगानें ग्रहण केलें जातें. ॥ १८ ॥

विवरण:—अद्वैतब्रह्मस्वरूपामध्यें ज्यास स्थिर केलें आहे व त्यामुळें ज्याचे राजस व तामस मल नष्ट झाले आहेत, अशा एकाग्र मनास जो आनंदानुभव होतो त्याचें वर्णन करितां येत नाहीं. कारण तो अतींद्रिय असल्यामुळें त्याचें केवळ अति शुद्ध मनानेंच ग्रहण होण्यासारखें आहे, ह्मणजे तें लौकिक सुखाप्रमाणें बोलतां येण्यासारखें नसून नुसतें अनुभवाच्याच योग्य आहे. वस्तुतः पाहतां लौकिक सुखही स्वसंवेद्यच आहे हें खरें; पण त्याच्याविषयीं 'तें अशें असें आहे' इतकें तरी सांगतां येतें; पण याविषयीं तेंही करितां येत नाहीं. ॥ १८ ॥

पण ही समाधि दुर्लभ आहे, तेव्हां तिच्या योगानें आनंद होईल अशी सर्वांस कशी आशा करितां येईल? या प्रश्नाचें आतां उत्तर सांगतात:—

**यद्यप्यसौ चिरं कालं समाधिर्दुर्लभो नृणाम् ॥**
**तथापि क्षणिको ब्रह्मानन्दं निश्चाययत्यसौ ॥ १९ ॥**

अन्वय:—यद्यपि असौ समाधिः नृणां चिरं कालं दुर्लभः तथापि असौ क्षणिकः ब्रह्मानन्दं निश्चाययति ।

अर्थ:—जरी ही समाधि मनुष्यास दीर्घ काल दुर्लभ आहे तरी ती क्षणिक समाधीही ब्रह्मानन्दाचा निश्चय करविते. ॥ १९ ॥

विवरण:—सर्ववृत्तिनिरोधरूप समाधि सर्वच मनुष्यांस दुर्लभ आहे. त्यांतून ती दीर्घकाल राहणें हें तर त्याहूनही कठीण. पण या समाधीचा एक क्षणभर जरी अनुभव आला, तरी तेवढ्यावरून ब्रह्मानन्दाचा निश्चय करितां येतो. ॥ १९ ॥

आतां आत्मदर्शनार्थ श्रवणादि साधनांमध्यें प्रवृत्त झालेले असेही कित्येक आनंदशून्य व बहिर्मुख आढळतात. हें खरें पणः—

**श्रद्धालुर्व्यसनी योऽत्र निश्चिनोत्येव सर्वथा ॥**
**निश्चिते तु सकृत्तस्मिन् विश्वसत्यन्यदाप्ययम् ॥ २० ॥**

अन्वय:—यः श्रद्धालुः व्यसनी सः अत्र सर्वथा निश्चिनोति एव । तस्मिन् सकृत् निश्चिते तु अयं अन्यदा अपि विश्वसति ।

अर्थ—जो श्रद्धालु, व्यसनी असतो, तो या समाधीविषयीं अवश्य निश्चय करितोच. व एकदा त्याचा निश्चय झाला कीं हा सर्वदा विश्वास ठेवितो. ॥२०॥

विवरण:—ज्या पदार्थावांचून मनुष्याचें जाग्रतींत एक क्षणभरही चालत नाहीं त्या पदार्थाचें त्यास व्यसन लागलेलें आहे असें ह्मणतात. ज्या श्रद्धालु पुरुषास समाधीचें व्यसन लागलें असतें, त्यास समाधीच्या वेळीं ब्रह्मानन्दाचा अवश्य अनुभव येतो; व क्षणभर का होईना, पण एकदा ब्रह्मानन्दाचा अनुभव आला कीं मुमुक्षु ब्रह्मानन्दाविषयीं अन्यकालींही विश्वासयुक्त होतो. ह्मणजे ज्याप्रमाणें एकाद्या मनुष्यास प्रखर दुःखाचा किंवा उत्तम सुखाचा एकदा अनुभव आला असतां तो तें यावज्जीव आठवितो, त्याप्रमाणेंच या ब्रह्मानन्दाचा ज्यास एकदा अनुभव आला आहे, तो त्यास पुनः केव्हांही विसरत नाहीं. ॥ २० ॥

आणि असा प्रकार असल्यामुळें:—

**तादृक् पुमानुदासीनकालेप्यानन्दवासनाम् ॥**
**उपेक्ष्य मुख्यमानन्दं भावयत्येव तत्परः ॥ २१ ॥**

अन्वयः--तादृक् पुमान् उदासीनकाले अपि आनंदवासनां उपेक्ष्य तत्परः सन् मुख्यं आनंदं भावयति एव ।

अर्थः—तशा प्रकारचा पुरुष उदासीन कालींही आनंदवासना सोडून तत्पर होत्साता मुख्य आनंदाची भावना करितोच. ॥ २१ ॥

विवरणः--जो पुरुष श्रद्धादियुक्त होऊन एकदा आनंदाचा निश्चय करितो तो उदासीन अवस्थेंत अनुभवास येणाऱ्या आनंदाच्या वासनेची उपेक्षा करून मुख्य आनंदाची इच्छा करूं लागतो व त्या दृढ इच्छेमुळें त्याची भावना सर्वदा ब्रह्मानंदास विसरत नाहीं.

आतां, 'असें कसें होतें,' म्हणून कोणी विचारील ? यास्तव पूर्वी नवव्या प्रकरणांत दिलेल्या उदाहरणाचें दृष्टांतपूर्वक उत्तर देतातः—

परव्यसनिनी नारी व्यग्रापि गृहकर्मणि ॥
तदेवास्वादयत्यन्तः परसङ्गरसायनम् ॥ २२ ॥
एवं तत्त्वे परे शुद्धे धीरो विश्रान्तिमागतः ॥
तदेवास्वादयत्यंतर्बहिर्व्यवहरन्नपि ॥ २३ ॥

अन्वयः—यथा परव्यसनिनी नारी गृहकर्मणि व्यग्रा अपि तत् परसंगरसायनं एव अंतः आस्वादयति । एवं परे शुद्धे तत्त्वे विश्रांतिं आगतः धीरः व्यवहरन् अपि अंतः बहिः च तत् एव आस्वादयति ।

अर्थः—ज्याप्रमाणें परपुरुषाचें व्यसन लागलेली स्त्री गृहकर्मामध्यें व्यग्र असतांही त्या परपुरुषसंगरूप रसायनाचा मनांत स्वाद घेत असते, त्याप्रमाणें श्रेष्ठ व शुद्ध तत्त्वाचे ठायीं निश्चित झालेला बुद्धिमान् मुमुक्षु व्यवहार करीत असतांही मनांत व बाहेर-जगांत त्याचाच स्वाद घेत असतो. ॥ २२ ॥ २३ ॥

विवरणः—यांतील दृष्टांतभूत श्लोकाचें व्याख्यान पूर्वी होऊन गेलें आहे. सारांश; व्यवहार व भावना यांचा परस्पर विरोध नसल्यामुळें दृष्टांतांतील स्त्रीप्रमाणें ब्रह्मनिष्ठ पुरुषही सतत ब्रह्मानंदाची भावना करूं शकतो. ॥ २२॥२३ ॥

गेल्या श्लोकांत 'धीर' या शब्दाचा उपयोग केला आहे पण त्याचा अर्थ जरा गूढ असल्यामुळें तो आतां सांगतातः—

**धीरत्वमक्षप्राबल्येप्यानंदास्वादवाञ्छया ॥**
**तिरस्कृत्याखिलाक्षाणि तच्चिंतायां प्रवर्तनम् ॥ २४ ॥**

अन्वयः—अक्षप्राबल्ये अपि आनंदास्वादवाञ्छया अखिलाक्षाणि तिरस्कृत्य तच्चिंतायां प्रवर्तनं धीरत्वम् ।

अर्थः—इंद्रियें जरी प्रबल आहेत तरी आनंदानुभवाच्या इच्छेनें त्या सर्व इंद्रियांस तुच्छ करून आनंदाच्या अनुसंधानामध्यें प्रवृत्त होणें हीच धीरता होय. ॥ २४ ॥

विवरणः—इंद्रियें अति प्रबल आहेत त्यांचा निरोध होणें अति कठिण आहे, तीं ज्ञानी पुरुषासही व्याकुळ करून सोडीत असतात, इत्यादि सर्व प्रकार जरी खरा आहे, तरी आत्मानंदाच्या इच्छेनें त्या सर्वांस तुच्छ मानून आनंदाविषयींच जो चिंतन करीत असतो, त्यास धीर ह्मणावें. सारांश; व्यवहारांतील धीर (धीट) पुरुष या स्थळींही धीरच असतो, असा कांहीं नियम नाहीं. ॥ २४ ॥

आतां, तेविसाव्या श्लोकांतील 'विश्रांति' या शब्दाचा अर्थ सांगतातः—

**भारवाही शिरोभारं मुक्त्वास्ते विश्रमं गतः ॥**
**संसारव्यापृतित्यागे तादृक्बुद्धिस्तु विश्रमः ॥ २५ ॥**

अन्वयः—यथा भारवाही शिरोभारं मुक्त्वा विश्रमं गतः सन् आस्ते तथा संसारव्यापृतित्यागे सति तादृक्बुद्धिः तु विश्रमः ।

अर्थः—ज्याप्रमाणें भारवाही मस्तकावरील भार टाकून श्रमरहित होऊन राहातो त्याप्रमाणें संसारव्यापार सुटल्यावर 'मी श्रमरहित झालों आहे' ही बुद्धीच विश्रांति होय. ॥ २५ ॥

विवरणः—डोक्यावरील बोजा उतरल्यावर असें हलकें वाटतें, व व्यापार बंद झाल्यावर 'आतां मी सुखी झालों आहे' अशा प्रकारची जी बुद्धि उत्पन्न होत असते तिलाच विश्रांति असें या शास्त्रांत म्हणतात. ॥ २२५ ॥

**विश्रान्तिं परमां प्राप्तस्त्वौदासीन्ये यथा तथा ॥**
**सुखदुःखदशायां च तदानन्दैकतत्परः ॥ २६ ॥**

अन्वयः—परमां विश्रांतिं प्राप्तः यथा औदासिन्ये तथा सुखदुःखदशायां च तदानन्दैकतत्परः भवति ।

**अर्थः—परम विश्रांतीस प्राप्त झालेला पुरुष जसा उदासीन अवस्थेंत असतो, तसाच तो सुखदुःखदशेमध्येंही केवल परमानंदतत्पर होतो. ॥ २६ ॥**

**विवरणः**—अति उत्तम विश्रांतीस पोंचलेला पुरुष उदासीन अवस्थेंत जसा परमानन्दाचा स्वाद घेण्यांत तत्पर होऊन राहातो, तसाच सुखदुःखभोगसमयीं व पुण्यपापाचरणसमयींही तो परमानन्दतत्पर होऊन राहातो. ह्मणजे आत्मानन्दाच्या स्वादावांचून त्यास कांहीं एक नकोसें होतें. ॥ २६ ॥

" दुःखाविषयीं स्वभावतःच प्राण्याची अप्रीति असते. त्यामुळें तो इच्छा करीत नसला तरी विषयजन्यसुखाची इच्छा करण्यास त्याला कोणता प्रत्यवाय आहे ? " अशी शंका कोणी विचारील ह्मणून ग्रंथकार ह्मणतात—

**अग्निप्रवेशहेतौ धीः शृंगारे यादृशी तथा ॥**
**धीरस्योदेति विषयेऽनुसंधानविरोधिनि ॥ २७ ॥**

अन्वयः—अग्निप्रवेशहेतौ शृंगारे यादृशी धीः तथा अस्य धीः अनुसंधानविरोधिनि विषये उदेति ।

**अर्थः—अग्निप्रवेशास विलंब करणाऱ्या शृंगाराविषयीं जशी बुद्धि होते, तशीच याची बुद्धि अनुसंधानाच्या विरुद्ध असणाऱ्या विषयांविषयीं होते. २७**

**विवरणः**—ज्याचा अग्नीमध्यें प्रवेश करण्याविषयीं दृढ निश्चय झाला आहे असा कोणी पुरुष किंवा स्त्री अग्निप्रवेशास विलंब करणाऱ्या अलंकारादिकांविषयीं ज्याप्रमाणें विरक्त होते, त्याप्रमाणें ह्या मुमुक्षूची बुद्धि ब्रह्मानुसंधानाच्या आड येणाऱ्या विषयांविषयीं विरक्त होते; ह्मणजे त्यास विषय शत्रूसारखे वाटतात, आणि त्यामुळें तो त्यांची इच्छा करीत नाहीं. ॥ २७ ॥

आतां:—

**अविरोधिसुखे बुद्धिः स्वानंदे च गमागमौ ॥**
**कुर्वत्यास्ते क्रमादेषा काकाक्षिवदितस्ततः ॥ २८ ॥**

अन्वयः—अविरोधि सुखे च स्वानंदे काकाक्षिवत् क्रमात् इतस्ततः गमागमौ कुर्वन्ती एषा बुद्धिः आस्ते ।

अर्थः—विरुद्ध नसलेल्या सुखामध्यें व आत्मानंदामध्यें–कावळ्याच्या डोळ्याप्रमाणें क्रमानें इकडून तिकडे व तिकडून इकडे अशा खेपा करणारी–बुद्धि असते. ॥ २८ ॥

विवरणः—आत्मानंदाशीं ज्याचा विरोध नाहीं अशा इतर सुखांमध्यें व आत्मानंदामध्यें बुद्धि क्रमाक्रमानें जात येत असते. याविषयीं कावळ्याच्या डोळ्याचा दृष्टांत आहे. त्याचें पुढील श्लोकांत स्पष्टीकरण होईल. ॥ २९ ॥

**एकैव दृष्टिः काकस्य वामदक्षिणनेत्रयोः ॥**
**यात्यायात्येवमानन्दद्वये तत्त्वविदो मतिः ॥ २९ ॥**

अन्वयः—यथा काकस्य एका एव दृष्टिः वामदक्षिणनेत्रयोः याति च आयाति एवं तत्त्वविदः मतिः आनंदद्वये याति ।

अर्थः—ज्याप्रमाणें कावळ्याची एकच दृष्टि डाव्या व उजव्या नेत्रामध्यें जाते व येते त्याप्रमाणें तत्त्ववेत्त्याची बुद्धि दोन्ही आनंदामध्यें जाते व येते.

विवरणः—दृष्टि ह्मणजे पाहाण्याचें इंद्रिय. हें कावळ्यास एकच असतें. ह्मणजे त्यास मनुष्याप्रमाणें एकाच काळीं दोन्हीं नेत्रांनीं पाहतां येत नाहीं. त्यामुळें त्याच्या नेत्रांतील इंद्रिय क्रमाक्रमानें दोन्ही नेत्रांत फिरतें. तसाच या ज्ञान्याच्या बुद्धीचा प्रकार समजावा. ॥ २९ ॥

**भुञ्जानो विषयानन्दं ब्रह्मानन्दं च तत्त्ववित् ॥**
**द्विभाषाभिज्ञवद्विद्यादुभौ लौकिकवैदिकौ ॥ ३० ॥**

अन्वयः—विषयानन्दं ब्रह्मानंदं च भुंजानः तत्त्ववित् उभौ लौकिकवैदिकौ द्विभाषाभिज्ञवत् विद्यात् ।

अर्थः—विषयानंद व ब्रह्मानंद यांचा भोग घेणारा तत्त्ववेत्ता लौकिक व वैदिक असे दोन्ही आनंद दुभाष्याप्रमाणें जाणतो. ॥ ३० ॥

विवरणः—ब्रह्मानंदाशीं विरोध न करणारा असा विषयानंद व स्वतः ब्रह्मानन्द या दोहोंचा भोग घेणारा तत्त्वज्ञ पुरुष दोन्ही आनंदांस यथार्थपणें जाणतो. याला दुभाष्याचा दृष्टांत; जसा दोन भाषा जाणणारा दोन्ही भाषेंत बोलणाऱ्याचें भाषण जाणतो, त्याप्रमाणें हा प्रकार होतो, असें समजावें. ॥ ३० ॥

असें जरी आहे तरी दुःखप्राप्ति झाली असतां तो काय करितो ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतातः—

**दुःखप्राप्तौ न चोद्वेगो यथापूर्वं यतो द्विदृक् ॥**
**गंगामग्नार्द्धकायस्य पुंसः शीतोष्णधीर्यथा ॥ ३१ ॥**

**अन्वयः**—यतः द्विदृक् ततः यथा गंगामग्नार्धकायस्य पुंसः शीतोष्णधीः तथा दुःखप्राप्तौ उद्वेगः न भवति ।

**अर्थः**—ज्याअर्थी हा दोन्ही जाणणारा असतो त्याअर्थी, गंगेमध्यें ज्याचें अर्धें शरीर बुडालें आहे अशा पुरुषास जशी शीत व उष्ण यांची भावना होते, त्याप्रमाणें ह्यास दुःखप्राप्ति झाली असतांही उद्वेग होत नाहीं. ॥ ३१ ॥

**विवरणः**—तत्त्ववेत्त्यास दोन्ही व्यवहारांचा अनुभव असतो; ह्मणजे गंगेमध्यें उभ्या राहिलेल्या मनुष्यास जशी खालीं थंडी व वर उष्णता यांचा एकाच कालीं अनुभव येतो, त्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यास लौकिक व वैदिक व्यवहारांचा अनुभव येतो. त्यामुळें जरी कदाचित् दुःखप्राप्ति झाली, तरी त्यास उद्वेग होत नाहीं. तो त्या दुःखास क्षणिक समजून तें सहन करितो. ॥ ३१ ॥

**इत्थं जागरणे तत्त्वविदो ब्रह्मसुखं सदा ॥**
**भाति तद्वासनाजन्ये स्वप्ने तद्भासते तथा ॥ ३२ ॥**

**अन्वयः**—इत्थं तत्त्वविदः जागरणे ब्रह्मसुखं सदा भाति तथा तद्वासनाजन्ये स्वप्ने तत् भासते ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यास जाग्रतीमध्यें ब्रह्मसुख सर्वदा भासतें, त्याच-प्रमाणें जाग्रद्वासनेपासून उत्पन्न होणाऱ्या स्वप्नामध्येंही तें भासतें. ॥ ३२ ॥

**विवरणः**—सदा–सुखदुःखांच्या अनुभवसमयीं व उदासीन अवस्थेमध्यें. तत्त्व-वेत्त्यास केवळ जाग्रतींतच ब्रह्मानन्दाचा अनुभव येतो असें नाहीं, तर स्वप्नामध्येंही त्याचें भान होतें. ॥ ३२ ॥

स्वप्न हें आनंदानुभवाच्या वासनेमुळें होतें, हें जरी अंशतः खरें आहे, तरी त्यामध्यें अविद्यावासनाही असते असें आतां सांगतातः—

**अविद्यावासनाप्यस्तीत्यतस्तद्वासनोत्थिते ॥**
**स्वप्ने मूर्खवदेवैष सुखं दुःखं च वीक्षते ॥ ३३ ॥**

**अन्वयः**—अविद्यावासना अपि अस्ति । अतः तद्वासनोत्थिते स्वप्ने एषः मूर्खवत् एव सुखं च दुःखं वीक्षते ।

**अर्थः**—अविद्येची वासनाही असते. यास्तव त्या वासनेपासून उत्पन्न झालेल्या स्वप्नांत हा मूर्खाप्रमाणें सुख व दुःख पाहातो. ॥ ३३ ॥

**विवरणः**—स्वप्नावस्था केवळ आनंदाच्या वासनेमुळें होते असें नाहीं, तर अविद्यावासनेपासूनही ती होते. त्यामुळें एकाद्या वेड्याप्रमाणें प्राणी सुखदुःख पाहातो.

आतां प्रस्तुत प्रकरणाचा उपसंहार करितातः—

**ब्रह्मानन्दाभिधे ग्रंथे ब्रह्मानन्दप्रकाशकम् ॥**
**योगिप्रत्यक्षमध्याये प्रथमेऽस्मिन्नुदीरितम् ॥ ३४ ॥**

**अन्वयः**—ब्रह्मानन्दाभिधे ग्रंथे अस्मिन् प्रथमे अध्याये ब्रह्मानन्दप्रकाशकं योगिप्रत्यक्षं उदीरितम् ।

**अर्थः**—ब्रह्मानन्दसंज्ञक ग्रंथांतील या प्रथमाध्यायांत ब्रह्मानन्दाचें प्रकाशन करणारें योगिप्रत्यक्ष सांगितलेलें आहे. ॥ ३४ ॥

**विवरणः**—ह्या प्रकरणास योगानन्द ही संज्ञा आहे. पण तो ब्रह्मानन्दाचा एक भाग आहे. यांत सुषुप्तीमध्यें, औदासिन्यकालीं, समाधिसमयीं व सुखदुःखकालींही स्वप्रकाश चिदानन्दाचें योग्यांच्या अनुभवरूप प्रत्यक्ष सांगितलें आहे. 'कैवल्यामध्यें गुरु, शास्त्र, बागा, गंगातीर इत्यादि विषय कोठून असणार व ते जर नाहींत तर त्यांत मौज ती कसची ?' या जीवपरैक्याविषयींच्या प्रतिबंधरूप प्रश्नाचें ह्या प्रकरणाच्या द्वारा सयुक्तिकपणें उत्तर दिलें आहे. ॥ १३४ ॥

ह्याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या योगानन्दाख्य अकराव्या प्रकरणाचें श्रीमच्छंकराचार्यभक्त विष्णु वामन बापटकृत सान्वयार्थ मराठी विवरण समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

# ब्रह्मानंदे आत्मानंदः

अकराव्या प्रकरणांत विवेक्यांस योगानंदाची कशी प्राप्ति होते तें सांगितलें. पण सर्वच जिज्ञासु विवेकी नसतात. यास्तव मंद साधकांवर अनुग्रह करण्याच्या इच्छेनें ग्रंथकार या बाराव्या प्रकरणास आरंभ करीत आहेत. परंतु मंद जिज्ञासूस ब्रह्मानंदाचा कसा अनुभव येईल, हा एक नेहमीं पुढें येणारा प्रश्न आहे. यास्तव प्रथमतः त्या प्रश्नाचाच अनुवाद करितातः—

नन्वेवं वासनानन्दाद्ब्रह्मानन्दादपीतरम् ॥
वेत्तु योगी निजानन्दं मूढस्यात्रास्ति का गतिः ॥ १ ॥

अन्वयः—ननु एवं योगी वासनानंदात् ब्रह्मानंदात् अपि इतरं निजानन्दं वेत्तु । अत्र मूढस्य का गतिः अस्ति ।

अर्थः—याप्रमाणें योगी वासनानन्द व ब्रह्मानन्द यांहून भिन्न जो निजानन्द त्यास जाणो. पण येथें मूढाची काय दशा होणार ? ॥ १ ॥

विवरणः—निजून उठल्यावर आनंदाच्या संस्कारामुळें कांहीं काल अनुभवास येणाऱ्या सुखास वासनानंद, व खुद्द निद्रासमयीं भासणाऱ्या आनंदास ब्रह्मानंद असें म्हटलें आहे. निजानंदाचा अधिक अनुभव कसा व केव्हां येऊं लागतो, हें गेल्या प्रकरणाच्या ९८ व्या श्लोकांत सांगितलें आहे. अर्थात् विवेकी पुरुषास प्राप्त होणारा निजानंद पूर्वोक्त दोन्ही आनंदाहून भिन्न आहे, व तो चित्ताच्या ऐकाग्र्यामुळेंच प्राप्त होणें शक्य आहे, म्हणून योगी पुरुषास जरी तो संपादन करितां आला तरी सामान्य जनांची काय वाट ? त्यांनीं कसें कृतार्थ व्हावें ? ॥ १ ॥

पूर्वोक्त प्रश्न शिष्यानें गुरूस केला आहे व त्याचें गुरु उत्तर देत आहेतः—

धर्माधर्मवशादेष जायतां म्रियतामपि ॥
पुनः पुनर्देहलक्षैः किं नो दाक्षिण्यतो वद ॥ २ ॥

अन्वयः—एषः धर्माधर्मवशात् पुनः पुनः देहलक्षैः जायतां म्रियतां अपि । नः दाक्षिण्यतः किं वद ।

अर्थ:—हा धर्म व अधर्म यांच्या अधीन झाल्यामुळें वारंवार लक्षावधि देह घेऊन जन्मो व मरो. आमच्या दाक्षिण्याच्या योगानें त्याचें काय होणार ? सांग. ॥ २ ॥

विवरण:—इतका जो मूढ असेल त्यानें पुण्य व पाप यांच्या अधीन होऊन या अनादि संसारामध्यें असंख्य वेळां जन्मास यावें व अनंत वेळां खुशाल मरावें. तेथें आमचा कांहीं इलाज नाहीं. अशा पुरुषाचा विद्येमध्यें अधिकारच नसल्या-मुळें आह्मी त्याच्याविषयीं कितीही जरी दया बाळगली, तरी त्याचा काय उपयोग होणार ? किंवा आह्मीं सर्व अज्ञांचा उद्धार करणार अशी कितीही जरी प्रौढि मिरव-ली तरी त्यापासून कोणता लाभ होणार ? ॥ २ ॥

आतां—शिष्य पुनः गुरूंची प्रार्थना करितो; व गुरूही त्यास प्रश्न करितातः—

अस्ति वोनुजिघृक्षुत्वाद्दाक्षिण्येन प्रयोजनम् ॥
तर्हि ब्रूहि स मूढः किं जिज्ञासुर्वा पराङ्मुखः ॥ ३ ॥

अन्वय:—वः अनुजिघृक्षुत्वात् दाक्षिण्येन प्रयोजनं अस्ति । तर्हि ब्रूहि सः मूढः किं जिज्ञासुः वा पराङ्मुखः ।

अर्थ:—शिष्य—तुह्मांस अनुग्रह करण्याची इच्छा असल्यामुळें ( तुमच्या ) दाक्षिण्याचें (आह्मांस) फल मिळतें. गुरु—असें जर असेल तर सांग, तो मूढ जिज्ञासु आहे, कीं पराङ्मुख आहे ? ॥ ३ ॥

विवरण:—या श्लोकाच्या पूर्वार्धांत शिष्यानें गुरूस उपाय सांगण्याकरितां आग्र-ह केला आहे. तो ह्मणतो, महाराज, सर्व प्राणिमात्रावर अनुग्रह करण्याची आपली इच्छा असते, त्यामुळें आपल्या उपदेशानें अवश्य लाभ होईल. हें शिष्याचें वचन ऐकून गुरु ह्मणतात, असें जर तुला निश्चयपूर्वक वाटत असेल, तर ज्या मूढाविषयीं तूं उपाय विचारीत आहेस, तो जिज्ञासु आहे, कीं शुद्ध प्राकृत आहे, तें अगोदर सांग; ह्मणजे त्याप्रमाणें उपायाची योजना करूं. या ठिकाणीं जिज्ञासु या शब्दाचा अर्थ रागी, विषयी इत्यादि समजावा. ॥ ३ ॥

आतां—तो मूढ रागी असल्यास काय करावें व विरक्त असल्यास कसा उपदेश करावा तें सांगतात:—

**उपास्तिं कर्म वा ब्रूयाद्विमुखाय यथोचितम् ॥**
**मन्दप्रज्ञं तु जिज्ञासुमात्मानन्देन बोधयेत् ॥ ४ ॥**

अन्वयः—विमुखाय कर्म उपास्तिं वा यथोचितं ब्रूयात् । मंदप्रज्ञं जिज्ञासुं तु आत्मानंदेन बोधयेत् ।

**अर्थः—तो जर बहिर्मुख असेल तर त्यास कर्म किंवा उपासना यांतील जें उचित असेल तें सांगावें. पण मंदबुद्धि जिज्ञासूस आत्मानन्दाच्या योगानें बोध करावा. ॥ ४ ॥**

विवरण:—तत्त्वज्ञानापासून जो विन्मुख असतो ह्मणजे त्याच्याकडे जो ढुंकूनही पाहात नाहीं, त्यास बहिर्मुख किंवा विमुख ह्मणतात. अशा सामान्य मनुष्यास कर्म किंवा उपासना करण्याविषयीं सांगावें. तो जर ब्रह्मलोकादिकांची इच्छा करीत असला, तर त्यास उपासना सांगावी व स्वर्ग, पितृलोक, मनुष्यलोक इत्यादि लोकांची जर त्यास इच्छा असली, तर श्रौतस्मार्त कर्म सांगावें. बरें, तो जर मंदबुद्धि असूनही तत्त्व जाणण्याची इच्छा करीत असला, तर त्यास आत्मानंदाचा उपदेश करावा. तो कसा करावा, हें पुढें सांगितलें आहे. या श्लोकांतील विमुख या शब्दाचा मुख्य अर्थ वर सांगितलाच आहे. पण सर्वत्र विमुख पुरुष कर्माचे किंवा उपासनेचे अधिकारी असतात असें समजूं नये. कारण त्यांतील कित्येक नास्तिकही असतात; यास्तव श्रद्धालु व परलोकाची इच्छा करणारे पण तत्त्वज्ञानापासून विन्मुख व विषयी अशा पुरुषांकरितां कर्म व उपासना यांचा उपदेश करावा.

पूर्वी याप्रमाणें कोणीं कोणास बोध केला तें आतां सांगतात:—

**बोधयामास मैत्रेयीं याज्ञवल्क्यो निजप्रियाम् ॥**
**न वा अरे पत्युरर्थे पतिः प्रिय इतीरयन् ॥ ५ ॥**

अन्वयः—न वा अरे पत्युः अर्थे पतिः प्रियः इति ईरयन् याज्ञवल्क्यः निजप्रियां मैत्रेयीं बोधयामास ।

**अर्थः—'पत्नीस पतीच्या कामाकरितां पति प्रिय होत नाहीं.' असें सांगून याज्ञवल्क्यांनीं आपल्या प्रिय मैत्रेयीस बोध केला. ॥ ५ ॥**

**विवरणः**—बृहदारण्यकाच्या तिसऱ्या व सहाव्या अध्यायांत हा प्रसंग आहे. याज्ञवल्क्य मुनि शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेचे प्रवर्तक आहेत. त्यांनीं आपल्या अति प्रिय भार्येस प्रस्तुत उपदेश केला. याचें पुढें अधिक स्पष्टीकरण होईल. ॥ ५॥

त्यांच्या सर्व उपदेशाचा सारांश असा आहेः–

**पतिर्जाया पुत्रवित्ते पशुब्राह्मणबाहुजाः ॥**
**लोका देवा वेदभूते सर्वं चात्मार्थतः प्रियम् ॥ ६ ॥**

**अन्वयः**—पतिः, जाया, पुत्रवित्ते, पशुब्राह्मणबाहुजाः, लोकाः, देवाः, वेदभूते, च सर्वं आत्मार्थतः प्रियं अस्ति।

**अर्थः**—पति, पत्नी, पुत्र, द्रव्य, पशु, ब्राह्मण, क्षत्रिय, लोक, देव, वेद, भूतें व इतर सर्व हीं प्रत्येकास आत्म्याकरितां प्रिय असतात. ॥ ६ ॥

**विवरणः**—या जगांतील सर्व पदार्थ प्राण्यास प्रिय असतात, हें खरें; पण ते भोग्य पदार्थ त्या भोग्यपदार्थांकरितां प्रिय वाटत नसून भोक्ता जो आत्मा त्याच्याकरितां प्रिय वाटतात. ॥ ६ ॥

पूर्वोक्त पति इत्यादि पदार्थ त्यांच्याकरितां कसे प्रिय होत नसतात, तें आतां क्रमानें दाखवितात–

**पत्याविच्छा यदा पत्न्यास्तदा प्रीतिं करोति सा ॥**
**क्षुदनुष्ठानरोगाद्यैस्तदा नेच्छति तत्पतिः ॥ ७ ॥**

**अन्वयः**—यदा पत्न्याः पत्यौ इच्छा भवति तदा सा प्रीतिं करोति। यदा तत्पतिः क्षुदनुष्ठानरोगाद्यैः युक्तः भवति तदा तं नेच्छति।

**अर्थः**—ज्या वेळीं पत्नीस पतीविषयीं इच्छा होते, त्या वेळीं ती त्याच्यावर प्रीति करिते. व जेव्हां तिचा पति क्षुधा, अनुष्ठान, रोग इत्यादिकांमध्यें गुंतलेला असतो, तेव्हां ती त्याची इच्छा करीत नाहीं. ॥ ७ ॥

**विवरणः**—क्षुधा, रोग इत्यादि इच्छाविघातक पीडांनीं जेव्हां पति पीडित होतो, तेव्हां पत्नी त्याची इच्छा करीत नाहीं. दरिद्री, रोगी, वृद्ध इत्यादि पतीची पत्नीकडून कशी संभावना होत असते, हें लोकप्रसिद्ध आहेच. ॥ ७ ॥

यावरून असें ठरतें:—

**न पत्युरर्थे सा प्रीतिः स्वार्थ एव करोति ताम् ॥**
**पतिश्चात्मन एवार्थे न जायार्थे कदाचन ॥ ८ ॥**

**अन्वयः**—सा प्रीतिः पत्युः अर्थे न किंतु तां स्वार्थे एव करोति । पतिः च आत्मनः एव अर्थे, न कदाचन जायार्थे करोति ।

**अर्थः**—ती प्रीति पतीकरितां नव्हे, तर ती आपल्याकरितांच करिते. तसाच पतीही आपल्या करितांच पत्नीवर प्रीति करितो, पत्नीकरितां कधींही करीत नाहीं. ॥ ८ ॥

**विवरणः**—पति पत्नीवर जी प्रीति करितो, किंवा पत्नी पतीवर करिते, ती आपल्या करितां होय, दुसऱ्याकरितां नव्हे. आतां दुसऱ्याकरितां ही माझी प्रीति आहे, असें जें लोक ह्मणत असतात, तो केवळ व्यवहार आहे, एवढेंच आह्मी ह्मणतों. ॥ ८ ॥

त्यांतील एकेकाच्या इच्छेनें प्रवृत्ति झाली असतां ती स्वार्थप्रवृत्ति होय असें जरी ह्मणतां आलें, तरी एकाच कालीं दोघांस इच्छा होऊन दोघांचीही प्रवृत्ति झाली असतां, तिला केवळ स्वार्थप्रवृत्ति ह्मणणें युक्त कसें होईल ?

**अन्योन्यप्रेरणेप्येवं स्वेच्छयैव प्रवर्तनम् ॥ ९ ॥**

**अन्वयः**—अन्योन्यप्रेरणे अपि एवं स्वेच्छया एव प्रवर्तनम् ।

**अर्थः**—परस्परांच्या प्रेरणेमध्येंही ह्याप्रमाणें स्वच्छेनेंच प्रवृत्ति होते. ॥ ९ ॥

**विवरणः**—जरी एकाद्या कामांत दोघांचीही प्रवृत्ति एकमेकांच्या प्रेरणेनें होतेसें वाटलें, तरी त्याचें स्वेच्छा हेंच बलवान् कारण होय. कारण आपली इच्छा नसल्यास कोणी कितीही जरी प्रेरणा केली, तरी आपण तें काम करीत नाहीं. ह्मणूनच एकाद्या कृत्यांत प्रवृत्त होणें, हेंही सूक्ष्मदृष्टया पाहिल्यास स्वेच्छेचेंच कार्य आहे, असा निश्चय होतो. ॥ ९ ॥

आतां हीच गोष्ट दृष्टान्त देऊन स्पष्ट करितात:—

**श्मश्रुकंटकवेधेन बाले रुदति तत्पिता ॥**
**चुंबत्येव न सा प्रीतिर्बालार्थे स्वार्थ एव सा ॥ १० ॥**

अन्वयः—श्मश्रुकंटकवेधेन बाले रुदति सति अपि तत्पिता चुंबति एव । सा प्रीतिः बालार्थे न । किंतु सा स्वार्थे एव ।

अर्थः—दाढीमिशीचे केस खुपल्यामुळें बालक रडत असतांनाही त्याचा पिता चुंबन घेतोच. ती प्रीति बालकाकरितां नव्हे तर स्वतः करितांच होय. ॥ १० ॥

विवरणः—लहान मुलाच्या गालास दाढीमीशीचे केंस कांट्यासारखे लागत असल्यामुळें कोणी पुरुष त्याचें चुंबन घेऊं लागल्यास तें रडूं लागतें. आपलें तोंड फिरवितें व हातांनीं त्याचें यथाशक्ति निवारण करितें. हें बहुतेक सर्व गृहस्थांस ठाऊक आहेच. वस्तुतः असा प्रकार जरी होत असला, तरी त्या मुलाच्या दुःखाकडे दुर्लक्ष्य करून चुंबन घेणारा त्याचें चुंबन घेतोच. पण तो हें कोणाच्या सुखाकरितां करितो ? मुलाच्या सुखाकरितांच हा सर्व खेळ आहे, असें कोणी तरी शहाणा ह्मणेल का ? ॥ १० ॥

स्त्री, पुत्र इत्यादि भोग्य पदार्थ सचेतन असल्यामुळें त्यांच्याविषयीं 'हें सर्व तीं कोणाकरितां करितात ?' असा संशय तरी येतो. पण जड पदार्थाविषयीं तसा कांहीं [illegible] होणें शक्यच नाहीं. असें आतां वित्ताच्या दृष्टान्तानें दाखवितातः—

**निरीच्छमपि रत्नादिवित्तं यत्नेन पालयन् ॥**
**प्रीतिं करोति स स्वार्थे वित्तार्थत्वं न शंकितम् ॥ ११ ॥**

अन्वयः—निरिच्छं रत्नादिवित्तं अपि यत्नेन पालयन् सः पुरुषः स्वार्थे प्रीतिं करोति वित्तार्थत्वं न शंकितम् ।

अर्थः—निरिच्छ अशा रत्नादि धनाचेंही प्रयत्नानें पालन करणारा पुरुष स्वतः करितांच त्याच्यावर प्रीति करितो. वित्ताकरितां अशी शंकाही येत नाहीं. ॥ ११ ॥

विवरणः—रत्नादि जड पदार्थांस इच्छा नसते हें तर उघड आहे. पण पुरुष त्यांचें मोठ्या प्रयत्नानें रक्षण करीत असतो व त्यांच्यावर त्याची मोठी प्रीतिही असते. ते जर नष्ट झाले किंवा कोणी चोरून नेले तर हा त्यांच्याकरितां रड रड रडतो. पण ही एवढी प्रीति कोणाकरितां ? स्वतःकरितां कीं त्या जड पदार्थांकरितां ? ॥ ११ ॥

आतां पशूच्या दृष्टान्तानें हीच गोष्ट सिद्ध करितात—

**अनिच्छति बलीवर्दे विवाहयिषते बलात् ॥**
**प्रीतिः सा वणिगर्थैव बलीवर्दार्थता कुतः ॥ १२ ॥**

अन्वयः—बलीवर्दे अनिच्छति सति बलात् विवाहयिषते सा प्रीतिः वणिगर्थे एव । तस्याः बलिवर्दार्थता कुतः ।

**अर्थः**—बैलाची इच्छा नसतांनाही त्याच्याकडून बलात्कारानें भार वाहविण्याची इच्छा करितात. ती प्रीति वाण्याकरितांच होय. ती बैलाकरितां कोठून असणार ? ॥ १२ ॥

विवरणः—तरुण बैलाच्या पाठीवर जर कांहीं बोजा लादूं लागलें किंवा त्याला नांगरास अथवा गाडीस जोडूं लागलें तर तो मोठा नाखुष होतो असें दिसतें व त्यामुळें त्यास मारूनमुटकून वठणीस आणावा लागतो. पण ही जबरदस्ती कोणाकरितां ? त्या बिचाऱ्या बैलाकरितां तर खचित नव्हे. अर्थात् ती या आपल्योट्या वाण्याकरितांच होय. गवळीलोक गाई दूध देत नसल्यास त्यांस कसें कसें छळतात व तें कोणाकरितां याचाही येथें निर्देश करितां येण्यासारखा आहे. त्यांची इच्छा नसतांनाही त्यांच्याकडून काम करून घेतात, यावरून हा सर्व प्रकार कोणाकरितां हें स्पष्ट आहे. ॥ १२ ॥

आतां क्रमप्राप्त ब्राह्मणाचा दृष्टांत स्पष्ट करितातः—

**ब्राह्मण्यं मेऽस्ति पूज्योहमिति तुष्यति पूजया ॥**
**अचेतनायाः जातेर्नो संतुष्टिः पुंस एव सा ॥ १३ ॥**

**अन्वयः**—मे ब्राह्मण्यं अस्ति अहं पूज्यः इति पूजया तुष्यति । अचेतनायाः जातेः संतुष्टिः नो । सा पुंसः एव ।

**अर्थः**—मला ब्राह्मण्य आहे, त्यामुळें मी पूज्य आहें, असें म्हणून पूजेच्या योगानें प्राणी संतुष्ट होतो. अचेतन अशी जी जाति तिची ही तुष्टि नव्हे अर्थात् ती पुरुषाचीच होय. ॥ १३ ॥

**विवरणः**—मी जातीचा ब्राह्मण आहें; तेव्हां मी सर्वांस पूज्य आहें, असें जातीचा अभिमान बाळगणारा जो असतो त्यास वाटत असतें आणि त्यामुळें कोणी

जरासा सत्कार केला कीं तो मोठा संतुष्ट होतो. पण हा संतोष जड जातीस होत असतो असें कोणी तरी ह्मणेल का ? ॥ १३ ॥

क्षत्रिय जातीच्या लोकांच्या अभिमानाचीही हीच दशा होय. असें आतां सांगतात:—

**क्षत्रियोऽहं तेन राज्यं करोमीत्यत्र राजता ॥**
**न जातेर्वैश्यजात्यादौ योजनायेदमीरितम् ॥ १४ ॥**

अन्वय:—अहं क्षत्रियः अस्मि तेन राज्यं करोमि इति अत्र राजता जातेः न । इद वैश्यजात्यादौ योजनाय ईरितम् ।

अर्थ:—मी क्षत्रिय आहें ह्मणून राज्य करितों. या ठिकाणीं राजता जातीची नव्हे. हें वैश्यजाती इत्यादिकांमध्यें योजून दाखविण्याकरितां सांगितलें आहे. ॥ १४ ॥

विवरण:—मी क्षत्रियजातिमान् असल्यामुळें राज्याचा उपभोग घेत आहें. या वाक्यांतील सुखोपभोग जातिमान् पुरुषासच होत असतो. जड जातीस कधींच होणें शक्य नाहीं, हें उघड आहे. ब्राह्मण जातीचें उदाहरण वर दिलें असतांना पुनः क्षत्रिय जातीचें उदाहरण दिलें आहे तें वैश्यादि सर्व जातींच्या ठिकाणीं अशीच योजना करावी, हें सुचविण्याकरितां आहे. ॥ १४ ॥

**स्वर्गलोकब्रह्मलोकौ स्तां ममेत्यभिवांछनम् ॥**
**लोकयोर्नोपकाराय स्वभोगायैव केवलम् ॥ १५ ॥**

अन्वय:—मम स्वर्गलोकब्रह्मलोकौ स्तां इति अभिवांच्छनं लोकयोः उपकाराय न । किंतु केवलं स्वभोगाय एव ।

अर्थ:—मला स्वर्गलोक व ब्रह्मलोक मिळावा. अशी जी दृढ इच्छा ती त्या लोकांच्या उपकाराकरितां नव्हे; तर केवल आपल्या भोगाकरितांच होय. ॥ १५ ॥

विवरण:—मला स्वर्गप्राप्ति व्हावी; मी ब्रह्मलोकीं जावें; मला पितृलोकीं असंड वास मिळावा; मी सूर्यलोकीं प्रवेश करावा; इत्यादिप्रकारें मनुष्य अनेक लोकांची इच्छा करीत असतो. पण ती इच्छा त्या त्या लोकांकरितां नसून केवळ स्वतःच्या सुखउपभोगाकरितांच होय; यांत कांहीं शंका नाहीं. ॥ १५ ॥

त्याचप्रमाणें:—

**ईशविष्ण्वादयो देवाः पूज्यंते पापनष्टये ॥**
**न तन्निष्पापदेवार्थं तत्तु स्वार्थं प्रयुज्यते ॥ १६ ॥**

अन्वयः—ईशविष्ण्वादयः देवाः पापनष्टये पूज्यन्ते । तत् निष्पापदेवार्थं न । किंतु तत् स्वार्थं प्रयुज्यते ।

अर्थः—शंकर, विष्णु इत्यादि देव पापाचा नाश होण्याकरितां पूजिले जातात, पण तें कृत्य निष्पाप जे देव त्यांच्याकरितां नव्हे, तर त्या कृत्यांची स्वतः करितांच योजना केली जाते. ॥ १६ ॥

विवरणः—मनुष्य देवादिकांची जी मनापासून उपासना करीत असतो, ती आपल्या पापाचा नाश व्हावा ह्मणूनच होय. देव स्वतः निष्पाप असल्यामुळें त्यांच्याकरितां नव्हे. अर्थात् त्या उपासनेचें फळ साधकासच मिळणार व स्वतःकरितांच तो तें करीत असतो, हें उघड आहे. ॥ १६ ॥

त्याचप्रमाणें:—

**ऋगादयो ह्यधीयंते दुर्ब्राह्मण्यानवाप्तये ॥**
**न तत्प्रसक्तं वेदेषु मनुष्येषु प्रसज्जते ॥ १७ ॥**

अन्वयः—दुर्ब्राह्मण्यानवाप्तये ऋगादयः अधीयन्ते हि । तत् वेदेषु न प्रसक्तम् । मनुष्येषु प्रसज्जते ।

अर्थः—व्रात्यत्व प्राप्त होऊं नये ह्मणून ऋग्वेदादि वेदांचें अध्ययन केलें जातें, हें उघड आहे. तें व्रात्यत्व वेदांमध्यें प्रसक्त होत नसून मनुष्यांमध्यें प्रसक्त होतें. ॥ १७ ॥

विवरणः—जो वेदाध्ययन करीत नाहीं तो व्रात्य होय. अशा ब्राह्मणासच दुष्ट ब्राह्मण ह्मणतात. पण हें दोषयुक्तत्व आपल्याकडे येऊं नये ह्मणून ब्राह्मण लोक आपल्या आपल्या शाखेचें अध्ययन करितात. पण हें निर्दोषत्व किंवा सदोषत्व वेदांच्या

---

१ ह्या उल्लेख आचार्यांच्या कालचा असू आहे. प्रस्तुत समयीं वेदाध्ययन तर दूरच राहिलें, पण नुसती गायत्रीही ज्यांस येत नाहीं, असे पुष्कळ ब्राह्मण आढळतात!

ठायीं कधीं तरी असूं शकेल का ? तें ब्राह्मणाच्या ठायीं असणार हें उघड आहे. अर्थात् ब्राह्मणांस स्वतःकरितांच वेद प्रिय होत असतात. ॥ १७ ॥

तसेंच:—

**भूम्यादिपञ्चभूतानि स्थानतृट्पाकशोषणैः ॥**
**हेतुभिश्चावकाशेन वांच्छन्त्येषां न हेतवः ॥ १८ ॥**

अन्वयः—सर्वे प्राणिनः स्थान तृट् पाक शोषणैः हेतुभिः च अवकाशेन भूम्यादि पंचभूतानि वांच्छन्ति । एषां हेतवः न ।

अर्थः—सर्व प्राणी स्थान, तृषा, पाक, शोषण, व अवकाश इत्यादिकांच्या निमित्तानें भूम्यादि पंचभूतांची इच्छा करितात. भूमि, आप इत्यादि भूतांच्या निमित्तानें नव्हे. ॥ १८ ॥

विवरणः—आपल्याला राहावयास जागा पाहिजे म्हणून भूमीची गरज; तान भागावी म्हणून पाण्याची गरज; स्वयंपाक, खाल्लेल्या अन्नाचा पाक, इत्यादिकांकरितां अग्नीची गरज; ओले पदार्थ सुकावे म्हणून वाऱ्याची गरज व इकडे तिकडे स्वैर हिंडतां यावें म्हणून आकाशाची गरज असते. तेव्हां आपल्या स्वार्थाकरितांच आपण पृथ्वी, आप इत्यादि भूतांवर प्रीति करितों; त्या भूतांकरितां नव्हे. ॥ १८ ॥

एकंदरींत:—

**स्वामिभृत्यादिकं सर्वं स्वोपकाराय वांच्छति ॥**
**तत्तत्कृतोपकारस्तु तस्य तस्य न विद्यते ॥ १९ ॥**

अन्वयः—स्वामिभृत्यादिकं सर्वं स्वोपकाराय वांच्छति । तत्तत्कृतोपकारः तु तस्य तस्य न विद्यते ।

अर्थः—धनी, सेवक इत्यादि सर्व पदार्थांची आपल्या उपकाराकरितां प्राणी इच्छा करितो. व तो तो स्वामिभृत्यांवर केलेला उपकार वस्तुतः त्याचा त्याचा नसतो. ॥ १९ ॥

विवरणः—प्राणी कोणत्याही कां पदार्थाची इच्छा करीना, ती स्वतःच्या उपकाराकरितां असते. धनी सेवकास जो पगार देत असतो तो त्याच्यावर उपकार कर-

ण्याकरितां नव्हे, तर आपल्या हिताकरितांच होय. त्याप्रमाणेंच सेवकाची सेवाही वस्तुतः धन्याकरितां नसून आपल्या हिताकरितां होय. हाच प्रकार सर्वत्र जाणावा. ॥ १९ ॥

सारांश—

**सर्वव्यवहृतिष्वेवमनुसन्धातुमीदृशम् ॥**
**उदाहरणबाहुल्यं तेन स्वां वासयेन्मतिम् ॥ २० ॥**

अन्वयः—एवं सर्वव्यवहृतिषु अनुसंधातुं ईदृशं उदाहरणबाहुल्यं उक्तम् । तेन स्वां मतिं वासयेत् ।

**अर्थः—याप्रमाणेंच सर्व व्यवहारांमध्यें अनुसंधान करितां यावें ह्मणून अशीं हीं पुष्कळ उदाहरणें दिलीं आहेत. त्यांच्या योगानें आत्मविषयक बुद्धि दृढ करावी. ॥ २० ॥**

विवरणः—इच्छापूर्वक होणारे जेवढे ह्मणून भोजनादि व्यवहार आहेत. त्या सर्वांमध्यें स्वार्थ आहे, परार्थ नाहीं, असें अनुसंधान सहज करितां यावें ह्मणून येथें अनेक दृष्टान्त दिलेले आहेत. त्यांवरून सर्व आत्म्याकरितां आहे, असा निश्चय करावा. व नंतर तोच अति प्रिय आहे, अशी सतत भावना ठेवावी. ॥ २० ॥

आतां प्रीतीचें स्वरूप व्यक्त करण्याकरितां तिच्याविषयीं प्रश्न करितातः—

**अथ केयं भवेत्प्रीतिः श्रूयते या निजात्मनि ॥**
**रागो वध्वादिविषये श्रद्धा यागादिकर्मणि ॥**
**भक्तिः स्याद्गुरुदेवादाविच्छा त्वप्राप्तवस्तुनि ॥ २१ ॥**

अन्वयः—या प्रीतिः निजात्मनि श्रूयते सा इयं का भवेत् । वध्वादिविषये रागः वा, यागादिकर्मणि श्रद्धा अथ वा गुरुदेवादौ भक्तिः किं वा अप्राप्यवस्तुनि इच्छा प्रीतिः स्यात् ।

**अर्थः—अहो, पण जी ही प्रीति स्वात्म्यामध्यें असते असें श्रुतीनें सांगितलें आहे ती कोणती ? स्त्री इत्यादि विषयांच्या ठिकाणाचा अनुराग ही प्रीति, कीं, यज्ञादि कर्मांच्या ठिकाणची श्रद्धा ही प्रीति, कीं गुरु, देव, इत्यादिकांच्या ठिकाणची भक्ति हीच प्रीति, कीं जी वस्तु प्राप्त झालेली नसते तिच्या विषयींची इच्छा हीच प्रीति? ॥ २१ ॥**

विवरणः—आत्म्यामध्यें प्रीति असते असें श्रुतीनें सांगितलें आहे हें खरें; पण ती प्रीति कशी असते हें स्पष्ट केलेलें नाहीं. यास्तव व्यवहारांत प्रत्ययास येणाऱ्या या चार प्रकारच्या प्रेमांपैकीं प्रस्तुत प्रीति कोणती ? कीं ती यांहून निराळीच आहे ? यांतील कोणती तरी एक प्रीति आत्मप्रीति आहे, असें जर ह्मटलें, तर ती एक देशी आहे असें होणार. ॥ २१ ॥

मग असें जर आहेः—

**तर्ह्यस्तु सात्विकी वृत्तिः सुखमात्रानुवर्तिनी ॥**
**प्राप्ते नष्टेपि सद्भावादिच्छातो व्यतिरिच्यते ॥ २२ ॥**

अन्वयः—तर्हि सुखमात्रानुवर्तिनी सात्विकी वृत्तिः अस्तु । प्राप्ते नष्टे अपि अस्याः सद्भावात् इयं इच्छातः व्यतिरिच्यते ।

अर्थः—तर प्रत्येक सुखामध्यें अनुवृत्त होणारी सात्विक वृत्तीच प्रीति असो; कारण प्राप्त झालेलें सुख जरी नष्ट झालें तरी ही असते, यास्तव ती इच्छेहून निराळी आहे. ॥ २२ ॥

विवरणः—स्त्रीपुत्रविषयक अनुराग व आपल्याजवळ नसलेल्या पदार्थाची इच्छा ही रजोगुणपरिणामरूप आहे. यास्तव सात्त्विकी हा शब्द येथें योजून त्यांचा निरास केला आहे. तात्पर्य, कोणतेंही कां सुख असेना ? पण प्रत्येकामध्यें ज्या प्रीतीची अनुवृत्ति होते, ह्मणजे प्रत्येक सुखामध्यें जी असते, ती सात्त्विक प्रीति आह्मांस इष्ट होय. आतां ती इच्छेहून भिन्न आहे हें कशावरून. असें जर ह्मणाल तर सांगतों. इच्छा इष्ट पदार्थ प्राप्त होई तोंच असते व ही सात्विक वृत्ति प्राप्त झालेलें सुख जरी नष्ट झालें तरी त्याविषयीं राहाते. ॥ २२ ॥

' अन्नादि पदार्थ सुखाचीं साधनें आहेत. त्यामुळें त्यांच्या ठायीं प्राण्याची प्रीति असते. पण आत्म्याच्या ठिकाणींही जर तशीच प्रीति असते असें मानलें, तर तोही सुखसाधन होईल ' अशी आतां शंका घेतातः—

**सुखसाधनतोपाधेरन्नपानादयः प्रियाः ॥ २३ ॥**
**आत्मानुकूल्यादन्नादिसमश्चेदपुनात्र कः ॥**
**अनुकूलयितव्यः स्यान्नैकस्मिन्कर्मकर्तृता ॥ २४ ॥**

अन्वयः--अन्नपानादयः सुखसाधनतोपाधेः यथा प्रियाः दृष्टाः तथा आत्मा आनुकूल्यात् अन्नादिसमः इति चेत् अमुना अत्र कः अनुकूलयितव्यः । एकस्मिन् कर्मकर्तृता न स्यात् ।

अर्थः--अन्नपानादि पदार्थ हीं सुखाचीं साधनें आहेत; या उपाधीमुळेंच तीं प्रिय होतात. तसाच आत्माही प्रिय वाटत असल्यामुळें तो अन्नादिकांसारखा च आहे, असें जर ह्मणशील, तर यानें अनुकूल करून कोणास घ्यावें? एकाच पदार्थाच्या ठायीं कर्तृत्व, कर्मत्व संभवत नाहीं. ॥ २३॥२४ ॥

विवरणः—जें जें सुखाचें साधन असतें, तें तें प्रिय वाटतें असा नियम आहे. त्यामुळें प्रिय वाटणारा आत्माही सुखसाधन आहे, असा निश्चय करितां येतो, असें जर म्हटलें, तर तें बरोबर नाहीं. कारण सुखसाधनरूप अशा या आत्म्यानें प्रसन्न कोणास करावें ? हा येथें प्रश्न येतो. आत्मा हा एक, अखंड, चैतन्य व नित्य असल्यामुळें तो ज्याला प्रसन्न करील असा पदार्थच या जगांत नाहीं. सारांश, आपल्या खांद्यावर बसून आपणांस कोठें जातां येणें जसें अशक्य आहे, तसेंच आत्मा दुसऱ्या कोणा भोक्त्यास प्रसन्न करील, हें ह्मणणें अशक्य आहे. ॥ २३॥२४ ॥

शिवाय विषयप्रीति व आत्मसुख यांमध्यें अंतर आहे. कसें तें सांगतों:—

**सुखे वैषयिके प्रीतिमात्रमात्मा त्वतिप्रियः ॥**
**सुखे व्यभिचरत्येषा नात्मनि व्यभिचारिणी ॥ २५ ॥**

अन्वयः—वैषयिके सुखे प्रीतिमात्रं । आत्मा तु अतिप्रियः । सुखे एषा व्यभिचरति आत्मनि न व्यभिचारिणी ।

अर्थः—विषयजन्य सुखामध्यें सामान्य प्रीति असते. पण आत्मा अतिप्रिय असतो. विषयसुखांतील ही प्रीति त्यास सोडून दुसऱ्याकडे जाते, पण आत्म्याच्या ठिकाणीं असणारी प्रीति आत्म्यास सोडून जात नाहीं. ॥ २५ ॥

विवरणः—विषयप्रीति सर्वसामान्य असते. ह्मणजे ती आत्म्याच्या प्रीती प्रमाणें निरतिशय नसते. आत्मा अतिशय प्रिय असतो. शिवाय विषयांविषयींची प्रीति पुष्कळ काळ टिकत नाहीं. कांहीं निमित्त झालें असतां ती नाहींशी होते. व पूर्वीं जो एकादा विषय अप्रिय असतो, तोच पुढें प्रिय होतो. पण आत्मप्रीतीचा तसा

प्रकार नाहीं. आत्म्यावर एकदां प्रीति बसली कीं ती यावज्जीव राहाते व उत्तरोत्तर वाढत जाते. ॥ २५ ॥

आतां पूर्वश्लोकोक्त प्रकारच स्पष्ट करितातः—

**एकं त्यक्त्वाऽन्यदादत्ते सुखं वैषयिकं सदा ॥**
**नात्मा त्याज्यो न चादेयस्तस्मिन्व्यभिचरेत्कथम् ॥ २६ ॥**

अन्वयः—एकं वैषयिकं सुखं त्यक्त्वा सदा अन्यत् आदत्ते । आत्मा न त्याज्यः च न आदेयः तस्मिन् कथं व्यभिचरेत् ।

अर्थः—एक वैषयिक सुख सोडून प्राणी सर्वदा दुसऱ्याचें ग्रहण करितो आत्म्याचा त्याग करितां येत नाहीं. तेव्हां ती त्यास सोडून कशी रहाणार.

विवरणः—एक विषयसुख सोडून दुसरें घेतां येतें. पण आत्मा नित्य असल्यामुळें त्याचा त्याग किंवा ग्रहण करितां येत नाहीं. तेव्हां त्याच्याविषयींची प्रीति व्यभिचारित कशी होणार ? ॥ २६ ॥

बरें त्याची उपेक्षा करावी तर तेंही अशक्य होय. असें आतां सांगतातः—

**हानादानविहीनेऽस्मिन्नुपेक्षा चेत्तृणादिवत् ॥**
**उपेक्षितुः स्वरूपत्वान्नोपेक्ष्यत्वं निजात्मनः ॥ २७ ॥**

अन्वयः—हानादानविहीने अस्मिन् तृणादिवत् उपेक्षा चेत् उपेक्षितुः स्वरूपत्वात् निजात्मनः उपेक्ष्यत्वं न ।

अर्थः—त्याग व स्वीकार यांनीं रहित अशा या आत्म्याविषयीं तृणादि क्षुद्र पदार्थांप्रमाणें उपेक्षा करावी असें जर ह्मणावें, तर आत्मा हेंच उपेक्षा करणाऱ्याचें स्वरूप असल्यामुळें स्वात्म्याची उपेक्षा करितां येण्यासारखी नाहीं. ॥ २७ ॥

विवरणः—आत्मा त्यागास व स्वीकारास योग्य नाहीं. यास्तव त्याची उपेक्षा करावी हें ह्मणणें सयुक्तिक नव्हे. कारण उपेक्षा करणारा पुरुष व आत्मा हे दोघे एकच असल्यामुळें कोणालाही झालें तरी त्याची उपेक्षा कशी करितां येईल ? सारांश; आत्म्याविषयीं उदासीनही होतां येत नाहीं. ॥ २७ ॥

पुनः याविषयीं शंका घेऊन ती बरोबर नाहीं असें ह्मणतातः–

**रोगक्रोधाभिभूतानां मुमूर्षा वीक्ष्यते क्वचित् ॥**
**ततो द्वेषाद्भवेत्त्याज्य आत्मेति यदि तन्न हि ॥ २८ ॥**

अन्वयः—रोगक्रोधाभिभूतानां क्वचित् मुमूर्षा वीक्ष्यते । ततः द्वेषात् आत्मा त्याज्यः भवेत् इति यदि तर्हि तत् न ।

अर्थः—रोग, क्रोध, इत्यादिकांच्या योगानें व्यापलेल्या पुरुषास केव्हां केव्हां मरण्याची इच्छा झाल्याचें दिसतें. त्यावरून ' द्वेषामुळें आत्मा त्याज्य होतो,' असें जर ह्मणशील तर तें बरोबर नव्हे. ॥ २८ ॥

विवरणः—आम्लपित्त, पोटशूळ, उपदंश इत्यादि असह्य रोगांच्या योगानें व अतिशय क्रोध आला असतां कोणी कोणी मरणाची इच्छा करितात. फार काय, पण स्वतःच्या देहाचा आपल्या हातानेंच नाश करितात. असा प्रकार पाहिला कीं आत्मा त्याज्यच आहे असे वाटते, अशी येथे शंका घेतली आहे; आणि ' तें बरोबर नाहीं ' या शेवटच्या वाक्याने तिचा निरास करण्याची येथें प्रतिज्ञा केली आहे.

आतां पूर्वोक्त शंका बरोबर कशी नाहीं हें सांगतातः—

**त्यक्तुं योग्यस्य देहस्य नात्मता त्यक्तुरेव सा ॥**
**न त्यक्तर्य्यस्ति स द्वेषस्त्याज्ये द्वेषे तु का क्षतिः ॥ २९ ॥**

अन्वयः—त्युक्तं योग्यस्य देहस्य आत्मता न । किंतु सा त्यक्तुः एव । अतः सः दोषः त्यक्तरि न अस्ति । त्याज्ये द्वेषे तु का क्षतिः ।

अर्थः—त्याग करण्यास योग्य असलेल्या देहास आत्मत्व नसतें, तर तें त्याग करणारासच असतें; यास्तव पूर्वोक्त द्वेष त्याग करणाऱ्या आत्म्याचे ठायीं नसतो. आतां त्याग करण्यास योग्य असलेल्या पदार्थांविषयीं जर द्वेष असला, तर त्यांत हानी कोणची. ॥ २९ ॥

विवरणः—अति पीडा झाली झाली असतां प्राणी जीवही देतो हें खरें, पण तो जीव देतो ह्मणजे काय करितो ? देहसंबंध तोडतो असेंच कीं नाहीं ? आत्म्याचा तर संबंध त्याच्यानें तोडवतच नाहीं; आत्मसंबंध तोडतां कसा येईल ? कारण आपल्या स्वभावभूत स्वरूपास कधीं कोणी आजपर्यंत सोडलें आहे का ? अर्थात् त्याग

करितां येण्यासारख्या अनात्मपदार्थांचा त्याग केल्यास त्यांत कांहीं हानि नाहीं. सारांश, रोगी, क्रोधी इत्यादि पुरुषांमध्यें जो द्वेष आढळतो, तो आत्म्याविषयीं नसून अनात्म्याविषयींच होय. ॥ २९ ॥

असो; एवढा वेळ श्रुतीच्या आधारानें आत्मा अति प्रिय आहे असें सांगून आत तीच गोष्ट युक्तित: सिद्ध करितातः–

**आत्मार्थत्वेन सर्वस्य प्रीतेश्चात्मा ह्यतिप्रियः ॥**
**सिद्धो यथा पुत्रमित्रात्पुत्रः प्रियतरस्तथा ॥ ३० ॥**

**अन्वयः**—यथा पुत्रमित्रात् पुत्रः प्रियतरः तथा सर्वस्य आत्मार्थत्वेन च प्रीतेः आत्मा अति प्रियः सिद्धः हि ।

**अर्थ:**—ज्याप्रमाणें पुत्राच्या मित्राहून पुत्र अधिक प्रिय असतो, त्याप्रमाणें सर्व भोग्यजात आत्म्याकरितां असल्यामुळें व तो प्रियही असल्यामुळें आत्मा अति प्रिय आहे, असें सिद्ध झालें. ॥ ३० ॥

**विवरण:**—पुत्राच्या मित्रावरही बापाची प्रीति असते पण ती साक्षात् नव्हे. पुत्राच्या द्वारा होय. त्यामुळें पुत्रप्रीति मुख्य व तिच्याकरितां त्याच्या मित्रावरील प्रीति गौण हें उघड आहे. त्याच न्यायानें प्राणी भोग्य पदार्थांवर जी प्रीति करीत असतो ती मुख्य नव्हे. कारण ती आत्म्याच्या द्वारा त्यांच्यावर बसते. साक्षात् नव्हे. अर्थात् आत्म्यावरील प्रीति मुख्य होय. शिवाय आत्मा ज्याचा त्याचा ज्याला त्याला अति प्रिय वाटत असल्यामुळें तो अति प्रिय व भोग्य पदार्थ नुस्ते प्रिय असेंही ठरतें. ॥ ३० ॥

आतां आत्म्याविषयीं स्वानुभव कसा असतो, तें दाखवितातः–

**मा न भूवमहं किं तु भूयासं सर्वदेत्यसौ ॥**
**आशीः सर्वस्य दृष्टेति प्रत्यक्षा प्रीतिरात्मनि ॥ ३१ ॥**

**अन्वयः**—अहं मा भूवं इति न । किं तु सर्वदा भूयासं इति असौ आशीः सर्वस्य दृष्टा इति आत्मनि प्रत्यक्षा प्रीतिः अस्ति ।

**अर्थ:**—मी नसावें असें नाहीं, तर सर्वदा असावें, अशी ही आशा सर्वांची दिसते. ही आत्म्यावरील प्रत्यक्ष प्रीति आहे. ॥ ३१ ॥

विवरणः—कोणत्याही कालीं व कोणत्याही स्थळीं माझें नास्तित्व न व्हावें, तर मी सदा विद्यमान् असावें, अशा प्रकारची ही इच्छा प्रत्येक प्राण्यास असते. हेंच आत्मप्रीतीचें प्रत्यक्ष प्रमाण होय. ह्मणजे ती इतकी प्रत्यक्ष असतांना तिच्याविषयीं वाद करीत बसणें अयुक्त आहे. ॥ ३१ ॥

पण:—

**इत्यादिभिस्त्रिभिः प्रीतौ सिद्धायामेवमात्मनि ॥**
**पुत्रभार्यादिशेषत्वमात्मनः कैश्चिदीरितम् ॥ ३२ ॥**

अन्वयः—इत्यादिभिः त्रिभिः एवं आत्मनि प्रीतौ सिद्धायां सत्यां कैश्चित् आत्मनः पुत्रभार्यादिशेषत्वं ईरितं अस्ति ।

अर्थः—या श्रुत्यादि तीन प्रमाणानीं ह्याप्रमाणें आत्म्याविषयीं प्रीति सिद्ध झाली असतां कित्येकांनीं आत्मा हा पुत्रभार्यादि भोग्य पदार्थांचा शेष आहे असें सांगितलें आहे. ॥ ३२ ॥

विवरणः—पूर्वोक्त श्रुति, युक्ति व अनुमान यांच्या योगानें आत्मप्रीति निःसंयपणें सिद्ध होत असतांनाही कित्येक शास्त्रपरिचयशून्य पुरुष आत्म्यास पुत्रादिकांचें शेषत्व आहे, ह्मणजे त्यांच्या सुखादिकांकरितां आत्मा आहे, आत्म्याकरितां ते नव्हेत, असें निःशंकपणें ह्मणत असतात. ॥ ३२ ॥

हें कशावरून ह्मणून विचाराल तर सांगतों:—

**एतद्विवक्षया पुत्रे मुख्यात्मत्वं श्रुतीरितम् ॥**
**आत्मा वै पुत्रनामेति तच्चोपनिषदि स्फुटम् ॥ ३३ ॥**

अन्वयः—एतद्विवक्षया 'आत्मा वै पुत्रनाम' इति पुत्रे मुख्यात्मत्वं श्रुतीरितं अस्ति । तत् च उपनिषदि स्फुटम् ।

अर्थः—प्रस्तुत गोष्ट सांगण्याच्या इच्छेनेंच 'आत्मा हा पुत्र आहे', असें ह्मणून पुत्राच्या ठायीं मुख्य आत्मत्व श्रुतीनें सांगितलें आहे. व तें उपनिषदांत स्पष्ट आहे. ॥ ३३ ॥

विवरणः—असें कित्येक ह्मणतात, हें सांगण्याच्या उद्देशानें " प्रसिद्ध आत्मांच

पुत्रसंज्ञक आहे' इत्यादि श्रुतीनें पुत्र मुख्य आत्मा आहे असें सांगितलें आहे. शिवाय हीच गोष्ट ऐतरेयादि उपनिषदांतून स्पष्टपणें सांगितली आहे. ॥ ३३ ॥

असें कोठें ह्मटलें आहे? ह्मणून जर विचाराल तर ऐतरेयांतील वाक्य देतों घ्याः—

**सोस्यायमात्मा पुण्येभ्यः कर्मभ्यः प्रतिधीयते ॥**
**अथास्येतर आत्मायं कृतकृत्यः प्रमीयते ॥ ३४ ॥**

अन्वयः—अस्य सः अयं आत्मा पुण्येभ्यः कर्मभ्यः प्रतिधीयते । अथ अस्य इतरः अयं आत्मा कृतकृत्यः सन् प्रमीयते ।

अर्थः—ह्याचा तो हा आत्मा पुण्यकर्मानुष्ठानार्थ प्रतिनिधि केला जातो. व नंतर ह्याचा हा दुसरा आत्मा कृतकृत्य होऊन मरतो. ॥ ३४ ॥

विवरणः—'हा पुत्ररूप गर्भ प्रथमतः पुरुषाच्या शरीरांत असतो.' इत्यादि प्रकारें ऐतरेयाच्या दुसऱ्या अध्यायांत गर्भ प्रकरण आहे. हा पुत्ररूप आत्मा विद्या, सामर्थ्य इत्यादिकांनीं युक्त झाला असतां पिता त्याला आपल्या पुण्यकर्मांमध्यें नियुक्त करितो. ह्मणजे तो त्यास प्रतिनिधि करितो. प्रतिनिधि ह्मणजे बदली काम करणारा. पुढें पित्याचा हा प्रत्यक्ष दिसणारा शरीररूप आत्मा वृद्धावस्थेमुळें जीर्ण झाला असतां मृत होतो. पण त्यानें सर्व कर्तव्यकर्में केलीं असल्यास त्यास कृतकृत्य ह्मणतात. तात्पर्य, येथें पुत्रास आत्मा असें ह्मटलें आहे. ॥ ३४ ॥

ह्याच प्रकार दृढ करण्याकरितां आतां दुसऱ्या एका वाक्याचा अर्थतः निर्देश करितातः—

**सत्यप्यात्मनि लोकोस्ति नापुत्रस्यात एव हि ॥**
**अनुशिष्टं पुत्रमेव लोक्यमाहुर्मनीषिणः ॥ ३५ ॥**

अन्वयः—अतः एव आत्मनि सति अपि अपुत्रस्य लोकः न अस्ति हि । मनीषिणः अनुशिष्टं एव पुत्रं लोक्यं आहुः ।

अर्थः—त्यामुळेंच देहरूपी आत्मा असतांनाही ज्याला पुत्र नसतो त्यास पितृलोक मिळत नाहीं, असें पुराणादिकांतून वर्णन आहे. शास्त्रज्ञ पुरुष 'त्वं ब्रह्म' इत्यादि मंत्रांच्या योगानें ज्यास उपदेश केला आहे, असाच पुत्र परलोकाचें साधन होतो, असें सांगतात. ॥ ३५ ॥

विवरणः—स्वतःचा देहसंज्ञक आत्मा जरी असला तरी हा पुत्ररूपी मुख्य आत्मा नसल्यास त्यास पितृलोक मिळत नाहीं, असें स्पष्टपणें सांगितलेलें आहे. म्हणजे या प्रसिद्ध आत्म्याचा परलोकाकरितां मुळींच उपयोग होत नाहीं. शास्त्रकारांचेंही असेंच मत आहे. ॥ ३५ ॥

आतां ऐहिक सुखही पुत्रामुळेंच मिळत असतें, असें सांगण्याकरितां—' हा मनुष्य लोक पुत्राच्या योगानेंच जिंकतां येण्यासारखा आहे.' इत्यादि श्रुतिवाक्य अर्थतः येथें देतातः—

मनुष्यलोको जय्यः स्यात्पुत्रेणैवेतरेण नो ॥
मुमूर्षुर्मंत्रयेत्पुत्रं त्वं ब्रह्मेत्यादिमन्त्रकैः ॥ ३६ ॥

अन्वयः—मनुष्यलोकः पुत्रेण एव जय्यः स्यात्। इतरेण नो। मुमूर्षुः ' त्वं ब्रह्म ' इत्यादि मंत्रकैः पुत्रं मंत्रयेत्।

अर्थः—मनुष्यलोक पुत्राच्या योगानेंच जिंकणें शक्य आहे; दुसऱ्या कर्मादि साधनानें नाहीं. मरावयास टेंकलेला पिता " तूं ब्रह्म आहेस " इत्यादि मंत्रांनीं पुत्रास उपदेश करितो. ॥ ३६ ॥

विवरणः—पुत्र नसल्यास गृहस्थास इतर सर्व सुखें तुच्छ वाटतात. हें अनुभवसिद्ध आहे. त्यावरून पुत्र हेंच ऐहिक सुखाचें साधम आहे. कर्म, वित्त इत्यादि दुसरें कोणतेंही नाहीं, हें निर्विवाद होय. मरणकाल समीप आला असतां पिता पुत्रास जवळ बसवून ' तूं यज्ञ आहेस, तूं लोक, तूं ब्रह्म आहेस ' इत्यादि अर्थाच्या मंत्रांनीं उपदेश करितो, हेंही वैदिकधर्मानुयायी लोकांस ठाऊक आहे. ॥ ३६ ॥

सारांश—

इत्यादिश्रुतयः प्राहुः पुत्रभार्यादिशेषताम् ॥
लौकिका अपि पुत्रस्य प्राधान्यमनुमन्यते ॥ ३७ ॥

अन्वयः—इत्यादि श्रुतयः पुत्रभार्यादिशेषतां प्राहुः। लौकिकाः अपि पुत्रस्य प्राधान्यं अनुमन्यते।

अर्थः—इत्यादि अनेक श्रुती आत्मा पुत्रभार्यादिकांचा शेष आहे, असें सांगत आहेत. स्मृति पुराणेंही पुत्राच्या प्राधान्यास अनुमोदन देतात. ॥ ३७ ॥

विवरणः—" पत्नी हा आत्म्याचा अर्धा भाग आहे " इत्यादि दुसऱ्याही अनेक श्रुती पुत्र, भार्या इत्यादि पदार्थ सुखाचीं साधनें आहेत व आत्मा त्यांचा शेष आहे असें सांगतात. स्मृत्यादिकांतही असेंच सांगितलें आहे. ॥ ३७ ॥

शिवायः—

**स्वस्मिन्मृतेऽपि पुत्रादिर्जीवेद्वित्तादिना यथा ॥**
**तथैव यत्नं कुरुते मुख्याः पुत्रदयस्ततः ॥ ३८ ॥**

अन्वयः—यतः स्वस्मिन् मृते अपि पुत्रादिः वित्तादिना यथा जीवेत् तथा एव यत्नं कुरुते ततः पुत्रादयः मुख्याः ।

अर्थः—ज्या अर्थी पुरुष आपल्या मरणानंतरही पुत्रादिक वित्तादिकांनीं जिवंत रहातील, असाच प्रयत्न करितो, त्या अर्थी पुत्रादिक मुख्य होत. ॥३८॥

विवरणः—आपण कधीं तरी मरणार खास हें ठाऊक असतांनाही पुरुष आपल्या मागें आपल्या पुत्रादिकांची उत्तम तजवाज करून ठेवण्याकरितां आपल्या समजुती-प्रमाणें खटपट करीत असतो, हें सर्वांस ठाऊक आहे. व त्यामुळें पुत्रादिकच मुख्य आहेत असें ह्मटल्यावांचून राहावत नाहीं. ॥ ३८ ॥

हें वाद्यांचें सर्व ह्मणणें कबूल करून " तरी सुद्धां आत्मा त्यांचा शेष आहे असें ठरत नाहीं " असें सिद्धान्ती प्रतिपादन करितातः—

**बाढमेतावता नात्मा शेषो भवति कस्यचित् ॥**
**गौणमिथ्यामुख्यभेदैरात्मायं भवति त्रिधा ॥ ३९ ॥**

अन्वयः—बाढं । एतावता आत्मा कस्यचित् शेषः न भवति । अयं आत्मा गौणमिथ्यामुख्यभेदैः त्रिधा भवति ।

अर्थः—खरें आहे. पण एवढ्यावरून आत्मा कोणाचा शेष आहे असें होत नाहीं. हा आत्मा गौण, मिथ्या व मुख्य या भेदांच्या योगानें तीन प्रकारचा होतो. ॥ ३९ ॥

विवरणः—पुत्र, भार्या इत्यादि पदार्थांची श्रुति, स्मृति व पुराणें यांमध्यें आत्मा या संज्ञेनें जरी स्तुति केलेली असली, तरी तेवढ्यावरून हा आत्मा कोणाचा शेष आहे असें होत नाहीं. आत्मा गौण, मिथ्या व मुख्य असा तीन प्रकारचा आहे;

व त्यामुळें पुत्रादि अनात्म पदार्थांस उद्देशूनही शास्त्रांत त्याचा प्रयोग होणें अशक्य नाहीं. ॥ ३९ ॥

पुत्रादि आत्मा गौण आहे, हें दाखविण्याकरितां लौकिक गौणप्रयोग कसा होतो तें अगोदर स्पष्ट करितातः—

**देवदत्तस्तु सिंहोयमित्यैक्यं गौणमेतयोः ॥**
**भेदस्य भासमानत्वात्पुत्रादेरात्मता तथा ॥ ४० ॥**

अन्वयः—अयं देवदत्तः सिंहः इति एतयोः ऐक्यं भेदस्य भासमानत्वात् गौणम् । पुत्रादेः आत्मता अपि तथा ।

अर्थः—हा देवदत्त सिंह आहे असा यांचा ऐक्यभेद स्पष्ट भासत असल्यामुळें तो गौण होय. पुत्रादिकांची आत्मता ही तशीच होय. ॥ ४० ॥

विवरणः—देवदत्त व सिंह हे दोन भिन्न पदार्थ आहेत. पण असें असतांनाही 'हा देवदत्त सिंह आहे' असा व्यवहारांत शब्दप्रयोग होत असल्यामुळें 'देवदत्त व सिंह यांचें ऐक्य गौण आहे, मुख्य नव्हे' असेंच मानावें लागतें. पुत्रास आत्मा ह्मणणें हेंही तसेंच समजावें. ह्मणजे आत्मा व पुत्र हे भिन्न पदार्थ असल्यामुळें 'पुत्र माझा आत्मा आहे' हें ह्मणणें मुख्य नव्हे, तर तें गौण होय. कारण अगदीं भिन्न अशा पदार्थांचें खरोखरीच ऐक्य होणें युक्तिशून्य आहे. ॥ ४० ॥

आतां मिथ्या आत्मा कोणता तें सांगतातः—

**भेदोऽस्ति पंचकोशेषु साक्षिणो न तु भात्यसौ ॥**
**मिथ्यात्मताऽतः कोशानां स्थाणोश्चोरात्मता तथा ॥ ४१ ॥**

अन्वयः—पंचकोशेषु साक्षिणः यः भेदः अस्ति असौ न भाति । अतः स्थाणोः यथा चोरात्मता तथा कोशानां मिथ्यात्मता अस्ति ।

अर्थः—पांचही कोशांमध्यें साक्षी आत्म्याचा जो भेद असतो तो भासत नाहीं. यास्तव स्थाणूची जशी चोररूपता तशी कोशांची मिथ्यात्मता होय.

विवरणः—अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय हे पांचही कोश साक्षी आत्म्याहून भिन्न आहेत, पण तो त्यांचा भेद कांहीं केल्या भासत नाहीं. तर त्यांचें तादात्म्य आहे असा सर्व उच्च नीच प्राण्यांस अनुभव येतो, तस्मात्

कोशांच्या ठिकाणीं भासणारा आत्मभाव मिथ्या आहे. यास दृष्टांत—एकाद्या खांबास पाहून हा चोर आहे असें जर कोणास वाटलें व त्यामुळें तो भयभीत झाला तर त्या भासलेल्या चोरास काय ह्मणतां येईल ! कारण खांब असतांना तो न भासणें व त्याच्या ठिकाणीं चोराचा प्रत्यय येणें हा शुद्ध भ्रम आहे. त्यामुळें खांबाची चोरता मिथ्या ( भ्रामक ) आहे असेंच ह्मणावें लागतें. गौण प्रयोगांत दोन्ही पदार्थ भिन्न भिन्न भासत असतांना त्यांचें ऐक्य करितात व मिथ्या ज्ञानांत एकाचे ठायीं दुसऱ्याचें भान होतें. हा या उभय ज्ञानांत फरक आहे. ॥ ४१ ॥

आतां साक्षी मुख्य आत्मा आहे असें सांगतातः—

**न भाति भेदो नाप्यस्ति साक्षिणोऽप्रतियोगिनः ॥**
**सर्वांतरत्वात्तस्यैव मुख्यमात्मत्वमिष्यते ॥ ४२ ॥**

अन्वयः—अप्रतियोगिनः साक्षिणः भेदः न भाति न अस्ति अपि । सर्वान्तरत्वात् तस्य एव मुख्यं आत्मत्वं इष्यते ।

अर्थः—प्रतियोग नसणाऱ्या साक्षी आत्म्याचा भेद भासत नाहीं व तो नाहींही. तो सर्वांच्या आंत राहाणारा असल्यामुळें त्यालाच मुख्य आत्मत्व मानिलेलें आहे. ॥ ४२ ॥

विवरणः—देहादिकांस आत्मा मानल्यास ते देहादिकच त्याचे जसे विरोधि होत असतात, त्याप्रमाणें साक्षी आत्म्याचा कोणी विरोधी नसतो. ह्मणजे साक्षी एक व अद्वितीय असल्यामुळें त्याचा भेद आहे असें भासत नाहीं. व केवल भासत नाहीं इतकेंच नव्हे, तर तो खरोखरीच नाहीं. शिवाय हा साक्षी पुत्रादि व अन्नमयादि सर्व गौण व मिथ्या आत्म्यांहून अगदीं आंत आहे. त्यामुळें तोच मुख्य आत्मा होय. ॥४२॥

पण असें जरी असलें तरी त्याचा प्रस्तुत प्रसंगीं काय उपयोग आहे तें आतां सांगतातः—

**सत्येवं व्यवहारेषु येषु यस्यात्मतोचिता ॥**
**तेषु तस्यैव शेषित्वं सर्वस्यान्यस्य शेषता ॥ ४३ ॥**

अन्वयः—एवं सति येषु व्यवहारेषु यस्य आत्मता उचिता तेषु तस्य एव शेषित्वं सर्वस्य अन्यस्य शेषता ।

अर्थः—असें सिद्ध झालें असतां ज्या व्यवहारांमध्यें ज्याचें आत्मत्व उचित असतें त्यामध्यें त्यालाच शेषित्व असतें व इतर सर्वांस शेषता असते. ४३

विवरणः—असो; आत्मा तीन प्रकारचा आहे, हें एवढ्यावरून ठरलें असतां पालनपोषणादि लौकिक व ब्रह्मानुसंधानादि वैदिक व्यवहारांमध्यें ज्या पुत्रादि, देहादि किंवा साक्षी आत्म्यास आत्मा मानणें उचित असेल, त्या देहादिकांसच शेषि म्हणणें, व इतरांस त्याचा शेष म्हणणें युक्त होय. याचा पुढील पांच श्लोकांत अधिक विस्तार होणार आहे. ॥ ४३ ॥

मुमूर्षोर्गृहरक्षादौ गौणात्मैवोपयुज्यते ॥
न मुख्यात्मा न मिथ्यात्मा पुत्रः शेषी भवत्यतः ॥ ४४ ॥

अन्वयः—मुमूर्षोः गृहरक्षादौ गौणात्मा एव उपयुज्यते । मुख्यात्मा न । मिथ्यात्मा अपि न । अतः पुत्रः शेषी भवति ।

अर्थः—मरावयास टेंकलेल्या पुरुषास गृहरक्षणादिकांमध्यें गौण आत्म्याचाच उपयोग होतो. मुख्य आत्म्याचा किंवा मिथ्या आत्म्याचाही होत नाहीं; यास्तव अशा प्रसंगीं पुत्र शेषी होय. ॥ ४४ ॥

विवरणः—स्वतः मरणार असें समजल्यावर देहादि मिथ्या आत्मा किंवा साक्षी यांचा मालमत्तेच्या रक्षणामध्यें मुळींच उपयोग होणार नाहीं असें वाटणेंही साहजिक आहे. यास्तव पित्यास पुत्रासारख्या गौण आत्म्याकडेसच तें काम द्यावें लागतें. व अशा प्रसंगीं तोच शेषी होय. कारण साक्षी निर्विकार असतो व देहरूप मिथ्या आत्मा तर मरणानंतर काष्ठरूप होणार हें त्यास पक्कें ठाऊक असतें. ॥ ४४ ॥

आतां स्वतः विद्यमान असतांनाही गृहादिकांच्या रक्षणाकरितां पुत्ररूप आत्म्याचा तो कसा स्वीकार करितो, याविषयीं एक दृष्टान्त देतातः—

अध्येता वन्हिरित्यत्र सन्नप्यग्निर्न गृह्यते ॥
अयोग्यत्वेन योग्यत्वाद्बटुरेवात्र गृह्यते ॥ ४५ ॥

अन्वयः—" अध्येता अग्निः " इति अत्र सन् अपि अग्निः अयोग्यत्वेन न गृह्यते । किं तु योग्यत्वात् अत्र बटुः एव गृह्यते ।

अर्थः—‘ हा अध्ययन करणारा अग्नि आहे ’ या वाक्यांत अग्नि विद्यमान असतांनाही तो अध्ययनास अयोग्य असल्यामुळें त्याचें अग्निशब्दानें ग्रहण केलें जात नाहीं. तर अशा प्रसंगीं योग्य असलेल्या बटूचेंच ग्रहण केलें जातें. ४५

विवरणः—‘ हा अध्ययन करणारा अग्नि आहे ’ असें ह्मणताच कोणीही झाला तरी अध्ययन करणाऱ्या ब्रह्मचाऱ्याचेंच ग्रहण करील, हें उघड आहे. कारण जड अग्नीस अध्ययन करितां येणें शक्य नाहीं, हें बहुतेक सर्वांस ठाऊक असतें. तसेंच मरणोन्मुख मनुष्य जरी विद्यमान असला तरी तो पुत्रादि गौण आत्म्यासच गृहादिकांचें रक्षण करावयास सांगेल हें उघड आहे. कारण मरणकाल समीप असल्यामुळें त्या कृत्यांस आपण अयोग्य आहो, असें त्यास निश्चयपूर्वक समजलेलें असतें; आणि त्यामुळें तो आपल्या पुत्रासच गृहकृत्यांमध्यें नियुक्त करितो. ॥ ४५ ॥

ह्याप्रमाणें गौण आत्म्याचें प्राधान्य केव्हां असतें तें सांगून आतां मिथ्या आत्म्याचें प्राधान्य केव्हां असते तें सांगतातः—

**कृशोहं पुष्टिमाप्स्यामीत्यादौ देहात्मतोचिता ॥**
**न पुत्रं विनियुंक्तेऽत्र पुष्टिहेत्वन्नभक्षणे ॥ ४६ ॥**

अन्वयः—अहं कृशः अस्मि पुष्टिं आप्स्यामि इत्यादौ देहात्मता उचिता । अत्र पुष्टिहेत्वन्नभक्षणे पुत्रं न विनियुंक्ते ।

अर्थः—मी कृश आहें. यास्तव पुष्टी मिळवीन ( पुष्ट होईन ), इत्यादि स्थळीं देहाचें आत्मत्वच उचित आहे; कारण पुष्टीस कारण होणाऱ्या अन्नादिकांच्या भक्षणासाठीं पुत्राची कोणीही योजना करीत नाहीं. ॥ ४६ ॥

विवरणः—‘ मी अलिकडे फार वाळलों आहें यास्तव कांहीं तरी शक्तिवर्धक औषध घेऊन मला आतां पुष्ट झालें पाहिजे ’ असें एकादा रोगी ह्मणतो. या स्थळीं मी व मला या शब्दांनीं कोणत्या आत्म्याचें ग्रहण करितां येणें शक्य आहे ? पुत्रादि गौण आत्म्याचें तर येथें कांहीं प्रयोजनच नाहीं. कारण मी कृश झालों आहें ह्मणून माझ्या पुत्रानें औषध खावें असें शुद्धीवर असलेला कोणीही ह्मणणार नाहीं. अर्थात् या स्थळीं देहरूपी मिथ्या आत्म्याचेंच ग्रहण करणें योग्य आहे. कारण कृश होणें, पुष्ट होणें, हे धर्म देहाचेच आहेत, हें सर्वांस ठाऊक आहे. ॥ ४६ ॥

तसेंच—

**तपसा स्वर्गमेष्यामीत्यादौ कर्त्रात्मतोचिता ॥**
**अनपेक्ष्य वपुर्भोगं चरेत्कृच्छ्रादिकं ततः ॥ ४७ ॥**

अन्वयः—तपसा अहं स्वर्गं एष्यामि इत्यादौ कर्त्रात्मता उचिता । ततः वपुर्भोगं अनपेक्ष्य कृच्छ्रादिक चरेत् ।

अर्थः—'तपाच्या योगानें मी स्वर्गास जाईन' इत्यादि स्थळीं कर्ता जो जीव ( विज्ञानमय ) त्यासच आत्मत्व असणें युक्त आहे. त्यामुळें शरीरभोगाची अपेक्षा न करितां पुरुष कृच्छ्रादि तप करितो. ॥ ४७ ॥

विवरण:—ज्याला स्वर्गसुखाची इच्छा असते, तो 'मी कष्टतर तप करून स्वर्ग मिळवीन' असें ह्मणतो व त्याकरितां अभ्यंगस्नान, चंदनाच्या उट्या, सुवासिक पुष्पांच्या माळा, दागिने, उत्तम वस्त्रें, स्त्रिया इत्यादि सर्व ऐहिक भोग सोडून कृच्छ्र, चांद्रायणादिकांच्या योगानें शरीरास कृश करून सोडितो. अशा प्रसंगीं देहात्मता ग्रहण करितां येत नाहीं. कारण देह हाच आत्मा आहे असें एकदा मानल्यावर त्यास कृश करून सोडण्याचें कोणासही धैर्य होणार नाहीं. तस्मात् येथें विज्ञानमय जीवच आत्मा होतो. ॥ ४७ ॥

त्याचप्रमाणें:—

**मोक्ष्येहमित्यत्र युक्तं चिदात्मत्वं तदा पुमान् ॥**
**तद्वेत्ति गुरुशास्त्राभ्यां न तु किंचिच्चिकीर्षति ॥ ४८ ॥**

अन्वयः—अहं मोक्ष्ये इति अत्र चिदात्मत्वं युक्तम् । यदा पुमान् तत् गुरुशास्त्राभ्यां वेत्ति तदा तु न किंचित् चिकीर्षति ।

अर्थः—'मी मुक्त होईन' या स्थळीं चिदात्मत्वच युक्त आहे. ज्या वेळीं पुरुष गुरु व शास्त्र यांच्या द्वारा तें जाणतो तेव्हां तो कांहीं एक करण्याची इच्छा करीत नाहीं. ॥ ४८ ॥

विवरण:—मी या जन्ममरणपरंपरेंतून सुटून जाईन असें जेव्हां मनुष्य ह्मणतो तेव्हां चैतन्यास आत्मा ह्मणणें युक्त आहे. कारण जीव, देह किंवा पुत्र यांतील कोणीही मुक्त होणें शक्य नाहीं. पुरुषास चैतन्यरूप साक्षीच आत्मा आहे असें जेव्हां

गुरूचा उपदेश व शास्त्र यांवरून समजतें, तेव्हां आत्मा अकर्ता, अभोक्ता, नित्य, एक, अद्वितीय आहे, असा त्याचा निश्चय झाल्यामुळें तो कोणतीही क्रिया करण्याची इच्छा करीत नाहीं. ॥ ४८ ॥

ह्मणजे:—

**विप्रक्षत्रादयो यद्वद्बृहस्पतिसवादिषु ॥**
**व्यवस्थितास्तथा गौणमिथ्यामुख्या यथोचितम् ॥ ४९ ॥**

**अन्वयः**—विप्रक्षत्रादयः बृहस्पतिसवादिषु यद्वत् अवस्थिताः तथा गौणमिथ्यामुख्याः आत्मानः यथोचितं अवस्थिताः ।

**अर्थः**—बृहस्पतिसवादि यज्ञांमध्यें ब्राह्मणक्षत्रियादिक जसे अधिकारी असतात, त्याचप्रमाणें गौणात्मा, मिथ्यात्मा व मुख्यात्मा यांचे योग्यतेप्रमाणें प्राधान्य असतें. ॥ ४९ ॥

**विवरणः**—ब्राह्मणानेंच बृहस्पतिसव करावा, राजानें राजसूय करावा व वैश्यानेंच वैश्यस्तोम करावा, इत्यादि वैदिक वाक्यांवरून ब्राह्मणादिकांचा बृहस्पतिसवादि यज्ञामध्यें अधिकार आहे, हें जसें ठरतें, तसें योग्यतेप्रमाणें गौणात्मा इत्यादि तिन्ही आत्म्याचें प्राधान्य असतें, असें समजावें. प्राधान्य ह्मणजे पूर्वी त्रेचाळीसाव्या श्लोकांत सांगितलेलें शेषित्व होय. यासच अंगित्व असेंही ह्मणतात. ॥ ४९ ॥

सारांश:—

**तत्र तत्रोचिते प्रीतिरात्मन्येवातिशायिनी ॥**
**अनात्मनि तु तच्छेषे प्रीतिरन्यत्र नोभयम् ॥ ५० ॥**

**अन्वयः**—तत्र तत्र उचिते आत्मनि एव अतिशायिनी प्रीतिः । तच्छेषे अनात्मनि तु प्रीतिः । अन्यत्र उभयं अपि न अस्ति ।

**अर्थः**—त्या त्या उचित आत्म्यांच्या ठायींच अतिशय प्रीति असते; त्याच्या शेषभूत आत्म्याच्या ठायीं तर केवल प्रीति असते; आणि इतर स्थळीं केवळ प्रीति नसते व निरतिशय प्रीतीही नसते. ॥ ५० ॥

**विवरणः**—वर सांगितल्याप्रमाणें ज्या ज्या व्यवहारांत जो जो आत्मा होणें उचित असतें, त्याच्या त्याच्या ठायींच प्राण्याची अतिशय प्रीति असते; ह्मणजे गृहरक्षणादि

प्रसंगीं गौणात्मा अति प्रिय असतो, पुष्टीची इच्छा असतांना मिथ्यात्मा अति आवडतो व मोक्षाची जेव्हां इच्छा असते, तेव्हां चिदात्म्यावर अति प्रेम असतें. अर्थात् त्या त्या समयीं त्यांचें त्याचेंच प्राधान्य असतें. व जेव्हां ज्या आत्म्यावर अति प्रेम असतें तेव्हां त्याच्या शेषभूत पदार्थांवर सामान्य प्रेम असतें; ह्मणजे ज्या वेळीं पुत्रावर अति प्रेम त्या वेळीं त्याच्या मित्रावर किंवा स्त्रीवर सामान्य प्रेम, ज्या वेळीं देहावर किंवा जीवावर अति प्रेम त्या वेळीं पुष्टिवर्धक पदार्थ व कृच्छ्रादि तप यांवर सामान्य प्रेम व ज्या वेळीं चिदात्म्यावर अति प्रेम त्या वेळीं शास्त्र व गुरु यांवर सामान्य प्रेम असतें. पण आत्मा व आत्म्याचा शेष यांतील एकाही कोटींत ज्या पदार्थांची गणना होत नाहीं, त्याच्यावर मनुष्याचें मुळींच प्रेम नसतें. ॥ ५० ॥

आतां पूर्व श्लोकांत अन्यत्र असा जो शब्द आला आहे, त्याचा अर्थ सांगतातः—

**उपेक्ष्यं द्वेष्यमित्यन्यद्‌द्वेधा मार्गतृणादिकम् ॥**
**उपेक्ष्यं व्याघ्रसर्पादि द्वेष्यमेवं चतुर्विधम् ॥ ५१ ॥**

अन्वयः—उपेक्ष्यं द्वेष्यं च इति अन्यत् द्वेधा । मार्गतृणादिकं उपेक्ष्यम् । व्याघ्रसर्पादि द्वेष्यम् । एवं पदार्थजातं चतुर्विधं अस्ति ।

अर्थः—उपेक्षा करण्यासारखें व द्वेष करण्यासारखें असें अन्य दोन प्रकारचें आहे. मार्गांतील तृण, दगड इत्यादि पदार्थ उपेक्ष्य आहेत व व्याघ्रसर्पादि द्वेष्य आहेत. सारांश, याप्रमाणें सर्व पदार्थजात चार प्रकारचें आहे. ॥ ५१ ॥

विवरणः—अन्यत्र या शब्दांत अन्य हा मुख्य शब्द आहे. व अन्याचे उपेक्ष्य व द्वेष्य असे दोन प्रकार आहेत. रस्त्यांतील गवत, दगड, माती, इत्यादि निरुपयोगी पदार्थ उपेक्षा करण्यास योग्य असतात. व्याघ्र, सर्प, विंचु इत्यादि दुःख देणारे पदार्थ द्वेषास पात्र असतात. आणि ह्याप्रमाणें जगांतील सर्व पदार्थ या चार कोटींत येतात. ॥ ५१ ॥

चार कोटी किंवा चार प्रकार कोणते तें सांगून, आतां अमुक पदार्थ अमुक प्रकारचाच आहे, असा नियम करितां येत नाहीं, असें सांगतातः—

**आत्मा शेष उपेक्ष्यं च द्वेष्यं चेति चतुर्ष्वपि ॥**
**न व्यक्तिनियमः किं तु तत्तत्कार्यात्तथा तथा ॥ ५२ ॥**

**अन्वयः**—आत्मा, शेषः, उपेक्ष्यं च द्वेष्यं इति चतुर्षु अपि व्यक्तिनियमः न अस्ति । किं तु तत्तत्कार्यात् तथा तथा भवति ॥

**अर्थः**—आत्मा, शेष, उपेक्ष्य व द्वेष्य या चारही प्रकारांमध्यें वस्तूच्या आकाराचा नियम नाहीं; तर त्या त्या कार्यावरून तो तो पदार्थ तसा तसा होतो. ॥ ५२ ॥

**विवरणः**—अमुक एक पदार्थ द्वेष्यच आहे, किंवा उपेक्ष्य आहे, किंवा सुखाचें अंग आहे, असा अबाधित नियम करितां येत नाहीं; कारण ज्याचें ज्याचें जसें जसें कार्य होत असेल, त्या त्याप्रमाणें तो पदार्थ द्वेष्य उपेक्ष्य किंवा शेष होत असतो. ५२

आतां पूर्वश्लोकोक्त प्रकारच स्पष्ट करितातः—

**स्याद्व्याघ्रः संमुखो द्वेष्यो ह्युपेक्ष्यस्तु पराङ्मुखः ॥**
**लालनादनुकुलश्चेद्विनोदायेति शेषताम् ॥ ५३ ॥**

**अन्वयः**—व्याघ्रः संमुखः द्वेष्यः स्यात् । तु पराङ्मुखः हि उपेक्ष्यः भवति । तथा लालनात् अनुकूलः चेत् विनोदाय भवति इति शेषतां भजते ।

**अर्थः**—वाघ समोर चालून आला असतां द्वेषास पात्र होतो; पण तोच दुसरीकडे कोठें जात असला तर उपेक्ष्य होतो; बरें लाड वगैरे केल्यामुळें जर तो अनुकूल झाला, तर विनोदास कारण होतो व त्यामुळें तो शेषतेस पात्र होतो. ॥ ५३ ॥

**विवरणः**—व्याघ्रासारखा क्रूर प्राणी अंगावर धांवून आल्यास त्याच्याविषयीं कोणाच्याही मनांत द्वेष उत्पन्न होणें साहजिक आहे. बरें; तो दुसरीकडेच कोठें जात असतांना कोणाच्या दृष्टीस पडला तर कोणीही झाला तरी त्याच्या वाटेस जाणार नाहीं, हेंही उघड आहे. तसेंच त्याचें उत्तम प्रकारें पालनपोषण केल्यामुळें जर तो वश झाला, तर स्वतःच्या व लोकांच्याही करमणुकीस तो कारण होत असल्यामुळें सुखाचें अंग होतो. प्रो. छत्र्यांची कसरत ज्यांनीं पाहिली असेल त्यांस प्रस्तुत गोष्ट समजेल. यावरून बऱ्याच कालापूर्वीही व्याघ्रांचे खेळ होत असत असें अनुमान होतें. सारांश, कोणताही पदार्थ केवळ द्वेष्य किंवा केवळ उपेक्ष्य किंवा केवळ सुखसाधनच असेल असा नियम संभवत नाहीं. ॥ ५३ ॥

अहो, पण एकाच पदार्थाचे जर असे तीन धर्म मानले, तर व्यवहाराची व्यवस्था कशी होणार ? असें कोणी विचारील ह्मणून सांगतातः--

**व्यक्तीनां नियमो माभूल्लक्षणात्तु व्यवस्थितिः ॥**
**आनुकूल्यं प्रातिकूल्यं द्वयाभावश्च लक्षणम् ॥ ५४ ॥**

अन्वयः—व्यक्तीनां नियमः माभूत् तु लक्षणात् व्यवस्थितिः स्यात् । आनुकूल्यं प्रातिकूल्यं च द्वयाभावः लक्षणं अस्ति ।

**अर्थः—व्यक्तींचा नियम नसेना कां ? पण लक्षणामुळें व्यवस्था होऊं शकेल. अनुकूलता, प्रतिकूलता व दोहींचा अभाव हें लक्षण आहे. ॥ ५४ ॥**

विवरणः---व्यक्ति कोणत्या प्रकारची आहे हें जरी नियमानें सांगतां येत नसलें तरी त्या त्या लक्षणावरून व्यवहार होऊं शकेल. आतां प्रिय, उपेक्ष्य व द्वेष्य यांचें लक्षण काय ह्मणून जर ह्मणशील तर सांगतों. अनुकूलपणा हें प्रियाचें लक्षण, प्रतिकूलपणा हें द्वेष्याचें लक्षण व अनुकूलता आणि प्रतिकूलता यांतील कांहींच नसणें हें उपेक्ष्याचें लक्षण होय. ॥ ५४ ॥

असो; एवढा वेळपर्यंत ज्याचें प्रतिपादन केलें आहे, त्याचाच आतां संक्षेपतः निर्देश करितातः-

**आत्मा प्रेयान् प्रियः शेषो द्वेषोपेक्षे तदन्ययोः ॥**
**इति व्यवस्थितो लोको याज्ञवल्क्यमतं च तत् ॥ ५५ ॥**

अन्वयः—आत्मा प्रेयान् शेषः प्रियः तदन्ययोः द्वेषोपेक्षे इति लोकः व्यवस्थितः। च तत् याज्ञवल्क्यमतम् ।

**अर्थः—आत्मा अति प्रिय, शेषभूत पदार्थ नुस्ते प्रिय, त्यांहून अन्य व्याघ्र व तृणादि पदार्थ द्वेष्य व उपेक्ष्य; अशाप्रकारें हा लोक व्यवस्थित आहे. व हें याज्ञवल्क्यांसही मान्य आहे. ॥ ५५ ॥**

**विवरणः**—प्रत्यक् आनंदरूप आत्मा अतिशय प्रिय आहे. सुखादिकांस साधन होणारे पदार्थ नुस्ते प्रिय आहेत. व्याघ्रादि दुःखदायी पदार्थ द्वेषास पात्र होत असतात. व तृणादि निरुपयोगी पदार्थ उपेक्षा करण्यास योग्य होत. सारांश या चार प्रकारें सर्व लोक व्यवस्थित झाला आहे. शिवाय हा अर्थ याज्ञवल्क्यांसही मान्य आहे. ॥ ५५ ॥

केवळ मैत्रेयी ब्राह्मणांत याज्ञवल्क्यांचेंच असें मत आढळतें असें नाहीं तर अन्यत्रही असा उल्लेख आहे, असें आतां सांगतात:-

**अन्यत्रापि श्रुतिः प्राह पुत्राद्वित्तात्तथान्यतः ॥**
**सर्वस्मादांतरं तत्त्वं तदेतत्प्रेय इष्यताम् ॥ ५६ ॥**

**अन्वयः**—पुत्रात् वित्तात् तथा अन्यतः सर्वस्मात् आंतरं यत् तत्त्वं अस्ति तत् एतत् प्रेयः इष्यतां इति अन्यत्र अपि श्रुतिः प्राह ।

**अर्थः**—पुत्राहून, वित्ताहून व त्याचप्रमाणें दुसऱ्या सर्वांहून आंत असें जें तत्त्व आहे, तें अति प्रिय आहे असें समजावें. असें दुसऱ्या स्थळींही श्रुतीनें सांगितलें आहे. ॥ ५६ ॥

**विवरण:**—'आत्मतत्त्व पुत्रादि सर्व पदार्थांहून आंत राहणारें आहे. आंत ह्मणजे सर्व कार्यकरणरूप समूहाच्या पलीकडे असें समजावें. व हें तत्त्व अतिशय प्रिय आहे. अशी भावना करावी' इत्यादि प्रकारें दुसऱ्याही अनेक श्रुति सांगत आहेत. ॥५६॥

तात्पर्य:—

**श्रौत्या विचारदृष्ट्यायं साक्ष्येवात्मा न चेतरः ॥**
**कोशान्पंच विविच्यांतर्वस्तुदृष्टिर्विचारणा ॥ ५७ ॥**

**अन्वयः**—श्रौत्या विचारदृष्ट्या अयं साक्षी एव आत्मा न इतरः । पंच कोशान् विविच्य अंतर्वस्तुदृष्टिः विचारणा ।

**अर्थः**—या श्रुतिप्रोक्त विचारदृष्टीनें हा साक्षीच आत्मा आहे, इतर कोणी नव्हे. पंच कोशांचें विवेचन करून अंतर्वस्तूकडे दृष्टि लावणें हाच विचार होय.

**विवरण:**—एवढा वेळपर्यंत सांगितलेल्या विचारसरणीनें विचार केला असतां हा साक्षीच खरा आत्मा आहे, पुत्रादि दुसरा कोणीही नव्हे, असा निश्चय होतो. आतां विचार कसा करावा ह्मणून ह्मणाल तर सांगतों. अन्नमयादि पांच कोशांहून आत्मा भिन्न आहे असा निश्चय करून त्याच्याकडेसच दृष्टि लावणें हाच विचार होय. ॥५७॥

आत्म्याकडे दृष्टि कशी लावतां येते तें सांगतात:—

**जाग्रत्स्वप्नसुषुप्तीनामागमापायभासनम् ॥**
**यतो भवत्यसावात्मा स्वप्रकाशचिदात्मकः ॥५८ ॥**

अन्वयः—जागरस्वप्नसुप्तीनां आगमापायभासनं यतः भवति असौ स्वप्रकाश-चिदात्मकः आत्मा ।

**अर्थः—जाग्रति, स्वप्न व सुषुप्ति यांच्या उत्पत्तीचें व नाशाचें भान ज्या-च्यामुळें होतें, तो स्वप्रकाश चिद्रूप आत्मा होय. ॥ ५८ ॥**

विवरणः—एका अवस्थेचा अंत व दुसरीचा उदय यांचें ज्ञान ज्या महात्म्यामुळें होतें तोच स्वयंज्योति, चैतन्यरूप, सर्व कारणांचें कारण, नित्य, निरंजन, व साक्षी आतमा आहे. ॥ ५८ ॥

त्या आत्म्याचे शेष कोणते तें आतां सांगतातः–

**शेषाः प्राणादिवित्तांता आसन्नास्तारतम्यतः ॥**
**प्रीतिस्तथा तारतम्यात्तेषु सर्वेषु वीक्ष्यते ॥ ५९ ॥**

अन्वयः—प्राणादिवित्तान्ताः शेषाः यथा तारतम्यतः आसन्नाः तथा तारतम्यात् तेषु सर्वेषु प्रीतिः वीक्ष्यते ।

**अर्थः–प्राणापासून वित्तापर्यंत असणारे शेष जशा तारतम्यानें आत्म्याजवळ असतात, तशाच तारतम्याच्या योगानें त्या सर्वांच्या ठायीं प्रीति दिसते.**

विवरणः—साक्षीहून भिन्न असे प्राणापासून वित्तापर्यंत जेवढे ह्मणून शेषरूप पदार्थ आहेत, ते सर्व जसे जसे आत्म्याजवळ असतात तशी तशी त्यांच्यावर अधिक प्रीति असते. ह्मणजे आत्म्याच्या अगदीं जवळ प्राण आहे. यास्तव तो सर्वांत अधिक प्रिय असतो. देह त्यांच्याहून जरा दूर आहे ह्मणून तो प्राणांहून कमी प्रिय आहे. तात्पर्य, सर्वत्र असाच क्रम समजावा. ॥ ५९ ॥

आतां–प्रीतीमध्यें तारतम्य कसें असतें तें स्वतः ग्रंथकार सांगतातः–

**वित्तात्पुत्रः प्रियः पुत्रात्पिंडः पिंडात्तथेंद्रियम् ॥**
**इंद्रियाच्च प्रियः प्राणः प्राणादात्मा प्रियः परः ॥ ६० ॥**

अन्वयः—वित्तात् पुत्रः प्रियः, पुत्रात् पिंडः तथा पिंडात् इंद्रियं च इंद्रियात् प्राणः प्राणात् परः आत्मा अस्ति ।

**अर्थः—द्रव्याहून पुत्र प्रिय, पुत्राहून पिंड प्रिय, तसेंच पिंडाहून इंद्रियें प्रिय, इंद्रियांहून प्राण प्रिय, आणि प्राणाहून श्रेष्ठ आत्मा प्रिय असतो. ॥ ६० ॥**

विवरणः—पिंड ह्मणजे देह. तो वित्त व पुत्र यांहून प्रिय आहे. त्याच्याहून आंत असणारीं इंद्रियें व प्राण उत्तरोत्तर प्रिय असतात. साक्षी परमात्मा तर सर्वांहून प्रिय आहे. ॥ ६० ॥

सारांशः—

**एवं स्थिते विवादोत्र प्रतिबुद्धविमूढयोः ॥**
**श्रुत्योदाहारि तत्रात्मा प्रेयानित्येव निर्णयः ॥ ६१ ॥**

अन्वयः—एवं स्थिते अत्र प्रतिबुद्धविमूढयोः विवादः श्रुत्या उदाहारि । तत्र आत्मा प्रेयान् इति एव निर्णयः ।

**अर्थः—ह्याप्रमाणें आत्म्याचें अति प्रियत्व प्रमाणसिद्ध असतांनाही यां-विषयीं ज्ञानी व अज्ञानी यांचा वाद श्रुतीनें दाखविला आहे. व त्यांतील आ-त्मा प्रिय आहे, हाच निर्णय होय. ॥ ६१ ॥**

विवरणः—आत्मा अति प्रिय आहे, ही गोष्ट जरी अनेक प्रमाणांनीं सिद्ध होत असली, तरी ज्ञानी व अज्ञानी यांच्यामध्यें या आत्म्याविषयीं नेहमीं वाद चालतो. व श्रुतीनें त्याचाच येथें निर्देश केलेला आहे. यावरून आत्मा अति प्रिय आहे हाच त्या वादाचा निर्णय होय; असें समजावें. ॥ ६१ ॥

आतां ज्ञानी व अज्ञानी यांचा वाद कां होत असतो, तें दाखवितातः—

**साक्ष्येव दृश्यादन्यस्मात्प्रेयानित्याह तत्त्ववित् ॥**
**प्रेयान्पुत्रादिरेवेमं भोक्तुं साक्षीति मूढधीः ॥ ६२ ॥**

अन्वयः—तत्त्ववित् साक्षी एव अन्यस्मात् दृश्यात् प्रेयान् इति आह । पुत्रादिः एव प्रेयान् च इमं भोक्तुं साक्षी इति मूढधीः आह ।

**अर्थः—साक्षीच आत्मा दुसऱ्या सर्व दृश्यांहून अधिक प्रिय आहे, असें तत्त्वज्ञ ह्मणतो. व पुत्रादिच अति प्रिय आहे व त्याचा भोग घेण्यासाठीं साक्षी असें मूढ पुरुष ह्मणतो. ॥ ६२ ॥**

विवरणः—अर्थात् दोघांचीं याप्रमाणें भिन्न भिन्न मतें असल्यामुळें त्यांचा वाद चालतो. ॥ ६२ ॥

पण अशा प्रसंगीं तत्त्ववेत्त्यानें काय करावें तें सांगतात:—

**आत्मनोन्यं प्रियं ब्रूते शिष्यश्च प्रतिवाद्यपि ॥**
**तस्योत्तरं वचो बोधशापौ कुर्यात्तयोः क्रमात् ॥ ६३ ॥**

अन्वयः—शिष्यः च प्रतिवादी अपि आत्मनः अन्यं प्रियं ब्रूते। तस्य उत्तरं वचः क्रमात् तयोः बोधशापौ कुर्यात्।

अर्थः—शिष्य व प्रतिवादीही आत्म्याहून अन्य पदार्थास प्रिय ह्मणतो. यास्तव एकास बोध व दुसऱ्यास शाप होईल असें उत्तररूप वचन क्रमानें द्यावें. ॥ ६३ ॥

विवरणः—ज्याप्रमाणें प्रतिवादी तत्त्ववेत्त्यास प्रश्न करीत असतो, तसाच उत्तम शिष्यही आपणास बोध व्हावा ह्मणून गुरूस अनेक वेडे वांकडे प्रश्न करीत असतो. यास्तव तत्त्ववेत्त्यानें असें उत्तर द्यावें कीं, ज्याच्या योगानें शिष्यास बोध होईल व प्रतिवादीस तोच शाप होईल. ॥ ६३ ॥

आतां तत्त्ववेत्ता उत्तर कसें देतो, तें श्रुतीच्या आधारानें सांगतात:—

**प्रियं त्वां रोत्स्यतीत्येवमुत्तरं वक्ति तत्त्ववित् ॥**
**स्वोक्तप्रियस्य दुष्टत्वं शिष्यो वेत्ति विवेकतः ॥ ६४ ॥**

अन्वयः—प्रियं त्वां रोत्स्यति इति एवं तत्त्ववित् उत्तरं वक्ति। तेन शिष्यः स्वोक्तप्रियस्य दुष्टत्वं विवेकतः वेत्ति।

अर्थः—हे शिष्या, किंवा हे वाद्या, 'ती प्रिय वस्तू तुला रडवील. अशा प्रकारें तत्त्ववेत्ता उत्तर देतो. व त्यामुळें शिष्य आपण सांगितलेली प्रिय वस्तू दुष्ट आहे असें विवेकद्वारा जाणतो. ॥ ६४ ॥

विवरणः—'तूं ज्यास आत्मा समजत आहेस व त्यामुळें जो तुला अति प्रिय आहे, ह्याचा नाश झाला असतां तुला अति दुःख होईल. ह्मणजे तो खोटा आत्मा आपल्या नाशानें तुला रडवील, असें एकच वाक्य तत्त्वज्ञ पुरुष दोघांस उद्देशून बोलतो, पण त्याचा परिणाम दोघांवर निरनिराळा घडतो. जो शिष्य असतो, त्याची गुरूंच्या वचनावर श्रद्धा असल्यामुळें तो 'या वाक्याचा गूढ अर्थ काय असावा

बरें ?' असा विचार करूं लागतो व त्यामुळें 'आपण ज्यास प्रिय समजत आहों तो पुत्रादि गौण आत्मा अनेक दोषयुक्त आहे' असें त्यास समजतें. ॥ ६४ ॥

आतां, पुत्ररूप गौण आत्म्याच्या ठायीं दोष कोणकोणते आहेत. तें या पुढील तीन श्लोकांत सांगतातः—

अलभ्यमानस्तनयः पितरौ क्लेशयेच्चिरम् ॥
लब्धोपि गर्भपातेन प्रसवेन च बाधते ॥ ६५ ॥
जातस्य ग्रहरोगादिः कुमारस्य च मूर्खता ॥
उपनीतेप्यविद्यत्वमनुद्वाहश्च पंडिते ॥ ६६ ॥
यूनश्चपरदारादि दारिद्र्यं च कुटुंबिनः ॥
पित्रोर्दुःखस्य नास्त्यंतो धनी चेन्म्रियते तदा ॥ ६७ ॥

अन्वयः—अलभ्यमानः तनयः पितरौ चिरं क्लेशयेत् । लब्धः अपि गर्भपातेन च प्रसवेन बाधते । जातस्य कुमारस्य ग्रहरोगादिः च मूर्खता । उपनीते अपि अविद्यत्वं च पंडिते अनुद्वाहः च यूनः परदारादि च कुटुंबिनः दारिद्र्यं । धनी चेत् तर्हि यदा म्रियते तदा एवं पित्रोः दुःखस्य अंतः नास्ति ।

अर्थः—प्राप्त न होणारा पुत्र मातापितरांस दीर्घकाल दुःख देतो. प्राप्त झालेलाही गर्भपात व प्रसूति यांच्या योगानें पीडा देतो. उत्पन्न झालेल्या पुत्राची पिशाचबाधा, रोग, मूर्खता हीं दुःख देतात; उपनयन झाल्यावरही आवद्या व पंडित होऊनही विवाह न होणें हीं दुसरीं दुःखाचीं कारणें आहेत. तरुण झाल्यावर त्याचें परस्त्रीसेवन व कुटुंब्याचें दारिद्र्य; बरें तो धनी असल्यास जेव्हां पुत्र मरतो, तेव्हां; याप्रमाणें आईबापांच्या दुःखाला अंत नाहीं. ॥ ६७ ॥

विवरणः—अगोदर अभाग्यांस पुत्र होत नाहीं, म्हणून दुःख; पुढें स्त्री गरोदर होऊन जरी गर्भपात झाला तरी दुःख; मूल जेव्हां जन्मास येतें तेव्हां दुःख; जन्मानंतर रोगादिकांच्या योगानें त्यास पिडा झाल्यास दुःख; तें मूल निपजल्यास दुःख; मुंज केल्यावर त्याला विद्या न आल्यास दुःख; जरी विद्या आली, तरी दारिद्र्यादि दुसऱ्या कांहीं कारणांमुळें विवाह न होणें हें दुःख; विवाह न झाल्यामुळें तारुण्यावस्थेंत

जर त्यानें परस्त्रीगमन किंवा वेश्यागमन केलें तर अपकीर्ती, असाध्य रोग यांच्यामुळें दुःख; कुटुंब दरिद्री असल्यामुळें आपल्या पुत्रास सुख होत नाहीं म्हणून दुःख; आणि जर कदाचित् पिता श्रीमंत असला, तर निदान पुत्र अकालीं मरण पावल्यास दुःख! सारांश, सर्व अवस्थेंत पुत्र आईबापांस दुःख देण्यास कारण होत असतो. या स्थळीं आणखी दुसऱ्या दुःखांची गणना केली नाहीं. नाहींपेक्षां प्रस्तुत ग्रंथाचा केवढा तरी विस्तार झाला असता!! आतां प्रसूति इत्यादि कालीं पित्यास प्रत्यक्ष दुःख होत नाहीं हें जरी खरें आहे. तरी संसर्गामुळें स्त्रीच्या दुःखानें दुःखी होणारे बहुतक सर्व पति असतात, असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहींत. ॥६५॥६६॥६७॥

तात्पर्य तो शिष्यः—

**एवं विविच्य पुत्रादौ प्रीतिं त्यक्त्वा निजात्मनि ॥**
**निश्चित्य परमां प्रीतिं वीक्षते तमहर्निशम् ॥ ६८ ॥**

अन्वयः—एवं विविच्य पुत्रादौ प्रीतिं त्यक्त्वा निजात्मनि परमां प्रीतिं निश्चित्य तं अहर्निशं वीक्षते ।

अर्थः—ह्या प्रमाणें पुत्र, स्त्री इत्यादि विषयाविषयीं विवेचन करून त्याच्या ठिकाणची प्रीति सोडून आपल्या आत्म्याच्या ठायींच परम प्रीति आहे असा निश्चय करून त्या कूटस्थ प्रत्यगात्म्यासच तो सतत पाहातो. ॥ ६८ ॥

विवरणः—प्रस्तुत विचारानंतर पुत्रादि सर्व अनात्मरूप विषय दुःखरूप आहेत त्यांस परम सुख समजणें ही मोठी चूक आहे, इत्यादि प्रकारें ज्ञान झालें असतां अर्थात् तो शिष्य विषयप्रीति सोडतो. व साक्षी आत्माच नित्य व निरातिशय प्रिय आहे, असा त्याचा निश्चय होतो आणि त्यामुळें तो सतत आत्मानुसंधान करीत राहातो.

आतां पूर्वोक्त उत्तर प्रतिवाद्यास शापरूप कसें होतें तें सांगतातः—

**आग्रहाद्ब्रह्मविद्वेषादपि पक्षममुंचतः ॥**
**वादिनो नरकः प्रोक्तो दोषश्च बहुयोनिषु ॥ ६९ ॥**

अन्वयः—आग्रहात् च ब्रह्मविद्वेषात् अपि पक्षं अमुंचतः वादिनः नरकः च बहुयोनिषु दोषः प्रोक्तः अस्ति ।

अर्थः—आग्रहामुळें व ब्रह्मवेत्त्याच्या द्वेषामुळेंही आपला पक्ष न सोडणाऱ्या वाद्यास नरक व अनेक योनींमध्यें दोष सांगितलेला आहे. ॥ ६९ ॥

**विवरणः—**'मी ह्मणतों तेंच खरें.' असा आग्रह धरून किंवा—या ब्रह्मवेत्त्याचें ह्मणणें मी खोटें करीन, असा ब्रह्मज्ञ पुरुषाशीं द्वेष करून जो आपला खोटा पक्षही सोडीत नाहीं, तो वादी नरकांत पडतो. दीर्घकाल नरकवास भोगून तरी त्याची सुटका होते असें नाहीं. तर पुढेंही अनेक जन्म त्यास पुत्रभार्या इत्यादि प्रिय वस्तूंच्या नाशामुळें दुःख भोगावें लागतें, अशा प्रकारें पूर्वोक्त प्रत्युत्तरच वाद्यास शापरूप होतें.

'पण एकाच वाक्याचे असे दोन परिणाम कसे होऊं शकतील?' या प्रश्नाचें उत्तर देतातः—

**ब्रह्मविद्ब्रह्मरूपत्वादीश्वरस्तेन वर्णितम् ॥**
**यद्यत्तत्तत्तथैव स्यात्तच्छिष्यप्रतिवादिनोः ॥ ७० ॥**

अन्वयः—ब्रह्मरूपत्वात् ब्रह्मवित् ईश्वरः अतः तेन यत् यत् वर्णितं तत् तत् तच्छिष्यप्रतिवादिनोः तथा एव स्यात् ।

**अर्थः—**ब्रह्मरूपत्वामुळें ब्रह्मज्ञ ईश्वरच आहे. यास्तव त्यानें जें जें ह्मटलेलें असतें तें तें त्याच्या शिष्यास व प्रतिवाद्यास तसेंच होतें. ॥ ७० ॥

विवरणः—जो ब्रह्मास जाणतो, तो ब्रह्मरूपच होतो असें श्रुतिवचन आहे. यास्तव ब्रह्मज्ञ पुरुष ईश्वरच आहे, यांत कांहीं संशय नाहीं. अर्थात् तो शिष्यास किंवा वाद्यास उद्देशून जें जें कांहीं इष्ट किंवा अनिष्ट ह्मणेल, तें तें सर्व तसेंच होईल. कारण ब्रह्मानुभवामुळें त्याची वाणी सत्य होत असते. ॥ ७० ॥

आतां जो कोणी आत्म्यास अति प्रिय मानतो, त्यास कोणता लाभ होतो, तें श्रुतीच्या आधारानेंच सांगतातः—

**यस्तु साक्षिणमात्मानं सेवते प्रियमुत्तमम् ॥**
**तस्य प्रेयानसावात्मा न नश्यति कदाचन ॥ ७१ ॥**

अन्वयः—यः तु साक्षिणं आत्मानं एव उत्तमं प्रियं सेवते तस्य असौ प्रेयान् आत्मा कदाचन न नश्यति ।

**अर्थः—पण जो पुरुष साक्षी आत्म्यासच अति प्रिय समजून त्याची सतत स्मरणरूप सेवा करतो, त्याचा अतिशय प्रिय आत्मा कधींही नष्ट होत नाहीं.**

विवरणः—पुत्रादि इतर सर्व गौण व मिथ्या आत्मे आहेत आणि कूटस्थ व सर्वांतर्यामी आत्माच मुख्य आत्मा आहे. अर्थात् तोच निरतिशय प्रिय आहे. व अशा भावनेनें जो कोणी श्रद्धालु सतत आत्मानुसंधान करितो, त्यास तो अति प्रिय आत्मा सर्वदा आनंदरूपानें भासत असतो. ह्मणजे वाद्याप्रमाणें त्याच्या आत्म्याचा अधोगतिरूप नाश होत नाहीं. ॥ ७१ ॥

ह्याप्रमाणें आत्मा परमप्रेमास्पद आहे असें श्रुति, युक्ति व अनुभव यांच्या द्वारा सिद्ध करून आतां त्याचें फल सांगतातः—

**परप्रेमास्पदत्वेन परमानंदरूपता ॥**
**सुखवृद्धिः प्रीतिवृद्धौ सार्वभौमादिषु श्रुता ॥ ७२ ॥**

अन्वयः—परप्रेमास्पदत्वेन परमानंदरूपता । सार्वभौमादिषु प्रीतिवृद्धौ सुखवृद्धिः श्रुता ।

अर्थः—आत्मा परम प्रेमास्पद असल्यामुळें त्याच्या परमानंदतेची सिद्धि होते. सार्वभौमादिकामध्यें जेथें जेथें प्रीतीची वृद्धि होत असते, तेथें तेथें सुखाचीही वृद्धि होते, असें श्रुतीनें सांगितलें आहे. ॥ ७२ ॥

विवरणः—आत्मा परमानंदरूप आहे. कारण तो परमप्रेमाचें स्थान आहे. जो जो पदार्थ परमप्रेमाचें स्थान नसतो, तो तो परमानंदरूपही नसतो. जसाः—दगड किंवा वृक्ष. तैत्तिरिय, बृहदारण्यक इत्यादि उपनिषदांत ज्या ज्या पदार्थाविषयीं प्रीति वाढते, तो तो पदार्थ अधिक सुख देणारा असतो, असें अनेक दृष्टांत देऊन ठरविलें आहे. ॥ ७२ ॥

आतां या आत्म्याच्या परमानंदतेविषयीं वादी शंका घेतोः—

**चैतन्यवत्सुखं चास्य स्वभावश्चेच्चिदात्मनः ॥**
**धीवृत्तिष्वनुवर्तेत सर्वास्वपि चितिर्यथा ॥ ७३ ॥**

अन्वयः—अस्य चिदात्मनः चैतन्यवत् सुखं च स्वभावः चेत् तर्हि यथा चितिः तथा तत् अपि सर्वासु धीवृत्तिषु अनुवर्तेत ।

अर्थः—या चिदात्म्याचा चैतन्याप्रमाणेंच सुख हा जर स्वभाव असेल तर चैतन्याप्रमाणेंच तें सुखही सर्व बुद्धिवृत्तींमध्यें अनुवृत्त होईल. ॥ ७३ ॥

**विवरणः**—चिदात्मा सुखरूप आहे असें ह्मणणें युक्त नव्हे. कारण तो सुखरूप जर असता, तर त्याचें चैतन्य जसें सर्व वृत्तींमध्यें अनुवृत्त होतें, तसेंच सुखही अनुवृत्त झालें असतें. पण तसें कधींच होत नाहीं. कारण, सर्व वृत्तींमध्यें सुखाची जर अनुवृत्ति झाली असती तर दुःखाचा कोणासच प्रत्यय आला नसता. शिवाय चैतन्याप्रमाणें प्रत्येक वृत्तींत त्याची प्रतीति आली असती. ॥ ७३ ॥

या शंकेचें आतां समाधान करितातः–

**मैवमुष्णप्रकाशात्मा दीपस्तस्य प्रभा गृहे ॥**
**व्याप्नोति नोष्णता तद्वच्चितेरेवानुवर्तनम् ॥ ॥ ७४ ॥**

अन्वयः—मा एवम् । दीपः उष्णप्रकाशात्मा अस्ति । तथापि तस्य प्रभा गृहे व्याप्नोति उष्णता तु न । तद्वत् चितेः एव अनुवर्तनम् ।

अर्थः—असें ह्मणूं नको. कारण दीप जरी उष्ण व प्रकाशरूप आहे, तरी त्याची प्रभाच घरांत पसरते, उष्णता कधींच पसरत नाहीं. त्याप्रमाणें आत्म्याचें चैतन्य वृत्तींमध्यें अनुवृत्त होतें, सुख अनुवृत्त होत नाहीं. ॥ ७४ ॥

**विवरणः**—घरांत लाविलेल्या दिव्यामध्यें उष्णता व प्रभा हे दोन्ही धर्म असतात. पण त्यांतील उष्णता दिव्यास सोडून दूर जात नाहीं. प्रभा मात्र सर्व घरभर पसरलेली असते. हा दृष्टांत आहे, आणि याप्रमाणेंच आत्म्याचें चैतन्य मात्र वृत्तींमध्यें अनुवृत्त होतें. सुख अनुवृत्त होत नाहीं. ह्मणजे कोणत्याही पदार्थाचे सर्व धर्म सर्व स्थळीं सारखें कार्य करतीलच, असा कांहीं नियम नाहीं. ॥ ७४ ॥

**वादी**:—पण आत्म्याचा स्वरूपभूत आनंद व चैतन्य यांचें ऐक्य आहे. प्रभा व उष्णतेप्रमाणें ते भिन्न भिन्न धर्म नव्हेत. त्यामुळें चैतन्याबरोबर आनंदाची अनुवृत्ति झालीच पाहिजे. सिद्धांती:–असा कांहीं नियम नाहीं. कारण—

**गंधरूपरसस्पर्शेष्वपि सत्सु यथा पृथक् ॥**
**एकाक्षेणैक एवार्थो गृह्यते नेतरस्तथा ॥ ७५ ॥**

**अन्वयः**—गंधरूपरसस्पर्शेषु सत्सु अपि यथा एकाक्षेण एकः एव अर्थः पृथक् गृह्यते न इतरः तथा चितः एव अनुवर्तनम् ।

अर्थः—गंध, रूप, रस, व स्पर्श हे चारी गुण जरी आम्रादि फळामध्यें असले तरी घ्राणादि एका इंद्रियाच्या योगानें त्यांतील एका गुणाचेंच ग्रहण करितां येतें, दुसऱ्याचें नाहीं. त्याप्रमाणें वृत्तीमध्यें आत्म्याच्या चैतन्याचीच अनुवृत्ति होते, सुखाची होत नाहीं. ॥ ७५ ॥

विवरणः—या श्लोकांचें रहस्य अर्थामध्येंच स्पष्ट झालें आहे. ॥ ७५ ॥

पण हा दृष्टान्त प्रस्तुतप्रसंगीं लागू पडण्यासारखा नाहीं, अशी आतां शंका घेतातः—

**चिदानंदौ नैव भिन्नौ गंधाद्यास्तु विलक्षणाः ॥**
**इति चेत्तद्भेदोपि साक्षिण्यन्यत्र वा वद ॥ ७६ ॥**

अन्वयः—चिदानन्दौ भिन्नौ न एव । गंधाद्याः तु विलक्षणाः इति चेत् तदभेदः अपि साक्षिणि वा अन्यत्र वद ।

अर्थः—चैतन्य व आनंद हीं भिन्न नाहींत पण गंधादिक गुण भिन्न आहेत, असें जर म्हणशील, तर त्यांचा अभेद हा साक्षीच्या ठायीं आहे, कीं अन्य कोठें ? सांग. ॥ ७६ ॥

विवरणः—चैतन्य व आनंद यांचें जसें ऐक्य आहे, तसें गंधादि गुणांचें नाहीं. आणि त्यामुळें तुमचा गंधादिकांचा दृष्टांत बरोबर लागू पडत नाहीं. ही वाद्याची शंका ऐकून सिद्धान्ती त्यास विचारतात, कीं आनंद व चैतन्य यांचें ऐक्य आहे असें जें तूं म्हणतोस तें स्वाभाविक आहे कीं औपाधिक ( उपाधीमुळें होणार ) आहे ? सांग पाहूं. म्हणजे साक्षी जो आत्मा त्याच्या स्वरूपभूत असें तें ऐक्य आहे, कीं वृत्तीमध्यें राहणारें आहे ?

आतां तूं कसेंही म्हटलेंस—म्हणजे तें आत्म्याच्या स्वभावभूत आहे असें किंवा औपाधिक आहे असें जरी म्हटलेंस—तरी आमचा दृष्टांत अगदीं बरोबर आहे. असें आतां सांगतातः—

**आद्ये गंधादयोप्येवमभिन्नाः पुष्पवर्तिनः ॥**
**अक्षभेदेन तद्भेदे वृत्तिभेदात्तयोर्भिदा ॥ ७७ ॥**

अन्वयः—आद्ये पुष्पवर्तिनः गंधादयः अपि एवं अभिन्नाः । अक्षभेदेन तद्भेदे इति वृत्तिभेदात् तयोः भिदा ।

**अर्थः—आतां प्रथम पक्ष जर घेतला तर पुष्पावर राहाणारे गंधादिकही असेच अभिन्न होत. इंद्रियभेदामुळें त्यांचा भेद होतो असें जर म्हटलें तर वृत्तिभेदामुळें चैतन्य व आनंद यांचाही भेद होतो. ॥ ७७ ॥**

विवरण:—चैतन्य व आनंद यांचें ऐक्य आत्म्याच्या स्वभावभूत आहे असें जर म्हटलेंस, तर पुष्पादि पदार्थांवरील गंध, रूप इत्यादि पदार्थांचेंही तसेंच स्वाभाविक ऐक्य असतें असें समज. कारण मालती, गुलाब इत्यादि पुष्पांतील गंध, रूप, रस व स्पर्श भिन्न भिन्न आहेत असें कोणालाही दाखवितां येणार नाहीं. मोगऱ्यांच्या फुलांतील नुस्ता गंधच आण असें जर 'ते भिन्न आहेत' असें मानणाऱ्या तार्किकांस सांगितलें, तर तें अनेक जन्मांतही त्याच्या हातून पडणार नाहीं. आतां, गंधादि गुण पुष्पांशीं जरी ऐक्य पावलेले असले, म्हणजे ते जरी त्याचे स्वाभाविक धर्म असले, व त्यामुळें भिन्न भिन्न नसले तरी घ्राणादि इंद्रियांमुळें त्यांचा जसा औपाधिक भेद भासतो, तसा या आनंदादिकांचा भासत नाहीं; असें जर म्हणशील तर राजस, तामस इत्यादि वृत्तींच्या भेदामुळें आनंद व चैतन्य यांचाही भेद होतो असें आम्ही म्हणतों.

आतां पूर्वोक्त सिद्धांतच स्पष्ट करण्याकरितां सुख व चैतन्य यांचें ऐक्य केव्हां भासतें व सुखाचें अभान केव्हां होतें तें सांगतात—

**सत्त्ववृत्तौ चित्सुखैक्यं तद्वृत्तेर्निर्मलत्वतः ॥**
**रजोवृत्तेस्तु मालिन्यात्सुखांशोत्र तिरस्कृतः ॥ ७८ ॥**

अन्वय:—तद्वृत्तेः सत्ववृत्तौ चित्सुखैक्यं भासते । तु रजोवृत्तेः मालिन्यात् अत्र निर्मलत्वतः सुखांशः तिरस्कृतः भवति ।

**अर्थः—सात्त्विक वृत्ति निर्मल असल्यामुळें तिच्यामध्यें चैतन्य व सुख यांचें ऐक्य भासतें. पण रजोवृत्ती अति मलिन असल्यामुळें तींत सुखाच्या अंशाचा तिरस्कार होतो. ॥ ७८ ॥**

**विवरण:—शुभकर्मामुळें उत्पन्न झालेली सात्त्विक वृत्ति अति निर्मल असल्यामुळें तिच्यामध्यें चैतन्य व आनंद या दोन्ही प्रकारच्या आत्मरूपाचें भान होतें. पण राजस वृत्ति मलिन असल्यामुळें तिच्यामध्यें आनंदाचें भान होत नाहीं. केवल चैतन्याचेंच भान होतें. ॥ ७८ ॥**

आत्मस्वरूपभूत असा आनंद तिरस्कृत कसा होऊं शकेल ? असें कोणी विचारील म्हणून ग्रंथकार दृष्टांतपूर्वक उत्तर देतात–

**तिंतिणीफलमत्यम्लं लवणेन युतं यदा ॥**

**तदाम्लस्य तिरस्कारादीषदम्लं यथा तथा ॥ ७९ ॥**

अन्वयः—तिंतिणीफलं अति अम्लं वर्तते । तत् यदा लवणेन युतं तदा आम्लस्य तिरस्कारात् यथा ईषत् अम्लं भवति तथा आनंदस्य तिरस्कारः भवति ।

अर्थः—चिंच अति आंबट असते. पण तिला मीठ लावलें असतां थोडी आंबट लागते, त्याप्रमाणें आत्म्याच्या आनंदाचा राजस वृत्तींत लोप होतो.७९

विवरणः—मिठाच्या संसर्गामुळें चिंचेच्या आंबटपणाचा जसा बहुतेक लोप होतो, त्याप्रमाणें राजसवृत्तींच्या संसर्गामुळें आत्म्याच्या स्वरूपभूत आनंदाचा प्रायः लोप होतो. ॥ ७९ ॥

पुनः सहेतुक शंका घेतात–

**ननु प्रियतमत्वेन परमानंदतात्मनि ॥**

**विवेक्तुं शक्यतामेवं विना योगेन किं भवेत् ॥ ८० ॥**

अन्वयः—ननु प्रियतमत्वेन आत्मनि परमानंदता विवेक्तुं शक्यतां एवं अपि विना योगेन किं भवेत् ।

अर्थः—अहो, आत्मा अति प्रिय असल्यामुळें त्याच्या ठिकाणच्या परमानंदतेचा विवेक करितां येणें शक्य असेल, पण असें जरी असलें तरी योगावांचून काय होणार. ॥ ८० ॥

विवरणः—तुह्मीं एवढा वेळ सांगितल्याप्रमाणें "आत्मा अति प्रिय असल्यामुळें तो परमानंदरूप आहे" असें विवेकपूर्वक ज्ञान होणें जरी शक्य असलें तरी तें ज्ञान मुक्तीच्या उपयोगीं नाहीं. कारण योगाभ्यासानें आत्मसाक्षात्कार झाल्यावांचून मुक्ति मिळत नाहीं. असा शास्त्रसिद्धांत आहे. असा या शंकेचा तात्पर्यार्थ आहे. ॥ ८० ॥

आतां या शंकेचें समाधान करितातः—

**यद्योगेन तदेवेति वदामो ज्ञानसिद्धये ॥**

**योगः प्रोक्तो विवेकेन ज्ञानं किं नोपजायते ॥ ८१ ॥**

अन्वय:—यत् योगेन तत् एव इति वदामः । यथा ज्ञानसिद्धये योगः प्रोक्तः तथा विवेकेन ज्ञानं न उपजायते किम् ।

अर्थः—जें योगानें होणार तेंच विचारानें असें आह्मी ह्मणतों; जसा ज्ञानसिद्ध्यर्थ योग सांगितलेला आहे, तसेंच विवेकानें ज्ञान नाहीं का होणार ? ८१

विवरणः—योग हा आत्मसाक्षात्कारास कारण आहे हें खरें, पण त्यामुळें विवेक हा आत्मसाक्षात्कारास कारण होतच नाहीं असें ह्मणणें सयुक्तिक नव्हे. अर्थात् पूर्व श्लोकांत योगावांचून नुस्त्या विवेकानें काय होणार ? असा जो प्रश्न केला होता, त्याचें उत्तर असें कीं जें फल योगामुळें मिळण्यासारखें आहे, तेंच विवेकामुळेंही मिळतें. ८१

आतां याविषयीं प्रमाण देतातः—

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ॥
इति स्मृतं फलैकत्वं योगिनां च विवेकिनाम् ॥ ८२ ॥

अन्वय:—यत् स्थानं सांख्यैः प्राप्यते तत् योगैः अपि गम्यते । इति योगिनां विवेकिनां च फलैकत्वं स्मृतम् ।

अर्थः—जें स्थान आत्मानात्मविवेक्यास प्राप्त होतें, तेंच योग्याकडूनही मिळाविलें जातें. असें योगी व विवेकी यांस एकच फल सांगितलें आहे. ॥८२॥

विवरण:—भगवद्गीतेच्या पांचव्या अध्यायांत या श्लोकाचा पूर्वार्ध आहे. व योगी व विवेकी यांस एकच फल मिळतें, असा त्याचा सर्वसंमत अर्थ आहे. गीतेच्या अद्वैतपंथी टीकाकारांनीं योग ह्मणजे निष्काम कर्म व सांख्य ह्मणजे विवेक असा अर्थ केला आहे. पण प्रस्तुत स्थळीं योग शब्दाचा चित्तवृत्तिनिरोधरूप पातंजल योग असा जरी अर्थ केला, तरी तो आह्मांस इष्टच आहे, असें सुचविलें आहे.

असें जर आहे, तर ईश्वरानें विवेक व योग अशीं मुक्तीचीं दोन साधनें कां सांगितलीं, असें कोणी ह्मणेल ह्मणून सांगतातः—

असाध्यः कस्यचिद्योगः कस्य चिज्ज्ञाननिश्चयः ॥
इत्थं विचार्य मार्गौ द्वौ जगाद परमेश्वरः ॥ ८३ ॥

अन्वयः—कस्यचित् योगः असाध्यः कस्यचित् ज्ञाननिश्चयः असाध्यः इत्थं विचार्य परमेश्वरः द्वौ मार्गौ जगाद ।

अर्थः—कोणास योग असाध्य आहे तर कोणास ज्ञानाचा निश्चय असाध्य आहे. असा विचार करून परमेश्वर दोन मार्ग सांगता झाला. ॥ ८३ ॥

विवरणः—प्रस्तुत वाक्य योगवासिष्ठांतील आहे. सर्व प्राणी सारखे अधिकारी नसतात. कोणास योग साध्य होण्यासारखा असतो व कोणास विवेकद्वारा ज्ञानच त्वरित संपादन करितां येतें. ही सत्य स्थिति लक्षांत आणूनच ईश्वरानें योग व विवेक हे दोन्ही उपाय अधिकारानुरूप सांगितले आहेत. खरें पाहिलें असतां हे उपाय सामान्य ज्ञान्याच्या कांहीं उपयोगी नाहींत. पण हें प्रकरणच विशिष्ट अधिकाऱ्यांकरितां असल्यामुळें त्यांच्या करितां सांगितलेल्या उपायांचाच येथें विचार केला आहे, असें समजावें. ॥ ८३ ॥

वादीः—पण ज्या अर्थीं सहज होणाऱ्या विवेकाहून योग किती तरी पटीनें अधिक त्रास सोसल्यावरच साध्य होण्यासारखा आहे, त्या अर्थीं त्यामध्यें कांहीं तरी अतिशय असला पाहिजे ! सिद्धान्तीः—गोष्ट खरी आहे, पण—

योगे कोतिशयस्तेऽत्र ज्ञानमुक्तं समं द्वयोः ॥
रागद्वेषाद्यभावश्च तुल्यो योगिविवेकिनोः ॥ ८४ ॥

अन्वयः—ते योगे 'कः अतिशयः'। अत्र योगिविवेकिनोः द्वयोः ज्ञानं समं उक्तं च रागद्वेषाद्यभावः तुल्यः ।

अर्थः—तुझ्या समजुतीनें तरी योगामध्यें कोणता अतिशय आहे ? या स्थळीं योगी व विवेकी या उभयतांसही सारखें फळ सांगितलें आहे. व रागद्वेषादिकाचा अभावही सारखाच आहे. ॥ ८४ ॥

विवरणः—यासंबंधानें आमचें ह्मणणें आहे तें तूर्त असूं दे. पण तुझ्या मताप्रमाणें तरी तूं योगामध्यें कोणता अतिशय पाहातोस ? आह्मांस वाटतें तुला याचें उत्तर देतां येणार नाहीं. कारण 'यत् सांख्यैः' इत्यादि ८२ व्या श्लोकांत आह्मी विवेकी व योगी यांना ज्ञानरूपी लाभ सारखाच होतो असें सांगितलें आहे. शिवाय राग, द्वेष, लोभ, इत्यादि ज्ञानप्रतिबंधक दोष दोघांसही सारखेच अनिष्ट आहेत. सारांश, अति आयासानें प्राप्त होणाऱ्या योगामध्यें आह्मांला तर कांहीं अतिशय दिसत नाहीं. अतिशय ह्मणजे अधिकता. ॥ ८४ ॥

आतां विवेकी पुरुषास रागादिक कसे नसतात तें सांगतात:—

**न प्रीतिर्विषयेष्वस्ति प्रेयानात्मेति जानतः ॥**

**कुतो रागः कुतो द्वेषः प्रातिकूल्यमपश्यतः ॥ ८५ ॥**

**अन्वय:**—आत्मा प्रेयान् इति जानतः विषयेषु प्रीतिः न अस्ति कुतः रागः प्रातिकूल्यं अपश्यतः च कुतः द्वेषः।

**अर्थ:**—आत्मा अति प्रिय आहे असें निश्चयपूर्वक जाणणाऱ्याची विषयांच्या ठायीं प्रीति नसते. तेव्हां प्रीति कोठून असणार व प्रातिकूलता न पाहणाऱ्या पुरुषास द्वेष कोठून असणार. ॥ ८५ ॥

**विवरण:**—विवेकी पुरुष साक्षी कूटस्थच अति प्रिय आहे असें जाणत असतो. त्यामुळें अनात्मरूप विषय त्याला प्रिय वाटत नाहींत. विषय प्रिय न वाटल्यावर त्यांच्याविषयीं प्रीति कशी असणार? तसेंच अमुक एक पदार्थ आपणांस प्रतिकूल आहे असें वाटल्यावरच त्याच्याविषयीं द्वेष वाटत असतो. पण या विवेक्यानें सर्वत्र आत्म्याचें अनुसंधान केल्यामुळें त्याला प्रतिकूल असें कांहींच वाटत नाहीं ह्मणून त्याचा कोणाशीं द्वेषही नसतो. ॥ ८५ ॥

**वादी:**—देहादिकांस कोणी पीडा देऊं लागल्यास त्याच्याविषयीं विवेक्याच्या मनांतही द्वेष उद्भवतो. सिद्धान्ती:—

**देहादेः प्रतिकूलेषु द्वेषस्तुल्यो द्वयोरपि ॥**

**द्वेषं कुर्वन्न योगी चेदविवेक्यपि तादृशः ॥ ८६ ॥**

**अन्वय:**—द्वयोः अपि देहादेः प्रतिकूलेषु द्वेषः तुल्यः। द्वेषं कुर्वन् योगी न इति चेत् तादृशः अविवेकी अपि।

**अर्थ:**—दोघांचाही देहादि प्रतिकूल पदार्थांविषयीं द्वेष सारखाच असतो. द्वेष करणारा योगीच नव्हे, असें जर ह्मणशील, तर द्वेष करणारा विवेकीही नव्हे.

**विवरण:**—कोणी योगी असो किंवा विवेकी असो, देहाला पीडा करणाऱ्या प्राण्याविषयीं त्याच्या मनांत द्वेष वाटणारच. विंचू, सर्प इत्यादि प्राण्यांचा विवेकीच द्वेष करितो व योगी करीत नाहीं, असें नाहीं. आतां असा जो द्वेषी आहे तो खरा योगीच नव्हे, असें जर ह्मणशील तर द्वेष करणाराही विवेकी नव्हे.' असें समज. ॥ ८६ ॥

आतां विवेक्यास जसें द्वैताचें भान होत असतें, तसें योग्यास होत नाहीं. त्यामुळें विवेक्यासच द्वेष होणें संभवनीय आहे. असें जर ह्मणशील, तर तेंही बरोबर नाहीं. कारण—

**द्वैतस्य प्रतिभानं तु व्यवहारे द्वयोः समम् ॥**
**समाधौ नेति चेत्तद्वदाद्वैतत्त्वविवेकिनः ॥ ८७ ॥**

अन्वयः—व्यवहारे तु द्वैतस्य प्रतिभानं द्वयोः समम् । समाधौ न इति चेत् तद्वत् अद्वैतत्त्वविवेकिनः अपि न ।

अर्थः—व्यवहार कालीं तर द्वैताचें प्रतिभान दोघांसही सारखेंच. योग्यास समाधीमध्यें द्वैत भासत नाहीं, असें जर ह्मणशील तर त्याचप्रमाणें अद्वैतत्त्वाच्या विवेक्यासही तें भासत नाहीं. ॥ ८७ ॥

विवरणः—व्यवहारकालीं विवेकी व योगी या दोघांसही द्वैताचें भान, त्यांची इच्छा नसली तरी, होणारच! आतां समाधीमध्यें असलेल्या योग्यास तें होत नाहीं असं जर ह्मणशील, तर अद्वैत हेंच परम तत्त्व आहे, असें श्रुतियुक्तींच्या आश्रयानें विवेचन करणाऱ्या विवेक्यासही त्या वेळीं द्वैत भासत नाहीं. त्यामुळें योग्याप्रमाणें त्याचाही त्या वेळीं कोणाशीं द्वेष राहात नाहीं. ॥ ८७ ॥

विवेचनसमयीं विवेक्यास द्वैतभान कसें होत नाहीं, हें आह्मी पुढच्या प्रकरणांत स्पष्ट करणार आहों, असें सांगतातः—

**विवक्ष्यते तदस्माभिरद्वैतानंदनामके ॥**
**अध्याये हि तृतीयेतः सर्वमप्यतिमंगलम् ॥ ८८ ॥**

अन्वयः—तत् अस्माभिः अद्वैतानंदनामके तृतीये अध्याये विवक्ष्यते । अतः सर्वं अपि अति मंगलम् ।

अर्थः—तें आह्मी अद्वैतानन्द नामक तृतीय अध्यायांत सांगणार आहों, त्यामुळें सर्वही अतिमंगलरूप होईल. ॥ ८८ ॥

विवरणः—'अतः सर्वं' इत्यादि श्लोकांशानें या प्रकरणाचा उपसंहार केला आहे.

आतां 'द्वैताचें भान होत नसून ज्याला आत्मसाक्षात्कार होतो, तो योगीच होय'. असें जर ह्मणत असशील तर तेंही आह्मांस इष्टच आहे. आह्मी केवळ शब्दाकरितां भांडत बसत नाहीं. असें आतां सांगतातः—

सदा पश्यन्निजानंदमपश्यन्निखिलं जगत् ॥
अर्थाद्योगीति चेत्तर्हि संतुष्टो वर्धतां भवान् ॥ ८९ ॥

अन्वयः—निजानंदं सदा पश्यन् च अखिलं जगत् अपश्यन् अर्थात् योगी इति चेत् तर्हि भवान् संतुष्टः सन् वर्धताम् ।

अर्थः—आत्मानंदाचा सदा अनुभव घेणारा व सर्व जगास न पाहणारा अर्थात् योगीच होय, असें जर ह्मणत असशील, तर तूं संतुष्ट होऊन वृद्धी-प्रत प्राप्त हो. ॥ ८९ ॥

विवरणः—ह्मणजे अद्वैतानंदाचा अनुभव घेणारा व जगास मिथ्या समजणारा असा जो कोणी असेल तो योगीच होय, असें जर तुझें ह्मणणें असेल तर तें आह्मांस इष्ट आहे. तुझें कल्याण होवो; तूं तसें खुशाल मान. ॥ ८९ ॥

आतां या दुसऱ्या अध्यायाचें संक्षेपतः तात्पर्य सांगतातः–

ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे मंदानुग्रहसिद्धये ॥
द्वितीयाध्याय एतस्मिन्नात्मानंदो विवेचितः ॥ ९० ॥

अन्वयः—ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे एतस्मिन् द्वितीयाध्याये मंदानुग्रहसिद्धये आत्मानंदः विवेचितः ।

अर्थः—ब्रह्मानन्द संज्ञक ग्रंथांतील या दुसऱ्या अध्यायांत मंदाधिकाऱ्यांवर अनुग्रह करण्याकरितां आत्मानंदाचें विवेचन केलें. ॥ ९० ॥

विवरणः—पंचदशीच्या या शेवटच्या पांच प्रकरणांस ब्रह्मानंद असें नांव आहे. व त्यांत पांच अध्याय आहेत. त्यांतील हा आत्मानंद संज्ञक दुसरा अध्याय येथें संपूर्ण झाला. मंद अधिकाऱ्यांस आत्मानंदाची प्राप्ति व्हावी हा या प्रकरणाचा उद्देश आहे; अद्वैतवादी कांहीं तरी सांगतात, असें जें कित्येकांस वाटत असतें व त्यामुळें अद्वैतशास्त्राविषयीं कित्येकांची जी अश्रद्धा होत असते, तिचा या प्रकरणांत निरास केला आहे. ॥ ९० ॥

ह्याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या आत्मानंदाख्य बाराव्या प्रकरणाचें श्रीमच्छंकराचार्य भक्त विष्णु वामन बापटकृत सान्वयार्थ मराठी विवरण समाप्त झालें. ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# ब्रह्मानन्दे अद्वैतानन्दः ।

ब्रह्मानन्द, विद्यानंद व विषयानंद असा आनंद तीन प्रकारचा आहे, असें अकराव्या प्रकरणांत सांगितलें आहे. पण त्याच्या पुढच्याच प्रकरणांकडे जों पहावें तों आत्मानंदसंज्ञक निराळ्याच एका आनंदाचें त्यांत प्रतिपादन केलेलें आढळतें. आणि त्यामुळें पूर्वापरविरोधाचा आभास होतो, असें कोणी ह्मणेल, ह्मणून ग्रंथकार सांगतातः-

**योगानंदः पुरोक्तो यः स आत्मानंद इष्यताम् ॥**
**कथं ब्रह्मत्वमेतस्य सद्वयस्येति चेच्छृणु ॥ १ ॥**

अन्वयः—यः योगानन्दः पुरा उक्तः स आत्मानन्दः इष्यताम् । सद्वयस्य एतस्य ब्रह्मत्वं कथं इति चेत् शृणु ।

अर्थः—जो योगानन्द ह्मणून पूर्वी सांगितलेला आहे, तोच आत्मानंद होय, असें समजावें. आतां द्वैतयुक्त अशा या आत्मानंदास ब्रह्मत्व कसें ? असें जर विचारशील तें सांगतों; ऐक. ॥ १ ॥

विवरणः—ब्रह्मानन्द या शद्बानें ज्याचा उल्लेख केला आहे तोच योगानंद होय. चित्ताच्या एकाग्रतेमुळें होणाऱ्या आत्मसाक्षात्काराशीं त्याचा संबंध असल्यामुळें त्यास योगानंद असें ह्मटलें आहे. प्रस्तुत योगरूपी उपाधिही ज्याला नसते त्याला निजानंद ह्मणण्याचा परिपाठ आहे. अर्थात् या संज्ञा जशा कांहीं निमित्तानें भिन्न झाल्या आहेत, त्याचप्रमाणें आत्मानंद ही संज्ञाही नैमित्तिक किंवा औपाधिक आहे असें समजावें. ह्मणजे वस्तुतः हे आनंद भिन्न नाहींत.

शंकाः—पण सजातीय पुत्रभार्यादिरूप गौण आत्मे; देहादि मिथ्या आत्मे व आकाशादि विजातीय पदार्थ ह्यांहून भिन्न असलेल्या व त्यामुळेंच सद्वितीय अशी या आत्मानंदास ब्रह्मत्व आहे असें कसें ह्मणतां येईल ? समाधानः—या तुझ्या शंकेचें सप्रमाण उत्तर देतों, तें ऐक.

**आकाशादिस्वदेहांतं तैत्तिरीयश्रुतीरितम् ॥**
**जगन्नास्त्यन्यदानंदादद्वैतब्रह्मता ततः ॥ २ ॥**

अन्वयः—तैत्तिरीयश्रुतीरितं आकाशादिस्वदेहान्तं जगत् आनंदात् अन्यत् न अस्ति । ततः तस्य अद्वैतब्रह्मता ।

अर्थः—तैत्तिरीय श्रुतीनें आकाशापासून आपल्या देहापर्यंत सांगितलेलें जगत् आनंदाहून पृथक् नाहीं. तस्मात् या आत्मानंदास अद्वितीय ब्रह्मरूपता आहेच. ॥ २ ॥

विवरण:—'त्या ह्या सत्य, ज्ञान व आनंदरूप आत्म्यापासून आकाश झालें; आकाशापासून वायु झाला; वायूपासून तेज झालें; तेजापासून उदक झालें; उदकापासून पृथ्वी झाली; पृथ्वीमध्यें औषधी झाल्या; औषधींपसून अन्न झालें; अन्नापासून शरीर झालें; असें तैत्तिरीय-ब्रह्मविदेमध्यें वर्णन आहे. त्यावरून हें सर्व जग आनदरूपच आहे, त्याच्याहून मुळीं भिन्न नाहीं, असें ठरतें. तस्मात् या आत्मानंदास अद्वैतब्रह्मता आहे. ह्मणजे हा आत्मानंद अद्वैतब्रह्मरूपच आहे, यांत कांहीं शंका नाहीं. ॥ २ ॥

वादी:—अहो पण तुह्मी ज्या श्रुतीचा येथें उल्लेख करीत आहां, ती श्रुति तर आकाशादि देहान्तसृष्टि आत्म्यापासून झाली असें सांगत आहे. तिनें आनंदाचा एका अक्षरानेंही उल्लेख केलेला नाहीं. सिद्धांती:—

आनंदादेव तज्जातं तिष्ठत्यानंद एव तत् ॥
आनंद एव लीनं चेत्युक्तानंदात्कथं पृथक् ॥ ३ ॥

अन्वयः—तत् आनंदात् एव जातम् । तत् आनंदे एव तिष्ठति । च आनंदे एव लीनं इति उक्तानंदात् कथं पृथक् ।

अर्थः—तें आनंदापासूनच उत्पन्न झालें, तें आनंदामध्येंच राहातें व आनंदामध्यें लीन होतें. अशा प्रकारें सांगितलेल्या आनंदाहून जग भिन्न कसें राहूं शकेल ? ॥ ३ ॥

विवरण:—वर ज्या श्रुतिवाक्याचा उल्लेख केला आहे, त्यांत जरी आनंदापासून हें सर्व झालें असें म्हटलेलें नसलें तरी पुढच्या भृगुवल्लींत तसा स्पष्ट उल्लेख केलेला आहे. त्यावरून आनंद व आत्मा हे भिन्न पदार्थ नसून एकाच तत्त्वाचीं हीं भिन्न नांवें आहेत, असें होतें. ॥ ३ ॥

वादी:—पण अशा प्रकारची श्रुति जरी असली तरी तिच्यावरून आनंद व जग यांचें ऐक्य आहे असें ठरत नाहीं. कारण [illegible]

त्याच्याहून भिन्न असतो तसेंच आनंदापासून उत्पन्न झालेलें जगही आनंदाहून भिन्न राहूं शकेल! सिद्धान्ती:—

**कुलालाद्घट उत्पन्नो भिन्नश्चेति न शंक्यताम् ॥**
**मृद्वदेष उपादानं निमित्तं न कुलालवत् ॥ ४ ॥**

अन्वयः—कुलालात् घटः उत्पन्नः भिन्नः च इति न शंक्यताम् । मृद्वत् एषः उपादानम् । कुलालवत् न निमित्तम् ।

अर्थः—कुंभारापासून घट उत्पन्न झाला व पण तो त्याच्याहून भिन्न आहे, अशी शंका घेऊं नये. कारण मृत्तिकेप्रमाणें हा आनंद उपादान कारण आहे. कुंभाराप्रमाणें निमित्त कारण नव्हे. ॥ ४ ॥

विवरण:—कुंभाराप्रमाणें हा आनंद जर जगाचा कर्ता असता तर प्रस्तुत शंका बरोबर झाली असती. पण खरा प्रकार तसा नाहीं. म्हणजे हा आनंद जगाचें उपादान कारण आहे. कोणतेंही कार्य उपादान कारणाहून पृथक् राहूंच शकत नाहीं, म्हणून जग हें आनंदाहून पृथक् आहे, असेंही म्हणतां येणार नाहीं. ॥ ४ ॥

पण कुलालच घटादिकांचें उपादान कारण आहे व मृत्तिका निमित्त कारण आहे असें म्हटल्यास कोणता प्रत्यवाय येणार आहे ? या आडाणी शंकेचें आतां निराकरण करितात:—

**स्थितिर्लयश्च कुंभस्य कुलाले स्तो न हि क्वचित् ॥**
**दृष्टौ तौ मृदि तद्वत्स्यादुपादानं तयोः श्रुतेः ॥ ५ ॥**

अन्वय:—कुंभस्य स्थितिः च लयः कुलाले क्वचित् न स्तः । तौ हि मृदि दृष्टौ । तद्वत् श्रुतेः आनंदः जगतः तयोः उपादानं स्यात् ।

अर्थः—कुंभाची स्थिति व लय कुलालामध्यें होतात, असें कोठेंही आढळत नाहीं. ते तर मृत्तिकेमध्यें होत असल्याचें दिसतें. त्याचप्रमाणें श्रुत्युक्त आनंद, जगाच्या स्थितिलयांचें कारण ठरतो. ॥ ५ ॥

विवरण:—कार्यांची उत्पत्ति, स्थिति व लय हीं ज्याच्या योगानें होतात व ज्याच्यामध्यें होतात, तें त्याचें उपादान कारण होय. या नियमावरून मातीच्या घटाचें उपादान कारण मृत्तिकाच आहे, कुलाल नव्हे, असा निश्चय करितां येतो. कारण उत्पत्ति,

स्थिति व लय या तिन्ही कालीं मृत्तिकेस घट सोडून राहूं शकत नाहीं. कुंभारास सोडून राहूं शकतो; ह्मणजे स्थिति व लय या अवस्थेंत त्याला कुंभाराची कांहीं गरज नसते. याप्रमाणें श्रुति माउली स्पष्टपणें सांगत असल्यामुळें स्थिति व लय या दोन्ही कालीं जग आनंदामध्यें राहात असतें, असा निश्चय होतो व त्यावरून तोच जगाचें उपादान कारण ठरतो. ॥ ५ ॥

उपादानाचे तीन भेद आहेत. त्यांतील दोन प्रस्तुत स्थळीं निरुपयोगी आहेत असें सांगतातः—

**उपादानं त्रिधा भिन्नं विवर्ति परिणामि च ॥**
**आरंभकं च तत्रांत्यौ न निरंशेऽवकाशिनौ ॥ ६ ॥**

**अन्वयः**—विवर्ति, परिणामि, च आरंभकं इति उपादानं त्रिधा भिन्नं अस्ति । तत्र अन्त्यौ भेदौ निरंशे अवकाशिनौ न स्तः ।

**अर्थः**—विवर्ति, परिणामी व आरंभक असें उपादान तीन प्रकारें भिन्न असतें. पण त्यांतील शेवटच्या दोन भेदांस निरंश आनंदाच्या ठायीं अवकाश मिळत नाहीं. ॥ ६ ॥

**विवरणः**—मायावादी वेदान्त्यांस विवर्तवाद इष्ट आहे. यास्तव सांख्यांस मान्य असलेल्या परिणाम वादास व नैय्यायिकांस इष्ट असलेल्यां आरंभवादास दोष देण्याकरितां प्रथमतः उपादानाचे किती भेद आहेत तें येथें सांगितलें आहे. विवर्तो-पादान, परिणामोपादान, आरंभोपादान असें उपादानकारण तीन प्रकारचें आहे. पण अंशशून्य आत्म्याच्या ठायीं आरंभ व परिणाम यांचा कांहीं उपयोग होत नाहीं. ॥ ६ ॥

कारणः—

**आरंभवादिनोन्यस्मादन्यस्योत्पत्तिमूचिरे ॥**
**तंतोः पटस्य निष्पत्तेर्भिन्नौ तंतुपटौ खलु ॥ ७ ॥**

**अन्वयः**—तंतोः पटस्य निष्पत्तेः आरंभवादिनः अन्यस्मात् अन्यस्य उत्पत्तिं ऊचिरे । तंतुपटौ भिन्नौ खलु ।

अर्थः—तंतूपासून पटाची निष्पत्ति होत असल्यामुळें आरंभवादी अन्य पदार्थांपासून अन्य पदार्थांची उत्पत्ति सांगते झाले. तंतू व पट हीं भिन्न आहेत हें तर प्रसिद्ध आहे ॥ ७ ॥

विवरणः—वैशेषिक, नैय्यायिक इत्यादि तार्किक आरंभवादी आहेत. ते तंतु, मृत्तिका इत्यादि अन्य पदार्थांपासून वस्त्र, घडा इत्यादि अन्य पदार्थांची उत्पत्ति होते, असें सांगतात. व त्यांना तसें ह्मणण्यास सबल कारणही आहे. तंतूपासून वस्त्र होतें व तंतु आणि वस्त्र हे भिन्न भिन्न पदार्थ आहेत हें प्रसिद्ध आहे. ॥ ७ ॥

तसेंचः—

अवस्थांतरतापत्तिरेकस्य परिणामिता ॥
स्यात्क्षीरं दधि मृत्कुंभः सुवर्णं कुंडलं यथा ॥ ८ ॥

अन्वयः—एकस्य अवस्थांतरतापत्तिः परिणामिता । यथा क्षीरं दधि, मृत् कुंभः, च सुवर्णं कुंडलं स्यात् ।

अर्थः—एका पदार्थाचें अवस्थांतर होणें, हीच परिणामिता होय. जसें दूध, दहीं; मृतिका, घडा; व सुवर्ण कुंडल होतें. ॥ ८ ॥

विवरणः—दुधाचें दहीं होणें, मृत्तिकेची घागर होणें, सुवर्णाचा अलंकार होणें, बीजाचा वृक्ष होणें इत्यादि हे सर्व परिणाम होत. पदार्थाचें एक स्वरूप जाऊन त्यास दुसरें प्राप्त होणें, हेंच परिणामाचें लक्षण आहे. ॥ ८ ॥

आतां, विवर्तवादाचें लक्षण सांगतातः—

अवस्थांतरभानं तु विवर्तो रज्जुसर्पवत् ॥
निरंशेऽप्यस्त्यसौ व्योम्नि तलमालिन्यकल्पनात् ॥ ९ ॥

अन्वयः—रज्जुसर्पवत् अवस्थांतरभानं तु विवर्तः । व्योम्नि तलमालिन्यकल्पनात् असौ निरंशे अपि अस्ति ।

अर्थः—रज्जूच्या ठायीं जसा सर्प भासतो, त्याप्रमाणें पदार्थावर एकाद्या निराळ्याच अवस्थेचें भान होणें, हा विवर्त होय. आकाशाचे ठायीं त्याला तल असून तो मलिन आहे अशी कल्पना होत असल्यामुळें हा विवर्त निरंश पदार्थाचे ठायींही होतो. ॥ ९ ॥

**विवरण:**—पदार्थ एक असतांना तो भलताच भासणें हें विवर्ताचें लक्षण होय. ह्मणजे एकाद्याच्या पुढें दोरी पडलेली असतांना तो सर्प आहे असा भ्रम होणें हाच विवर्त होय. आतां हा विवर्तवाद तरी निरंश पदार्थाच्या ठायीं सावकाश कसा होईल? असें कोणी विचारील ह्मणून ग्रंथकार ह्मणतात—आकाश अंशरहित ( अवयवशून्य ) असतांनाही त्याचा तळ लाल आहे, निळा आहे, करडा आहे, पांढरा आहे. इत्यादि प्रकारं भ्रम होत असल्याचें दिसतें. तसाच निरंश आत्म्याच्या ठायींही जगाचा भ्रम होऊं शकतो. ॥ ९ ॥

तात्पर्य:—

**ततो निरंश आनंदे विवर्तो जगदिष्यताम् ॥**
**मायाशक्तिः कल्पिका स्यादैंद्रजालिकशक्तिवत् ॥ १० ॥**

**अन्वय:**—ततः जगत् निरंशे आनंदे विवर्तः इष्यताम् । ऐंद्रजालिकशक्तिवत् मायाशक्तिः कल्पिका स्यात् ।

**अर्थ:**—असा प्रकार असल्यामुळें जग अंशरहित आनंदाच्या ठायीं कल्पित आहे, असें समजावें. गारुड्याच्या शक्तीप्रमाणें ईश्वराची मायाशक्ति कल्पना करणारी होय. ॥ १० ॥

**विवरण:**—पूर्व श्लोकांत आकाशाचा दृष्टांत देऊन अवयवरहित पदार्थावरही भ्रम होतो हें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें या निरंश आनंदावर या स्थावरजंगमरूप सृष्टीची कल्पना झालेली आहे. ह्मणजे रज्जुरूप अधिष्ठानावर जशी सर्पाची कल्पना व्हावी तसाच हा सर्व प्रकार आहे, असें समजावें. गारुड्याची शक्ति जशी विलक्षण रचना करितें, त्याचप्रमाणें ईश्वराची शक्ति या विचित्र सृष्टीस निर्माण करिते. ॥ १० ॥

**वादी:**—अहो पण आत्म्याहून भिन्न अशा या मायाशक्तीचा अंगीकार केल्यास तुमच्या अद्वैताची हानि नाहीं का होणार ? सिद्धान्ती:—

**शक्तिः शक्तात्पृथङ्नास्ति तद्वद्दृष्टेर्न चाभिदा ॥**
**प्रतिबंधस्य दृष्टत्वाच्छक्त्यभावे तु कस्य सः ॥ ११ ॥**

**अन्वय:**—शक्तिः शक्तात् पृथक् न अस्ति । कुतः । तद्वत् दृष्टेः । प्रतिबंधस्य दृष्टत्वात् अभिदा अपि न अस्ति । शक्त्यभावे तु सः कस्य ।

अर्थः—शक्ति शक्तिमान् पदार्थाहून भिन्न नसते. कशावरून ? ह्मणून ह्मणशील तर भिन्न नसल्याचा प्रत्यय येत असल्यामुळें—असें आम्ही कारण सांगतों. त्याचप्रमाणें तिच्या कार्यास प्रतिबंध होत असल्याचें दिसत असल्यामुळें ती पदार्थाशीं अभिन्नही नाहीं. बरें शक्ति मुळीं नाहींच असें जर म्हणावें, तर प्रत्ययास येणारा प्रतिबंध कोणास होतो ? ॥ ११ ॥

विवरण:—शक्ति व शक्तिमान् हे वस्तुत: भिन्न पदार्थ नसतात. कारण ते भिन्न भिन्न आहेत असा साक्षात् प्रत्यय येत नाहीं. उदाहरणार्थ आपण अग्नि व त्याची दाहशक्ति घेऊं. अग्नीहून दाहशक्ति भिन्न आहे, असा कधींच अनुभव येत नाहीं. बरें तर, ती पदार्थरूप असते असेंच समजा; असें जर ह्मणशील, तर तसेंही करितां येत नाहीं; कारण द्रव्य प्रत्यक्ष दिसतांनाही त्याची शक्ति कांहीं उपायांनीं हटवितां येते. अग्नीची दाहशक्ति मणि, मंत्र, औषधि यांच्या योगानें कशी हटते, हें सर्वप्रसिद्ध आहे. ह्मणजे अग्नि एकसारखा जळत असतांनाही पायांस कांहीं औषधी लावून लोक त्यांतून चालतात. त्यांना अग्नीपासून कोणत्याही प्रकारची इजा होत नाहीं. शक्ति जर अग्निरूपच असती, तर ती त्याच्या बरोबरच राहाती व तिनें आपलें कार्यही केलें असतें. पण तसें होत नाहीं. त्यामुळें शक्ति पदार्थरूपच आहे, असें ह्मणतां येत नाहीं. पण असल्या या शक्तीचा स्वीकार करून तरी लाभ कोणता ? असें कोणी विचारील ह्मणन ग्रंथकार ह्मणतात, शक्तीचाच जर अंगीकार न केला, तर प्रतिबंध कोणास होतो? ह्मणजे उपायाची योजना केली असतां कार्य होत नाहीं, असें जें आढळतें तें कां? उपायाचा परिणाम कोणावर झाला ? पदार्थ तर जशाचा तसाच समोर आहे. कार्य मात्र होत नाहीं. ॥ ११ ॥

वादी:—तुम्ही ह्मणतां तशी जरी अडचण असली तरी कोणत्याही इंद्रियास गोचर होणाऱ्या शक्तीसच प्रतिबंध होतो, हें कशावरून ? सिद्धांती—

शक्तेः कार्यानुमेयत्वादकार्ये प्रतिबंधनम् ॥
ज्वलतोऽग्नेरदाहे स्यान्मंत्रादिप्रतिबंधता ॥१२ ॥

अन्वयः—शक्तेः कार्यानुमेयत्वात् अकार्ये प्रतिबंधनं अवगम्यते । ज्वलतः अग्नेः अदाहे मंत्रादिप्रतिबंधता स्यात् ।

**अर्थ:**—शक्ति कार्यावरून जाणतां येण्यासारखी आहे. अर्थात् कार्य न झाल्यास त्याच्या प्रतिबंधाचें ज्ञान होतें. जळणाऱ्या अग्नीपासून दाह न झाल्यास मंत्रादिप्रतिबंधतेची कल्पना होते. ॥ १२ ॥

**विवरण:**—पदार्थाची शक्ति अतींद्रिय असते हें खरें; पण तिचें कार्यावरून अनुमान होतें. कारण असतांनाही कार्य होत नाहीं असें आढळल्यास त्यास कांहीं तरी प्रतिबंध होत असावा, अशी सहजच कल्पना होते. याविषयीं अग्नीचाच दृष्टांत घेऊन पहा. अग्नि चांगला पेटलेला असूनही त्यांतून चालणाऱ्या लोकांस तो भाजीत नसल्यास त्याची शक्ति मंत्रादि उपायांनीं प्रतिबद्ध झालेली असावी, असें कोणीही समजेल. अर्थात् शक्ति जरी अतींद्रिय असली, तरी तिच्याविषयीं कार्यावरून अनुमान होतें. ॥ १२ ॥

याप्रमाणें सामान्यत: शक्तीविषयीं प्रतिपादन करून, आतां श्रुतीनें या ईशशक्तीचें कसें वर्णन केलें आहे तें सांगतात:—

**देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढां मुनयोऽविदन् ॥**
**परास्य शक्तिर्विविधा क्रियाज्ञानबलात्मिका ॥ १३ ॥**

**अन्वय:**—मुनयः देवात्मशक्तिं स्वगुणैः निगूढां अविदन् । अस्य परा शक्तिः विविधा क्रियाज्ञानबलात्मिका श्रूयते ।

**अर्थः**—मुनि हे सूक्ष्मस्थूलशरीररूप आपल्या गुणांनीं गुप्त होऊन राहिलेल्या देवाच्या आत्मशक्तीस साक्षात् जाणते झाले. या ब्रह्माची उत्कृष्ट शक्ति विविध म्हणजे क्रिया, ज्ञान व बलरूप आहे असें वर्णन केलेलें आहे. ॥ १३ ॥

**विवरण:**—जगाचें कारण काळ आहे, परमाणु आहेत, प्रकृति आहे, स्वभाव आहे, इत्यादि वादांमध्यें दोष आहेत असें जाणणारे मुनीश्वर जगाचें खरें कारण काय आहे, हें जाणण्याच्या इच्छेनें ध्यानयोगामध्यें निमग्न होऊन जेव्हां पाहूं लागले, तेव्हां त्यांस स्वप्रकाशचिदात्म्याची मायारूप शक्ति आपल्या स्थूलसूक्ष्मशरीररूप गुणांमध्यें गुप्त होऊन राहिलेली आहे, असें दिसलें. म्हणजे त्यांस तिचा साक्षात्कार झाला. त्याचप्रमाणें या ब्रह्माची अति उत्तम शक्ति, क्रिया, ज्ञान, बल इत्यादि रूपांनीं अनेक प्रकारची आहे. या श्लोकाच्या दोन अर्धीत श्वेताश्वतरोपनिषदांतील दोन वाक्यांचा निर्देश केला आहे. ॥ १३ ॥

तात्पर्यः—

**इति वेदवचः प्राह वसिष्ठश्च तथाऽब्रवीत् ॥**
**सर्वशक्ति परं ब्रह्म नित्यमापूर्णमद्वयम् ॥ १४ ॥**

**अन्वयः**—इति वेदवचः प्राह । च वसिष्ठः तथा अब्रवीत् । सर्वशक्ति नित्यं आपूर्णं अद्वयम् परं ब्रह्म अस्ति ।

**अर्थः—अशा रीतीनें वेदवचन सांगत आहे. व वसिष्ठ मुनींनींही तसेंच सांगितलेलें आहे. सर्वशक्ति, नित्य, परिपूर्ण व अद्वितीय असें परब्रह्म आहे. ॥ १४ ॥**

**विवरणः**—पूर्वश्लोकांत सांगितल्याप्रमाणें श्रुतीनें वर्णन केलें आहे. भगवान् वसिष्ठांनींही श्रीरामचंद्रास असाच उपदेश केला आहे. तो कसा ह्मणून विचारशील तर योगवासिष्ठांतील वसिष्ठ वचनाचाच उल्लेख करून सांगतों:—हे प्रिय रामचंद्रा, जगामध्यें जेवढ्या शक्ति आहेत, त्या सर्व शक्तींनीं संपन्न, त्रिकालाबाधित, परिपूर्ण व अद्वितीय असें पर, ब्रह्म आहे. या स्थळीं सर्वशक्ति हा शब्द ब्रह्माच्या सोपाधिक रूपाचा वाचक आहे. व इतर सर्व निरुपाधिक रूपाचे वाचक आहेत, असें समजावें.

**यथोल्लसति शक्त्यासौ प्रकाशमधिगच्छति ॥**
**चिच्छक्तिर्ब्रह्मणो राम शरीरेषूपलभ्यते ॥ १५ ॥**

**अन्वयः**—यदा यत् ब्रह्म यया उल्लसति तदा असौ शक्तिः प्रकाशं अधिगच्छति । हे राम ब्रह्मणः चिच्छक्तिः शरीरेषु उपलभ्यते ।

**अर्थः—ज्या वेळीं तें ब्रह्म तिच्या योगानें विकसित होतें, त्या वेळीं ती शक्ति व्यक्त होते, हे रामा, ब्रह्माची चिच्छक्ति शरीरामध्यें उपलब्ध होते. १५**

**विवरणः—ज्या वेळीं मायेच्या योगानें ब्रह्म विवर्त होतें, ह्मणजे अन्यथाभावाप्रत प्राप्त होतें त्या वेळीं ही माया व्यक्त होते. कशी ह्मणून ह्मणशील तर सांगतों. बा रामचंद्रा, ब्रह्माची चैतन्यशक्ति देव, मनुष्यें, पशु, पक्षी इत्यादि सर्वांच्या शरीरामध्यें उपलब्ध होत असते. ही गोष्ट प्रसिद्धच आहे. ॥ १५ ॥**

त्याचप्रमाणें:-

स्पंदशक्तिश्च वातेषु दार्ढ्यशक्तिस्तथोपले ॥
द्रवशक्तिस्तथांभःसु दाहशक्तिस्तथानले ॥ १६ ॥
शून्यशक्तिस्तथाकाशे नाशशक्तिर्विनाशिनि ॥
यथांडेंतर्महासर्पो जगदस्ति तथात्मनि ॥ १७ ॥

अन्वयः—च वातेषु स्पंदशक्तिः तथा उपले दार्ढ्यशक्तिः तथा अंभःसु द्रवशक्तिः तथा अनले दाहशक्तिः तथा आकाशे शून्यशक्तिः च विनाशिनि नाशशक्तिः । यथा अंडे अंतर् महासर्पः तथा आत्मनि जगत् अस्ति ।

अर्थः—व वायूमध्यें स्पंदनशक्ति, तशीच दगडामध्यें दृढपणाची शक्ति, तशीच उदकामध्यें द्रवशक्ति, अग्नीमध्यें दाहशक्ति, आकाशांत शून्यशक्ति, व विनाश होणाऱ्या पदार्थांत नाशशक्ति असते. सारांश, ज्याप्रमाणें अंड्यामध्यें मोठा सर्प असतो, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें जग असतें ॥ १६॥१७ ॥

विवरणः—सृष्टींतील ज्या ज्या पदार्थांत जी जी शक्ति दिसते, ती ती त्या ब्रह्माचीच शक्ति आहे असें तूं जाण. अंड्याच्या आंत मोठा थोरला भुजंग जसा गुप्त असतो, त्याप्रमाणें हें सर्व जग उत्पत्तीच्या पूर्वी आत्म्यामध्यें लीन असतें. ॥ १७॥

पण हें विचित्र जग एका आत्म्यामध्यें कसें राहातें ? या विषयीं दृष्टांत देतातः-

फलपत्रलतापुष्पशाखाविटपमूलवान् ॥
ननु बीजे यथा वृक्षस्तथेदं ब्रह्मणि स्थितम् ॥१८ ॥

अन्वयः—ननु यथा बीजे फलपत्रलतापुष्पशाखाविटपमूलवान् वृक्षः तथा इदं ब्रह्मणि स्थितम् ।

अर्थः—ह्मणजे ज्याप्रमाणें बीजामध्यें फलें, पानें, वेली, पुष्पें, खांद्या, पारंब्या, मुळें इत्यादिकांनीं युक्त असलेला वृक्ष राहातो, त्याप्रमाणें हें सर्व ब्रह्मामध्यें स्थित आहे. ॥ १८ ॥

विवरणः—अगदीं बारीक अशा एकाद्या बीजामध्यें ज्याप्रमाणें पुष्पफलादि अनेक विचित्र भागांनीं युक्त असा वृक्ष राहातो, त्याप्रमाणें विचित्र असें हें जग ब्रह्ममध्यें लीन होऊन राहतें. ॥ १८ ॥

तर मग सर्व शक्तींचा एकदम उदय कां होत नाहीं ?—या प्रश्नाचें आतां उत्तर देतात:–

**क्वचित्काश्चित्कदाचिच्च तस्मादुद्यंति शक्तयः ॥**
**देशकालविचित्रत्वात्क्ष्मातलादिव शालयः ॥ १९ ॥**

अन्वयः—क्ष्मातलात् शालयः इव देशकालविचित्रत्वात् तस्मात् शक्तयः क्वचित् कदाचित् काश्चित् च उद्यन्ति ।

अर्थः—पृथ्वीतलापासून उत्पन्न होणाऱ्या साळीप्रमाणें देशकाल विचित्र असल्यामुळें त्यांच्यापासून क्वचित् विशेष प्रदेशीं केव्हां केव्हां व कांहीं थोड्या-शाच शक्ती उत्पन्न होतात. ॥ १९ ॥

विवरणः—ज्याप्रमाणें भूमीवर योग्य समयीं पेरलेल्या धान्यांतलिही कांहीं धान्य उगवतें व तेंही देश, काल इत्यादिकांची अपेक्षा धरितें, त्याप्रमाणें देश व काल विचित्र असल्यामुळें तदनुरूपच शक्ती उदय पावतात. ॥ १९ ॥

आतां जगत्कल्पना करणाऱ्या मनाचें स्वरूप सांगतात:–

**स आत्मा सर्वगो राम नित्योदितमहावपुः ॥**
**यन्मनाङ्मननीं शक्तिं धत्ते तन्मन उच्यते ॥ २० ॥**

अन्वयः—हे राम, नित्योदितमहावपुः सः आत्मा सर्वगः अस्ति। यत् मनाक् मननीं शक्तिं धत्ते, तत् मनः उच्यते।

अर्थः—हे रामचंद्रा, नित्य उगवलेलें आहे महा शरीर ज्याचें, असा हा आत्मा सर्वगामी आहे. ज्या वेळीं मन थोडीही मननशक्ति धारण करितें, तेव्हांच त्यास मन असें म्हटलें जातें. ॥ २० ॥

विवरणः—नित्योदित० सतत प्रकाशरूप असें महास्वरूप. अंतःकरण थोडेसें मनन करूं लागलें कीं, लागलीच त्यास मन ही संज्ञा प्राप्त होते. ॥ २० ॥

आतां कल्पना कशी होते तें सांगतातः—

आदौ मनस्तदनु बंधविमोक्षदृष्टी
पश्चात्प्रपंचरचना भुवनाभिधाना ॥
इत्यादिका स्थितिरियं हि गता प्रतिष्ठा-
माख्यायिका सुभगबालजनोदितेव ॥ २१ ॥

अन्वयः—आदौ मनः भवति। तदनु बंधविमोक्षदृष्टी भवतः। पश्चात् भुवनाभिधाना प्रपंचरचना इत्यादिका सुभगबालजनोदिता आख्यायिका इव इयं स्थितिः प्रतिष्ठां गता हि ।

अर्थ—प्रथमतः मन होतें; नंतर बंध व मोक्ष या कल्पना होतात; पुढें भुवन हें नांव आहे जिला अशी प्रपंचरचना होते. तात्पर्य, राजपुत्रास सांगितलेल्या कथेप्रमाणें अशी ही स्थिति सत्यतेप्रत प्राप्त झाली. ॥ २१ ॥

विवरणः—अगदीं प्रथमतः मननशक्ति विकासित होते व त्यामुळें मनाची उत्पत्ति होते. मनाच्या उत्पत्तीनंतर बंध व मोक्ष यांची कल्पना होते; तदनंतर भुवन असें ज्याला ह्मणतात तो प्रपंच होतो. तो पर्वत, नगरें, नद्या, समुद्र, मनुष्य, पशु, पक्षी, वृक्ष, वेली इत्यादि सर्व स्थावरजंगमरूप असतो. तात्पर्य, अशा प्रकारें जिची केवल कल्पना झालेली असते, ती ही सृष्टि पुढें सत्य रूपानें भासूं लागते. ह्मणजे राजपुत्रास सांगितलेली कल्पित कथा जशी खरी झाली तसाच हा सर्व प्रकार झाला. ॥ २१ ॥

आतां ती कथा कोणती तें सांगतातः—

बालस्य हि विनोदाय धात्री वक्ति शुभां कथम्
क्वचित्संति महाबाहो राजपुत्रास्त्रयः शुभाः ॥ २२ ॥
द्वौ न जातौ तथैकस्तु गर्भे एव न च स्थितः ॥
वसंति ते धर्मयुक्ता अत्यंतासति पत्तने ॥ २३ ॥
स्वकीयाच्छून्यनगरान्निर्गत्य विमलाशयाः ॥
गच्छंतो गगने वृक्षान् ददृशुः फलशालिनः ॥ २४ ॥

भविष्यन्नगरे तत्र राजपुत्रास्त्रयोपि ते ॥
सुखमद्य स्थिताः पुत्र मृगयाव्यवहारिणः ॥ २५ ॥
धात्र्येति कथिता राम बालकाख्यायिका शुभा ॥
निश्चयं स ययौ बालो निर्विचारणया धिया ॥ २६ ॥

अन्वयः—बालस्य विनोदाय हि धात्री शुभां कथां वक्ति । हे महाबाहो, कचित् शुभाः त्रयः राजपुत्राः संति । द्वौ न जातौ तथा एकः तु गर्भे एव न स्थितः । ते धर्मयुक्ताः संतः अत्यंतासति पत्तने वसंति । ते विमलाशयाः स्वकीयात् शून्यनगरात् निर्गत्य गच्छन्तः गगने फलशालिनः वृक्षान् ददृशुः । हे पुत्र, ते त्रयः अपि मृगयाव्यवहारिणः राजपुत्राः तत्र भविष्यन्नगरे अद्य सुखं स्थिताः सन्ति । हे राम, इति धात्र्या शुभा बालकाख्यायिका कथिता । सः बालः निर्विचारणया धिया निश्चयं ययौ ।

अर्थः—बालकाच्या मनोरंजनाकरितां दायीनें शुभकथा सांगितली. ती अशी–हे सुंदर पुत्रा, कोणा एका गांवांत तीन शुभ कर्में करणारे राजपुत्र होते. पण त्यांतील दोन उत्पन्न झाले नव्हते. व एक तर मातेच्या गर्भांतही आला नव्हता. ते तिघेही धर्मयुक्त होत्साते अत्यंत असत् या नांवाच्या एका नगरांत राहात असत. शुद्ध आहे अंतःकरण ज्याचें, असे ते राजपुत्र एकदा आपल्या शून्य नगरांतून निघून जात असतां, त्यांनीं अंतरिक्षांत फलांनीं युक्त असे वृक्ष पाहिले. तात्पर्य, ते तिघेही मृगयाविहार करणारे राजपुत्र त्या भविष्य नगरांत आज सुखरूप राहिलेले आहेत. असो; हे रामा, ह्याप्रमाणें धात्रीनें शुभबालकाख्यायिका सांगितली असतां, तो बालक विचारशून्य अशा बुद्धीच्या योगानें निश्चययुक्त झाला. ॥२२॥२३॥२४॥२५॥२६॥

विवरणः—कोण्या एका अनिर्वचनीय मायाख्य गांवांत सत्त्व, रज व तम हे तीन गुण राहात असत. ते अनादि असल्यामुळें त्यांतील दोघांचा जन्म झाला नव्हता व एक तर मातेच्या उदरांतही आला नव्हता. ते तिघेही मोठेपणीं अत्यंत असत् ह्मणजे क्षणिक अशा शरीररूपी नगरांत राहूं लागले. कांहीं कालानें आपल्या शून्य ( तत्त्वरहित ) नगरांस सोडून ते सूक्ष्म शरीरासह बाहेर पडले व स्वैर फिरूं लागले; ह्मणजे एका शरीरास सोडून ते देहरहित अशा अवस्थेंत दुसऱ्या देहांत

जाण्याकरितां फिरूं लागले. इतक्यांत त्यांस आकाशांत ह्मणजे आधाररहित अशा सूक्ष्म शरीरांत फळांनीं भरलेले वासनारूपी वृक्ष दिसले व फळांनीं भरलेल्या वृक्षांच्या अरण्यांत मृगया करीत, फलोपभोग घेत, ते उत्तरजन्मरूपी नगरांत (शरीरांत) अद्यापि मोठ्या सुखानें वास्तव्य करीत आहेत. ज्ञानावांचून गुणांचा नाश होणें शक्यच नसल्यामुळें त्यांना अपाय झाला असेल किंवा त्याच्या सुखानें राहाण्यांत कांहीं व्यत्यय आला असेल, अशी कल्पनाही करावयास नको. असा या आख्यायिकेचा गूढार्थ आहे. ही कथा धात्रीनें त्या बालकास रचून सांगितलेली होती व त्यामुळें त्यांत सत्यांश मुळींच नव्हता; तरी बालकाची बुद्धि अगदींच विवेकशून्य असल्यामुळें त्यानें ती सर्व खरी स्थिति आहे असा निश्चय केला. ॥२२॥२३॥२४॥२५॥२६॥

सारांश—

इयं संसाररचना विचारोज्झितचेतसाम् ॥
बालकाख्यायिके वेत्थमवस्थितिमुपागता ॥ २७ ॥

अन्वयः—बालकाख्यायिका इव इयं संसाररचना विचारोज्झितचेतसां इत्थं अवस्थितिं उपागता ।

अर्थः—बालकास सांगितलेल्या कथेप्रमाणें ही संसाररचना विवेकशून्य पुरुषांच्या दृष्टीनें अशी खरी झाली आहे. ॥ २७ ॥

विवरणः—पूर्वोक्त कथेप्रमाणेंच अविवेकी पुरुषांच्या मनोरंजनार्थ तत्त्वज्ञानें सांगितलेली ही सृष्टीच्या उत्पत्तीची कथा त्यांनीं खरी मानिली आहे; पण हा सर्व कल्पनेचा बाजार आहे, त्यांत सत्याचा लेशही नाहीं; हें एका तत्त्वज्ञान्यावांचून दुसऱ्या कोणासही ठाऊक नाहीं. त्यामुळें अनेक अविवेकी आपसांत मोठा झगडा करीत असतात. त्यांतील प्रत्येक माझें किंवा माझ्या गुरूचें ह्मणणें मात्र खरें, बाकी सर्वांचें खोटें, असें निःशंकपणें प्रतिपादन करीत असतो. आणि या सर्वांचा परिणाम द्वेष, मतभेद, अभिमान इत्यादि दुष्ट विकारांत झाला आहे. पण तत्त्वज्ञ पुरुष हा सर्व चमत्कार पाहून नुस्तें हंसत राहातो. कारण खोट्याकरितां भांडणाऱ्या ह्या मूर्खांकडे पाहून त्यास मोठें आश्चर्य वाटतें. ॥ २७ ॥

असोः—

इत्यादिभिरुपाख्यानैर्मायाशक्तेश्च विस्तरम् ॥
वसिष्ठः कथयामास सैव शक्तिर्निरूप्यते ॥ २८ ॥

अन्वयः—इत्यादिभिः उपाख्यानैः वसिष्ठः मायाशक्तेः विस्तरं कथयामास। सा शक्तिः एव निरूप्यते।

अर्थः—इत्यादि अनेक कथांच्या योगानें वसिष्ठ मायाशक्तीचा विस्तार सांगते झाले. त्या शक्तीचेंच आह्मी निरूपण करितों. ॥ २८ ॥

विवरणः—गेल्या तेरा श्लोकांत योगवासिष्ठांतील श्लोकांचाच अक्षरशः निर्देश केलेला आहे. तात्पर्य, असल्या अनेक कथांच्या योगानें श्री वसिष्ठमुनींनीं मायाशक्तीचा विस्तार केला आहे. असो; आम्हीही आतां त्या मायेचेंच निरूपण करितों. ॥ २८ ॥

**कार्यादाश्रयतश्चैषा भवेच्छक्तिर्विलक्षणा ॥**
**स्फोटांगारौ दृश्यमानौ शक्तिस्तत्रानुमीयते ॥ २९ ॥**

अन्वयः—कार्यात् च आश्रयतः एषा शक्तिः विलक्षणा भवेत्। स्फोटांगारौ दृश्यमानौ। तत्र शक्तिः अनुमीयते।

अर्थः—कार्याहून व आश्रयाहून ही शक्ति विलक्षण आहे. फोड व निखारा हे दोन्ही दिसतात, व त्यावरून शक्तीचें अनुमान होतें. ॥ २९ ॥

विवरणः—ही मायासंज्ञक शक्ति तिचें कार्य जगत् व आश्रयभूत ब्रह्म, या दोघांहूनही विलक्षण ( निराळ्या लक्षणाची, विपरीत स्वभावाची ) आहे. ती कशी ह्मणून ह्मणाल, तर दृष्टांत देऊन सांगतों. रस्त्यांत निखारा पडलेला असावा व त्यावर पाय पडावा, ह्मणजे लागलाच पायास फोड येतो. अशा स्थळीं फोड व निखारा हे दोघे मात्र प्रत्यक्ष दिसत असतात. फोड येण्यास कारण होणारा अग्नींतील गुण प्रत्यक्ष दिसत नाहीं. पण फोड आल्यामुळें आपण त्याचें अनुमान करितों. अर्थात् ती अग्निशक्ति निखारा व फोड यांहून निराळी आहे, हें उघड होय. सारांश, मायाशक्तीचीही तीच स्थिति आहे, असें समजावें. ॥ २९ ॥

आतां हाच न्याय मृत्तिकेच्या शक्तीचे ठायींही योजून दाखवितातः—

**पृथुबुध्नोदराकारो घटः कार्योऽत्र मृत्तिका ॥**
**शब्दादिभिः पंचगुणैर्युक्ता शक्तिस्त्वतद्विधा ॥ ३० ॥**

अन्वयः—पृथुबुध्नोदराकारः घटः कार्यः। शब्दादिभिः पंचगुणैः युक्ता मृत्तिका अत्र आश्रयः। शक्तिः तु अतद्विधा।

अर्थः—स्थूल व वर्तुल आहे उदर ज्याचें असा घट कार्य. शब्दादि पाच गुणांनीं युक्त असलेली मृत्तिका या ठिकाणीं आश्रय व शक्ति तर दोहोंहून निराळी. ॥ ३० ॥

विवरण:—अति स्थूल व वर्तुलाकार आहे उदर ज्याचें असा मृत्तिकेचा घट कुंभारानें दंडचक्रादि साधनांच्या योगानें तयार केला असतां कार्यरूप होतो. त्याचें कारण शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पांच गुणांनीं युक्त अशी माती असते. पण त्यास उत्पन्न करणारी मृत्तिकेमध्यें जी शक्ति असते, ती या कार्यकारणांहून अगदीं भिन्न होय. कारण कार्य घट व कारण मृत्तिका जशा प्रत्यक्ष दिसते, त्याप्रमाणें ती प्रत्यक्ष दिसत नाहीं. तसेंच घटाचे स्थूलवर्तुलादि धर्म व मृत्तिकेचे शब्दादि गुण तिच्यामध्यें नसतात. ॥ ३० ॥

न पृथ्व्यादिर्न शब्दादिः शक्तावस्तु यथा तथा ॥
अत एव ह्यचिंत्यैषा न निर्वचनमर्हति ॥ ३१ ॥

अन्वय:—शक्तौ न पृथ्व्यादि: च न शब्दादिः विद्यते । अतः यथा तथा अस्तु । अतः एव हि एषा अचिन्त्या निर्वचनं न अर्हति ।

अर्थः—शक्तीमध्यें स्थूलत्वादि नाहींत व शब्दादिही नाहींत. तस्मात् ती जशी तशी असो. एवढ्या करितांच ती अचिंत्य आहे. अर्थात् ती सांगतां येण्यासारखी नाहीं. ॥ ३१ ॥

विवरणः—मृत्तिकेमध्यें घट उत्पन्न करण्याची जी शक्ति असते, तिच्यामध्यें मृत्तिकेचे धर्म नसतात व तसेच घटाचेही धर्म नसतात. त्यामुळें ती कशी तरी असते असेंच ह्मणावें लागते. ह्मणजे ती अचिंत्य आहे. तिचें घटाप्रमाणें किंवा मृत्तिकेप्रमाणें वर्णन करितां येत नाहीं. कारण ती भिन्न आहे, अभिन्न आहे, किंवा अचिंत्यत्वादि धर्मयुक्त आहे, असें कधींच ह्मणतां येत नाहीं. ॥ ३१ ॥

वादी:—अहो, पण ती शक्ति कारणस्वरूपाहून जर भिन्न आहे, तर कारणस्वरूपाप्रमाणें भासत कां नाहीं? सिद्धान्ती:—

कार्योत्पत्तेः पुरा शक्तिर्निगूढा मृद्यवस्थिता ॥
कुलालादिसहायेन विकाराकारतां व्रजेत् ॥ ३२ ॥

अन्वयः—कार्योत्पत्तेः पुरा मृदि अवस्थिता शक्तिः निगूढा । कुलालादिसहायेन-विकाराकारतां व्रजेत् ।

अर्थः—कार्योत्पत्तीच्या पूर्वी मृत्तिकेमध्यें असलेली शक्ति गुप्त राहाते व कुंभारादिकांच्या सहायानें विकाररूपास प्राप्त होते. ॥ ३२ ॥

विवरणः—घटरूपी कार्य उत्पन्न होण्याच्या पूर्वी जी शक्ति मृत्तिकेमध्यें गुप्त असते, तीच कुंभार, दंड, व चक्र इत्यादिकांच्या सहायानें कार्यरूपानें व्यक्त होते. अर्थात्—जी पूर्वी अव्यक्त असते, ती नंतरही अव्यक्तच असणें युक्त आहे—हें ह्मणणें शोभत नाहीं. याविषयीं लोण्याचा दुसरा उत्तम दृष्टांत आहे. ताक करण्यापूर्वी लोणी दह्यांमध्यें गुप्त असतें. पण तेंच पुढें घुसळ्यावर व्यक्त होतें. त्याप्रमाणेंच प्रस्तुत प्रकार समजावा. ॥ ३२ ॥

पण आतां घट असें कशास ह्मणतात, तें सांगतातः—

पृथुत्वादिविकारांतं स्पर्शादिं चापि मृत्तिकाम् ॥
एकीकृत्य घटं प्राहुर्विचारविकला जनाः ॥ ३३ ॥

अन्वयः—विचारविकलाः जनाः तं पृथुत्वादिविकारांतं च स्पर्शादिं मृत्तिकां अपि एकीकृत्य घटं प्राहुः ।

अर्थः—विचारशून्य लोक त्या स्थूलादिरूप विकारास व शब्दस्पर्शादिरूप मृत्तिकेसही एक करून घट असें ह्मणतात. ॥ ३३ ॥

विवरणः—ज्यांना कार्यकारणभाव समजत नाहीं, असे स्थूलबुद्धीचे सामान्य लोक स्थूल, वर्तुल इत्यादि विकार व शब्द, स्पर्श इत्यादिरूप मृत्तिका यांचें ऐक्य करून हा घट आहे असें ह्मणूं लागतात. पण या व्यवहारास त्यांचा अविवेकच कारण आहे. ॥ ३३ ॥

अविवेक कारण कसा ह्मणाल तर सांगतोंः—

कुलालव्यापृतेः पूर्वो यावानंशः स नो घटः ॥
पश्चात्तु पृथुबुध्नादिमत्त्वे युक्ता हि कुंभता ॥ ३४ ॥

अन्वयः—कुलालव्यापृतेः पूर्वः यावान् अंशः सः घटः नो । पश्चात् तु पृथु-बुध्नादिमत्त्वे कुंभता युक्ता हि ।

अर्थः—कुंभाराच्या व्यापारापूर्वी जेवढा अंश असतो तो घट नव्हे. पण मागून त्याला स्थूलवर्तुलादि भाव प्राप्त झाला कीं कुंभता येणें युक्तच आहे.

विवरणः—कुंभार दंडादिकांच्या सहायानें व्यापार करीपर्यंत जो मृत्तिकेचा ओला अंश असतो, त्याला घट असें कोणासही ह्मणतां येणार नाहीं. अर्थात् कुंभाराच्या क्रियेनंतर जो स्थूल, वर्तुल, पोकळ, इत्यादि मृत्तिकेचा विकार होतो, त्यास 'घट' असें ह्मणतां येणें शक्य आहे. जगाचा अनुभवही तसाच आहे. ॥ ३४ ॥

वादीः—अहो, पण घट सत्य असल्यामुळें व त्याचें तसें भानही होत असल्यामुळें त्याचें कारण अनिर्वचनीय शक्ति आहे, अशी कल्पना करणें युक्त नव्हे. सिद्धान्तीः—पण घट सत्य आहे हें तुह्मी कशावरून सांगतां ? कारणः—

स घटो न मृदो भिन्नो वियोगे सत्यनीक्षणात् ॥
नाप्यभिन्नः पुरा पिंडदशायामनवेक्षणात् ॥ ३५ ॥

अन्वयः—वियोगे सति अनीक्षणात् सः घटः मृदः भिन्नः न अस्ति । पुरा पिंडदशायां अनवेक्षणात् अभिन्नः अपि न अस्ति ।

अर्थः—वियोगानंतर त्याचा प्रत्यय येत नसल्यामुळें तो घट मृत्तिकेहून भिन्न नाहीं व उत्पत्तीच्या पूर्वी पिंडकालीं त्याचा प्रत्यय येत नसल्यामुळें तो अभिन्नही नाहीं. ॥ ३५ ॥

विवरणः—घट मृत्तिकेहून भिन्न करून दाखवितां येत नाहीं. त्यामुळें तो मृत्तिकेहून भिन्न आहे असें ह्मणणें व्यर्थ आहे. तसाच तो मृत्तिकारूप आहे असेंही ह्मणतां येत नाहीं. कारण घट उत्पन्न होण्यापूर्वी जेव्हां नुस्ता मातीचा गोळाच असतो, तेव्हां त्याचा प्रत्यय येत नाहीं. तात्पर्य; घट मातीहून भिन्न किंवा अभिन्न आहे असें ह्मणतां येत नाहीं. ॥ ३५ ॥

अतोऽनिर्वचनीयोयं शक्तिवत्तेन शक्तिजः ॥
अव्यक्तत्वे शक्तिरुक्ता व्यक्तत्वे घटनामभृत् ॥ ३६ ॥

अन्वयः—अतः शक्तिवत् अयं अनिर्वचनीयः । तेन शक्तिजः । अव्यक्तत्वे शक्तिः उक्ता च व्यक्तत्वे घटनामभृत् ।

अर्थः—यास्तव शक्तीप्रमाणें हा अनिर्वचनीय आहे. त्यामुळें तो शक्तीपासून उत्पन्न होणारा होय. अव्यक्ततासमयीं शक्ति असें ह्मटलें आहे व व्यक्तता-समयीं तोच घटनामक होतो. ॥ ३६ ॥

विवरणः—सारांश, शक्ति कारणाहून भिन्न किंवा अभिन्न आहे, यांतील कांहींच जसें ह्मणतां येत नाहीं, त्याचप्रमाणें घटाविषयींही कांहीं निश्चय करितां येत नाहीं. यास्तव घट शक्तीपासून होणारा आहे. तो जेव्हां अव्यक्त असतो, तेव्हां शक्ति ह्मणतात व जेव्हां व्यक्त होतो, तेव्हां त्यास घट हें नांव प्राप्त होतें. ॥ ३६ ॥

लौकिक मायेचें लक्षणही असेंच आहे, असें आतां सांगतातः—

**ऐंद्रजालिकनिष्ठापि माया न व्यज्यते पुरा ॥**
**पश्चाद्गंधर्वसेनादिरूपेण व्यक्तिमाप्नुयात् ॥ ३७ ॥**

अन्वयः—ऐंद्रजालिकनिष्ठा अपि माया पुरा न व्यज्यते । पश्चात् गंधर्वसेनादि रूपेण व्यक्तिं आप्नुयात् ।

अर्थः—इंद्रजालामध्यें असलेली माया ही सुद्धां पूर्वी व्यक्त नसते. पुढें गंधर्वसेना इत्यादि रूपानें व्यक्त होते. ॥ ३७ ॥

विवरणः—गारुडामध्यें असलेली माया ही गारुड सुरु होण्यापूर्वी अव्यक्त असते. पण पुढें मणि, मंत्र, औषधि यांच्या योगानें तीच गुप्त असलेली माया गंधर्वसेना, गंधर्वनगर इत्यादि रूपानें व्यक्त होते. अर्थात् पूर्वी अव्यक्त असून पुढें व्यक्त होणें हेंच माया व शक्ति यांचें लक्षण आहे. व तें सर्वत्र दिसण्यासारखें आहे. ॥ ३७ ॥

आतां शक्तिकार्यास मिथ्यात्व व शक्तीच्या आधारास सत्यत्व असतें, असें छान्दो-ग्यश्रुतीमध्येंही सांगितलेलें आहे असें सांगतातः—

**एवं मायामयत्वेन विकारस्यानृतात्मताम् ॥**
**विकाराधारमृद्वस्तुसत्यत्वं चाब्रवीच्छ्रुतिः ॥ ३८ ॥**

अन्वयः—एवं मायामयत्वेन विकारस्य अनृतात्मतां च विकाराधारमृद्वस्तुसत्यत्वं श्रुतिः अब्रवीत् ।

अर्थः—ह्याप्रमाणें मायामयतेमुळें विकारास मिथ्यारूपत्व व विकाराच्या आधारभूत मृत्तिकेस सत्यत्व असतें, असें श्रुतीनें सांगितलें आहे. ॥ ३८ ॥

विवरणः—घटादि विकार मायामय असल्यामुळे ह्मणजे तो मायेचे कार्य असल्यामुळें खोटा ( कांहीं काल राहून पुनः आपल्या कारणात लीन होणारा ) आहे. आणि जिच्या आधारावर विकार होतो, ती मृत्तिका सत्य ( ह्मणजे विकारसमयीं, त्याच्या उत्पत्तिपूर्वी व नाशानतरही राहाणारी ) आहे, असे छान्दोग्याच्या सहाव्या अध्यायांत सांगितलें आहे. ॥ ३८ ॥

आतां तें वाक्यच अर्थतः घेतातः—

**वाङ्निष्पाद्यं नाममात्रं विकारो नास्य सत्यता ॥**
**स्पर्शादिगुणयुक्ता तु सत्याकेवलमृत्तिका ॥ ३९ ॥**

अन्वयः—विकारः वाङ्निष्पाद्यं नाममात्रं अस्य सत्यता न । स्पर्शादिगुणयुक्ता तु केवलमृत्तिका सत्या ।

अर्थः—विकार, वाणीच्या योगानें निष्पन्न होणारा, नाममात्र असतो. त्याला सत्यता नसते. पण स्पर्शादिगुणयुक्त नुस्ती मृत्तिका सत्य असते. ॥ ३९ ॥

विवरणः—घटादि विकार केवल शब्दमात्र असतात. ह्मणजे त्यांच्या विषयीं शब्दव्यवहार मात्र करितां येतो. त्याच्या पलिकडे कांहीं नाहीं. कारण केवळ नांवाच्या पलीकडे त्याला स्वरूपच नाहीं. पण स्पर्शादि अनेक गुणांनीं युक्त असलेली मृत्तिका विकाराचें कारण असल्यामुळें सत्य आहे. ह्मणजे तिला नांवाच्या पलीकडे कांहीं स्वरूप आहे. ॥ ३९ ॥

कारणः—

**व्यक्ताव्यक्तो तदाधार इति त्रिष्वाद्ययोर्द्वयोः ॥**
**पर्यायः कालभेदेन तृतीयस्त्वनुगच्छति ॥ ४० ॥**

अन्वयः—व्यक्ताव्यक्ते तदाधारः इति त्रिषु आद्ययोः द्वयो; कालभेदेन पर्यायः । तृतीयः तु उभयत्र अनुगच्छति ।

अर्थः—व्यक्त, अव्यक्त व त्याचा आधार या तीन अवस्थांपैकीं पहिल्या दोन अवस्था कालभेदानें राहातात. पण तिसरा आधार त्या दोन्ही अवस्थेमध्यें राहातो. ॥ ४० ॥

विवरणः—विकाराच्या व्यक्त व अव्यक्त अशा दोन अवस्था आहेत. यांतील व्यक्त अवस्थेस कार्य व अव्यक्त अवस्थेस शक्ति म्हणतात. पण त्या परस्पर विरुद्ध असल्यामुळें एकाच कालीं राहू शकत नाहींत. अर्थात् जेव्हां शक्ति असते, तेव्हां कार्य नसतें व कार्य असतें तेव्हां शक्ति नसते. पण आधारभूत मृत्तिकेची अशी स्थिति नाहीं. कारण ती शक्तिसमयीं व कार्यसमयींही असते. यास्तव ती सत्य व कांहीं काल राहाणारी शक्ति व कार्य हीं अनित्य होत. '॥ ४० ॥

आतां विकार अनित्य आहे, याविषयीं तीन हेतु सांगतातः—

निस्तत्त्वं भासमानं च व्यक्तमुत्पत्तिनाशभाक् ॥
तदुत्पत्तौ तस्य नाम वाचा निष्पाद्यते नृभिः ॥ ४१ ॥

अन्वयः—व्यक्त निस्तत्वं भासमानं तथा उत्पत्तिनाशभाक् । तथा च तदुत्पतौ तस्य नाम नृभिः वाचा निष्पाद्यते ।

अर्थः—व्यक्त तत्त्वशून्य असूनही तें भासतें; तसेंच तें उत्पत्तिविनाशयुक्त आहे व त्याची उत्पत्ति झाली असतां त्याचें नांव मनुष्याकडून वाणीनें उच्चारिलें जातें. ॥ ४१ ॥

विवरणः—व्यक्त असें ज्याला म्हणतात तें कार्य स्वरूपतः असत् असूनही उत्तम प्रकारें प्रतीत होतें; हें एक कारण. तसेंच तें उत्पत्ति व नाश यांनीं युक्त असतें हें दुसरें; आणि उत्पत्तीनंतरच त्याचा वाणीच्या योगानें व्यवहार करितां येतो, हें तिसरें कारण होय. या तीन कारणांवरून विकार अनित्य आहे, असा निश्चय करितां येतो. कारण जें जें असत् असून भासणारें मृगजलादि तें तें अनित्य, जें जें उत्पत्तिविनाशयुक्त तें तें अनित्य, व जें जें इंद्रियगम्य तें तें अनित्य, असा नियम आहे. ॥ ४१ ॥

शिवायः—

व्यक्ते नष्टेऽपि नामैतन्नृवक्त्रेष्वनुवर्तते ॥
तेन नाम्ना निरूप्यत्वाद्व्यक्तं तद्रूपमुच्यते ॥ ४२ ॥

अन्वयः—व्यक्ते नष्टे अपि एतत् नाम नृवक्त्रेषु अनुवर्तते । तेन नाम्ना निरूप्यत्वात् व्यक्तं तद्रूपं उच्यते ।

**अर्थः**—व्यक्त जरी नष्ट झालें तरी हें नांव मनुष्यांच्या तोंडात असतें. तात्पर्य, हें नामानें निरूपण करितां येण्यासारखें असल्यामुळें व्यक्तनामरूप आहे, असें ह्मटलें जातें. ॥ ४२ ॥

**विवरण:**—कार्याचें स्वरूप जरी नष्ट झालें, तरी त्याच्याहून भिन्न नसणारें त्याचें नांव मनुष्यांच्या तोंडांत राहातेंच. शिवाय कार्य त्याच्या नांवानेंच निरूपण करितां येण्यासारखें असल्यामुळें व त्याच्या निरूपणास दुसरा उपायच नसल्यामुळें नामरूपच कार्य असतें असें ह्मणतात. वेदांतशास्त्रांत नामरूपात्मकजगत् असें जें ह्मटलेलें आढळतें, त्याचें कारण हेंच होय. ॥ ४२ ॥

असो; ह्याप्रमाणें कार्य अनित्य आहे असें सांगून आतां त्याविषयीं अनुमान कसें रचावें तें दाखवितातः—

**निस्तत्त्वत्वाद्विनाशित्वाद्वाचारंभणनामतः ॥**
**व्यक्तस्य न तु तद्रूपं सत्यं किंचिन्मृदादिवत् ॥ ४३ ॥**

**अन्वयः**—व्यक्तस्य यत् रूपं अस्ति तत् किंचित् अपि निस्तत्त्वत्वात् विनाशित्वात् वाचारंभणनामतः मृदादिवत् सत्यं न ।

**अर्थः**—कार्याचें जें रूप असतें, तें अगदीं तत्त्वशून्य असल्यामुळें, विनाशी असल्यामुळें व वाणीनेंच मात्र त्याचा नामानिर्देश करितां येत असल्यामुळें मृत्तिकादिकांप्रमाणें सत्य नव्हे. ॥ ४३ ॥

**विवरण:**—घटादि कार्याचें जें स्थूल व वर्तुल उदर, संकुचित मान इत्यादि स्वरूप दिसतें तें सत्य नव्हे. कारण तें तत्त्वशून्य ह्मणजे वास्तविक स्वरूपशून्य असतें; विनाशी असतें; व वागिंद्रियजन्य शब्दमात्र असतें. याविषयीं मृत्तिकेचा व्यतिरेकी दृष्टान्त आहे. ह्मणजे मृत्तिका घटाच्या अपेक्षेनें तत्त्वरूप असल्यामुळें, घटासारखी विनाशी नसल्यामुळें व घटाप्रमाणें केवल शब्दरूप नसल्यामुळें नित्य आहे. ॥ ४३ ॥

आतां मृत्तिकेच्या सत्यत्वाचें प्रतिपादन करितातः—

**व्यक्तकाले ततः पूर्वमूर्ध्वमप्येकरूपभाक् ॥**
**सतत्त्वमविनाशं च सत्यं मृद्वस्तु कथ्यते ॥ ४४ ॥**

अन्वयः—व्यक्तकाले ततः पूर्वं ऊर्ध्वं अपि एकरूपभाक् , सतत्वं च अविनाशं मृद्वस्तु सत्यं कथ्यते ।

अर्थः—कार्याच्या स्थितिकालीं त्याच्या उत्पत्तीपूर्वी व नाशानंतरही एक रूपानें असणारी, वास्तविक रूपानें राहाणारी व अविनाशी अशी मृत्तिका-संज्ञक वस्तु सत्य आहे, असें सांगितलें जातें. ॥ ४४ ॥

विवरणः—व्यक्तकाले—कार्याच्या उत्पत्तीनंतर व नाशापूर्वी जो काल जातो त्यास व्यक्त किंवा स्थितिकाल ह्मणतात. सतत्त्वंः—तत्त्व ह्मणजे वास्तविक रूप. जें त्रिकालीं बदलत नाहीं त्यास वास्तविक ह्मणतात. ॥ ४४ ॥

पण घटादि कार्यसमूह असत्य आहे असेंच जर मानलें, तर शुक्तिरजतादि इतर असत्य कार्याप्रमाणें आधिष्ठान ज्ञानानें त्याचाही बाध व्हावयास पाहिजे. पण तसें होत नाहीं. अशी आतां वादी शंका घेतोः—

**व्यक्तं घटो विकारश्चेत्येतैर्नामभिरीरितः ॥**
**अर्थश्चेदनृतः कस्मान्न मृद्बोधे निवर्तते ॥ ४५ ॥**

अन्वयः—व्यक्तं, घटः, च विकारः इति एतैः नामभिः ईरितः अर्थः अनृतः चेत् मृद्बोधे कस्मात् न निवर्तते ।

अर्थः—व्यक्त, घट, व विकार अशा या नांवांनीं बोलला जाणारा पदार्थ जर मिथ्या आहे, तर मृत्तिकेचें ज्ञान झालें असतां त्याची निवृत्ति कां होत नाहीं ? ॥ ४५ ॥

विवरणः—शुक्तीवर भासणाऱ्या रुप्याची शुक्तिज्ञानानें जशी निवृत्ति होते, तशीच मृत्तिकेवर भासणाऱ्या मिथ्या घटाचीही मातीचा साक्षात्कार झाला असतां निवृत्ति व्हावयास पाहिजे असें वाद्यानें ह्मणणें आहे. ॥ ४५ ॥

प्रस्तुत शंकेचें आतां समाधान करितात्ः—

**निवृत्त एव यस्मात्ते तत्सत्यत्वमतिर्गता ॥**
**ईदृङ्निवृत्तिरेवात्र बोधजा नत्वभासनम् ॥ ४६ ॥**

अन्वयः—यस्मात् ते तत्सत्यत्वमतिः गता तस्मात् सः निवृत्तः एव । अत्र ईदृक् एव बोधजा निवृत्तिः न तु अभासनम् ।

अर्थः—ज्या अर्थी तुझी त्याच्या सत्यत्वाविषयींची बुद्धि गेली, त्या अर्थी तो निवृत्त झालाच. असल्या सोपाधिक भ्रमामध्यें अशीच बोधजन्य निवृत्ति होत असते, न भासणें ही निवृत्ति नव्हे. ॥ ४६ ॥

विवरणः—घटादि पदार्थ सत्य आहेत अशा प्रकारची जी पूर्वी बुद्धि होती ती नष्ट झाली, कीं तीच मिथ्या कार्यांची निवृत्ति होय; असें आह्मी ह्मणतों. कारण घटासारख्या सोपाधिक स्थळीं बोधापासून होणारी निवृत्ति अधिष्ठानाच्या यथार्थ ज्ञानरूपच होय. घटादिकांचें भानही होतां कामा नये, असा आग्रह येथें चालत नाहीं. ॥ ४६ ॥

आतां पूर्वोक्त गोष्टच दृष्टान्तानें स्पष्ट करितातः—

पुमानधोमुखो नीरे भातोप्यास्ति न वस्तुतः

तटस्थमर्त्यवत्तस्मिन्नैवास्था कस्यचित्क्वचित् ॥ ४७ ॥

अन्वयः—नीरे अधोमुखः भातः अपि पुमान् वस्तुतः न अस्ति। तटस्थ मर्त्यवत् तस्मिन् एव कस्यचित् क्वचित् आस्था न अस्ति।

अर्थः—जलामध्यें खालीं मुख व वर पाय असा भासणारा पुरुष कांहीं खरोखर नसतो. कारण तीरावर उभ्या असलेल्या मनुष्याइतकी त्या जलांतील उलट्या मनुष्याच्या ठायीं कोणाची कधींही आस्था आढळत नाहीं. ॥ ४७ ॥

विवरणः—नदी, तळें, विहीर इत्यादि जलाशयांच्या कांठीं उभें राहून पाण्यांत पाहिल्यास आपलेंच शरीर त्यांत उलटें दिसतें. ह्मणजे डोकें खालीं व पाय वर अशी आकृति नजरेस पडते. पण तिला पाहून कोणी तरी (विवेकी अथवा अविवेकी) त्या उलट्या छायेच्या ठायीं तीरस्थ पुरुषाप्रमाणें कधीं तरी सत्यत्वाभिमान धरितो का? मुळींच नाहीं. ॥ ४७ ॥

सारांशः—

ईदृग्बोधे पुमर्थत्वं गतमद्वैतवादिनाम् ॥

मृद्रूपस्यापरित्यागाद्विवर्तत्वं घटे स्थितम् ॥ ४८ ॥

अन्वयः—अद्वैतवादिनां ईदृक् बोधे पुमर्थत्वं गतम्। मृद्रूपस्य अपरित्यागात् घटे विवर्तत्वं स्थितम्।

**अर्थः—अद्वैतवादी लोकांस अशा प्रकारचा बोध झाला असतांच पुरुषार्थत्व मान्य आहे. मृत्तिकारूपाचा परित्याग होत नसल्यामुळें घटाचे ठायीं विवर्तत्व सिद्ध झालें. ॥ ४८ ॥**

विवरणः—'अद्वैतवादामध्यें आत्मानंदाहून भिन्न अशा सर्व सृष्टीस मिथ्यात्व आहे, असा निश्चय झाला असतां अद्वैतानंदाची अभिव्यक्ति हा पुरुषार्थ सिद्ध होतो.' असा पूर्वार्धाचा सारांश समजावा. पण घट मृत्तिकेचा विवर्त आहे हें कशावरून? असें ह्मणाल तर सांगतों.—मृत्तिकेचें स्वरूप न सोडतां घटाचें भान होत असल्यामुळें घट मृत्तिकेचा विवर्त आहे. कारणाचें स्वरूप न बदलतां कार्याचें भलतेंच भान होणें हाच विवर्त होय. यासच अन्यथाभाव ह्मणतात. ॥ ४८ ॥

आतां घट मृत्तिकेचा परिणाम आहे असें कां ह्मणूं नये तें सांगतातः—

**परिणामे पूर्वरूपं त्यजेत्तत्क्षीररूपवत् ॥**
**मृत्सुवर्णे निवर्तेते घटकुंडलयोर्न हि ॥ ४९ ॥**

अन्वयः—क्षीररूपवत् परिणामे तत् पूर्वरूपं त्यजेत् । घटकुंडलयोः मृत्सुवर्णे न हि निवर्तेते ।

**अर्थः—दुधाच्या स्वरूपाप्रमाणें परिणामामध्यें कारण पूर्वरूप टाकितें. पण घट व कुंडल यांच्यांतील मृत्तिका व सुवर्ण निवृत्त होत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. ॥ ४९ ॥**

विवरणः—दुधाचें दहीं होणें हा परिणाम आहे. व त्यांत मूळरूप नष्ट होत असतें, असा अनुभव आहे. पण विवर्ताची तशी स्थिति नसल्यामुळें मातीचा घट व सुवर्णाचें कुंडल यांतील, दह्यांतील दुधाप्रमाणें माती व सुवर्ण हीं निवृत्त होत नाहींत. तर कारणभूत मृत्तिका व सुवर्ण यांचें कार्यकालींही अस्तित्व व भान असतें. ॥४९॥

पण घटाचा नाश झाल्यावर तो कारणरूप ह्मणजे मृत्तिकारूप कोठें होतो? अशी आतां शंका घेऊन समाधान करितातः—

**घटे भग्ने न मृद्भावकपालानामवेक्षणात् ॥**
**मैवं चूर्णेऽस्ति मृद्रूपं स्वर्णरूपं त्वतिस्फुटम् ॥ ५० ॥**

अन्वयः—घटे भग्ने कपालानां अवेक्षणात् मृद्भावः न इति मा एवं यतः चूर्णे मृद्रूपं अस्ति । स्वर्णरूपं तु अति स्फुटं वर्तते ।

अर्थः—घट फुटल्यावर खापऱ्या दिसत असल्यामुळें त्याचा मृद्भाव होत नाहीं असें ह्मणूं नको. कारण चूर्णाचे ठायीं मृद्रूप असतेंच. सुवर्णाचें रूप तर अति स्पष्ट असतें. ॥ ५० ॥

विवरण:—मातीची घागर फोडून टाकिल्यावर तिच्या खापऱ्या होतात. माती होत असल्याचें कोणाच्याही पाहण्यांत नाहीं. तेव्हां माती हें घटाचें उपादान कारण आहे, व त्याचा घटाच्या अस्तित्वसमयींही प्रत्यय येत असल्यामुळें घट हा त्याचा विवर्त आहे, असें कसें ह्मणतां येईल ? असें जर ह्मणशील तर तें तुझें ह्मणणें बरोबर नाहीं. कारण खापऱ्यासुद्धां मृत्तिकेचाच विकार आहे. व त्यांचा कुटून चूर केला असतां मातीच होते. कुंडलांतील सुवर्ण तर अगदीं स्पष्टच आहे. सारांश घट, कुंडल इत्यादि कार्यें विवर्त होत. ॥ ५० ॥

तात्पर्य:—

> क्षीरादौ परिणामोस्तु पुनस्तद्भाववर्जनात् ॥
> एतावता मृदादीनां दृष्टांतत्वं न हीयते ॥ ५१ ॥

अन्वयः—पुनः सद्भाववर्जनात् क्षीरादौ परिणामः अस्तु । एतावता मृदादीनां दृष्टान्तत्वं न हीयते ।

अर्थः—फिरून दुग्धभाव होत नसल्यामुळें क्षीरादिकांच्या ठायीं परिणाम असो; एवढ्यावरून मृत्तिका इत्यादिकांचें दृष्टांतत्व नष्ट होत नाहीं. ॥ ५१ ॥

विवरणः—दुधाचें एकदा दहीं झालें कीं फिरून त्याचें दूध करितां येत नाहीं यास्तव त्यास परिणामच ह्मणावें. आणि मातीचा घट व सुवर्णाचें कुंडल झालें असतां माती व सुवर्ण याचेंही अवस्थांतर होत असल्यामुळें त्यास परिणामही ह्मणावें व पूर्वरूपाचा परित्याग होत नसल्यामुळें विवर्तही ह्मणावें. सारांश, विवर्तवादामध्यें सुवर्णादिकाही दृष्टान्त होऊं शकतात.

पण मृत्तिका व सुवर्ण यांचें आरंभकत्वही कां स्वीकारूं नये ? असें जर ह्मणाल, तर सांगतों:—

**आरंभवादिनः कार्ये मृदो द्वैगुण्यमापतेत् ॥**
**रूपस्पर्शादयः प्रोक्ताः कार्यकारणयोः पृथक् ॥ ५२ ॥**

अन्वयः—आरंभवादिनः कार्ये मृदः द्वैगुण्यं आपतेत् । रूपस्पर्शादयः कार्यकारणयोः पृथक् प्रोक्ताः ।

अर्थः—आरंभवाद्यांच्या मतानें घटादि कार्यामध्यें मृत्तिकेची दुप्पट होईल. कारण त्यांच्या मतें रूपस्पर्शादिक गुण कार्य व कारण यांच्यामध्यें पृथक् मानलेले आहेत. ॥ ५२ ॥

विवरण:—वैशेषिक आरंभवादी आहेत. त्यांच्या मतानें—घट, कुंडल इत्यादि कार्यामध्यें मृत्तिकादि द्रव्य कार्यरूपानें व कारणरूपानें असें दुप्पट होतें—असें ठरतें. पण तसें झालें असतां गुरुत्वादि सर्वच गुण दुप्पट झालेच पाहिजेत, असा नियम कसा करितां येईल ? ह्मणून ह्मणाल तर सांगतों:—आरंभवादी कार्यांतील रूपादि गुण कारणांतील रूपादि गुणांहून भिन्न असतात असें ह्मणतात, त्यामुळें आह्मी ह्मणतों तसा प्रकार अवश्य होणारच. व जर होत नसला, तर आरंभवाद युक्तिशून्य आहे, असें ह्मणावयास पाहिजे. ॥ ५२ ॥

सारांश—

**मृत्सुवर्णमयश्चेति दृष्टांतत्रयमारुणिः ॥**
**प्राहातो वासयेत्कार्यानृतत्वं सर्ववस्तुषु ॥ ५३ ॥**

अन्वयः—मृत्, सुवर्णं च अयः इति दृष्टांतत्रयं आरुणिः प्राह । अतः सर्ववस्तुषु कार्यानृतत्वं वासयेत् ।

अर्थः—मृत्तिका, सुवर्ण, व लोखंड असे तीन दृष्टांत अरुणपुत्रानें दिले आहेत. यास्तव सर्व वस्तूंच्या ठायीं कार्याचें मिथ्यात्व निश्चित करावें. ॥५३॥

विवरण:—अरुणाचा पुत्र जो उद्दालक मुनि त्यानें आपल्या पुत्रास उपदेश करीत असतां मृत्तिका, सुवर्ण व पोलाद यांचे दृष्टांत दिले व त्यावरून घट, कुंडल, सुरी इत्यादि कार्यरूप पदार्थ अनित्य व माती, सुवर्ण, पोलाद इत्यादि कारणरूप

पदार्थ नित्य असें ठरविलें. असे अनेक दृष्टांत देण्याचें कारण एवढेंच कीं सूज्ञ साधकानें सर्व भूतभौतिक कार्यांचे ठायीं मिथ्या दृष्टि करावी. ॥ ५३ ॥

पण कार्य मिथ्या आहे, असें समजल्यानें कोणता लाभ होणार ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतात:–

**कारणज्ञानतः कार्यविज्ञानं चापि सोवदत् ॥**
**सत्यज्ञानेऽनृतज्ञानं कथमत्रोपपद्यते ॥ ५४ ॥**

अन्वयः—सः कारणज्ञानतः कार्यविज्ञानं अपि अवदत् । अत्र सत्यज्ञाने अनृतज्ञानं कथं उपपद्यते ।

अर्थः—तो अरुणपुत्र कारणज्ञानामुळें कार्यज्ञान होतें, असेंही सांगता झाला. पण सत्याचें ज्ञान झाल्यानें असत्याचें ज्ञान होणें कसें युक्त होणार ?

विवरणः—मृत्तिका, सुवर्ण इत्यादि कारणांचें ज्ञान झालें असतां घटकुंडलादि कार्यांचेंही पूर्ण ज्ञान होतें, असें आरुणीनें स्पष्टपणें सांगितलें आहे. शंकाः—पण, परमार्थतः सत्य अशा कारणाच्या ज्ञानानें त्याच्याहून अगदीं विलक्षण अशा कार्याचें ज्ञान कसें होऊं शकेल ? ॥ ५४ ॥

समाधानः—

**समृत्कस्य विकारस्य कार्यता लोकदृष्टितः ॥**
**वास्तवोत्र मृदंशोस्य बोधः कारणबोधतः ॥ ५५ ॥**

अन्वयः—समृत्कस्य विकारस्य कार्यता लोकदृष्टितः । अत्र वास्तवः मृदंशः अस्ति। अस्य बोधः कारणबोधतः भवति ।

अर्थः—मृत्तिकेसह असणाऱ्या विकाराचें कार्यत्व लोकप्रसिद्ध आहे. पण या कार्यामध्यें जो खरा मृत्तिकेचा अंश असतो, त्याचा बोध कारणबोधावरून होतो. ॥ ५५ ॥

विवरणः—अधिष्ठानभूत मृत्तिकेसह घटादिरूप आरोपित विकारास कार्यत्व असतें. म्हणजे त्यास कार्य असें म्हणतात, हें आबालवृद्धांस ठाऊक आहे. कार्यामध्यें एक सत्य व दुसरा असत्य असे दोन अंश असतात. यास्तव; कारणाचें ज्ञान झालें कीं, कार्यांतील सत्य अंशाचें ज्ञान होतेंच. मग त्यांतील मिथ्या अंशाचें ज्ञान जरी न झालें, तरी सत्य ज्ञानास बाध येत नाहीं. ॥ ५५ ॥

कार्यातील सत्यांश जाणणें जसें अवश्य आहे, तसेंच मिथ्यात्व जाणणेंही अवश्य आहे कीं काय ? या प्रश्नाचा आतां उलगडा करितात:—

**अनृतांशो न बोद्धव्यस्तद्बोधानुपयोगतः ॥**

**तत्त्वज्ञानं पुमर्थं स्यान्नानृतांशावबोधनम् ॥ ५६ ॥**

अन्वयः—तद्बोधानुपयोगतः अनृतांशः न बोद्धव्यः । तत्त्वज्ञानं पुमर्थं स्यात् न अनृतांशावबोधनम् ।

अर्थः—मिथ्यांशाच्या ज्ञानाचा कांहीं उपयोग नसल्यामुळें त्याचें ज्ञान अवश्य नाहीं. कारण तत्त्वज्ञान जसें पुरुषोपयोगी असतें, तसें मिथ्यांशाचें ज्ञान असत नाहीं. ॥ ५६ ॥

विवरण:—कार्यातील मिथ्या अंशाचा जर कांहीं उपयोग असता, तर शास्त्रानें त्याच्या ज्ञानाविषयीं विधान केलें असतें. पण त्याचा पुरुषांस कांहीं उपयोग नाहीं. कारण मोक्षनामक पुरुषार्थ तत्त्वज्ञानानेंच मिळत असतो, असा सर्व शास्त्रांचा सिद्धांत आहे. ॥ ५६ ॥

आतां याविषयी पुनरपि शंका घेतात:—

**तर्हि कारणविज्ञानात्कार्यज्ञानमितीरिते ॥**

**मृद्बोधान्मृत्तिका बुद्धेत्युक्तं स्यात्कोऽत्र विस्मयः॥ ५७ ॥**

अन्वयः—तर्हि कारणविज्ञानात् कार्यज्ञानं इति ईरिते मृद्बोधात् मृत्तिका बुद्धा इति उक्तं स्यात् । अत्र कः विस्मयः ।

अर्थः—तर मग कारणाच्या यथार्थज्ञानानें कार्यज्ञान होतें, असें सांगितलें असतां मृत्तिकेच्या ज्ञानानें मृत्तिकेचें ज्ञान झालें, असें म्हटल्यासारखें होणार यामध्यें आश्चर्य काय आहे ? ॥ ५७ ॥

विवरण:—कारणज्ञानानें कार्यज्ञान होतें. या वाक्याचा अर्थ—मातीच्या ज्ञानानें मातीचें ज्ञान होतें—असा आहे. पण यामध्यें चमत्कार काय आहे, तें आम्हांस समजलें नाहीं. कारण मातीच्या ज्ञानानें मातीचें ज्ञान होतें, असें जर कोणी सामान्य मनुष्यानें म्हटलें, तर भाषाभिज्ञ त्यास हंसतील, यांत मुळींच संदेह नाहीं. ॥ ५७ ॥

आतां या शंकेचें समाधान करितात:—

**सत्यं कार्येषु वस्त्वंशः कारणात्मेति जानतः ॥**
**विस्मयो मास्त्विहाज्ञस्य विस्मयः केन वार्यते ॥ ५८ ॥**

अन्वय:—सत्यं, कार्येषु वस्त्वंशः कारणात्मा इति जानतः विस्मयः मा अस्तु । किं तु इह अज्ञस्य विस्मयः केन वार्यते ।

अर्थ:—खरें आहे. कार्यामध्यें असलेला सत्य अंश कारणरूप आहे, असें जाणणाऱ्यास विस्मय वाटत नाहीं, पण यांविषयीं अज्ञास वाटणारा विस्मय कोणाकडून निवारण केला जाणार आहे. ॥ ५८ ॥

विवरण:—जे विवेकी आहेत, त्यांना याविषयीं आश्चर्य वाटणार नाहीं हें खरें, पण दुसरे जे पुष्कळसे अज्ञानी आहेत त्यांना ' कारणज्ञानानें कार्यज्ञान होतें ' हें वाक्य आश्चर्यचकित करील, यांत कांहीं शंका नाहीं. कारण घटादि कार्यांतील वास्तविक अंश उपादान कारणाचाच आहे. असें ऐकून ' असें कसें होईल ? कारण निराळें व कर्म निराळें; त्यांचें अंशत: ऐक्य कसें होऊं शकेल ? ' इत्यादिप्रकारें त्यांना आश्चर्य वाटणें साहजिक आहे. ॥ ५८ ॥

आतां अविवेक्यांस कार्यकारणांचें ऐक्य ऐकून आश्चर्य कसें वाटतें, तें सांगतात:–

**आरंभी परिणामी च लौकिकश्चैककारणे ॥**
**ज्ञाते सर्वमतिं श्रुत्वा प्राप्नुवंत्येव विस्मयम् ॥ ५९ ॥**

अन्वय:—आरंभी, परिणामी, च लौकिकः एककारणे ज्ञाते सर्वमतिं श्रुत्वा विस्मयं प्राप्नुवन्ति एव ।

अर्थ:—आरंभवादी, परिणामवादी व लौकिक एका कारणाचें ज्ञान झालें असतां अनेक कार्यांचें ज्ञान होतें, असें ऐकून विस्मयास प्राप्त होतातच.॥५९॥

विवरण:—आरंभ ह्मणजे समवायी[1], असमवायी[2], व निमित्त[3] या तीन कारणांहून भिन्न अशा कार्याची उत्पत्ति. अशी उत्पत्ति जो सांगतो ह्मणजे अशाप्रकारेंच कार्याची

१ कारणद्रव्य कार्याचें समवायी कारण असतें. २ कारणगुण कार्याच्या गुणांचें असमवायी कारण होय. ३ कर्ता, साधनें इत्यादि कार्याचीं निमित्त कारणें होत.

उत्पत्ति झाली आहे असें जो मानतो व लोकांस सांगतो, त्यास आरंभवादी ह्मणतात. सहा शास्त्रांतील न्याय व वैशेषिक शास्त्रें आरंभवादी आहेत. परिणाम ह्मणजे पूर्वरूप टाकून दुसऱ्या रूपाची प्राप्ति होणें. अशा परिणामाचें जो प्रतिपादन करितो, ह्मणजे कार्य, कारणाचा परिणाम आहे असें जो मानतो व लोकांस सांगतो, त्यास परिणामवादी ह्मणतात. सहा शास्त्रांतील योगशास्त्र व सांख्यशास्त्र हीं परिणामवादी आहेत. पण ही दोन्हीप्रकारची शास्त्रीय प्रक्रिया ज्यांस ठाऊक नसते व जे केवल व्यवहारचतुर असतात त्यांस लौकिक ह्मणतात. या त्रिवर्गांनाही एका कारणाच्या ज्ञानानें सर्व कार्यजाताचें ज्ञान होतें, असें कोणीं सांगितल्यास मोठें आश्चर्य वाटतें ! ॥ ५९ ॥

पण यथाश्रुत ( ह्म. वाच्य, सहज ध्यानांत येणारा ) अर्थ सोडून असें क्लिष्ट व्याख्यान करण्याचें काय प्रयोजन ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतातः—

**अद्वैतेऽभिमुखीकर्तुमेवात्रैकस्य बोधतः ॥**
**सर्वबोधः श्रुतौ नैव नानात्वस्य विवक्षया ॥ ६० ॥**

अन्वयः—अद्वैते अभिमुखीकर्तुं एव अत्र श्रुतौ एकस्य बोधतः सर्वबोधः उक्तः । नानात्वस्य विवक्षया न एव ।

अर्थः—शिष्यास अद्वैताभिमुख करण्याकरितांच या श्रुतीमध्यें एकाच्या ज्ञानानें सर्व ज्ञान सांगितलेलें आहे. अनेकत्व आहे, असें सांगण्याच्या इच्छेनें नव्हे. ॥ ६० ॥

विवरणः—शिष्यास अद्वैतशास्त्रांत प्रवृत्त करण्याकरितांच छान्दोग्य श्रुतीमध्यें एका कारणाचें ज्ञान झाल्यानें सर्व कार्यांचें ज्ञान होतें असें सांगितलें आहे. अनेक कार्यांचें ज्ञान व्हावें पाहिजे, असें श्रुतीनें कोठेंही सांगितलेलें नाहीं. सारांश, श्रुतीचें तात्पर्य अद्वैतामध्यें आहे. द्वैतांत नव्हे. ॥ ६० ॥

सारांशः—

**एकमृत्पिंडविज्ञानात्सर्वमृण्मयधीर्यथा ॥**
**तथैकब्रह्मबोधेन जगद्बुद्धिर्विभाव्यताम् ॥ ६१ ॥**

अन्वयः—एकमृत्पिंडविज्ञानात् यथा सर्वमृण्मयधीः भवति । तथा एकब्रह्मबोधेन जगद्बुद्धिः विभाव्यताम् ।

अर्थः—एका मृत्तिकेच्या पिंडाचें ज्ञान झालें असतां जसें मृण्मय कार्याचें ज्ञान होतें, त्याप्रमाणें एका ब्रह्मज्ञानानें सर्व जगाचें ज्ञान होतें, असें समजावें.

विवरणः—" मातीचीं सर्वही भांडीं, कवलें, परळें, इत्यादि सर्व पदार्थ मातीच्या गोळ्यांचाच विकार असल्यामुळें मातीचें ज्ञान झालें असतां सर्व मृत्कार्याचें ज्ञान होतें. " या श्रुतीनें सांगितलेल्या दृष्टांताप्रमाणेंच एका ब्रह्माचें ज्ञान झालें कीं त्याच्या कार्यरूप अशा या सर्व जगाचेंही ज्ञान होतें, असें समजावें. कारण ब्रह्म प्रकृतिद्वारा जगाचें उपादान कारण आहे, हें पूर्वीं ठरलेलें आहे. ॥ ६१ ॥

आतां ब्रह्म व जगत् यांचें स्वरूप सांगतातः—

**सच्चित्सुखात्मकं ब्रह्म नामरूपात्मकं जगत् ॥**
**तापनीये श्रुतं ब्रह्म सच्चिदानंदलक्षणम् ॥ ६२ ॥**

अन्वयः—ब्रह्म सच्चित्सुखात्मकं च जगत् नामरूपात्मकं अस्ति । तापनीये ब्रह्म सच्चिदानंदलक्षणं श्रुतं अस्ति ।

अर्थः—ब्रह्म सत्, चित् व आनन्दरूप आणि जगत् नामरूपात्मक आहे. उत्तरतापनीय नामक उपनिषदांत सत् चित् व आनंदरूप ब्रह्म सांगितलें आहे.

विवरणः—नाम व रूप (आकार) यांच्या पलीकडे जगत् ह्मणून कांहीं नाहींच. ब्रह्म तर त्रिकालाबाधित, चैतन्यरूप, व आनंदरूप आहे. ब्रह्माचें हें स्वरूपलक्षण अथर्ववेदाच्या नृसिंहोत्तरतापनीय नामक उपनिषदांत सांगितलेलें आहे. ॥ ६२ ॥

दुसऱ्या श्रुतींमध्येंही ब्रह्माचें प्रस्तुत लक्षण आढळतें, असें आतां त्या त्या श्रुतींचा साक्षात् निर्देश करून सांगतात—

**सद्रूपमारुणिः प्राह प्रज्ञानं ब्रह्म बव्हृचः ॥**
**सनत्कुमार आनंदमेवमन्यत्र गम्यताम् ॥ ६३ ॥**

अन्वय—आरुणिः सद्रूपं प्राह । बह्वृचः प्रज्ञानं ब्रह्म इति प्राहुः । सनत्कुमारः आनंदं आह । अन्यत्र एवं गम्यताम् ।

अर्थः—अरुणपुत्र सद्रूप सांगता झाला. ऋग्वेदीयांनीं प्रज्ञान ब्रह्म आहे असें ह्मटलें आहे, सनत्कुमार आनंदाचा उपदेश करिते झाले. सारांश, दुसऱ्या श्रुतींमध्येंही असेंच जाणावें. ॥ ६३ ॥

विवरणः—छान्दोग्याच्या सहाव्या अध्यायांत अरुणपुत्र उद्दालक आपल्या पुत्रास 'हे प्रियपुत्रा, सृष्टीच्या उत्पत्तिपूर्वी हें सर्वजग सत् होतें' अशा रीतीनें सद्रूप ब्रह्माचा उपदेश करिता झाला. त्यावरून ब्रह्माच्या सत् या रूपाचें ज्ञान होतें. ऐतरेयोपानषदाच्या पांचव्या खंडांत ' प्रज्ञान हेंच ब्रह्म आहे ' असें सांगितलें आहे. तसेंच छान्दोग्याच्या आठव्या अध्यायांत सनत्कुमार नामक गुरु आपल्या नारदसंज्ञक प्रसिद्ध शिष्यास ' भूमा नामक ईश्वरास जाणण्याची इच्छा करावी. जो भूमा तेंच सुख होय. कारण परिच्छिन्न पदार्थांत सुख नसतें.' असे सांगते झाले. तैत्तिरीयादि दुसऱ्याही अनेक श्रुतींत ' आनंदो ब्रह्म ' इत्यादिप्रकारें निर्देश आहे. ॥ ६३ ॥

**विचिंत्य सर्वरूपाणि कृत्वा नामानि तिष्ठति ॥**
**अहं व्याकरवाणीमे नामरूपे इति श्रुतेः ॥ ६४ ॥**

अन्वयः—सर्वरूपाणि विचिन्त्य च नामानि कृत्वा तिष्ठति । अहं इमे नामरूपे व्याकरवाणि इति श्रुतेः ।

अर्थः—सर्व रूपांविषयीं पूर्ण चिंतन करून व नांवें ठेऊन तो राहातो. मीं हीं नामरूपें व्यक्त करावीं अशी श्रुति आहे. ॥ ६४ ॥

विवरणः—' जो ज्ञानरूप ईश्वर सर्व स्वरूपांविषयीं ( आकृतींविषयीं ) चिंतन करून व त्यांस नांवें देऊन त्याप्रमाणें त्यांचा व्यवहारांत उपयोग करीत राहातो ' अशी व आतां ' मीं हीं नामरूपें व्यक्त करितों ' इत्यादि अर्थाच्या अनेक श्रुति असल्यामुळें जग नामरूपात्मक आहे, असा निश्चय करितां येतो. ॥ ६४ ॥

याविषयींच आणखी एका श्रुतीचा निर्देश करितातः–

**अव्याकृतं पुरा सृष्टेरूर्ध्वं व्याक्रियते द्विधा ॥**
**अचिंत्यशक्तिर्मायैषा ब्रह्मण्यव्याकृताभिधा ॥ ६५ ॥**

अन्वयः—सृष्टेः पुरा अव्याकृतं वर्तते । ऊर्ध्वं द्विधा व्याक्रियते । या एषा ब्रह्मणि अचिंत्यशक्तिः माया अस्ति सा अव्याकृताभिधा ।

अर्थः—सृष्टीच्या पूर्वी अव्याकृत असतें तेंच पुढें दोन प्रकारें व्यक्त होतें. जी ही ब्रह्माच्या ठायीं अचिंत्य शक्ति माया असते, तीच अव्याकृत संज्ञक होय. ॥ ६५ ॥

विवरणः—बृहदारण्यकांत सांगितलें आहे कीं 'पूर्वी हें जग अव्यक्त होतें. पण तेंच पुढें बीजांकुरन्यायानें नामरूपद्वारा व्यक्त झालें.' ह्मणजे हा अमुक पदार्थ अमुक नांवाचा व अमुक आकाराचा आहे, इत्यादिप्रकारें व्यवहार करितां येण्यासारखा अवस्थेस तें पोंचलें. या सर्वांचें तात्पर्य असें—सृष्टीच्या पूर्वी हें जग अव्याकृत होतें.' ह्मणजे त्याचें नांव व रूप व्यक्त नव्हतें. पण सृष्टिसमयीं तें वाच्य व वाचक, ह्मणजे घटादि पदार्थ व घट, पट, मठ इत्यादि शब्द यांच्या योगानें तें व्यक्त झालें. उत्पत्तीच्या पूर्वी जी अव्यक्त अवस्था होती, त्या अचिंत्य शक्तीसच माया ह्मणतात. अव्याकृत असें या अवस्थेचेंच नांव होय. ॥ ६५ ॥

आतां नामरूप या शब्दांचा अर्थ स्पष्ट करितातः—

**अविक्रियब्रह्मनिष्ठा विकारं यात्यनेकधा ॥**
**मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ॥ ६६ ॥**

अन्वयः—अविक्रियब्रह्मनिष्ठा अनेकधा विकारं याति । मायां तु प्रकृतिं विद्यात् तु मायिनं महेश्वरं विद्यात् ।

अर्थः—विकारशून्य अशा ब्रह्मामध्यें राहाणारी ती माया अनेक प्रकारें विकार पावते. मायेस प्रकृति समजावें व ती माया ज्याच्या जवळ असते, त्या मायावीस महेश्वर समजावें. ॥ ६६ ॥

विवरणः—कोणत्याही समयीं विकार न पावणाऱ्या ब्रह्माच्या आश्रयानें ती माया असते व सृष्टिकाल प्राप्त झाला असतां ती भूतें व भौतिक पदार्थ यांच्या योगानें विकार पावते. आतां याविषयीं प्रमाण काय ह्मणून विचाराल तर सांगतों; "या पूर्वोक्त मायेलाच जगाचें उपादान कारण ह्मणावें. व तिला आश्रय देणाऱ्या ब्रह्माला महेश्वर ह्मणावें" अशा अर्थाची श्रुति, याविषयीं प्रमाण आहे. ॥ ६६ ॥

आतां मायारूप उपाधीनें युक्त असलेल्या ब्रह्माचें पहिलें कार्य सांगतातः—

**आद्यो विकार आकाशः सोऽस्ति भात्यपि च प्रियः**
**अवकाशस्तस्य रूपं तन्मिथ्या न तु तत्रयम् ॥ ६७ ॥**

अन्वयः—आद्यः विकारः आकाशः सः अस्ति भाति अपि च प्रियः । तस्य रूपं अवकाशः । तत् मिथ्या । तु तत् त्रयं न ।

अर्थः—प्रथमविकार आकाश होय. तें आहे, भासतें व प्रियरूप असतें. त्याचें स्वतःचें रूप अवकाश होय. पण तें मिथ्या आहे व पूर्वोक्त तीन गुण मिथ्या नव्हेत. ।। ६७ ।।

विवरणः—सोपाधिक ब्रह्माचें पहिलें कार्य आकाश होय. त्याच्यामध्यें तीन कारणाचे व एक स्वतःचा असे चार गुण राहतात. अस्तित्व, भान, व प्रियता हे त्याच्या कारणापासून आलेले गुण असून अवकाश हें त्याचें स्वतःचें रूप आहे. पण तें मिथ्या आहे. कारण कार्याचे गुण सर्वदा अनित्य असतात. अर्थात् अस्तित्वादि कारण गुण नित्य होत. ॥ ६७ ॥

आतां आकाशाचें अवकाश हें रूप मिथ्या कां असें कोणी विचारतील ? म्हणून सांगतात.—

न व्यक्तेः पूर्वमस्त्येव न पश्चाच्चापि नाशतः ॥
आदावन्ते च यन्नास्ति वर्तमानेऽपि तत्तथा ॥ ६८ ॥

अन्वयः—व्यक्तेः पूर्वं न अस्ति एव । च नाशतः पश्चात् अपि न । यत् आदौ अंते च न अस्ति तत् वर्तमाने अपि तथा ।

अर्थः—जें व्यक्त होण्याच्या पूर्वी नसतेंच व नाशानंतरही नसतें. आणि जें पूर्वीं व नंतर नसतें तें वर्तमानकालींही तसेंच असतें. (नसतें.) ॥ ६८ ॥

विवरणः—अवकाशसंज्ञक आकाशाचें जें रूप आहे, तें आकाशाची उत्पत्ति होण्यापूर्वीं व नंतर नसतें. आणि जें उत्पत्तिपूर्वी नाहीं व नाशानंतर नसतें, तें स्थिति-कालीं मात्र भासणारें आकाशाचें रूपही असत् आहे; केवल भासमान होणारें आहे; असें समजावें. ॥ ६८ ॥

याविषयीं आतां श्रीकृष्णांच्या वचनाचें प्रमाण देतात:—

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ॥
अव्यक्तनिधनान्येवेत्याह कृष्णोर्जुनं प्रति ॥ ६९ ॥

अन्वयः—हे भारत, अव्यक्तादीनि व्यक्तमध्यानि च अव्यक्तनिधनानि एव भूतानि इति कृष्णः अर्जुनं प्रति आह।

असें कसें ? ह्मणून विचाराल तर सांगतों:—

**आनुकूल्ये हर्षधीः स्यात्प्रातिकूल्ये तु दुःखधीः ॥**
**द्वयाभावे निजानन्दो निजदुःखं न तु क्वचित् ॥ ७३ ॥**

अन्वय:—आनुकूल्ये हर्षधीः स्यात् प्रातिकूल्ये तु दुःखधीः । द्वयाभावे निजानंदः । निजदुःखं तु क्वचित् अपि न ।

**अर्थः—अनुकूलतेमध्यें हर्षबुद्धि होते व प्रतिकूलतेमध्यें दुःख बुद्धि होते. पण या दोन्ही बुद्धींचा अभाव झाला असतां निजानंद होतो. निजदुःख तर कधीही होत नाहीं. ॥ ७३ ॥**

विवरणः—जो पदार्थ आपणांस अनुकूल वाटतो, त्याची प्राप्ति झाली असतां किंवा प्राप्ति होणार असें समजलें असतां मन हर्षयुक्त होतें व जो पदार्थ आपणांस प्रतिकूल वाटतो त्याची प्राप्ति झाली असतां किंवा प्राप्ति होणार असें समजलें असतां मन दुःखपूर्ण होतें. पण या दोन्ही अंतःकरणाच्या वृत्ति आहेत. त्यामुळें त्या जरी एक सुखरूप व दुसरी दुःखरूप अशा दोन प्रकारच्या भासल्या, तरी वस्तुतः दुःखरूपच आहेत. सर्व वृत्तींचा निरोध झाल्यावरच आत्मानंदाचा अनुभव येत असतो. सर्व वृत्तींचा निरोध झाल्यावर आत्मानंदाप्रमाणें आत्मदुःखाचा अनुभव येत नसल्यामुळें आत्मा आनंदरूपच आहे, असा भाग्यवान् मुमुक्षूंस निश्चय करितां येतो. ॥७३॥

तात्पर्य:—

**निजानन्दे स्थिरे हर्षशोकयोर्व्यत्ययः क्षणात् ॥**
**मनसः क्षणिकत्वेन तयोर्मानसतेष्यताम् ॥ ७४ ॥**

अन्वय:—निजानंदे स्थिरे सति हर्षशोकयोः व्यत्ययः क्षणात् स्यात् । च मनसः क्षणिकत्वेन तयोः मानसता इष्यताम् ।

**अर्थः—आत्मानंद स्थिर झाला असतां हर्ष व शोक यांचा नाश एका क्षणांत होतो. व मनास क्षणिकत्व असल्यामुळें हर्ष व शोक यांस मानसता आहे, असें मानावें. ॥ ७४ ॥**

**विवरणः—हा आत्मानंद स्थिर झाला असतां हर्ष व शोक या दोन्ही वृत्ति लीन होतात. व्यत्ययः—या शब्दाचा येथें 'सर्व प्रकारें नाश' असा अर्थ करावा.**

मन क्षणिक असल्यामुळें त्याच्यामुळेंच भासणाऱ्या या हर्षशोकांसही मानसता म्हणजे मानसपणा आहे, असा अंगीकार करावा. आणि हर्ष व शोक मनोमय असल्यामुळें व तें मनच स्वतः क्षणिक असल्यामुळें, तेही क्षणिक आहेत असें समजावें. ॥ ७४ ॥

हाच प्रकार आतां दार्ष्टांतिकाच्या ठायीं योजून दाखवितात:–

**आकाशेऽप्येवमानन्दः सत्ताभाने तु सम्मते ॥**
**वाय्वादिदेहपर्यन्तं वस्तुष्वेवं विभाव्यताम् ॥ ७५ ॥**

अन्वयः—एवं आकाशे अपि आनंदः अस्ति । सत्ताभाने तु संमते । वाय्वादि देहपर्यंतवस्तुषु एवं विभाव्यताम् ।

अर्थः—ह्याप्रमाणें आकाशामध्येंही आनंद आहे. सत्ता व भान तर तुम्हांसही मान्य आहे. सारांश, वायूपासून देहापर्यंत ज्या वस्तू आहेत त्या सर्वांमध्यें अशीच भावना करावी. ॥ ७५ ॥

विवरण:—स्वात्म्यामध्यें आनंद आहे, असें पूर्वी सिद्ध केलें आहे, त्याप्रमाणें आकाशामध्येंही आनंद आहे. त्याच्या अस्तित्वाविषयीं व प्रत्ययाविषयीं तर कोणाही वाद करणार नाहींच. सारांश वायु, तेज, इत्यादि सर्व वस्तूंच्या ठायींही अशीच योजना करावी. ॥ ७५ ॥

आतां वायु, तेज इत्यादि भूतांचे असाधारण धर्म सांगतात:–

**गतिस्पर्शौ वायुरूपं वन्हेर्दाहप्रकाशने ॥**
**जलस्य द्रवता भूमेः काठिन्यं चेतिनिर्णयः ॥ ७६ ॥**

अन्वयः—गतिस्पर्शौ वायुरूपम् । वह्नेः दाहप्रकाशने । जलस्य द्रवता च भूमेः काठिन्यं इति निर्णयः ।

अर्थः—गति व स्पर्श हें वायूचें रूप आहे; अग्नीचें दाह व प्रकाश हें रूप आहे; जलाचें स्वरूप द्रवत्व व भूमीचें काठिन्य असा निर्णय समजावा. ७६

विवरणः—या श्लोकांत वायु, तेज, उदक व भूमि या भूतांचे मुख्य धर्म कोणते आहेत, हें सांगितलें आहे. भूतविवेक नामक दुसऱ्या प्रकारांत याविषयीं विस्तृत विवेचन होऊन गेलेलें असल्यामुळें त्याचा आतां पुनः विस्तार करीत नाहीं. ॥ ७६ ॥

असाधारण आकार औषध्यन्नवपुष्यपि ॥
एवं विभाव्यं मनसा तत्तद्रूपं यथोचितम् ॥ ७७ ॥

अन्वयः---एवं औषध्यन्नवपुषि अपि असाधारणः आकारः ज्ञेयः । एवं मनसा यथोचितं तत्तद्रूपं विभाव्यम् ।

अर्थः---ह्याप्रमाणें औषधि, अन्न, शरीर इत्यादिकांमध्यें असाधारण आकार जाणावा. ह्याप्रमाणें मनानें त्या त्या रूपाचें यथायोग्यपणें चिंतन करावें. ७७

विवरणः---गेल्या श्लोकांत सांगितलेल्या पद्धतीनेंच वृक्ष, वेली, धान्य, शरीरें इत्यादिकांमध्येंही असाधारण धर्म कोणता आहे, त्याचा निश्चय करावा. तात्पर्य, मनांमध्यें विचार करून सर्व पदार्थांतील असाधारण धर्म अशाच रीतीनें ओळखावा. ७७

सारांशः---

अनेकधा विभिन्नेषु नामरूपेषु चैकधा ।
तिष्ठन्ति सच्चिदानन्दा विसंवादो न कस्य चित् ॥ ७८ ॥

अन्वयः---अनेकधा विभिन्नेषु नामरूपेषु सच्चिदानंदाः एकधा तिष्ठन्ति । अत्र कस्यचित् विसंवादः न अस्ति ।

अर्थः---अनेक प्रकारें अति भिन्न झालेल्या नामरूपात्मक जगामध्यें सत् चित् व आनंद एकरूपानेंच स्थित आहेत याविषयीं कोणाचाही फारसा वाद नाही. ॥ ७८ ॥

विवरणः---जगांतील प्रत्येक पदार्थ भिन्न भिन्न असून त्यांचीं नांवें व आकारही भिन्न भिन्न असतात. पण त्यांतील प्रत्येकामध्यें सत्ता, भान व प्रियरूपता हे धर्म असतात व याविषयीं कोणाचा फारसा वादही नाहीं. ॥ ७८ ॥

तर मग प्रतीत होणाऱ्या नामरूपाची काय वाट ? असें कोणी विचारील म्हणून ग्रंथकार म्हणतात:---

निस्तत्त्वे नामरूपे द्वे जन्मनाशयुते च ते ॥
बुद्ध्या ब्रह्मणि वीक्षस्व समुद्रे बुद्बुदादिवत् ॥ ७९ ॥

अन्वयः—नामरूपे द्वे निस्तत्वे च जन्मनाशयुते अतः समुद्रे बुद्बुदादिवत् बुद्ध्या ते ब्रह्मणि वीक्षस्व ।

अर्थः—नाम व रूप हीं दोन्ही निस्तत्त्व व जन्मनाशयुक्त आहेत; यास्तव समुद्रांतील बुडबुडे फेंस इत्यादिकांप्रमाणें बुद्धीच्या योगानें तीं ब्रह्मामध्यें पहा.

विवरणः—समुद्रामध्यें लाटा, बुडबुडे, फेंस इत्यादि अनेक विकार होतात. पण वस्तुतः ते समुद्राहून भिन्न नसतात, हें सर्वास ठाऊक आहेच. शिवाय ते कांहीं निमित्तामुळे उत्पन्न होणारे व निमित्ताचा नाश झाला असता नाश पावणारे असतात. आणि या सर्व कारणांवरून समुद्र नित्य व त्याचे विकार अनित्य असा निश्चय होतो. या दृष्टान्ताप्रमाणेंच हें सर्व नामरूपात्मक जगत् स्वतः तत्वशून्य व जन्मनाशयुक्त असल्यामुळें मिथ्या आहे व त्याचा ब्रह्माचे ठायीं आभास होत असल्यामुळें तें ब्रह्मच सत्य व तत्त्वभूत आहे असा विवेकाच्या योगानें निश्चय करावा. ॥ ७९ ॥

पुढें:—

**सच्चिदानन्दरूपेऽस्मिन्पूर्णे ब्रह्मणि वीक्षिते ॥**
**स्वयमेवावजानाति नामरूपे शनैः शनैः ॥ ८० ॥**

अन्वयः—अस्मिन् पूर्णे सच्चिदानंदरूपे ब्रह्मणि वीक्षिते सति नामरूपे शनैः शनैः स्वय एव अवजानाति ।

अर्थः—या पूर्ण सच्चिदानंदरूप ब्रह्मास पाहिलें असतां नाम व रूप यांची हळु हळु आपोआप मुमुक्षु अवज्ञा करूं लागतो. ॥ ८० ॥

विवरणः—अधिष्ठानाचें ज्ञान झालें असतां विकारांचें तत्त्व समजतें व त्यामुळें त्यांविषयीं हळु हळु अनादर वाटूं लागतो. ॥ ८० ॥

ह्मणजे:—

**यावद्यावदवज्ञा स्यात्तावत्तावत्तदीक्षणम् ॥**
**यावद्यावद्वीक्ष्यते तत्तावत्तावदुभे त्यजेत् ॥ ८१ ॥**

अन्वयः—यावत् यावत् अवज्ञा स्यात् तावत् तावत् तदीक्षणम् । यावत् यावत् तत् वीक्ष्यते तावत् तावत् उभे त्यजेत् ।

अर्थः—जशी जशी अवज्ञा होत जाते तसें तसें त्याचें दर्शन स्पष्ट होतें. व जसें जसें त्याचें दर्शन होतें तसा तसा त्या उभयतांचा त्याग होतो. ॥८१

विवरणः—द्वैताविषयीं पूर्ण अनादर वाटल्यावांचून ब्रह्मज्ञान दृढ होत नाहीं. यास्तव मोठ्या प्रयत्नानें द्वैताचा अनादर करावा व तो जसा जसा अधिक होऊं लागतो, तसा तसा साक्षात्कार वाढतो, व जसा जसा साक्षात्कार वाढेल तसा तसा त्या नामरूपाचा त्याग करावा. ॥ ८१ ॥

आतां द्वैताचा अनादर व आत्मदर्शन यांच्या अभ्यासापासून कोणता लाभ होतो तें सांगतातः—

तदभ्यासेन विद्यायां सुस्थितायामयं पुमान् ॥
जीवन्नेव भवेन्मुक्तो वपुरस्तु यथा तथा ॥ ८२ ॥

अन्वयः—तदभ्यासेन विद्यायां सुस्थितायां सत्यां अयं पुमान् जीवन् एव मुक्तः भवेत् । ततः परं वपुः यथा तथा अस्तु ।

अर्थः—त्यांच्या अभ्यासानें विद्या अति स्थिर झाली असतां हा पुरुष जीवनमुक्तच होतो. त्यानंतर शरीर कसेंही राहो. ॥ ८२ ॥

विवरणः—नामरूपात्मक द्वैताचा अनादर व सर्वांमध्यें भरून राहिलेल्या सच्चिदानंदाचें सतत अनुसंधान या उभयतांचाही दीर्घकाल अभ्यास घडून विद्या दृढ झाली असतां साधक जीवन्मुक्त होतो. हा परम लाभ एकदा झाला कीं मग नाश पावणारें शरीर कसेंही व कोठेंही का राहीना. त्याच्यामुळें साधकाची कांहींएक हानि होत नाहीं. ॥ ८२ ॥

आतां ब्रह्माभ्यासाचें स्वरूप सांगतातः—

तच्चिंतनं तत्कथनमन्योन्यं तत्प्रबोधनम् ॥
एतदेकपरत्वं च ब्रह्माभ्यासं विदुर्बुधाः ॥ ८३ ॥

अन्वयः—तच्चिंतनं तत्कथनं अन्योन्यं तत्प्रबोधनं च एतदेकपरत्वं बुधाः ब्रह्माभ्यासं विदुः ।

अर्थः—त्या चिद्रूपब्रह्माचेंच चिंतन करणें त्या निजानंदाचेंच कीर्तन करणें कोणाची गांठ पडली असतां परस्पर त्याचाच उत्तम प्रकारें बोध करणें

व येणें प्रमाणें त्या सद्रूपाचे ठिकाणीं आत्मपरच होऊन राहाणें, यास ज्ञानी ब्रह्माभ्यास समजतात. ॥ ८३ ॥

विवरणः—सातव्या प्रकरणांत हाच श्लोक आलेला आहे. यास्तव याचें व्याख्यान ज्यास पाहावयाचें असेल त्यांनीं तेथें पाहावें. ॥ ८३ ॥

पण अनादि कालापासून प्रवृत्त झालेल्या वासनेचा क्षय कसा होणार ? असें कोणी विचारील ह्मणून श्रीभारतीतीर्थ सांगतातः—

**वासनानेककालीना दीर्घकालं निरंतरम् ॥**
**सादरं चाभ्यस्यमाने सर्वथैव निवर्तते ॥ ८४ ॥**

अन्वयः—अनेककालीना वासना दीर्घकालं निरंतरं च सादरं अभ्यस्यमाने सति सर्वथा एव निवर्तते ।

अर्थः—अनेक कालाची ही वासना दीर्घकाल, अहोरात्र व आदरपूर्वक अभ्यास केला असतां संपूर्णपणेंच निवृत्त होते. ॥ ८४ ॥

विवरणः—अनादि कालापासून प्रवृत्त झालेल्या वासनेस **अनेककालीना** असें येथें ह्मटलें आहे. ती जरी परमेश्वराप्रमाणेंच अति प्राचीन आहे हें खरें आहे, तरी अनेक वर्षें किंवा अनेक जन्मही अहोरात्र व आदरपूर्वक ब्रह्माभ्यास केला असतां ती पूर्णपणें निवृत्त होते. ॥ ८४ ॥

पण, एक व अद्वितीय ब्रह्म अनेक पदार्थांनीं भरलेल्या जगाचें कारण कसें होतें ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतातः—

**मृच्छक्तिवद्ब्रह्मशक्तिरनेकाननृतान्सृजेत् ॥**
**यद्वा जीवगता निद्रा स्वप्नश्चात्र निदर्शनम् ॥ ८५ ॥**

अन्वयः—मृच्छक्तिवत् ब्रह्मशक्तिः अनेकान् अनृतान् सृजेत् । यद्वा जीवगता निद्रा च स्वप्नः अत्र निदर्शनं अस्ति ।

अर्थः—मृत्तिकारूप शक्तीप्रमाणें ही ब्रह्मशक्ति अनेक मिथ्या पदार्थांस निर्माण करिते. किंवा जीवगत निद्रा व स्वप्न यांचा येथें दृष्टांत घ्यावा. ॥८५॥

विवरणः—ज्याप्रमाणें मृत्तिकारूप शक्तिपासून घटादि अनेक आकार होतात, त्याप्रमाणेंच या मायाख्य ब्रह्मशक्तीच्या द्वारा हें विचित्र जग होतें असें समजावें.

पण मृत्तिकेंतील शक्ति सत्य असल्यामुळें ती अनेक कार्यांस कारण होऊं शकते. हें ह्मणणें जरी बरोबर आहे, तरी तोच न्याय ब्रह्मशक्तीच्या ठायीं लागू करणें बरोबर नाहीं. कारण ती मिथ्या आहे असें तुह्मींच आपल्या तोंडानें सांगत असतां, असें कदाचित् कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार ह्मणतात.–अथवा जीवाची निद्रा व स्वप्न यांच्या क्रमानें शक्ति व कार्य यांस दृष्टांत द्यावा. हा दृष्टांत पुढें स्पष्ट होणार आहे. ॥ ८५ ॥

**निद्राशक्तिर्यथा जीवे दुर्घटस्वप्नकारिणी ॥**
**ब्रह्मण्येषा स्थिता माया सृष्टिस्थित्यंतकारिणी ॥ ८६ ॥**

**विवरणः**—यथा जीवे निद्राशक्तिः दुर्घटस्वप्नकारिणी तथा ब्रह्मणि एषा माया सृष्टिस्थित्यंतकारिणी स्थिता अस्ति ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें जीवाच्या स्वरूपांत निद्राशक्ति अघटित स्वप्न करविणारी असते, त्याप्रमाणें ब्रह्माच्या ठिकाणीं जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करविणारी ही माया आहे. ॥ ८६ ॥

**विवरणः**—आभासरूप जीवामध्यें निद्राशक्ति राहाते व ती स्वसामर्थ्यानें कधींही न घडणारें असें स्वप्न दाखविते, हें सुप्रसिद्ध आहे. त्याप्रमाणेंच शबल ब्रह्माचे ठिकाणीं ही मायासंज्ञक शक्ति राहाते व ती या विचित्र जगाची उत्पत्ति, स्थिति व प्रलय करिते. ॥ ८६ ॥

आतां, जीवस्थ निद्रा दुर्घट स्वप्नही कसें करिते, तें सांगतातः—

**स्वप्ने वियद्गतिं पश्येत्स्वमूर्द्धच्छेदनं यथा ॥**
**मुहूर्ते वत्सरौघं च मृतपुत्रादिकं पुनः ॥ ८७॥**

**अन्वयः**—जीवः स्वप्ने वियद्गतिं पश्येत् यथा स्वमूर्धच्छेदनं पश्येत् । मुहूर्ते वत्सरौघं च मृतपुत्रादिकं पुन; पश्येत् ।

**अर्थः—जीव स्वप्नामध्यें मी आकाशांत चालत आहें असें पाहातो; तसेंच आपलें मस्तक तुटलें आहे असें पाहातो; एका मुहुर्तांत अनेक वर्षे लोटलीं आहेत असें मानून मेलेल्या पुत्रादिकांस पुनः पाहातो. ॥ ८७ ॥**

विवरणः—स्वप्नांमध्यें काय काय दिसतें, त्या सर्वांचा येथें संग्रह करणें अशक्य आहे. याकरितां ग्रंथकारांनीं प्रस्तुत श्लोकांत चार अघटित गोष्टींचा निर्देश केला आहे. त्यांचा बहुतेकांस अनुभव येत असेलच. ॥ ८७ ॥

शिवायः—

इदं युक्तमिदं नेति व्यवस्था तत्र दुर्लभा ॥
यथा यथेक्ष्यते यद्यत्तत्तद्युक्तं तथा तथा ॥ ८८ ॥

अन्वयः—इदं युक्तं इदं न इति व्यवस्था तत्र दुर्लभा। यत् यत् तथा तथा ईक्ष्यते तत् तत् तथा तथा युक्तम्।

अर्थः—हें युक्त आहे व हें नाहीं, अशी व्यवस्था तेथें दुर्लभ आहे. जें जें जसें जसें पाहिलें जातें, तें तें तसें तसेंच युक्त होय. ॥ ८८ ॥

विवरणः—स्वप्नामध्यें आपण जें जें पाहातों, तें तें योग्य आहे कीं अयोग्य आहे याचा तेव्हांच निकाल करितां येत नाहीं. कारण स्वप्नामध्यें प्राणी जें जें कांहीं जशा जशा प्रकारें पाहातो तें तें त्या त्याप्रमाणेंच युक्त आहे, असें त्यास वाटत असतें. त्याच्या विषयीं त्याला शंका अशी मुळींच येत नाहीं. ॥ ८८ ॥

आणिः—

ईदृशो महिमा दृष्टो निद्राशक्तेर्यदा तदा ॥
मायाशक्तेरचिंत्योयं महिमेति किमद्भुतम् ॥ ८९ ॥

अन्वयः—निद्राशक्तेः यदा ईदृशः महिमा दृष्टः तदा मायाशक्तेः अयं अचिंत्यः महिमा इति किं अद्भुतम्।

अर्थः—निद्राशक्तीचा जेव्हां अशा प्रकारचा महिमा दिसतो, तेव्हां मायाशक्तीचा असा अचिंत्य महिमा असला, तर त्यांत काय आश्चर्य आहे? ॥८९॥

विवरणः—म्हणजे निद्रेसारखी सामान्य व सर्व प्राणिसाधारणी अशी शक्ति ही जर एवढें आश्चर्य करूं शकते, तर अचिन्त्य प्रभाववाली ईश्वराची माया काय पाहिजे तें करील यांत काय संशय आहे ? व त्यामध्यें आश्चर्य तें कोणतें ? ॥ ८९ ॥

पण प्रवृत्तिशून्य ब्रह्मामध्यें राहाणारी ही माया जगाचें कारण कशी होऊं शकेल ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतातः—

**शयाने पुरुषे निद्रा स्वप्नं बहुविधं सृजेत् ॥**
**ब्रह्मण्येवं निर्विकारे विकारान्कल्पयत्यसौ ॥ ९० ॥**

**अन्वयः**—यथा शयाने पुरुषे निद्रा बहुविधं स्वप्नं सृजेत् एवं निर्विकारे ब्रह्मणि असौ विकारान् कल्पयति ।

**अर्थः**—ज्याप्रमाणें शयन करणाऱ्या पुरुषांचे ठायीं निद्रा नानाप्रकारच्या स्वप्नांस उत्पन्न करिते, त्याप्रमाणें विकारशून्य ब्रह्माचे ठायींही माया विकारांची कल्पना करिते. ॥ ९० ॥

**विवरण**:—पुरुष निश्चेष्ट होऊन शय्येवर स्वस्थ घोरत पडलेला असतो; पण निद्रा त्याच्यामध्यें अनेक क्रियांनीं व सुखदुःखांनीं युक्त असें स्वप्न निर्माण करिते, हें सर्वांस ठाऊक आहे. या दृष्टांताप्रमाणें या विकारशून्य आत्म्याच्या ठायीं ही ईश्वराची शक्ति असंख्य विकारांची कल्पना करिते. ॥ ९० ॥

मायेनें कोणकोणते पदार्थ निर्माण केले तें आतां सांगतातः—

**खानिलाग्निजलोर्व्यंडलोकप्राणिशिलादिकाः ॥**
**विकाराः प्राणिधीष्वंतश्चिच्छाया प्रतिबिंबता ॥ ९१ ॥**

**विवरण**:—खानिलाग्निजलोर्व्यंडलोकप्राणिशिलादिकाः विकाराः । प्राणिधीषु अंतः चिच्छाया प्रतिबिंबिता ।

**अर्थः**—आकाश, वायु, अग्नी, उदक, पृथ्वी, ब्रह्मांड, सत्यादिलोक, देवादि प्राणी शिलादिक विकार होत. प्राण्यांच्या अंतःकरणांत चैतन्याची छाया प्रतिबिंबित होते. ॥ ९१ ॥

**विवरण**:—आकाशादि सर्व विकार मायेपासून झालेले आहेत. **शिलादिकाः**—येथील आदि शब्दानें वृक्ष, वेली, इत्यादि सर्व पदार्थ घ्यावे. **वादी**:—सर्व पदार्थ जर पंचभूतांपासून झालेले आहेत तर त्यांतील कांहीं जड व कांहीं सचेतन असा भेद कां दिसतो ? **सिद्धान्ती**:—ज्या प्राण्यांच्या अंतःकरणांत चैतन्याचें प्रतिबिंब पडल्यामुळें त्यांचा व्यवहार होऊं लागतो, त्यांस सचेतन म्हणतात; व ज्यांच्यामध्यें हा चैतन्याभास पडत नाहीं त्यास जड म्हणतात. अर्थात् चेतन व अचेतन हा भेद औपाधिक आहे. ॥ ९१ ॥

वादीः—पण हा भेद ब्रह्मकृतच आहे असें ह्मटल्यास कोणता प्रत्यवाय येईल ? सिद्धान्तीः—प्रत्यक्ष प्रत्यवाय जरी न आला, तरी तें ह्मणणें युक्ति शून्य आहे. कारण—

**चेतनाचेतनेष्वेषु सच्चिदानंदलक्षणम् ॥**
**समानं ब्रह्म भिद्येते नामरूपे पृथक् पृथक् ॥ ९२ ॥**

अन्वयः—एषु चेतनाचेतनेषु सच्चिदानंदलक्षणं ब्रह्म समानं च नामरूपे पृथक् पृथक् भिद्येते ।

अर्थः—या चेतनाचेतनामध्यें सत् चित् व आनंदरूप ब्रह्म सारखेंच असतें पण नांव व रूप भिन्न भिन्न होत असतें. ॥ ९२ ॥

विवरणः—सचेतन व जड रूप अशा या द्विविध सृष्टीमध्यें ब्रह्म सर्वत्र सारखेंच भरून राहिलें आहे. ह्मणजे त्याच्या सत्, चित् व आनंद या गुणांची सर्व सृष्ट-पदार्थांत सारखीच व्याप्ति आढळते. यास्तव त्याच्या योगानें सृष्टीमध्यें जड व चैतन्य असा भेद झाला हें ह्मणणें युक्त नव्हे. नांव व रूप हीं मात्र प्रत्येक पदार्थास भिन्न भिन्न असतात. त्यामुळें हा भेद औपाधिक आहे, ब्रह्मकृत ह्मणजे स्वाभाविक नव्हे असा निश्चय होतो. ॥ ९२ ॥

आतां, ब्रह्म चित् व जड या उभयतांसही साधारण कसें आहे, तें सांगतातः—

**ब्रह्मण्येते नामरूपे पटे चित्रमिव स्थिते ॥**
**उपेक्ष्य नामरूपे द्वे सच्चिदानंदधीर्भवेत् ॥ ९३ ॥**

अन्वयः—पटे चित्रं इव एते नामरूपे ब्रह्मणि स्थिते । अतः द्वे नामरूपे उपेक्ष्य सच्चिदानंदधीः भवेत् ।

अर्थः—पटाचे ठायीं चित्राप्रमाणें हीं नामरूपें ब्रह्मामध्यें स्थित आहेत. यास्तव या दोन्हीं नामरूपांची उपेक्षा करून सच्चिदानंदाच्या भावनेनें युक्त व्हावें. ॥ ९३ ॥

विवरणः—चितारी वस्त्रावर अनेक चित्रें काढतो व तीं जरी परस्पर विरोधी ( विरुद्ध धर्मवालीं ) भासलीं तरी त्या सर्वांस वस्त्राचा एकसारखाच आधार असतो, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणेंच नामरूपात्मक द्वैत ब्रह्माच्या ठायीं कल्पित

असल्यामुळें त्यास ब्रह्मांचांच आधार आहे. व तो सर्वत्र सारखा आहे. यास्तव त्या द्वैताची उपेक्षा केल्यास साधक ब्रह्मज्ञानी होतो. ॥ ९३ ॥

आतां याविषयीं एक दृष्टांत देतातः—

**जलस्थेऽधोमुखे स्वस्य देहे दृष्टेप्युपेक्ष तम् ॥**
**तीरस्थ एव देहे स्वे तात्पर्यं स्याद्यथा तथा ॥ ९४ ॥**

**अन्वयः**—जलस्थे अधोमुखे स्वस्य देहे दृष्टे अपि तं उपेक्ष्य तीरस्थे एव स्वे देहे यथा तात्पर्यं स्यात् तथा ।

**अर्थः—जलातील अधोमुख अशा आपल्या देहाचें दर्शन जरी झालें, तरी त्याची उपेक्षा करून तीरावरील आपल्या देहांमध्येंच जसें तात्पर्य पाहतो, त्याप्रमाणें नामरूपांची उपेक्षा करून साधक तदधिष्ठानभूत ब्रह्मामध्यें तात्पर्य पाहातो. ॥ ९४ ॥**

**विवरणः**—पाण्यांत आपलें शरीर जरी उलटें दिसलें तरी त्याच्याकडे जसा सुज्ञ ध्यान देत नाहीं, त्याप्रमाणें उत्तम मुमुक्षु नामरूपात्मक द्वैताकडे लक्ष्य देत नाहीं. तर तो नामरूपाच्या आधारभूत ब्रह्माकडे आपलें सर्व लक्ष्य ठेवितो, आणि त्यामुळें त्याला ब्रह्मसाक्षात्कार सहज होतो. ॥ ९४ ॥

आतां या पुढील तीन श्लोकांत सर्व लोकप्रसिद्ध असे आणखी दृष्टांत देतातः—

**सहस्रशो मनोराज्ये वर्तमाने सदैव तत् ॥**
**सर्वैरुपेक्ष्यते यद्वदुपेक्षा नामरूपयोः ॥ ९५ ॥**

**अन्वयः**—मनोराज्ये सहस्रशः वर्तमाने यद्वत् तत् सर्वैः सदा एव उपेक्ष्यते तद्वत् नामरूपयोः उपेक्षा कर्तव्या ।

**अर्थः—मनोराज्य हजारों प्रकारें चाललें असतांही ज्याप्रमाणें तें सर्वांकडून सर्वदाच उपेक्षिलें जातें, त्याप्रमाणें नामरूपाची उपेक्षा करावी. ॥ ९५ ॥**

**विवरणः**—प्राणी एकांतांत बसून नाहीं नाहीं तें मनोराज्य करितो; पण कांहीं वेळानें तें सर्व काल्पनिक आहे असें समजून तोच त्या सर्वांची उपेक्षा करितो हें सर्वांस ठाऊक आहेच. त्याचप्रमाणें नामरूपांची उपेक्षा करावी. ॥ ९५ ॥

आता प्रपंच विचित्र कसा असतो याविषयीं दृष्टांतः—

**क्षणे क्षणे मनोराज्यं भवत्येवान्यथाऽन्यथा ॥**

**गतं गतं पुनर्नास्ति व्यवहारो बहिस्तथा ॥ ९६ ॥**

अन्वयः—मनोराज्यं क्षणे क्षणे अन्यथा अन्यथा भवति एव। किंतु गतं गतं पुनः न अस्ति। तथा बहिः व्यवहारः।

अर्थः—मनोराज्य क्षणोक्षणीं भिन्न भिन्न होतेंच, पण तें होऊन गेलेलें मनोराज्य पुनरपि राहात नाहीं, त्याप्रमाणें बाहेरचा व्यवहार समजावा. ॥ ९६ ॥

विवरण:—प्रत्येक क्षणीं निरनिराळें मनोराज्य होतें, पण त्यांतील जी जी कल्पना होऊन जाते, ती ती फिरून येत नाहीं. तिच्यासारखी दुसरी जरी एकादी कल्पना कदाचित् मनांत आली, तरी ती स्वतः पुनः येत नाहीं, व तसें होणें शक्यही नाहीं. या दृष्टान्ताप्रमाणेंच जो जो बाह्य पदार्थ आपण पाहातों, तो तो पूर्वी पाहिलेल्या दुसऱ्या पदार्थास हटवून स्वतः पुढें येतो; त्यास हटवून तिसरा पदार्थ पुढें येतो व हाच क्रम सर्व व्यवहारांत चालतो. पण एकदा भासलेला पदार्थ पुनः कधींही भासत नाहीं.—कालचाच मनुष्य आज दिसतो; सकाळचाच पशु संध्याकाळीं गोठ्यांत येतो. व याप्रमाणें तोच तो पदार्थ वारंवार दिसत असतो, असें कदाचित् कोणी यावर ह्मणेल. पण यास आमचें असें उत्तर आहे कीं, सकाळचाच पशु संध्याकाळीं गोठ्यांत आला हें ह्मणणें सामान्य मनुष्यासच शोभण्यासारखें आहे. विवेकी पुरुष तर पदार्थांमध्यें प्रत्येकक्षणीं बदल होत असल्यामुळें सकाळचा पदार्थ निराळा व संध्याकाळचा निराळा असें, तीच वस्तु प्रत्यक्ष दिसत असतांही, सूक्ष्मदृष्ट्या मानतो. ॥ ९६ ॥

पूर्व श्लोकांत सांगितलेला बाह्य व्यवहार क्षणिक कसा, हें आतां दुसऱ्या अनेक उदाहरणांनीं दाखवितातः—

**न बाल्यं यौवने लभ्यं यौवनं स्थाविरे तथा ॥**

**मृतः पिता पुनर्नास्ति नायात्येव गतं दिनम् ॥ ९७ ॥**

अन्वयः—बाल्यं यौवने न लभ्यम्। तथा यौवनं स्थाविरे न लभ्यम्। मृतः पिता पुनः न अस्ति। गतं दिनं न आयाति एव।

अर्थः—बाल्यावस्था तारुण्यांत प्राप्त होण्यासारखी नसते; तसेंच तारुण्य वृद्धापकालीं लभ्य नसतें; मेलेला पिता पुनरपि नसतो व गेलेला दिवस पुनः येत नाहींच. ॥ ९७ ॥

विवरणः—या श्लोकांतील सर्व दृष्टांत अगदीं स्पष्ट आहेत, यास्तव विशेष विस्तार करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. ॥ ९७ ॥

सारांशः—

**मनोराज्याद्विशेषः कः क्षणध्वंसिनि लौकिके ॥**
**अतोस्मिन् भासमानेपि तत्सत्यत्वधियं त्यजेत् ॥ ९८ ॥**

अन्वयः—क्षणविध्वंसिनि लौकिके मनोराज्यात् कः विशेषः । अतः अस्मिन् भासमाने अपि तत्सत्यत्वधियं त्यजेत् ।

अर्थः—क्षणभंगुर अशा या लौकिकांत मनोराज्याहून विशेष तो कोणता! यास्तव हें भासत असलें तरीही त्याच्या विषयींची सत्यत्व बुद्धि टाकावी.

विवरणः—क्षणभंगुर अशा या द्वैतामध्यें व मनोराज्यामध्यें फरक मुळींच नाहीं. कारण तीं दोन्ही क्षणिक आहेत. एवढ्याकरितां द्वैत जरी सत्यासारखें भासत असलें, तरी तें सत्य आहे, अशी भावना कधींही करूं नये. ॥ ९८ ॥

पण असें केल्यानें कोणता लाभ होणार ? हें आतां सांगतातः—

**उपेक्षिते लौकिके धीर्निर्विघ्ना ब्रह्मचिंतने ॥**
**नटवत्कृत्रिमास्थायां निर्वहत्येव लौकिकम् ॥ ९९ ॥**

अन्वयः—लौकिके उपेक्षिते ब्रह्मचिंतने धीः निर्विघ्नभवेत् । नटवत् कृत्रिमास्थायां लौकिकं निर्वहति एव ।

अर्थः—लौकिकाची उपेक्षा केली असतां ब्रह्मचिंतनामध्यें बुद्धि निर्विघ्न होते. नटाप्रमाणें कृत्रिम आस्था ठेविल्यास लौकिकाचा निर्वाह होतोच. ॥९९॥

विवरणः—व्यवहाराची उपेक्षा केल्यावांचून मुमुक्षूची बुद्धि ब्रह्मचिंतनामध्यें पूर्णपणें स्थिर होत नाहीं. यास्तव द्वैताची अवश्य उपेक्षा करावी. पण द्वैताची आस्था सोडल्यावर प्रारब्धप्राप्त व्यवहार कसा होणार ?, अशी कोणी शंका विचारील म्हणून सांगतात कीं, नटाप्रमाणें द्वैतावर कृत्रिम आस्था ठेविल्यानेंही व्यवहार होऊं शकेल.

नाटकामध्यें पुरुष स्त्रीवेष घेऊन स्त्रीप्रमाणेंच कृत्रिम व्यवहार कसा करून दाखवितो, हे सर्वांस ठाऊक आहेच. ॥ ९९ ॥

वादी:—कृत्रिम कां होईना, पण ज्ञानी व्यवहार करितो कीं नाहीं ? झालें तर; त्यामुळें तो विकारयुक्त अवश्य होणारच. सिद्धान्ती—असा दृढ निश्चय करितां येणें शक्य नाहीं. कारण—

**प्रवहत्यपि नीरेऽधः स्थिरा प्रौढशिला यथा ॥**

**नामरूपान्यथात्वेपि कूटस्थं ब्रह्म नान्यथा ॥ १०० ॥**

अन्वयः—नीरे प्रवहति अपि यथा अधः प्रौढशिला स्थिरा तथा नामरूपान्यथात्वे अपि कूटस्थं ब्रह्म अन्यथा न भवति ।

अर्थ:—उदक वरून वहात असतानांही ज्याप्रमाणें खालीं मोठी शिला स्थिर राहाते, त्याप्रमाणें नामरूपाचा जरी विपरीत भाव झाला, तरी कूटस्थ ब्रह्म अन्यथा होत नाहीं. ॥ १०० ॥

विवरणः—नदीमध्यें मोठमोठे दगड असतात, तिला पूर आला असतां त्यांच्या वरून पाणी मोठ्या जोरानें वाहूं लागतें. पण त्यामुळें त्या दगडांच्या स्थितीमध्यें असा कांहीं फरक होत नाहीं व ते जसेच्या तसेच निश्चल असतात, त्याप्रमाणें बुद्धि कितीही जरी संसार करीत राहिली तरी त्यामुळें कूटस्थाम मुळींच विकार होत नाहीं. आणि त्यामुळें ज्ञानी पुरुषाच्या ज्ञानास व्यवहारद्वारा प्रतिबंध होत नाहीं. सारांश, कृत्रिम आस्थेनें ज्ञानी पुरुषाचा व्यवहार होऊं शकतो. ॥ १०० ॥

पण अखंड ब्रह्मामध्यें या विलक्षण जगाचें भान कसें होणार ? या प्रश्नाचें आतां उत्तर देतात—

**निश्छिद्रे दर्पणे भाति वस्तुगर्भं बृहद्वियत् ॥**

**सच्चिद्घने तथा नानाजगद्गर्भमिदं वियत् ॥ १०१ ॥**

अन्वयः—यथा निश्छिद्रे दर्पणे वस्तुगर्भं बृहत् वियत् भाति तथा सच्चिद्घने इदं नानाजगद्गर्भं वियत् भाति ।

अर्थः—ज्याप्रमाणें छिद्ररहित आरशीमध्यें, अनेक वस्तु आहेत ज्यामध्यें असें आकाश भासतें, त्याप्रमाणें सत् व चित् यांनीं पूर्ण अशा आत्म्यामध्यें हें विचित्र जगानें भरलेलें आकाश भासतें. ॥ १०१ ॥

**विवरणः**—एकाद्या भींतीस आरशी टांगून ठेवावी व त्यांत पाहावें ह्मणजे घरांतील सर्व पदार्थांसह घरांतील मोठें आकाश दिसतें. पण ज्या आरशींत हें सर्व दिसतें, तिच्यामध्यें आकाशाचा लेशही नसतो हें कोणासही समजण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें सत्ता, चैतन्य, आनंद इत्यादिकांनीं परिपूर्ण व द्वैतशून्य अशा ब्रह्मामध्यें या विचित्र जगानें भरलेलें असें हें विभु आकाश दिसतें. ॥ १०१ ॥

पण आरसा जसा दिसतो तसें ब्रह्म दिसत नाहीं. तेव्हां आरशांतील प्रतिबिंबाप्रमाणेंच ब्रह्मामध्यें जगद्भान होतें, असें कसें ह्मणतां येईल? या प्रश्नाचें आतां उत्तर देतात—

**अदृष्ट्वा दर्पणं नैव तदंतस्थेक्षणं तथा ॥**
**अमत्वा सच्चिदानंदं नामरूपमतिः कुतः ॥ १०२ ॥**

**अन्वयः**—दर्पणं अदृष्ट्वा तदंतस्थेक्षणं न एव । तथा सच्चिदानंदं अमत्वा नामरूपमतिः कुतः ।

**अर्थः**—दर्पण न दिसतां त्याच्या आंतील वस्तूचें दर्शन होणें शक्यच नाहीं. त्याचप्रमाणें सत्, चित् व आनंदरूप आत्म्यास न जाणतां नामरूपाचें ज्ञान कोठून होणार? ॥ १०२ ॥

**विवरणः**—आरशांतील प्रतिबिंबाचें ज्ञान होण्यापूर्वी आरशाचें ज्ञान अवश्य आहे. अर्थात् आरसा दिसल्यावांचून त्यांतील प्रतिबिंब दिसणें शक्य नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्माचें ज्ञान झाल्यावांचून जगाचें ज्ञान होणेंही शक्य नाहीं. कारण हें ब्रह्म आहे असें जरी अविवेकामुळें कोणास न भासलें, तरी नामरूपज्ञान होणें या कार्यावरूनच त्याच्या अस्तित्वाचें अनुमान होऊं शकतें. ॥ १०२ ॥

**वादीः**—अहो, पण ब्रह्माच्या सच्चिदादिगुणांप्रमाणें नामरूपही भासत असतें. त्याचा जोंपर्यंत भास होत आहे, तोंपर्यंत ब्रह्माची प्रतीति कशी होणार? **सिद्धान्तीः**—

**प्रथमं सच्चिदानंदे भासमानेऽथ तावता ॥**
**बुद्धिं नियम्य नैवोर्ध्वं धारयेन्नामरूपयोः ॥ १०३ ॥**

**अन्वयः**—प्रथमं सच्चिदानंदे भासमाने अथ तावता बुद्धिं नियम्य ऊर्ध्वं नामरूपयोः बुद्धिं न धारयेत् एव ।

अर्थः—प्रथमतः सच्चिदानंद भासूं लागला असतां त्याबरोबर बुद्धीचा निरोध करून नंतर नामरूपांमध्यें बुद्धिची धारणा करूं नये. ॥ १०३ ॥

विवरणः—सर्वांच्या अगोदर सच्चिद्घन आत्म्याचें भान होतें, असा दृढ निश्चय होऊन तसा प्रत्यय आला असतां, सर्व प्रपंचांत आत्मा भरला आहे असा बुद्धीच्या द्वारा विचार करून नामरूपात्मक द्वैतामध्यें बुद्धीस आसक्त होऊं देऊं नये. असें केल्यानें याच्याच्या वरील शंकेस जागाच राहाणार नाहीं. कारण आत्म्याच्या गुणांमध्येंच बुद्धीस स्थिर केलें असतां त्याच्या पुढें होणारा नामरूपांचा भास सहजच नाहींसा होईल. ॥ १०३ ॥

सारांशः—

**एवं च निर्जगद्ब्रह्म सच्चिदानंदलक्षणम् ॥**
**अद्वैतानंद एतस्मिन्विश्राम्यंतु जनाश्चिरम् ॥ १०४ ॥**

अन्वयः—एवं च निर्जगद्ब्रह्म सच्चिदानंदलक्षणं भवति । एतस्मिन् अद्वैतानन्दे जनाः चिरं विश्राम्यन्तु ।

अर्थः—व ह्याप्रमाणें झालें असतां जगरहित ब्रह्म सच्चिदानंदलक्षण होतें; या अद्वैतानंदामध्यें जन दीर्घकाल विश्रांति घेवोत. ॥ १०४ ॥

विवरणः—ह्याप्रमाणें प्रथम भासणाऱ्या ब्रह्माच्या सच्चिदादिरूपांत बुद्धि निमग्न झाली असतां जगरहित ब्रह्मच सच्चिदादिरूप बनतें. हाच अद्वैतानंद होय. यामध्यें, सर्व लोक मोठ्या आनंदानें दीर्घ काल विश्रांति घेवोत. तात्पर्य, ब्रह्मानुसंधानाचा सर्वांनीं सतत अभ्यास करावा. त्यांतच खरा पुरुषार्थ आहे. ॥ १०४ ॥

आतां या अध्यायाचा उपसंहार करितात—

**ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे तृतीयोध्याय ईरितः ॥**
**अद्वैतानंद एव स्याज्जगन्मिथ्यात्वचिंतया ॥ १०५ ॥**

अन्वयः—ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे अयं तृतीयः अध्यायः ईरितः । जगन्मिथ्यात्वचिंतया अद्वैतानंदः स्यात् एव ।

अर्थः—ब्रह्मानंदसंज्ञक ग्रंथांतील हा तिसरा अध्याय सांगितला. जगाच्या मिथ्यत्वचिंतनानें अद्वैतानंद होतोच. ॥ १०५ ॥

विवरणः—या स्थळीं तेराव्या प्रकारणाची समाप्ति झाली. ब्रह्मानन्दांतील हा अद्वैतानन्दसंज्ञक तिसरा अध्याय होय; जग मिथ्या आहे असें सतत चिंतन केल्यानें या अद्वैतानन्दाचा साक्षात्कार होतो. या प्रकारणांत अनेक युक्ति योजून अद्वैत व ऐक्य यांची सिद्धि केली आहे. ॥ १०५ ॥

याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या अद्वैतानन्दाख्य त्रयोदश प्रकरणाचें श्रीमच्छंकराचार्यभक्त विष्णु वामन बापटकृत सान्वयार्थ मराठी विवरण समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

# ब्रह्मानंदे विद्यानंदः ।

श्रीभारतीतीर्थमुनि या विद्यानंदाख्य चवदाव्या प्रकरणाचा आरंभ करीत असतांना प्रथमतः पूर्वापर ग्रंथाचा संदर्भ सांगतातः—

**योगेनात्मविवेकेन द्वैतमिथ्यात्वचिंतया ॥**

**ब्रह्मानन्दं पश्यतोऽथ विद्यानन्दो निरूप्यते ॥ १ ॥**

**अन्वयः**—योगेन आत्मविवेकेन द्वैतमिथ्यात्वचिंतया ब्रह्मानन्दं पश्यतः अथ विद्यानन्दः निरूप्यते ।

**अर्थः—योगाच्या योगानें, आत्मविवेकानें व द्वैत मिथ्या आहे अशा चिंतनानें ब्रह्मानंद पाहाणाऱ्या विद्वानाचा विद्यानंद आतां निरूपण केला जात आहे. ॥ १ ॥**

**विवरणः**—अकराव्या प्रकरणांत योगानंद, बाराव्यांत आत्मानंद व तेराव्यांत अद्वैतानंद कसा प्राप्त होतो तें सविस्तर सांगितलें आहे. त्याचें अवलोकन करून ज्या धन्य पुरुषास ब्रह्मानंदाची प्राप्ति झाली आहे, त्यास विद्यानंदाचा लाभ कसा होतो, तें आतां या प्रकरणांत सांगावयाचें आहे. विद्यानंदाचा विषयानंदामध्येंच अंतर्भाव होतो, असें जरी पूर्वी सांगितलेलें आहे, तरी विषयानंद जसा कीटभृंगीपर्यंत सर्व प्राण्यांस साधारण आहे, तसा हा नाहीं. ज्या पुण्यवानांनीं अश्रांत श्रम करून विद्यासंपादन केली असेल त्यांसच याचा लाभ होण्यासारखा असल्यामुळें त्याचें वर्णन निराळ्याच एका प्रकरणांत करावें, असें ग्रंथकारास वाटलें. व त्याकरितां या प्रकरणाचा आरंभ झाला आहे. ॥ १ ॥

आतां विद्यानंदाचें स्वरूप व त्याचे अवांतर भेद सांगतातः—

**विषयानन्दवद्विद्यानन्दो धीवृत्तिरूपकः ॥**

**दुःखाभावादिरूपेण प्रोक्त एष चतुर्विधः ॥ २**

**अन्वयः**—विषयानंदवत् विद्यानंदः धीवृत्तिरूपकः । एषः दुःखाभावादिरूपेण चतुर्विधः प्रोक्तः ।

अर्थः—विषयानंदाप्रमाणें हा विद्यानंद बुद्धिवृत्तिरूप आहे; हा दुःखाचा अभाव इत्यादिरूपानें चार प्रकारचा सांगितलेला आहे. ॥ २ ॥

विवरणः—विद्यानंद विद्येमुळें प्राप्त होत असतो. अर्थात् तो चित्तवृत्तिरूप आहे व त्या वृत्तीचा विद्या हा विषय असल्यामुळें तज्जन्य आनंदही विषयानंद होय. त्याचे चार भेद आहेत. व त्या सर्वांचा विचार पुढच्या श्लोकांतच होणार आहे. ॥ २ ॥

**दुःखाभावश्च कामाप्तिः कृतकृत्योहमित्यसौ ॥**
**प्राप्तप्राप्योहमित्येव चातुर्विध्यमुदाहृतम् ॥ ३ ॥**

अन्वयः—दुःखाभावः कामाप्तिः कृतकृत्यः अहं इति असौ प्राप्तप्राप्यः अहं इति एव चातुर्विध्यं उदाहृतं अस्ति ।

अर्थः—दुःखाचा अभाव, इष्टप्राप्ति, मी कृतकृत्य आहें अशी भावना व सर्व प्राप्तव्य मला प्राप्त झालें आहे असा निश्चय, असे त्याचे चार प्रकार सांगितलेले आहेत. ॥ ३ ॥

विवरणः—दुःखांची कांहीं काल होणारी निवृत्ति सुखद असते. त्याचप्रमाणें इष्ट पदार्थांचा लाभ असतांही सुख होतें. मी कृतकृत्य झालों आहें, मला आतां कर्तव्य असें कांहीं एक उरलेलें नाहीं, अशी मनाची भावना झाली असतांही शांतिरूप सुख प्राप्त होत असतें. तसेंच मला जें जें कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें होतें तें तें सर्व प्राप्त झालें आहे, असा निश्चय झाल्यावरही प्राणी सर्व कर्मांपासून निवृत्त होतो व त्यामुळें त्यास परम सुख होतें. पण हे सर्व आनंद वृत्तिरूप आहेत. यास्तव त्यांची विषयानंदामध्येंच गणना करावी. सारांश, याप्रमाणें विषयानंद चार प्रकारचा आहे.

पूर्वोक्त चार प्रकारांत दुःखाभाव हा प्रथम आनंद होय. यास्तव त्याचें वर्णन करण्याकरितां प्रथमतः दुःखाचे भेद किती आहेत व त्यांतील कोणतें दुःख निवृत्त होण्यासारखें आहे, तें सांगतातः—

**ऐहिकं चामुष्मिकं चेत्येवं दुःखं द्विधेरितम् ॥**
**निवृत्तिमैहिकस्याह बृहदारण्यकं वचः ॥ ४ ॥**

अन्वयः—ऐहिकं च आमुष्मिकं च इति एवं दुःखं द्विधा ईरितं अस्ति । बृहदारण्यकं वचः ऐहिकस्य निवृत्तिं आह ।

अर्थः—इहलोकचें व परलोकचें असें दुःख दोन प्रकारचें सांगितलेलें आहे व बृहदारण्यकाचें वाक्य ऐहिक दुःखाची निवृत्ति सांगत आहे. ॥ ४ ॥

विवरणः—या श्लोकांतील ऐहिक, आमुष्मिक इत्यादि पदांचा अर्थ पुढें मूळ ग्रंथांतच स्पष्ट होणार आहे. ॥ ४ ॥

पूर्व श्लोकांत ज्याचा नुसता निर्देश केला आहे, तें बृहदारण्यकवाक्य आतां येथें येतातः—

**आत्मानं चेद्विजानीयादयमस्मीति पूरुषः ॥**
**किमिच्छन्कस्य कामाय शरीरमनु संज्वरेत् ॥ ५ ॥**

अन्वयः—पुरुषः आत्मानं अयं अस्मि इति विजानीयात् चेत् किं इच्छन् कस्य कामाय शरीरं अनु संज्वरेत् ।

अर्थः—पुरुष आत्म्यास ‘ हा मी आहें ’ असें जर जाणील, तर मग कशाच्या इच्छेनें व कोणाच्या कामाकरितां शरीराबरोबरच संतप्त होईल? ॥ ५ ॥

विवरणः—या श्रुतिवचनाचें व्याख्यान मागें सातव्या प्रकरणांत विस्तृतपणें होऊन गेलें आहे. ॥ ५ ॥

आतां आत्म्याचे भेद किती आहेत व तो भोक्ता कसा होतो, तें सांगतातः—

**जीवात्मा परमात्मा चेत्यात्मा द्विविध ईरितः ॥**
**चित्तादात्म्यात्त्रिभिर्देहैर्जीवः सन् भोक्तृतां व्रजेत् ॥ ६ ॥**

अन्वयः—जीवात्मा च परमात्मा इति आत्मा द्विविधः ईरितः अस्ति । त्रिभिः देहैः चित्तादात्म्यात् जीवः सन् भोक्तृतां व्रजेत् ।

अर्थः—जीवात्मा व परमात्मा असा आत्मा दोन प्रकारचा सांगितलेला आहे. तीन देहांशीं चैतन्याचें तादात्म्य झाल्यामुळें चैतन्य जीव होत्सातें भोक्तेपणाप्रत प्राप्त होतें. ॥ ६ ॥

विवरणः—पूर्वी तृप्तिदीपांत प्रस्तुत प्रकरण जरी विस्तारपूर्वक होऊन गेलें आहे तरी विषयसंदर्भ समजण्याकरितां ग्रंथकारांनीं येथें त्याचें संक्षेपतः वर्णन केलें आहे. स्थूल, सूक्ष्म व कारण या तीन देहांशीं भ्रमानें चैतन्याचें तादात्म्य केलें असतां तें

चैतन्य भोक्ता होतें. भोक्ता होणें ह्मणजे जीव होणेंच आहे. तात्पर्य जड पदार्थां चैतन्याचें ऐक्य केल्यानें शुद्ध चैतन्य, जीव, भोक्ता, संसारी इत्यादि रूप होतें. ॥६

आतां परमात्म्याचें स्वरूप सांगतात:—

**परात्मा सच्चिदानन्दस्तादात्म्यं नामरूपयोः ॥**
**गत्वा भोग्यत्वमापन्नस्तद्विवेके तु नोभयम् ॥ ७ ॥**

**अन्वयः**—सच्चिदानंदः परात्मा नामरूपयोः तादात्म्यं गत्वा भोग्यत्वं आपन्नः तद्विवेके तु उभयं न अस्ति ।

**अर्थः—सत्, चित्, व आनंदरूप परमात्मा नाम व रूप यांच्याशीं ऐक्य पावून भोग्यपणाप्रत प्राप्त झाला आहे. पण तो तीन शरीरें व जग यांहू भिन्न आहे असें समजलें असतां भोक्ता व भोग्य हीं राहात नाहींत. ॥ ७ ॥**

**विवरणः**—परमात्मा जरी सच्चिदानंदरूप आहे, तरी नामरूपात्मक द्वैताशं ऐक्य पावला असतां तो भोग्य होतो. पण मुमुक्षूस तें चैतन्य स्थूलादि तीन शरी व सृष्टि यांहून अगदीं भिन्न व विलक्षण आहे, असें विवेकद्वारा समजलें असत त्याच्या दृष्टीनें तें भोक्ताही नसतें व भोग्यही नसतें. ॥ ७ ॥

तें कसें ? ह्मणून ह्मणाल तर सांगतों:—

**भोग्यमिच्छन् भोक्तुरर्थे शरीरमनु संज्वरेत् ॥**
**ज्वरास्त्रिषु शरीरेषु स्थिता न त्वात्मनो ज्वराः ॥ ८ ॥**

**अन्वयः**—भोक्तुः अर्थे भोग्यं इच्छन् शरीरं अनु संज्वरेत् । ज्वराः त्रिषु शरीरे स्थिताः । तु ज्वराः आत्मनः न सन्ति ।

**अर्थः—भोक्त्याकरितां भोग्याची इच्छा करणारा पुरुष शरीराबरोबरच संतप्त होतो. संताप तीन शरीरांमध्यें असतात. ते आत्म्याचे नव्हेत. ॥ ८ ॥**

**विवरणः**—मला अमुक अमुक विषय प्राप्त व्हावे असें ज्याला वाटत असतें त्यालाच शरीराच्या पीडेनें पीडा होते. पीडा शरीरास होत असते. तिचा आत्म्याशीं कांहींएक संबंध नाहीं, कारण तो असंग आहे. ॥ ८ ॥

आतां त्रिविध शरीरांतील कोणत्या शरीरांत कोणती पीडा राहाते तें सांगतात:—

**व्याधयो धातुवैषम्ये स्थूलदेहे स्थिता ज्वराः ॥**
**कामक्रोधादयः सूक्ष्मे द्वयोर्बीजं तु कारणे ॥ ९ ॥**

अन्वय:—धातुवैषम्ये ये व्याधयः ते स्थूलदेहे स्थिताः ज्वराः सन्ति । कामक्रोधादयः सूक्ष्मे स्थिताः । द्वयोः बीजं तु कारणे स्थितम् ।

अर्थ:—कफादि धातूंचें वैषम्य झालें असतां जे व्याधि होतात, ते स्थूल देहांत राहाणारे ज्वर होत. कामक्रोधादिक सूक्ष्म देहांत व त्या दोघांचेंही बीज कारणामध्यें राहातें. ॥ ९ ॥

विवरण:—कफ, वात व पित्त हे तीन धातु जोंपर्यंत साम्यावस्थेंत असतात, तोंपर्यंत ते शरीराचें उत्तम प्रकारें धारण करितात. पण त्यांच्यामध्यें न्यूनाधिक भाव आला कीं अनेक व्याधि उत्पन्न होतात. पण त्या सर्व स्थूल देहगत असतात. काम, क्रोध, इत्यादि मानसिक व्यथा आहेत. व त्या सूक्ष्म शरीरांत असतात; आणि या दोन्ही पीडांचें बीज कारणशरीरांत असतें. ॥ ९ ॥

पण:—

**अद्वैतानन्दमार्गेण परात्मनि विवेचिते ॥**
**अपश्यन्वास्तवं भोग्यं किं नामेच्छेत्परात्मवित् ॥ १० ॥**

अन्वय:—अद्वैतानंदमार्गेण परात्मनि विवेचिते सति वास्तवं भोग्यं अपश्यन् परात्मवित् किं नाम इच्छेत् ।

अर्थ:—अद्वैतानंदाच्या द्वारा परमात्म्याचें विवेचन झालें असतां वास्तविक भोग्य न पाहणारा परात्मवेत्ता कशाची इच्छा करणार ? ॥ १० ॥

विवरण:—एक व अद्वितीय अशा आत्म्याच्या स्वरूपभूत आनंदाच्या द्वारा ज्यानें परमात्म्याचें स्वरूप या जड सृष्टीहून अगदीं विलक्षण आहे असें जाणलें आहे, त्यास या सृष्टींतील एकही पदार्थ सत्य भासत नाहीं. तेव्हां तो त्याच्या विषयीं इच्छा कशी करणार ? स्वप्नांतील द्रव्याची किंवा गारुड्यानें केलेल्या रुपयाची कधीं कोणी इच्छा करील नाहीं. ॥ १० ॥

तात्पर्यः—

**आत्मानन्दोक्तरीत्यास्मिन् जिवात्मन्यवधारिते ॥**
**भोक्ता नैवास्ति कोप्यत्र शरीरे तु ज्वरः कुतः ॥ ११ ॥**

अन्वयः—आत्मानंदोक्तरीत्या अस्मिन् जीवात्मनि अवधारिते सति अत्र कः अपि भोक्ता न अस्ति एव । शरीरे तु ज्वरः कुतः ।

अर्थः—आत्मानंदनामक अध्यायांत सांगितल्याप्रमाणें या जीवात्म्याविषयीं निश्चय झाला असतां या शरीरेंद्रियसमूहांत भोक्ता कोणीही नसतो; मग शरीरांत ज्वर कोठून असणार ? ॥ ११ ॥

विवरणः—जीवात्मा वस्तुतः कूटस्थ, असंग व चैतन्यरूप आहे असें निश्चयपूर्वक समजलें असतां कामना करणारा भोक्ताच राहात नाहीं. मग शरीरांत राहणाऱ्या व्याधींचा आत्म्याशीं संबंध कसा होणार ? सारांश, ऐहिक दुःखाचा आत्म्याशीं कांहीं एक संबंध नाहीं. ॥ ११ ॥

आतां पारलौकिक संताप कोणता तें सांगतातः–

**पुण्यपापद्वये चिंता दुःखमामुष्मिकं भवेत् ॥**
**प्रथमाध्याय एवोक्तं चिंता नैनं तपेदिति ॥ १२ ॥**

अन्वयः—पुण्यपापद्वये या चिंता तत् एव आमुष्मिकं दुःखं भवेत् । चिंता एनं न तपेत् इति प्रथमाध्याये एव उक्तम् ।

अर्थः—पुण्य व पाप या दोन्हीं विषयीं जी चिंता तेंच पारलौकिक दुःख होय ' या पुरुषास चिंता संतप्त करीत नाहीं,' असें प्रथमाध्यायांत सांगितलें आहे. ॥ १२ ॥

विवरणः—' अरे रे, मीं पुण्य केलें नाहीं पापाचें मात्र अनुष्ठान केलें ' असें प्राण्यांस अंतकालीं दुःख होत असतें. तेंच पारलौकिक दुःख होय. कारण परलोकांतील दुःखास ही चिंताच कारण होत असतें. ' ज्ञानी पुरुषास प्रस्तुत चिंता संतप्त करीत नाहीं ' इत्यादि अकराव्या प्रकरणाच्या श्लोकांत सांगितलें आहे. ॥ १२ ॥

ज्ञान्यास क्रियमाणकर्मामुळें संताप होत नाहीं, असें आतां सांगतातः—

**यथा पुष्करपर्णेऽस्मिन्नपामश्लेषणं तथा ॥**

**वेदनादूर्ध्वमागामिकर्मणोऽश्लेषणं बुधे ॥ १३ ॥**

अन्वयः—यथा अस्मिन् पुष्करपर्णे अपां अश्लेषणं तथा बुधे वेदनात् उर्ध्वं आगामिकर्मणः अश्लेषणम् भवति ।

**अर्थः—ज्याप्रमाणें या कमलपत्राचे ठायीं उदकाचा संपर्क होत नाहीं, त्याप्रमाणें ज्ञान्याचे ठायीं साक्षात्कारानंतर क्रियमाण कर्माचा संपर्क होत नाहीं.**

विवरणः—कमलाची पाकळी पाण्यामध्यें एक प्रहरभर जरी ठेंवली, तरी त्याचा तिला लेप होत नाहीं. पाकळी वर काढतांच ती कोरडी ठणठणीत आहे, असेंच दिसतें. त्याचप्रमाणें ज्ञानी पुरुषास आत्मसाक्षत्कारानंतर घडणाऱ्या क्रियमाण कर्माचा संपर्क होत नाहीं. एवढ्याकरितांच भगवानांनीं ' ज्ञानाग्नि सर्व कर्में भस्मरूप करून सोडतो ' असें ह्मटलें आहे. ॥ १३ ॥

संचित कर्मही ज्ञान्यास प्रतिबंध करीत नाहीं, असें आतां श्रुतीच्या आधारानें सांगतातः—

**इषीकातृणतूलस्य वन्हिदाहः क्षणाद्यथा ॥**

**तथा संचितकर्मास्य दग्धं भवति वेदनात् ॥ १४ ॥**

अन्वयः—यथा इषीकातृणतूलस्य क्षणात् वह्निदाहः तथा अस्य वेदनात् संचितकर्म दग्धं भवति ।

**अर्थः—ज्याप्रमाणें इषीका संज्ञक गवताची बारीक काडी अग्नीमध्यें टाकली असतां एका क्षणांत जळून जाते, त्याप्रमाणें ज्ञान्याचें संचित कर्म ज्ञानामुळें दग्ध होतें. ॥ १४ ॥**

**विवरणः—' ज्याप्रमाणें गवताची बारिक काडी पेटलेल्या अग्नींत घातली असतां तात्काळ जळून भस्म होते; त्याप्रमाणें ज्ञानी पुरुषाचें पाप नष्ट होतें ' अशी श्रुति आहे व तिच्यावरून ज्ञानी पुरुषाचें संचित कर्मही नष्ट होतें, असें ठरतें. अर्थात् संचित कर्मविषयींही ज्ञान्यास चिंता करण्याचें कारण नाहीं. ॥ १४ ॥**

अर्थः—खात, खेळत, [illegible] [illegible] [illegible] दुसरे [illegible] इत्यादिकांसह करमणूक करीत [illegible] ज्ञानी शरीराची आठवण करीत नाहीं. व प्रारब्ध कर्माच्या योगानें प्राण त्यास वांचवितो. ॥ १९ ॥

विवरण:—सर्वत्र आत्माच भरलेला आहे असें पाहाणाऱ्या ज्ञान्यास दुःख होत नाहीं. तो सर्वदा अनेक सुखांचा अनुभव घेत असतो. छान्दोग्यांत त्याच्या सुखोपभोगाचें वर्णन येणप्रमाणें केलें आहे.—आत्मज्ञ इंद्र, राजा इत्यादिकांच्या शरीरांत अनेक खाद्य पेयादि पदार्थ खात, बालकें, स्त्रिया, आप्त यांसह खेळत व हंसत, वाहनांत बसून व फिरत व सजातीयांशीं आनंद करीत असतो. त्याला अगदीं जवळ असलेल्या या शरीराचेंही भान नसतें. ज्ञानाच्या पूर्वी देहतादात्म्यामुळें त्यास जसें पदोपदीं दुःख होत होतें, तसें ज्ञानानें तो भ्रम नष्ट झाल्यावर होत नाहीं. सारांश, सर्वही आनंद ब्रह्मानंदाचे लेश असल्यामुळें तत्त्वज्ञ पुरुष त्यांच्याविषयीं मनामध्यें प्रेम बाळगतो व दुःखाचा माझ्याशीं कांहीं संबंध नाहीं, असें समजतो. ॥ १९ ॥

आतां याच अर्थी तैत्तिरीय श्रुति अर्थतः येथें घेतात—

> सर्वान्कामान्सहाप्नोतिनान्यवज्जन्मकर्मभिः ॥
> वर्तंते श्रोत्रिये भोगा युगपत् क्रमवर्जिताः ॥ २० ॥

अन्वयः—सर्वान् कामान् सह आप्नोति अन्यवत् जन्मकर्मभिः न । श्रोत्रिये भोगाः युगपत् क्रमवर्जिताः वर्तन्ते ।

अर्थः—ज्ञान्यास सर्व काम एकदम प्राप्त होतात. अज्ञांप्रमाणें जन्म व कर्म यांच्या योगानें प्राप्त होत नाहीं. श्रोत्रियामध्यें सर्व भोग एकाच कालीं क्रम सोडून राहातात. ॥ २० ॥

विवरण:—ज्याला आत्मसाक्षात्कार झालेला असतो त्यास सर्व विषय एकदम प्राप्त होतात. व त्यांच्या भोगाकरितां त्यास जन्म घेऊन शरीरयुक्त व्हावें लागत नाहीं. कर्मांच्या अधीन होऊन राहाणाऱ्या प्राण्यास एकामागून एक अशा क्रमानें भोग मिळतात. पण ज्ञानी श्रोत्रियास ते सर्व एकाच कालीं प्राप्त होतात. ॥ २० ॥

आनंदाची इयत्ता सांगण्याकरितां प्रथमतः उत्तम राजाचा आनंद श्रोत्रियास प्राप्त होतो, असें आतां पुढील दोन श्लोकांत सांगतात—

युवा रूपी च विद्यावान्नीरोगो दृढचित्तवान् ॥
सैन्योपेतः सर्वपृथ्वीं वित्तपूर्णां प्रपालयन् ॥ २१ ॥
सर्वैर्मानुष्यकैर्भोगैः संपन्नस्तृप्तभूमिपः ॥
यमानन्दमवाप्नोति ब्रह्मविच्च तमश्नुते ॥ २२ ॥

अन्वयः—युवा रूपी च विद्यावान् नीरोगी दृढचित्तवान् सैन्योपेतः वित्तपूर्णां सर्वपृथ्वीं प्रपालयन् सर्वैः मानुष्यकैः भोगैः संपन्नः तृप्तभूमिपः यं आनंदं अवाप्नोति तं ब्रह्मवित् च अश्नुते ।

अर्थः—तरुण, रूपवान् , विद्वान्, निरोगी, निश्चयी, सैन्ययुक्त, धनानें भरलेल्या सर्व पृथ्वीचें पालन करणारा व सर्व मानुषलोकच्या भोगांनीं संपन्न असा तृप्त राजा ज्या आनंदास प्राप्त होतो, त्याचा ब्रह्मवेत्ताही उपभोग घेतो. ॥ २१ ॥

विवरणः—तारुण्यादि गुणांनीं युक्त असलेल्या सार्वभौम राजाचें सुख ब्रह्मवेत्त्या पुरुषासही मिळतें. ह्मणजे त्या दोघांचेंही सुख सारखेंच असतें. मूळ श्रुतीमध्यें श्रोत्रियास अकामहत हें विशेषण दिलें आहे. सारांश-निष्काम श्रोत्रियाचा आनंद पूर्वोक्त राजाच्या आनंदाबरोबर असतो. ॥ २१॥२२ ॥

तो कसा तें आतां सांगतात—

मर्त्यभोगे द्वयोर्नास्ति कामस्तृप्तिरतः समा ॥
भोगान्निष्कामतैकस्य परस्यापि विवेकतः ॥ २३ ॥

अन्वयः—मर्त्यभोगे द्वयोः कामः नास्ति अतः तृप्ति समा । एकस्य भोगात् निष्कामता परस्य अपि विवेकतः ।

अर्थः—मृत्युलोकांच्या भोगांविषयीं दोघांनाही इच्छा नसते. यास्तव त्यांची तृप्ति सारखीच होय. एकाची भोगांमुळें निष्कामता व दुसऱ्याची विवेकामुळें.

विवरणः—ऐहिक भोगांविषयीं पूर्वोक्त प्रकारचा राजा व निष्काम यति हे दोन्ही निःस्पृह असतात, कारण राजा अनेक भोग भोगून तृप्त झालेला असतो व यति

विषयांच्या स्वरूपाचें विवेचन करून ते निस्तत्त्व आहेत असें समजल्यामुळें तृप्त होतो. मिळून दोघांचीही तृप्ति सारखीच. ॥ २३ ॥

**श्रोत्रियत्वाद्वेदशास्त्रैर्भोगदोषानवेक्षते ॥**

**राजा बृहद्रथो दोषांस्तान् गाथाभिरुदाहरत् ॥ २४ ॥**

**अन्वयः**—यतिः श्रोत्रियत्वात् वेदशास्त्रैः भोगदोषान् अवेक्षते राजा बृहद्रथः तान् दोषान् गाथाभिः उदाहरत् ।

**अर्थः**—यति श्रोत्रियपणामुळें वेद व शास्त्रें यांच्या योगानें भोगांतील दोषांस पाहतो. राजा बृहद्रथ त्या दोषांस गाथारूपानें सांगता झाला. ॥२४॥

**विवरणः**—जन्म, संस्कार व विद्या यांच्या योगानें ब्राह्मण श्रोत्रिय होतो. अर्थात् त्याच्या अंगांत सदसद्विवेकसामर्थ्य असतें. त्यामुळें तो वेद व शास्त्रें यांच्या द्वारा भोगांतील दोषांचें निरीक्षण करितो. मैत्रायणीय श्रुतींमध्यें राजा बृहद्रथानें गाथारूपानें दाखविलेले विषयदोषांचें वर्णन आहे. ॥ २४ ॥

त्या दोषांचा आतां निर्देश करितात—

**देहदोषांश्चित्तदोषान् भोग्यदोषाननेकशः ॥**

**शुना वांते पायसे नो कामस्तद्वद्विवेकिनः ॥ २५ ॥**

**अन्वयः**—सः देहदोषान् चित्तदोषान् च अनेकशः भोग्यदोषान् उदाहरत् । यथा शुना वांते पायसे कामः नो अस्ति तद्वत् विवेकिनः ।

**अर्थः**—तो देहदोष, चित्तदोष व अनेक प्रकारचे विषयदोष दाखविता झाला. ज्याप्रमाणें कुत्र्यानें वमन केलेल्या खिरीवर कोणाची वांछा जात नाहीं, त्याप्रमाणें विवेक्याची विषयांवर वांछा जात नाहीं. ॥ २५ ॥

**विवरणः**—देह कफवातपित्तयुक्त आहे, तो आध्यात्मिक पीडेनें ग्रासलेला असतो, दुःखाचें मूळ तोच आहे, इत्यादि देहदोष; मन चंचळ आहे, तें उगीच कांहीं तरी संकल्प करणारें आहे, त्याच्या मध्यें क्षणोक्षणीं विलक्षण वृत्ती उठत् असतात इत्यादि चित्तदोष; व विषय अनर्थांत पाडणारे आहेत, ते क्षणिक आहेत, इत्यादि विषयदोष होत. अशा रीतीनें पूर्वोक्त श्रुतींत सविस्तर वर्णन आहे. असो; कुत्र्यानें ओकून टेवलेल्या दुधाच्या खिरीवर जशी कोणाची वांछा जात नाहीं, त्याप्र-

प्रमाणें या ज्ञानी पुरुषांचीही अशा अनेक दोषयुक्त विषयांवर इच्छा जात नाहीं. तो विषयांस काकविष्ठेप्रमाणें किंवा कुत्र्याच्या ओकीप्रमाणें समजतो. ॥ २५ ॥

सार्वभौम राजा व श्रोत्रिय यांची तृप्ति सारखीच आहे असें जरी सामान्यतः पूर्वी म्हटलेलें आहे, तरी श्रोत्रियाच्या तृप्तीची योग्यता राजाच्या तृप्तीहून अधिक आहे असें आतां पुढील दीड श्लोकांत सांगतात:—

निष्कामत्वे समेऽप्यत्र राज्ञः साधनसंचये ॥
दुःखमासीद्भाविनाशादतिभीरनुवर्तते ॥ २६ ॥
नोभयं श्रोत्रियस्यातस्तदानन्दोऽधिकोऽन्यतः ॥
गंधर्वानंद आशास्ति राज्ञो नास्ति विवेकनः ॥ २७ ॥

अन्वयः—निष्कामत्वे समे अपि अत्र राज्ञः साधनसंचये दुःखं आसीत् च भाविविनाशात् अतिभीः अनुवर्तते । श्रोत्रियस्य इदं उभयं न अतः तदानंदः अन्यतः अधिकः । राज्ञः गंधर्वानंदे आशा अस्ति विवेकिनः न अस्ति ।

अर्थः—निष्कामत्व जरी दोघांमध्यें सारखेंच असलें, तरी त्यापैकीं राजास साधनांचा संचय करितांना दुःख झालेलें असतें व पुढें त्यांचा नाश होईल असें वाटत असल्यामुळें अतिशय भिती वाटत असते. श्रोत्रियास यापैकीं कांहीं एक नसतें. यास्तव त्याचा आनंद राजाच्या आनंदाहून अधिक होय. शिवाय राजाची गंधर्वानंदाविषयीं इच्छा असते, पण विवेक्यास ती नसते. ॥ २६॥२७ ॥

विवरणः—राजास असंख्य लढाया, अनंत हत्या, अगणित अनन्वित कृत्यें व कितीतरी लबाड्या करून राज्यादि भोगांचीं साधनें मिळवावीं लागतात. व तीं मिळवितांना अनेक कष्टही सोसावे लागतात. पुढें त्यांच्या नाशाविषयीं अहोरात्र चिंता बाळगावी लागते. कोणी प्रबल शत्रु माझ्या या सुखसाधनांचा अपहार तर करणार नाहीं ना ! ही चिंता राजास जन्मभर सोडीत नाहीं. श्रोत्रियाची स्थिति यापेक्षां कितीतरी उत्तम असते. कारण त्यास पूर्वोक्त चिंता कधीं स्वप्नांतही स्पर्श करीत नाहीं. शिवाय राजास ऐहिक सर्व सुखें मिळून त्यांच्याविषयीं जरी तो निस्पृह झालेला असला, तरी पारलौकिक सुखाची त्याला इच्छा असतेच. [illegible]

सुखापेक्षां गंधर्वांचें सुख अधिकच आहे. यास्तव तें मला कसें मिळेल ? या विवंच-नेंत तो अहोरात्र पडलेला असतो. ज्ञानी पुरुषास ही चिंताही नसते. तस्मात् राजापेक्षां श्रोत्रियाचा आनंद अधिक होय. ॥ २६ ॥ २७ ॥

आतां गंधर्वानंद दोनप्रकारचा आहे, असें दाखविण्याकरितां या पुढील दोन श्लोकांत गंधर्वांचे भेद सांगतातः-

**अस्मिन्कल्पे मनुष्यः सन्पुण्यपाकविशेषतः ॥**
**गंधर्वत्वं समापन्नो मर्त्यगंधर्व उच्यते ॥ २८ ॥**
**पूर्वकल्पे कृतात्पुण्यात्कल्पादावेव चेद्भवेत् ॥ ॥**
**गंधर्वत्वं तादृशोत्र देवगंधर्व उच्यते ॥ २९ ॥**

अन्वयः—अस्मिन् कल्पे मनुष्यः सन् पुण्यपाकविशेषतः गंधर्वत्वं समापन्नः मर्त्यगंधर्वः उच्यते । पूर्वकल्पे कृतात् पुण्यात् कल्पादौ एव गंधर्वत्वं भवेत् चेत् तर्हि तादृशः अत्र देवगंधर्वः उच्यते ।

**अर्थः—या कल्पामध्यें मनुष्य असून विशेष प्रकारच्या पुण्यपरिपाकामुळें जो गंधर्वत्वाप्रत प्राप्त झालेला असतो त्यास मर्त्यगंधर्व ह्मणतात व पूर्व कल्पांत केलेल्या कर्मामुळें कल्पाच्या प्रारंभींच गंधर्वत्वाची प्राप्ति झाल्यास तशा प्रकारच्या गंधर्वास शास्त्रांत देवगंधर्व ह्मणतात. ॥ २८॥२९ ॥**

विवरणः—एकाच कल्पामध्यें पूर्वी मनुष्य असून जो पुढें पुण्यपरिपाकामुळें गंधर्वयोनींत उत्पन्न होतो, तो मर्त्यगंधर्व होय. व पूर्वकल्पांत केलेल्या कर्मामुळें उत्तर कल्पाच्या आरंभीं ज्यास गंधर्वत्व प्राप्त होतें, तो देवगंधर्व होय. ॥ २८ ॥ २९ ॥

आतां चिरलोक पितरांचा व आजानदेवांचा आनंद दाखविण्याकरितां चिरलोक पितर व आजानदेव कोणते तें सांगतातः—

**अग्निष्वात्तादयो लोके पितरश्चिरवासिनः ॥**
**कल्पादावेव देवत्वं गता आजानदेवताः ॥ ३० ॥**

अन्वयः—लोके चिरवासिनः अग्निष्वात्तादयः पितरः । कल्पादौ एव देवत्वं गताः आजानदेवताः ।

अर्थः—पितृलोकीं चिरकाल वास करणारे अग्निष्वात्तादिक पितर व कल्पाच्या आरंभींच देवत्वाप्रत प्राप्त झालेले अजानदेव होत. ॥ ३० ॥

विवरणः—अग्निष्वात्त इत्यादि पितर पितृलोकीं दीर्घ काल वास करीत असतात, यास्तव त्यांस चिरलोक पितर ह्मणतात. आणि पूर्व कल्पांत केलेल्या पुण्यामुळें जे उत्तर कल्पाच्या आरंभींच देव होतात, त्यांस आजान देव ह्मणतात. ॥ ३० ॥

आतां कर्मदेव कोणते तें सांगतातः—

**अस्मिन्कल्पेऽश्वमेधादिकर्म कृत्वा महत्पदम् ॥**
**अवाप्याजानदेवैर्याः पूज्यास्ताः कर्मदेवताः ॥ ३१ ॥**

अन्वयः—अस्मिन् कल्पे अश्वमेधादि कर्म कृत्वा महत्पदं अवाप्य आजानदेवैः याः पूज्याः ताः कर्मदेवताः ।

अर्थः—या कल्पामध्यें अश्वमेधादि कर्मे करून व मोठ्या पदास प्राप्त होऊन आजानदेवांस पूज्य झालेल्या ज्या देवता असतात त्या कर्मदेवता होत. ॥ ३१ ॥

विवरणः—अश्वमेध, ज्योतिष्टोम इत्यादि वैदिक यज्ञ व दुसरीं हीं स्वर्ग देणारीं कर्मे करून, मोठ्या पदाला प्राप्त झालेल्या देवता पूर्वोक्त आजानदेवांस पूज्य होतात; व त्यांस कर्मदेवता ह्मणतात. ॥ ३१ ॥

**यमाग्निमुख्या देवास्युर्ज्ञाताविंद्रबृहस्पती ॥**
**प्रजापतिर्विराट् प्रोक्तो ब्रह्मा सूत्रात्मनामकः ॥ ३२ ॥**

अन्वयः—यमाग्निमुख्याः देवाः स्युः । इंद्रबृहस्पती ज्ञातौ । प्रजापतिः विराट् प्रोक्तः च ब्रह्मा सूत्रात्मनामकः अस्ति ।

अर्थः—यम, अग्नि इत्यादि देव होत. इंद्र व बृहस्पती हे तर प्रसिद्ध आहेत. प्रजापतीसच शास्त्रांत विराट् असें ह्मटलें आहे. व ब्रह्मदेव सूत्रात्मसंज्ञक होय. ॥ ३२ ॥

विवरणः—यम, अग्नि, वरुण, वायु, कुबेर, इत्यादि सर्व देव होत. इंद्र हा राजा असून बृहस्पती त्याचा गुरु आहे. विराडात्म्यासच प्रजापति ह्मणतात व हिरण्यगर्भास सूत्रात्मा किंवा ब्रह्मा असें नांव दिलेलें आहे. मनुष्यगंधर्वांपासून सूत्रात्म्या-

पर्यंत ज्यांचा निर्देश केलेला आहे त्यांचा आनंद उत्तरोत्तर शतपट अधिक असतो, ह्मणजे पूर्वोक्त सार्वभौम राजाच्या आनंदापेक्षां मनुष्यगंधर्वांचा आनंद शतपट अधिक; मनुष्यगंधर्वांच्या आनंदापेक्षां देवगंधर्वांचा आनंद शतपट अधिक; अशा क्रमानें आनंदाची मर्यादा हिरण्यगर्भापर्यंत वाढत गेली आहे. ॥ ३२ ॥

पण या सर्वांच्या आनंदाहून श्रोत्रियाचा आनंद अधिक आहे, असें आतां सांगतात:—

**सार्वभौमादिसूत्रांता उत्तरोत्तरकामिनः ॥**
**अवाङ्मनसगम्योयमात्मानन्दस्ततः परः ॥ ३३ ॥**

अन्वयः—सार्वभौमादिसूत्रांताः उत्तरोत्तरकामिनः सन्ति । च अयं अवाङ्मनसगम्यः आत्मानंदः ततः परः अस्ति ।

अर्थः—सार्वभौम राजापासून सूत्रात्म्यापर्यंत सर्वही जीव पुढच्या पुढच्या आनंदाची इच्छा करीत असतात. व हा वाणी व मन यांस गोचर न होणारा आत्मनंद त्याच्याहून श्रेष्ठ आहे. ॥ ३३ ॥

विवरणः—राजा मनुष्यगंधर्वांच्या आनंदाची इच्छा करितो; मनुष्यगंधर्व देवगंधर्वांच्या आनंदाची इच्छा करितो व याप्रमाणें सूत्रात्म्यापर्यंत पूर्व पूर्व प्राणी पुढच्या पुढच्या आनंदाची इच्छा करीत असतो. पण हे सर्व आनंद सातिशय आहेत. सातिशय ह्मणजे अतिशय युक्त; अतिशय ह्मणजे आधिक्य. एकाहून दुसऱ्यानें अधिक असणें ह्मणजे त्या एकानें सातिशय होणें होय. या सर्व आनंदांहून आत्मानंद अधिक असतो. वास्तव हे सर्व आनंद सातिशय होत. व आत्मानंदाहून अधिक असा दुसरा एकादा आनंद प्रसिद्ध नसल्यामुळें तो निरतिशय होय. हा आत्मानंद वाणी व मन यांसही विषय होत नाहीं. ह्मणजे याच्या विषयीं कांहीं बोलतां येत नाहीं इतकेंच नव्हे, तर त्याच्या विषयीं कांहीं कल्पनाही करवत नाहीं. तस्मात् तो या सर्व आनंदांहून श्रेष्ठ आहे. ॥ ३३ ॥

आतां हे सर्व आनंद श्रोत्रियामध्यें कसे असतात तें सांगतात—

**तैस्तैः काम्येषु सर्वेषु सुखेषु श्रोत्रियो यतः ॥**
**निस्पृहस्तेन सर्वेषामानन्दाः संति तस्य ते ॥ ३४ ॥**

अन्वयः— यतः श्रोत्रियः तैः तैः काम्येषु सर्वेषु सुखेषु निःस्पृहः तेन तस्य ते सर्वेषां आनंदाः सन्ति ।

अर्थः—ज्या अर्थी श्रोत्रिय त्या त्या जीवांकडून इच्छिल्या जाणाऱ्या सर्व सुखांविषयीं निःस्पृह असतो, त्या अर्थी त्यास ते सर्वांचे आनंद प्राप्त आहेत. ॥ ३४ ॥

विवरणः—ज्याला जी वस्तु प्राप्त झालेली असते तिच्या विषयीं त्याला कधीं इच्छाही होत नाहीं; असा सर्वत्र अनुभव आहे. त्यावरून:—निष्काम श्रोत्रियास जो आनंद होत असतो त्यामध्यें या पूर्वोक्त सातिशय आनंदांचा अंतर्भाव होत असल्या-मुळेच त्याला त्यांची इच्छा होत नाहीं:—असें अनुमान निघतें. ॥ ३४ ॥

आतां प्रतिपादन केलेल्या अर्थाचा उपसंहार करितात:—

सर्वकामाप्तिरेषोक्ता यद्वा साक्षिचिदात्मना ॥
स्वदेहवत्सर्वदेहेष्वपि भोगानवेक्षते ॥ ३५ ॥

अन्वयः—एषा सर्व कामाप्तिः उक्ता । यद्वा साक्षिचिदात्मना स्वदेहवत् सर्व देहेषु अपि भोगान् अवेक्षते ।

अर्थः—ही सर्व कामाप्ति सांगितली. अथवा साक्षिचैतन्यरूपानें आपल्या देहाप्रमाणेंच सर्वदेहांमध्येंही भोगांस पाहातो. ॥ ३५ ॥

विवरणः—या प्रकरणाच्या अठराव्या श्लोकापासून येथपर्यंत आत्मज्ञानी पुरुषास सर्व कामनांची प्राप्ति कशी होते तें सांगितलें. आतां तीच कामाप्ति अन्यप्रकारेंही होते असें सांगतात. साक्षि चिदात्मा सर्व शरीरांत आहे. अर्थात् आनंदाकार बुद्धीचा साक्षी या नात्यानें या शरीरांत जसा त्याला आनंदीपणा आहे, तसाच तो इतर देहामध्यें असणाऱ्या आत्म्यासही आहे असें तो जाणतो. ह्मणजे आत्मा सर्वदा आप्तकाम आहे. त्याला प्राप्तव्य किंवा काम्य असें कांहीं नाहीं. ॥ ३५ ॥

पण याविषयींही शंका घेऊन समाधान करितात:—

अज्ञस्याप्येतदस्त्येव न तु तृप्तिरबोधतः ॥
यो वेद सोऽश्नुते सर्वान्कामानित्यब्रवीच्छ्रुतिः ॥ ३६ ॥

अन्वयः—अज्ञस्य अपि एतत् अस्ति एव । तु अबोधतः तृप्तिः न अस्ति । ‘ यः वेद सः सर्वान् कामान् अश्नुते ’ इति श्रुतिः अब्रवीत् ।

**अर्थः—तर मग अज्ञासही ही आनंदप्राप्ति होतेच. ( असें जर ह्मणशील तर तें बरोबर आहे ) पण अज्ञानामुळें त्याची तृप्ति होत नाहीं. ‘ जो आत्म्यास जाणतो, त्यास सर्व कामना एकदम प्राप्त होतात.’ असें श्रुतीनें सांगितलें आहे.**

विवरणः—आत्मा सर्वव्यापी व सर्वांतर्यामी असल्यामुळें तो प्रत्येक शरीरांत असतो हें उघड आहे. त्यामुळें तुमच्या या पूर्वोक्त न्यायानें अगदीं प्राकृत पुरुषासही आत्म्याच्या आनंदाचा अनुभव यावयास पाहिजे पण तसें होत नाहीं. असें वाद्याचें ह्मणणें आहे. त्यावर सिद्धांती सांगतातः—आत्मा प्राकृत पुरुषाच्या शरीरांतही असतो हें अगदीं खरें आहे, व तो आत्मकाम आहे, हेंही कांहीं खोटें नाहीं, परंतु आत्म्याचें हें यथार्थ स्वरूप नसल्यामुळें त्यास तृप्ति नसते. तैत्तिराय श्रुतीमध्यें ‘ जो ह्या नित्यानंदरूप आत्म्यास साक्षात् जाणतो, त्यास सर्व कामोपभोग एकाच कालीं प्राप्त होतात’ असें सांगितलेलें आहे. ॥ ३६ ॥

**यद्वा सर्वात्मतां स्वस्य साम्ना गायति सर्वदा ॥**
**अहमन्नं तथान्नादश्चेति साम ह्यधीयते ॥ ३७ ॥**

अन्वयः—यद्वा स्वस्य सर्वात्मतां साम्ना सर्वदा गायति । अहं अन्नं तथा च अन्नादः इति हि साम अधीयते ।

**अर्थः—किंवा आपली सर्वात्मता सामाच्या द्वारा सदा गातो. ‘मी अन्न व तसाच अन्नाद आहें ’ अशा सामाच्या श्रुतीनें पठण केलेलें आहे. ॥ ३७ ॥**

विवरणः—ज्ञानी पुरुष आत्मज्ञानामुळें तृप्त होऊन व आत्मा सर्वात्मभूत आहे, असें समजून, त्याच्या सर्वात्मतेचें नित्य गायन करीत राहातो. तैत्तिरीय श्रुतीमध्यें आत्मज्ञ गायन कसें करितो तें एका सामसंज्ञक ऋचेनें दाखविलें आहे. त्याचा अर्थ असा—मी अन्न आहें व अन्नाद ही आहें. ह्मणजे विषय व विषयी, भोग्य व भोक्ता, आत्मा व अनात्मा, सत् व असत् इत्यादि सर्व मीच आहें. ॥ ३७ ॥

असो; आतां या प्रकरणाच्या तिसऱ्या श्लोकापासून येथपर्यंत प्रतिपादित केलेल्या विषयाचा संक्षेपतः निर्देश करितातः—

**दुःखाभावश्च कामाप्तिरुभे ह्येवं निरूपिते ॥**
**कृतकृत्यत्वमन्यच्च प्राप्तप्राप्यत्वमीक्षताम् ॥ ३८ ॥**

अन्वयः—एवं दुःखाभावः च कामाप्तिः इति उभे हि निरूपिते । अन्यत् कृतकृत्यत्वं च प्राप्तप्राप्यत्वं ईक्षताम् ।

अर्थः—ह्या प्रमाणें दुःखाभाव व कामाप्ति या उभयतांचें निरूपण केलें. आतां राहिलेलें कृतकृत्यत्व व प्राप्तप्राप्यत्व पाहावें. ॥ ३८ ॥

विवरणः—या प्रकरणाच्या तिसऱ्या श्लोकांत विषयानन्दाचे चार भेद सांगितले होते, त्यापैकीं दोघांचेंही येथवर निरूपण केलें. आतां यापुढें बाकी राहिलेल्या दोन आनंदांचें निरूपण कर्तव्य आहे. ॥ ३८ ॥

पण तें तर पूर्वीं सातव्या प्रकरणांतच होऊन गेलें आहे, असें आतां सांगतातः—

**उभयं तृप्तिदीपे हि सम्यगस्माभिरीरितम् ॥**
**त एवात्रानुसंधेयाः श्लोका बुद्धिविशुद्धये ॥ ३९ ॥**

अन्वयः—अस्माभिः उभयं हि तृप्तिदीपे सम्यक् ईरितम् । बुद्धिविशुद्धये ते एव श्लोकाः अत्र अनुसंधेयाः ।

अर्थः—आम्ही त्या दोघांचेंही तृप्तिदीपांत उत्तम प्रकारें निरूपण केलें आहे. पण बुद्धि अति निर्मल व्हावी ह्मणून त्या श्लोकांचेंच येथें अनुसंधान करणें उचित आहे. ॥ ३९ ॥

विवरणः—प्रसंगोपात्त पूर्वींच त्याचें प्रतिपादन झालेलें असल्यामुळें या स्थळींही तेथील श्लोकांचेंच चिंतन करणें उचित होय. ॥ ३९ ॥

या पुढील अठरा श्लोक कृतकृत्यता व प्राप्तप्राप्यता कशी प्राप्त होते तें दाखवीत आहेत. पण त्यांचें विस्तृत व्याख्यान पूर्वींच होऊन गेलेलें असल्यामुळें, येथें प्रत्येक श्लोकापुढें त्याचें सरळ तात्पर्य देतों:—

**ऐहिकामुष्मिकव्रातसिद्ध्यै मुक्तेश्च सिद्धये ॥**
**बहुकृत्यं पुरास्याभूत्तत्सर्वमधुना कृतम् ॥ ४० ॥**

आत्मा समजणें हीच विपरीत भावना होय. पण मी तसें कधींही समजत नाहीं. व त्यामुळें मला ध्यानाचीही आवश्यकता नाहीं. ॥ ४८ ॥

अहं मनुष्य इत्यादिव्यवहारो विनाप्यमुम् ॥
विपर्यासं चिराभ्यस्तवासनातोऽवकल्पते ॥ ४९ ॥

तात्पर्यः—तर मग 'मी मनुष्य आहें' असा तरी तुह्मीं व्यवहार कसा करूं शकतां असें कोणी विचारील, तर त्यास आमचें एवढेंच उत्तर आहे कीं, 'मी देह आहें' या विपरीत भावनेवांचूनच दीर्घकाल अभ्यास झाल्यामुळें त्या वासनेनें तो होऊं शकतो. ॥ ४९ ॥

आरब्धकर्मणि क्षीणे व्यवहारो निवर्तते ॥
कर्माक्षये त्वसौ नैव शाम्येद्ध्यानसहस्रतः ॥ ५० ॥

तात्पर्यः—पण हा तुमचा वासनेमुळें होणारा व्यवहार तरी थांबणार केव्हां? ह्मणून जर विचारशील, तर त्याचें उत्तर असें:—प्रारब्धकर्माचा क्षय झाला असतां हा व्यवहार आपोआप थांबेल, व तें कर्म जोंपर्यंत क्षीण झालेलें नाहीं तोंपर्यंत हजारों वेळां जरी ध्यान केलें, तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. ॥ ५० ॥

विरलत्वं व्यवहृतेरिष्टं चेद्ध्यानमस्तु ते ॥
अबाधिकां व्यवहृतिं पश्यन्ध्यायाम्यहं कुतः ॥ ५१ ॥

तात्पर्यः—ध्यानाच्या योगानें व्यवहार विरल होतो असें जर ह्मणत असशील, तर तूं तें ध्यान खुशाल कर. प्रारब्धकर्मप्राप्त व्यवहाराचा बाध होणें शक्यच नाहीं असें समजत असतांनाही, मी तें कशाकरितां करूं? ५१

विक्षेपो नास्ति यस्मान्मे न समाधिस्ततो मम ॥
विक्षेपो वा समाधिर्वा मनसः स्याद्विकारिणः ॥ ५२ ॥

तात्पर्यः—मला कोणत्याहि प्रकारचा विक्षेप नाहीं व त्यामुळें समाधीचीही गरज नाहीं. विक्षेप व समाधि हे दोन्ही विकारी मनाचे धर्म आहेत, यास्थळीं

विक्षेप ह्मणजे मनाची चंचलता व समाधि ह्मणजे मनाची एकाग्रता असें समजावें. ॥ ५२ ॥

नित्यानुभवरूपस्य को मेऽत्रानुभवः पृथक् ॥
कृतं कृत्यं प्रापणीयं प्राप्तमित्येव निश्चयः ॥ ५३ ॥

तात्पर्यः—मला जें कांहीं अवश्य कर्तव्य होतें तें सर्व मी केलें आहे, व जें कांहीं प्राप्त करून घ्यावयाचें होतें तें प्राप्त झालें आहे. तेव्हां नित्य अनुभवरूप अशा मला आतां दुसरा कोणता अनुभव येणार ? ॥ ५३ ॥

व्यवहारो लौकिको वा शास्त्रीयो वान्यथापि वा ॥
ममाकर्तुरलेपस्य यथारब्धं प्रवर्तताम् ॥ ५४ ॥

तात्पर्यः—अकर्ता व निर्लेप अशा माझा लौकिक, शास्त्रीय किंवा प्रतिषिद्ध व्यवहार प्रारब्धकर्माप्रमाणें खुशाल होऊं दे. ॥ ५४ ॥

अथ वा कृतकृत्योपि लोकानुग्रहकाम्यया ॥
शास्त्रीयेणैव मार्गेण वर्तेऽहं का मम क्षतिः ॥ ५५ ॥

तात्पर्यः—अथवा मी जरी स्वतः कृतकृत्य झालों आहें, तरी मी लोकोपकारार्थ शास्त्रीयमार्गानेंच चालणार ! त्यांत माझी कोणती हानि आहे ? ५५

देवार्चनस्नानशौचभिक्षादौ वर्ततां वपुः ॥
तारं जपतु वाक् तद्वत्पठत्वाम्नायमस्तकम् ॥ ५६ ॥

तात्पर्यः—हें विनाशी शरीर देवपूजा, स्नान, शौच, भिक्षा इत्यादि कर्मे खुशाल करो; वाणी प्रणवाचा जप करो; व उपनिषदांचा पाठही करो. ५६

विष्णुं ध्यायतु धीर्यद्वा ब्रह्मानंदे विलीयताम् ॥
साक्ष्यहं किंचिदप्यत्र न कुर्वे नापि कारये ॥ ५७ ॥

तात्पर्यः—सारांश, बुद्धि विष्णूचें ध्यान करो की, ब्रह्मानन्दामध्यें लीन होवो. मी साक्षी आत्मा यांतील कांहीं एक करीत नाहीं; किंवा करवीतही नाहीं. ॥ ५७ ॥

कृतकृत्यतया तृप्तः प्राप्तप्राप्यतया पुनः ॥
तृप्यन्नेवं स्वमनसा मन्यतेऽसौ निरंतरम् ॥ ५८ ॥

तात्पर्यः—हा कृतकृत्यपणामुळें तृप्त झालेला ज्ञानी पुनरपि प्राप्य पदार्थ प्राप्त झाल्यामुळें तृप्त होत्साता आपल्या मनामध्यें सर्वदा पुढील सहा श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें चिंतन करितो. ॥ ५८ ॥

धन्योहं धन्योहं नित्यं स्वात्मानमंजसा वेद्मि ॥
धन्योहं धन्योहं ब्रह्मानंदो विभाति मे स्पष्टम् ॥ ५९ ॥
धन्योहं धन्योहं दुःखं सांसारिकं न वीक्षेद्य ॥
धन्योहं धन्योहं स्वस्याज्ञानं पलायितं क्वापि ॥ ६० ॥
धन्योहं धन्योहं कर्तव्यं मे न विद्यते किंचित् ॥
धन्योहं धन्योहं प्राप्तव्यं सर्वमद्य संपन्नम् ॥ ६१ ॥
धन्योहं धन्योहं तृप्तेर्मे कोपमा भवेल्लोके ॥
धन्योहं धन्योहं धन्यो धन्यः पुनः पुनर्धन्यः ॥ ६२ ॥
अहो पुण्यमहो पुण्यं फलितं फलितं दृढम् ॥
अस्य पुण्यस्य संपत्तेरहो वयमहो वयम् ॥ ६३ ॥
अहो शास्त्रमहो शास्त्रमहो गुरुरहो गुरुः ॥
अहो ज्ञानमहो ज्ञानमहो सुखमहो सुखम् ॥ ६४ ॥

तात्पर्यः—मी आपल्या आत्म्यास साक्षात् जाणतों, व त्यामुळें मला ब्रह्मानंदाचा स्पष्ट प्रत्यय येत आहे. खरोखर मी धन्य आहें, माझा जन्म सफल झाला. मला आज सांसारिक दुःख मुळींच भासत नाहीं; माझें आत्माविषयींचें अज्ञान कोठें पळालें कांहीं समजत नाहीं. आतां मला कांहीं एक कर्तव्य उरलेलें नाहीं. मला जें काय प्राप्त करून घ्यावयाचें होतें, तें सर्व प्राप्त झालें आहे. माझ्या या तृप्तीला इहलोकीं उपमाच नाहीं. खरोखर

मी धन्य, धन्य, धन्य, अति धन्य आहें. अहाहा!! काय हो सांगूं! माझें पुण्य आज फळास आलें. या पुण्याच्या फलानें संपन्न झाल्यामुळें आम्ही कृतकृत्य आहों. वाहवा! काय तें शास्त्र! काय त्या गुरूची योग्यता! काय तें ज्ञान व कोण तें सुख! सर्वच कांहीं चमत्कार आहे. तात्पर्य, मी आज धन्य झालों; कृतकृत्य झालों. व आनंदाच्या शिखरावर जाऊन बसलों आहें. ॥ ५९ ॥ ६० ॥ ६१ ॥ ६२ ॥ ६३ ॥ ६४ ॥

आतां या विद्यानन्दसंज्ञक चवदाव्या प्रकरणाचा उपसंहार करितात:—

**ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे चतुर्थोध्यायः ईरितः ॥**
**विद्यानंदस्तदुत्पत्तिपर्यंतोभ्यास इष्यताम् ॥ ६५ ॥**

**अन्वयः**—ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे अयं विद्यानन्दः चतुर्थः अध्यायः ईरितः । तदुत्पत्तिपर्यंतः अभ्यासः इष्यताम् ।

**अर्थ:**—ब्रह्मानन्दसंज्ञक या ग्रंथांतील हा विद्यानन्दनामक चवथा अध्याय सांगितला. त्याच्या उत्पत्तीपर्यंत अभ्यासाची इच्छा करावी. ॥ ३५ ॥

**विवरण:**—या प्रकरणांत विद्यानंदाचें वर्णन केलें आहे. हा आनंद प्राप्त होईपर्यंत मुमुक्षूनें पुष्कळ दिवस अहोरात्र व मोठ्या आदरानें अभ्यास करावा. 'ज्ञान जरी झालें तरी देह पडल्यावरच मुक्ति मिळणें शक्य आहे' असें कित्येक समजतात. पण तो समज ऐक्यज्ञानास प्रतिबंध करीत असतो. यास्तव त्याचा या प्रकरणांत निरास केला आहे. ॥ ६५ ॥

ह्याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या विद्यानंदसंज्ञक चौदाव्या प्रकरणाचें श्रीमच्छंकराचार्यभक्त विष्णु वामन बापटकृत सान्वयार्थ मराठी विवरण समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु. ॥

# ब्रह्मानंदे विषयानंदः।

श्रीभारतीतीर्थमुनि आतां या पंधराव्या प्रकरणांत काय प्रतिपादन करावयाचें आहे तें सांगतातः—

**अथात्र विषयानन्दो ब्रह्मानन्दांशरूपभाक् ॥**
**निरूप्यते द्वारभूतस्तदंशत्वं श्रुतिर्जगौ ॥ १ ॥**

**अन्वयः**—अथ अत्र ब्रह्मानंदांशरूपभाक् द्वारभूतः विषयानन्दः निरूप्यते। तदंशत्वं श्रुतिः जगौ।

**अर्थः**—आतां या प्रकरणांत ब्रह्मानंदांशरूप व द्वारभूत असा विषयानन्द निरूपण केला जात आहे. यास ब्रह्मानन्दाचें अंशत्व आहे असें श्रुतीनें सांगितलें आहे. ॥ १ ॥

**विवरणः**—आतां येथें विषयानंदाचें प्रतिपादन करावयाचें आहे. पण त्याचा काय उपयोग होणार? असें कदाचित् कोणी ह्मणेल ह्मणून ग्रंथकार सांगतात कीं, हा विषयानंद ब्रह्मानंदाच्या प्राप्तीचें साधन आहे. कारण हा त्या ब्रह्मानंदाचा अंश आहे. आणि अंशाचें ज्ञान झाल्यावाचून अंशीचें ज्ञान होणें शक्य नाहीं. आतां यास प्रमाण काय ह्मणून विचाराल तर सांगतोंः—स्वतः श्रुति माउलीनेंच 'विषयानंद ब्रह्मानंदाचा अंश आहे.' असें सांगितलें आहे. ॥ १ ॥

तें कोठें? ह्मणून ह्मणाल तर सांगतोंः—

**एषोस्य परमानन्दो योऽखंडैकरसात्मकः ॥**
**अन्यानि भूतान्येतस्य मात्रामेवोपभुंजते ॥ २ ॥**

**अन्वयः**—यः अखंडैकरसात्मकः एषः अस्य परमानंदः अन्यानि भूतानि एतस्य मात्रां एव उपभुंजते।

---

१ अंशी ह्मणजे ज्याला अंश आहेत तो. यासच अवयवी असेंही ह्मणतात. जसें:—हात, पाय इत्यादि अवयव; व ते ज्यास आहेत तो देह अवयवी.

अर्थः—जो अखंड व एकरसात्मक तोच ह्याचा परमानंद होय. दुसरीं भूतें याच्या अंशाचाच उपभोग घेतात. ॥ २ ॥

विवरणः—अखंड:-खंडरहित; एकसारखा प्रवाहरूपानें राहणारा. एकरस०:- ह्मणजे आनंदावांचून दुसऱ्या कशाचाही ज्याच्यामध्यें लेशही नसतो; ' असा आनंदच या परमात्म्याचा परमानंद आहे. या आनंदाच्या योगानेंच इतर भूतें आनंदित होतात. ब्रह्मापासून मुंगीपर्यंत प्राण्यांना जो आनंद होत असतो, तो या परमात्म्याचाच अंश होय.' असें बृहदारण्यकादि उपनिषदांमध्यें स्पष्टपणें सांगितलेलें आहे. ॥ २ ॥

आतां विषयानंद ब्रह्मानंदाचा लेश आहे हें प्रमाणपूर्वक दाखविण्याकरितां प्रथमतः विषयानंदाच्या उपाधिभूत अंतःकरण वृत्ती किती आहेत तें सांगतातः—

**शांता घोरास्तथा मूढा मनसो वृत्तयस्त्रिधा ॥**
**वैराग्यं क्षांतिरौदार्यमित्याद्याः शांतवृत्तयः ॥ ३ ॥**
**तृष्णा स्नेहो रागलोभावित्याद्या घोरवृत्तयः ॥**
**संमोहो भयमित्याद्याः कथिता मूढवृत्तयः ॥ ४ ॥**

अन्वयः—शांताः घोराः तथा मूढाः इति मनसः त्रिधा वृत्तयः सन्ति । वैराग्यं क्षांतिः औदार्यं इत्याद्याः शांतवृत्तयः । तृष्णा स्नेहः रागलोभौ इत्याद्याः घोरवृत्तयः । च संमोहः भयं इत्याद्याः मूढवृत्तयः कथिताः ।

अर्थः—शांत, घोर व मूढ अशा मनाच्या त्रिविध वृत्ति असतात. वैराग्य, क्षमा, उदारपणा इत्यादि शांत वृत्ति, तृष्णा, स्नेह, राग, लोभ इत्यादि घोर वृत्ति व मोह, भय इत्यादि मूढ वृत्ति सांगितलेल्या आहेत. ॥ ३ ॥ ४ ॥

विवरणः—सत्व, रज व तम या तीन गुणांमुळें शांत घोर व मूढ अशा क्रमानें तीन प्रकारच्या वृत्ति झालेल्या आहेत. पण अमुक वृत्ति शांत आहे; अमुक घोर आहे, इत्यादि कसें ओळखतां येईल? असें कोणी विचारील, ह्मणून त्यांना ओळखण्याची सामान्य दिशा दाखवितातः—वैराग्य, क्षमा, उदारपणा, निरभिमान, इत्यादि प्राणिसमुदायाधि व स्वतःस सुखी करणाऱ्या वृत्ति शांत किंवा सात्विक होत. तृष्णा, स्नेह, राग, लोभ, दंभ इत्यादि स्वतःस व दुसऱ्यांसही दुःखांत लोटणाऱ्या वृत्ति घोर किंवा राजस होत; आणि अविवेक, भय आळस इत्यादि सर्वत्र हानि करणाऱ्या वृत्ति मूढ किंवा

तामसी होत. हा सर्व प्रकार श्रुति स्मृति इत्यादि ग्रंथांतून विस्तारपूर्वक सांगितलेला आहे. ॥ ३॥४ ॥

पण या सर्व वृत्तींमध्यें ब्रह्माच्या चैतन्याचें व शांत वृत्तींमध्यें त्याच्या सुखाचें भान होतें, असें आतां सांगतात—

**वृत्तिष्वेतासु सर्वासु ब्रह्मणश्चित्स्वभावता ॥**
**प्रतिबिंबति शांतासु सुखं च प्रतिबिंबति ॥ ५ ॥**

अन्वयः—एतासु सर्वासु वृत्तिषु ब्रह्मणः चित्स्वभावता प्रतिबिंबति च शांतासु सुखं प्रतिबिंबति ।

अर्थः—यासर्व वृत्तींमध्यें ब्रह्माची चिद्रूपता प्रतिबिंबित होते. व शांत वृत्तींमध्यें सुख प्रतिबिंबित होतें. ॥ ५ ॥

विवरणः—ब्रह्माच्या चैतन्याचें भान जसें या सर्व वृत्तींमध्यें होतें, तसें सुखाचें होत नाहीं. तर केवल शांत वृत्तींमध्येंच सुखाचें भान होतें. तात्पर्य शांतवृत्तींमध्यें ब्रह्माचें चैतन्य व सुख या दोघांचाही प्रत्यय येतो आणि घोर व मूढ या वृत्तींमध्यें केवल चैतन्याचाच भास होतो. ॥ ५ ॥

याविषयीं आतां श्रुतिप्रमाण देतात:—

**रूपं रूपं बभूवासौ प्रतिरूप इति श्रुतिः ॥**
**उपमा सूर्यकेत्यादि सूत्रयामास सूत्रकृत् ॥ ६ ॥**

अन्वयः—असौ रूपं रूपं प्रतिरूपः बभूव इति श्रुतिः अस्ति । तथा उपमा सूर्यकेत्यादि सूत्रकृत् सूत्रयामास ।

अर्थः—हा परमात्मा प्रत्येक देहांत देहाप्रमाणें झाला, अशी श्रुति आहे. त्याचप्रमाणें 'एवढ्याकरितांच सूर्याच्या प्रतिबिंबाची उपमा' असें सूत्रकारांनीं सूत्र केलें आहे. ॥ ६ ॥

विवरणः—'सर्व व्यापी आत्मा आपल्या उपाधीप्रमाणें दिसूं लागला' असा श्रुतीचा अर्थ असून "परमात्मा नित्य चिद्घन असल्यामुळेंच त्याच्या या जीवरूप परिणामास सूर्याच्या प्रतिबिंबाची उपमा दिली आहे" असा 'अत एव०' इत्यादि सूत्राचा अर्थ आहे. प्रस्तुत सूत्र शारीरकाच्या तिसऱ्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील अठरावें आहे. ॥ ६ ॥

परमात्मा स्वरूपतः एकच असतांना उपाधीशीं संबंध झाल्यामुळें त्याच्यामध्यें अनेकपणा आला आहे, असें आतां श्रुतीचा निर्देश करून सांगतातः—

**एक एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः ॥**
**एकधा बहुधा चैव दृश्यते जलचंद्रवत् ॥ ७ ॥**

अन्वय—एकः एव हि भूतात्मा भूते भूते व्यवस्थितः अस्ति। जलचंद्रवत् एव एकधा च बहुधा दृश्यते।

**अर्थः—एकच भूतात्मा भूतांभूतामध्यें भिन्न भिन्न होऊन राहिला आहे, तो जलांत दिसणाऱ्या चंद्राप्रमाणेंच एक प्रकारचा व अनेक प्रकारचा पाहिला जातो.**

विवरणः—चंद्र जरी आकाशांत एकच असला तरी जितक्या भांड्यांत पाणी ठेवून पाहावें, तितक्यांतही तो दिसतोच. पण त्यावरून चंद्र अनेक झाले आहेत असें समजूं नये. त्याप्रमाणें हा एकच परमात्मा अनेक शरीररूप उपाधींमुळें अनेक आहे असें वाटतें; पण तें खरें नव्हे. कारण ज्ञानी पुरुषांच्या दृष्टीनें त्याचें एकत्व सर्वदा कायम असतें. ॥ ७ ॥

पण 'निरवयव ब्रह्माचें कोठें चिद्रूपानेंच भान होणें व कोठें चिदानंदरूपानेंच भान होणें अशक्य आहे.' असें कोणी म्हणेल म्हणून चंद्राच्या दृष्टान्तानेंच त्याचा परिहार करितातः—

**जले प्रविष्टश्चंद्रोयमस्पष्टः कलुषे जले ॥**
**विस्पष्टो निर्मले तद्वद्द्वेधा ब्रह्मापि वृत्तिषु ॥ ८ ॥**

अन्वयः—यथा जले प्रविष्टः अयं चंद्रः कलुषे जले अस्पष्टः च निर्मले विस्पष्टः तद्वत् ब्रह्म अपि वृत्तिषु द्वेधा भवति।

**अर्थः—ज्याप्रमाणें जलामध्यें प्रविष्ट झालेला हा चंद्र गढूळ पाण्यांत अस्पष्ट व निर्मल पाण्यांत अति स्पष्ट दिसतो, त्याप्रमाणें ब्रह्महि वृत्तींमध्यें दोन प्रकारचें होतें. ॥ ८ ॥**

**विवरणः—सर्वच पाण्यामध्यें चंद्राचें प्रतिबिंब पडतें हें खरें. पण पाणी स्वच्छ असल्यास त्यांत तें स्पष्ट दिसतें; पाणी गढूळ असल्यास त्यांत अस्पष्ट दिसतें; तें स्थिर असल्यास प्रतिबिंबही स्थिर दिसतें; व तें चंचल असल्यास प्रतिबिंबही चंचल दिसतें. त्याचप्रमाणें ज्या ज्या वृत्ति असतात, त्या त्याप्रमाणें त्यांत ब्रह्माचें प्रतिबिंब दिसतें.**

आतां पूर्वोक्त प्रकाराचेंच स्पष्टीकरण करितात:-

**घोरमुढासु मालिन्यात्सुखांशश्च तिरोहितः ॥**
**ईषन्नैर्मल्यतस्तत्र चिदंशप्रतिबिंबनम् ॥ ९ ॥**

अन्वयः—घोरमूढासु मालिन्यात् सुखांशः तिरोहितः च ईषन्नैर्मल्यतः तत्र चिदंश-प्रतिबिंबनम् भवति ।

**अर्थः—घोर व मूढ वृत्तीमध्यें त्यांच्या मलिनतेमुळें सुखाचा अंश गुप्त झालेला असतो. व थोड्या निर्मलतेमुळें त्यांत चैतन्याचा अंश प्रतिबिंबित होतो.**

**विवरण:**—पूर्वोक्त दृष्टान्ताप्रमाणेंच घोर व मूढ वृत्ति मलिन असल्यामुळें त्यांत सुखाचा अंश भासत नाहीं. पण त्या वृत्ति थोड्याशा निर्मल असल्यामुळें त्यांत चैतन्याचा मात्र भास होतो. म्हणजे त्या मालिन वृत्तींत ब्रह्माचें अस्पष्ट प्रतिबिंब पडतें.

**यद्वाऽपि निर्मले नीरे वन्हेरौष्ण्यस्य संक्रमः ॥**
**न प्रकाशस्य तद्वत्स्याच्चिन्मात्रोद्भूतिरेव च ॥ १० ॥**

अन्वयः—यद्वा निर्मले नीरे अपि वन्हेः औष्ण्यस्य संक्रमः स्यात् न प्रकाशस्य । तद्वत् च चिन्मात्रोद्भूतिः एव ।

**अर्थः—किंवा निर्मल जलामध्येंही अग्नीची उष्णताच येते, प्रकाश येत नाहीं. त्याप्रमाणें पूर्वोक्त वृत्तीमध्यें केवळ चैतन्याचाच उद्भव होतो. ॥ १० ॥**

**विवरण:**—आतां हा चंद्राचा दृष्टांत बरोबर नाहीं असें जर कोणास वाटत असलें तर त्याच्याकरितां आम्ही आणखी एक दृष्टांत देतों. चुलीमध्यें अग्नि पेटवून तिच्यावर स्वच्छ थंड पाण्याचें भांडें भरून ठेवलें असतां, त्यांतील पाण्यास कांहीं वेळानें आधण येतें म्हणजे अग्नीची उष्णता त्यांत येते, पण प्रकाश येत नाहीं. हें आबाल-वृद्धांस ठाऊक आहे. त्याप्रमाणें अंतःकरण जरी सत्त्वगुणाचेंच कार्य आहे, तरी रज व तम यांनीं प्रतिबद्ध झालेल्या त्याच्या वृत्तीमध्यें केवल आत्म्याचें चैतन्यच येतें; आनंद येत नाहीं. सारांश, पूर्वोक्त दृष्टान्तामध्यें जसें पाणी व अग्नि यांच्यामध्यें भांडें आड आलेलें असतें त्याप्रमाणें आत्मा व वृत्ति यांच्यामध्यें रज व तम हे आलेले असतात. ॥ १० ॥

पण शांतवृत्तीमध्यें आनंद कसा येतो तेंही आतां दृष्टांत देऊन सांगतातः—

**काष्ठे त्वौष्ण्यप्रकाशौ द्वावुद्भवं गच्छतो यथा ॥**
**शांतासु सुखचैतन्ये तथैवोद्भूतिमाप्नुतः ॥ ११ ॥**

अन्वयः—यथा काष्ठे तु द्वौ औष्ण्यप्रकाशौ उद्भवं गच्छतः तथा एव शांतासु सुखचैतन्ये उद्भूतिं आप्नुतः ।

**अर्थः—ज्याप्रमाणें काष्ठामध्यें उष्णता व प्रकाश हीं दोन्हीं उत्पन्न होतात, त्याप्रमाणेंच शांत वृत्तीमध्यें सुख व चैतन्य हीं उत्पन्न होतात. ॥११॥**

**विवरणः**—काष्ठांचा व अग्नीचा साक्षात् संयोग होत असल्यामुळें त्यांच्यामध्यें जसे अग्नीचे दोन्ही गुण येतात, त्याप्रमाणेंच केवल सत्त्वगुणानें युक्त व रजोगुण आणि तमोगुण यांच्या योगानें प्रतिबद्ध न झालेल्या वृत्तीमध्यें आत्म्याचे दोन्ही गुण येतात. ॥ ११ ॥

पण ही अशी व्यवस्था करण्याचें काय कारण ? असें कोणी विचारील म्हणून सांगतातः—

**वस्तुस्वभावमाश्रित्य व्यवस्था तूभयोः समा ॥**
**अनुभूत्यनुसारेण कल्प्यते हि नियामकम् ॥ १२ ॥**

अन्वयः—वस्तुस्वभावं आश्रित्य तु उभयोः व्यवस्था समा । अनुभूत्यनुसारेण नियामकं कल्प्यते हि ।

**अर्थः—वस्तूच्या स्वभावाचा आश्रय करून दोघांचीही व्यवस्था सारखीच आहे. व अनुभवाप्रमाणें नियमन करणाऱ्या स्वभावाची कल्पना केली जाते.**

**विवरणः**—प्रत्येक वस्तूचा स्वभाव कसा आहे, हें सूक्ष्मदृष्टीनें पाहून आम्ही दृष्टांत व दार्ष्टांतिक या दोघांचीही सारखीच व्यवस्था लावितों. मात्र आम्ही स्वभाववादी नसल्यामुळें त्यांची व्यवस्था करितांना आमच्या अनुभवाप्रमाणेंच नियामकाचीही कल्पना करितों. म्हणजे ज्याअर्थी अमुक एक पदार्थाचा असा असा अनुभव येत आहे, त्याअर्थी त्याच्यामध्यें हा अमुक एक धर्म असलाच पाहिजे. कारण त्यावांचून असा अनुभव येणें शक्य नाहीं. असा आम्ही निश्चय करितों. जे स्वभाववादी असतात, ते अबाधित अनुभवाची अपेक्षा ठेवीत नाहींत. हाच त्यांच्या व आमच्यामध्यें फरक.

आतां आम्ही म्हणतों तो अनुभव कसा म्हणून म्हणाल तर सांगतों:—

**न घोरासु न मुढासु सुखानुभव ईक्ष्यते ॥**
**शांतास्वपि क्वचित्कश्चित्सुखातिशय ईक्ष्यताम् ॥ १३ ॥**

अन्वय:—सुखानुभवः घोरासु न च मुढासु न ईक्ष्यते । शांतासु अपि क्वचित् कश्चित् सुखातिशयः ईक्ष्यताम् ।

**अर्थः—सुखाचा अनुभव घोर किंवा मूढ वृत्तीमध्यें कधींच येत नाहीं. शांत वृत्तींमध्येंही केव्हां केव्हां कांहींसा सुखाचा अधिकपणा अनुभवास येतो.**

**विवरण:**—राजस व तामस वृत्तीमध्यें तर सुखाचा अनुभव कधींच येत नाहीं. सात्विक वृत्तीमध्यें मात्र त्याच्या अधिकतेचा केव्हां केव्हां प्रत्यय येतो. ॥ १३ ॥

आतां पूर्वोक्त प्रकारच स्पष्ट करितातः—

**गृहक्षेत्रादिविषये यदा कामो भवेत्तदा ॥**
**राजसस्यास्य कामस्य घोरत्वात्तत्रनो सुखम् ॥ १४ ॥**

अन्वय:—यदा गृहक्षेत्रादिविषये कामः भवेत् तदा राजसस्य अस्य कामस्य घोरत्वात् तत्र सुखं नो अस्ति ।

**अर्थ:—ज्या वेळीं घर, शेत इत्यादि विषयांविषयीं इच्छा होते, तेव्हां या राजस तृष्णेस घोरत्व असल्यामुळें तेथें सुख नसतें. ॥ १४ ॥**

**विवरण:**—कामना ही राजसवृत्ति आहे. राजसवृत्तीस घोर असेंही म्हणतात. त्यामुळें तिच्यामध्यें सुखाचा लेशही नसतो. ॥ १४ ॥

पण घोरवृत्तींमध्यें सुखाचा लेशही नसतो, हें कशावरून असें कोणी विचारील म्हणून सांगतात:—

**सिद्ध्येन्नवेत्यस्ति दुःखमसिद्धौ तद्विवर्द्धते ॥**
**प्रतिबंधे भवेत् क्रोधो द्वेषो वा प्रतिकूलतः ॥ १५ ॥**

अन्वय:—सिद्ध्येत् न वा इति दुःखं अस्ति । असिद्धौ तत् विवर्द्धते । प्रतिबंधे क्रोधः भवेत् । प्रतिकूलतः द्वेषः वा भवेत् ।

अर्थः—माझी इच्छा पूर्ण होईल कीं नाहीं असें दुःख असतें; पूर्ण न झाल्यास तें आणखी वाढतें. कोणी प्रतिबंध केल्यास क्रोध येतो, व प्रतिकूल झाल्यास द्वेष होतो. ॥ १५ ॥

विवरण:—कोणतीही कामना म्हणजे दुःखाचा प्रारंभच होय. कारण ती होतांच 'पण, ही सिद्ध होईल कीं नाहीं' अशी चिंता पुढें येऊन उभी राहाते. चिंता हेंच दुःख होय. कर्मधर्मसंयोगानें जर का ती पूर्ण न झाली, तर मग कांहीं विचारूं नका. तें पूर्वदुःखच अतोनात वाढतें. बरें आपल्या सिद्धीस कोणीं विघ्न केलें तर त्याच्या-विषयीं असह्य क्रोध येतो. आणि जर का कोणी आपल्यास प्रतिकूल असा वागला, तर त्याच्याशीं हाडवैर पडतें. ॥ १५ ॥

शिवाय—

अशक्यश्चेत्प्रतीकारो विषादः स्यात्स तामसः ॥
क्रोधादिषु महद्दुःखं सुखशंकापि दूरतः ॥ १६ ॥

अन्वय:—प्रतीकारः अशक्यः चेत् विषादः स्यात् । सः तामसः । क्रोधादिषु महत् दुःख अस्ति । सुखशका अपि दूरतः एव ।

अर्थः—त्याचा प्रतीकार करितां येत नाहीं असें जर वाटलें, तर खेद होतो. तो तमोगुणी होय. सारांश, क्रोधादिकांमध्यें मोठें दुःख आहे. मग सुखशंका तर दूरच राहिली. ॥ १६ ॥

विवरणः—वैर पडल्यास सूड घेण्याची इच्छा होते, पण शत्रु प्रबल आहे. आप-ल्यास त्याचा प्रतीकार करिता येण्यासारिखा नाहीं, अशी खात्री झाल्यास त्या बिचाऱ्या कामी पुरुषास अतोनात खेद होतो. खेद ही तामसी वृत्ति होय. तात्पर्य, क्रोधादिकां-मध्यें सुखाचा लेशही नसून तें दुःखांनीं भरलेले आहेत. ॥ १६ ॥

त्याचप्रमाणें—

काम्यलाभे हर्षवृत्तिः शांता तत्र महत्सुखम् ॥
भोगे महत्तरं लाभप्रसक्तावीषदेव हि ॥ १७ ॥

अन्वय:—काम्यलाभे हर्षवृत्तिः शांता तत्र महत् सुखम् । भोगे महत्तरम् । हि लाभप्रसक्तौ ईषत् एव ।

अर्थः—इष्ट वस्तूचा लाभ झाला असतां हर्षवृत्ति शांत होते. तिच्यामध्यें मोठें सुख आहे. भोगामध्यें तर त्याहूनही अधिक सुख होतें. व लाभकाल आला असतां थोडेंसेंच सुख होतें. ॥ १७ ॥

विवरण:—लाभसमयीं शांत वृत्ति होते, व त्यामुळें प्राण्यास हर्ष होतो. पण इष्ट वस्तूचा लाभ होऊन तिचा भोग घेतांना तर त्याहूनही अधिक आनंद होतो. फार काय! इष्ट वस्तू आपणास मिळणार असें जरी नुस्तें वाटलें, तरी देखील कांहींसा आनंद होतोच. ॥ १७ ॥

पण—

**महत्तमं विरक्तौ तु विद्यानन्दे तदीरितम् ॥**
**एवं क्षांतौ तथौदार्ये क्रोधलोभनिवारणात् ॥ १८ ॥**

अन्वयः—विरक्तौ तु महत्तमं सुखं भवति तत् विद्यानन्दे ईरितम् । एवं क्रोधलोभनिवारणात् क्षांतौ तथा औदार्ये भवति ।

अर्थः—विरक्तींत तर अतिशय सुख होतें, तें विद्यानंदांत सांगितलें आहे. तसेंच क्रोध व लोभ यांचा लेशही नसल्यामुळें क्षमा व औदार्य यांमध्येंही अतिशय आनंद होतो. ॥ १८ ॥

विवरण:—वैराग्यापासून होणारें सुख अवर्णनीय आहे. पण त्याचा गेल्या प्रकरणांत यथाशक्ति निर्देश केला आहे. क्षमा, उदारपणा व दुसऱ्याही सर्व सात्त्विकवृत्तीमध्यें असाच अवर्णनीय आनंद आहे. ॥ १८ ॥

तात्पर्यः—

**यद्यत्सुखं भवेत्तत्तद्ब्रह्मैव प्रतिबिंबनात् ॥**
**वृत्तिष्वंतर्मुखास्वस्य निर्विघ्नं प्रतिबिंबनम् ॥ १९ ॥**

अन्वयः—यत् यत् सुखं तत् तत् प्रतिबिंबनात् ब्रह्म एव भवेत् । अंतर्मुखासु वृत्तिषु अस्य प्रतिबिंबनं निर्विघ्नं भवति ।

अर्थः—जें जें सुख तें तें प्रतिबिंबित झाल्यामुळें ब्रह्मच होय. अंतर्मुख वृत्तींमध्यें याचें निर्विघ्नपणें प्रतिबिंब पडतें. ॥ १९ ॥

विवरणः—विषयाच्या प्राप्तीपासून, भोगापासून, तें प्राप्त होणार असें वाटल्यामुळें किंवा अशाच आणखी कोणत्याही निमित्तानें होणारें जेवढें ह्मणून सुख आहे तेवढें तें सर्व वृत्तींमध्यें ब्रह्म प्रतिबिंबित झाल्यामुळेंच होतें. त्यावांचून सुखाचा अनुभव होणें शक्य नाहीं. अंतःकरण बाह्य व्यापार सोडून अंतर्मुख झालें असतां त्यामध्यें या ब्रह्माचें प्रतिबिंब निर्विघ्न पडतें. ह्मणजे मनोवृत्ति जशा जशा अधिक अंतर्मुख होतात, तशा तसा सुखानुभवही वाढतो. त्यास राजस व तामस वृत्ति प्रतिबंध करीत नाहीत. १९

प्रस्तुत ब्रह्माच्या स्वरूपाचा अनुभव सर्वत्र कसा येतो तें दाखवितात:—

**सत्ता चितिः सुखं चेति स्वभावा ब्रह्मणस्त्रयः ॥**
**मृच्छिलादिषु सत्तैव व्यज्यते नेतरद्वयम् ॥ २० ॥**

**अन्वयः**—सत्ता चितिः च सुखं इति ब्रह्मणः त्रयः स्वभावाः । मृच्छिलादिषु सत्ता एव व्यज्यते । इतरद्वयं न ।

**अर्थः—सत्ता, चैतन्य व सुख असे ब्रह्माचे तीन स्वभाव आहेत. पण मृत्तिका, दगड इत्यादिकांमध्यें सत्ताच व्यक्त होते, इतर दोन व्यक्त होत नाहींत. ॥ २० ॥**

**विवरणः**—ब्रह्माचे स्वरूपभूत असे तीन गुण आहेत. पण ते सर्वच पदार्थांमध्यें व्यक्त होतात असें नाहीं. माती, दगड इत्यादि जड पदार्थांत केवल सत्ता (अस्तित्व) च व्यक्त होते, चैतन्य व सुख व्यक्त होत नाहीं ॥ २० ॥

तसेंच—

**सत्ता चितिर्द्वयं व्यक्तं धीवृत्त्योर्घोरमूढयोः ॥**
**शांतवृत्तौ त्रयं व्यक्तं मिश्रं ब्रह्मेत्यमीरितम् ॥ २१ ॥**

**अन्वयः**—घोरमूढयोः धीवृत्त्योः सत्ता च चितिः इति द्वयं व्यक्तम् तथा शांतवृत्तौ त्रयं व्यक्तम् । इत्थं मिश्रं ब्रह्म ईरितम् ।

**अर्थः—घोर व मूढ बुद्धिवृत्तींमध्यें सत्ता व चैतन्य हे दोन्ही गुण व्यक्त होतात; व शांत वृत्तींमध्यें तिन्ही गुण व्यक्त होतात. याप्रमाणें मिश्र ब्रह्म सांगितलें. ॥ २१ ॥**

विवरणः—राजसी व तामसी बुद्धिवृत्तींमध्यें आत्म्याचें चैतन्य व सत्ता हे दोन गुण येतात. सात्त्विकवृत्तीमध्यें तर आत्म्याचे तिन्ही गुण येतात. तात्पर्य जडाशीं मिश्र होऊन राहणाऱ्या ब्रह्माचें हें वर्णन झालें. ॥ २१ ॥

पण आतां अमिश्र ब्रह्माचें ज्ञान कसें होतें तें सांगतातः—

**अमिश्रं ज्ञानयोगाभ्यां तौ च पूर्वमुदीरितौ ॥**
**आद्येऽध्याये योगचिंता ज्ञानमध्याययोर्द्वयोः ॥ २२ ॥**

अन्वयः—अमिश्रं ब्रह्म ज्ञानयोगाभ्यां ज्ञायते । तौ च पूर्वं उदीरितौ । आद्ये अध्याये योगचिंता च द्वयोः अध्याययोः ज्ञानम् ।

अर्थः— अमिश्र ब्रह्म, ज्ञान व योग यांच्या योगानें जाणलें जातें. व त्यांचें दोघांचेंही वर्णन पूर्वी झालें आहे. ह्मणजे पहिल्या अध्यायांत योगाचा व त्याच्या पुढच्या दोन अध्यायांत ज्ञानाचा विचार केला आहे. ॥ २२ ॥

विवरणः—जडाशीं मिश्र न झालेलें ब्रह्म ज्ञान व योग यांच्या द्वारा ज्ञात होतें. व त्यांचें सविस्तर वर्णन अकरा, बारा व तेरा या प्रकरणांत झालेलें आहे. ॥२२॥

अहो, पण सत् चित् व आनंद हीं तिन्हीं जर ब्रह्माचीं रूपें आहेत असें मानलें, तर मायेचें रूप कोणतें ? असा कोणी प्रश्न करील ह्मणून श्रीभारतीतीर्थ ह्मणतातः—

**असत्ता जाड्यदुःखे द्वे मायारूपत्रयं त्विदम् ॥**
**असत्ता नरशृंगादौ जाड्यं काष्ठशिलादिषु ॥ २३ ॥**

अन्वयः—असत्ता च द्वे जाड्यदुःखे इति तु इदं मायारूपत्रयम् । नरशृंगादौ असत्ता तथा काष्ठशिलादिषु जाड्यम् ।

अर्थः— असत्त्व हें एक व जाड्य आणि दुःख हीं दोन अशीं हीं मायेचीं तीन रूपें आहेत. मनुष्याचें शिंग इत्यादि पदार्थांमध्यें असत्त्व व काष्ठ, शिला इत्यादिकांमध्यें जडपणा असतो. ॥ २३ ॥

विवरणः—असत्त्व, जडपणा व दुःख हीं तीन मायेचीं रूपें आहेत. त्यांतील वांझेचा पुत्र, सशाचें शिंग, आकाशांतील पुष्प इत्यादि पदार्थांमध्यें असत्त्व असतें; व

त्याचप्रमाणेः—

**घोरमूढधियोर्दुःखमेवं माया विजृंभिता ॥**
**शांतादिबुद्धिवृत्त्यैक्यान्मिश्रं ब्रह्मेति कीर्तितम् ॥ २४ ॥**

अन्वयः—घोरमूढधियोः दुःखम्। एवं माया विजृंभिता। शांतादि बुद्धिवृत्त्यैक्यात् मिश्रं ब्रह्म इति कीर्तितम्।

अर्थः—घोर व मूढ बुद्धीमध्यें दुःख प्रतीत होतें. सारांश याप्रमाणें माया विकास पावली आहे. शांतादि बुद्धिवृत्तीशी ऐक्य पावल्यामुळे मिश्र ब्रह्म असें ह्मटलें आहे. ॥ २४ ॥

विवरणः—घोर व मूढ वृत्तीमध्ये दुःखाचा प्रत्यय येतो. तात्पर्य, मायेचा विकास येणेंप्रमाणे झाला आहे. गेल्या एकविसाव्या श्लोकांत 'याप्रमाणें मिश्र ब्रह्म सांगितलें' असें ह्मटलें आहे. पण एक मिश्र व दुसरें अमिश्र असा ब्रह्माचा भेद करण्याचें काय कारण? असें कोणी कदाचित् ह्मणेल ह्मणून सांगतातः—शांत, घोर व मूढ या वृत्तींशीं तादात्म्य पावल्यामुळें त्यांत प्रतिबिंबित झालेल्या ब्रह्मास मिश्र ब्रह्म असें ह्मटलें आहे. ॥ २४ ॥

आतां एवढी सर्व खटपट करण्याचें कारण सांगतातः-

**एवं स्थितेऽत्र यो ब्रह्म ध्यातुमिच्छेत्पुमानसौ ॥**
**नृशृंगादिमुपेक्षेत शिष्टं ध्यायेद्यथायथम् ॥ २५ ॥**

अन्वयः—एवं स्थिते अत्र यः पुमान् ब्रह्म ध्यातुं इच्छेत् असौ नृशृंगादि उपेक्षेत। च शिष्टं यथायथं ध्यायेत्।

अर्थः—असें सिद्ध झालें असतां या लोकीं जो पुरुष ब्रह्माचें ध्यान करण्याची इच्छा करीत असेल, त्यानें मनुष्याच्या शिंगासारख्या मायागुणांनीं युक्त असलेल्या पदार्थांची उपेक्षा करावी, व अवशिष्ट भागाचें यथायोग्यपणें ध्यान करावें. ॥ २५ ॥

विवरणः—असत्त्व, दुःख व जाड्य यांनीं युक्त असलेल्या प्रत्येक पदार्थांची उपेक्षा करून सत्य, सुख व चैतन्यरूप ब्रह्माचें साधकानें ध्यान करावें ह्मणून आतां पूर्वोक्त वर्णन केलें आहे. ॥ २५ ॥

पूर्व श्लोकांत अवशिष्ट पदार्थांतील योग्य गुणांचें ध्यान करावें असें सांगितलें आहे. पण कोणत्या पदार्थांतील कोणत्या गुणाचा त्याग करावा व कशाचें ग्रहण करावें हें सांगितलें नाहीं. ह्मणून त्याचें आतां स्पष्ट विवेचन करितातः—

**शिलादौ नामरूपे द्वे त्यक्त्वा सन्मात्रचिंतनम् ॥**
**त्यक्त्वा दुःखं घोरमूढधियोः सच्चिद्द्विचिंतनम् ॥ २६ ॥**

अन्वयः—शिलादौ नामरूपे द्वे त्यक्त्वा सन्मात्र चिंतनं कार्यम् । तथा घोरमूढधियोः दुःखं त्यक्त्वा सच्चिद्द्विचिंतनं कार्यम् ।

**अर्थः—शिलादि पदार्थांतील नाम व रूप या दोघांचाही त्याग करून केवल सत्तेचें चिंतन करावें. त्याचप्रमाणें घोर व मूढ या वृत्तींतील दुःख टाकून सत्त्व व चैतन्य यांचें चिंतन करावें. ॥ २६ ॥**

**विवरणः**—शिलादि पदार्थांत केवल सत् हाच ब्रह्माचा गुण असतो, यास्तव त्यांतील इतर सर्व गुण सोडून केवल सत्त्वाचें चिंतन करावें, नाम व रूप यांमध्यें इतर सर्व गुण येतात. त्याचप्रमाणें तामसी व राजसी वृत्तीमध्यें दुःख हा मायागुण व सत् आणि चित् हें ब्रह्मस्वरूप असतें. यास्तव मायागुणाचा त्याग करून दोन्ही ब्रह्मगुणांचें चिंतन करावें. ॥ २६ ॥

आतां सात्विकवृत्तीमध्यें ब्रह्माच्या तिन्ही गुणांचें ध्यान करावें असें सांगतातः—

**शांतासु सच्चिदानन्दांस्त्रीनप्येवं विचिंतयेत् ॥**
**कनिष्ठमध्यमोत्कृष्टास्तिस्रश्चिंताः क्रमादिमाः ॥ २७ ॥**

अन्वयः—शांतासु सच्चिदानंदान् त्रीन् अपि एवं विचिंतयेत् । इमाः तिस्रः चिंताः क्रमात् कनिष्ठमध्यमोत्कृष्टाः सन्ति ।

**अर्थः—ह्याप्रमाणेंच शांत वृत्तींमध्यें सत्, चित् व आनंद या तिन्हीं गुणांचें ध्यान करावें. ह्या तीन चिंता क्रमानें कनिष्ट, मध्यम व उत्तम होत.**

**विवरणः—सारांश, या तीन प्रकारच्या चिंतनास कनिष्ठ, मध्यम व उत्तम असें ह्मटलें आहे. ह्मणजे शिलादिकांच्या ठिकाणीं असणाऱ्या सत्त्वाचें ध्यान करणें हें कनिष्ठ चिंतन, घोर व मूढ वृत्तींतील सत्त्व व चैतन्य यांचें ध्यान करणें हें मध्यम चिंतन आणि शांतवृत्तींतील सत्, चित् व आनंद यांचें ध्यान करणें हें उत्कृष्ट चिंतन होय.**

निर्गुण ब्रह्माचें ध्यान करण्यास जे योग्य नसतात त्यांच्यावर उपकार करण्याकरितां त्यांनीं मिश्र ब्रह्माचें ध्यान करावें, असें आतां सुचवितातः—

**मंदस्य व्यवहारेपि मिश्रब्रह्मणि चिंतनम् ॥**
**उत्कृष्टं वक्तुमेवात्र विषयानन्द ईरितः ॥ २८ ॥**

अन्वयः—व्यवहारे अपि मंदस्य मिश्रब्रह्मणि चिंतनं उत्कृष्टं इति वक्तुम् एव अत्र विषयानंदः ईरितः ।

अर्थः—व्यवहार करीत असतांनाही मंद पुरुषाचें मिश्रब्रह्मविषयक चिंतन उत्कृष्ट होय; असें सांगण्याकरितांच या स्थळीं विषयानंद सांगितलेला आहे.

विवरणः—व्यवहार केल्यावांचून ज्याचें चालतच नाहीं, व जे जात्याच मतिमंद आहेत, अशा पुरुषांस व्यवहार करीत असतांनाच ईश्वराचें ध्यान घडावें म्हणून युक्ति योजिली आहे. 'अशा मंद अधिकाऱ्यानें व्यवहारसमयीं मिश्र ब्रह्माचें चिंतन करणेंही उत्तम होय. ' असें सांगितल्यावांचून त्यांची प्रवृत्ति ब्रह्मचिंतनाकडे होणारच नाहीं. असें समजून ग्रंथकारांनीं या प्रकरणांत विषयानंदाचें विवेचन केलें आहे. ॥ २८ ॥

याप्रमाणें वृत्तींसह होणारें त्रिविध ध्यान सांगून आतां वृत्तिरहित ध्यान सांगतातः—

**औदासीन्ये तु धीवृत्तेः शैथिल्यादुत्तमोत्तमम् ॥**
**चिंतनं वासनानंदे ध्यानमुक्तं चतुर्विधम् ॥ २९ ॥**

अन्वयः—औदासिन्ये तु धीवृत्तेः शैथिल्यात् वासनानंदे चिंतनं उत्तमोत्तमम् । एवं चतुर्विधं ध्यानं उक्तम् ।

अर्थः—उदासीन अवस्थेमध्यें तर बुद्धिवृत्ति शिथिल होत असल्यामुळें वासनानंदामध्यें जें ध्यान तें अत्युत्तम होय. याप्रमाणें चार प्रकारचें ध्यान सांगितलें.

विवरणः—ज्या वेळीं साधक निरिच्छ झाल्यामुळें सर्व विषयांविषयीं उदासीन होतो, त्या वेळीं त्याच्या घोर, मूढ इत्यादि वृत्तीही शिथिल होतात म्हणजे त्यांच्यामध्यें पूर्वींप्रमाणें आपापलें कार्य करण्याची शक्ति नसते. त्यामुळें वासनानंदाचा अनुभव येतो. त्या आनंदामध्यें ब्रह्माच्या तिन्ही गुणांचें ध्यान करणें हें तर सर्वोत्कृष्ट ध्यान होय. असो; याप्रमाणें चार प्रकारचें ध्यान करणें सांगितलें. पण त्यांतील पहिलीं तीन ध्यानें अंतःकरणवृत्तियुक्त असतात म्हणून त्यांस सवृत्ति व हें शेवटचें ध्यान वृत्तिशून्य असतें त्यामुळें त्यास निवृत्तिक असें म्हणतात.

हें चवथें ध्यान पूर्वोक्तध्यानापासून भिन्न आहे असें आतां सांगतातः—

**न ध्यानं ज्ञानयोगाभ्यां ब्रह्मविद्यैव सा खलु ॥**
**ध्यानेनैकाग्र्यमापन्ने चित्ते विद्या स्थिरीभवेत् ॥ ३० ॥**

अन्वयः—ज्ञानयोगाभ्यां ध्यानं न । सा ब्रह्मविद्या एव खलु । ध्यानेन ऐकाग्र्यं आपन्ने चित्ते विद्या स्थिरी भवेत् ।

**अर्थः—हें ज्ञान व योग यांच्या योगानें होणारें ध्यान नव्हे. ती ब्रह्मविद्याच होय. ध्यानाच्या योगानें एकाग्र झालेल्या चित्तामध्यें विद्या स्थिर होते.**

**विवरणः**—या वासनानंदांतील ब्रह्मचिंतनालाही जर तुह्मी ध्यान ह्मणूं लागाल तर तुह्मी पातंजलमताचा अंगीकार केलात, असें आह्मी समजूं. कारण वृत्तिशून्य अवस्थेमध्यें परमेश्वराच्या गुणांचें ध्यान करणें ह्मणजे सविकल्प समाधीच होय, अशी वाद्याची शंका आहे. तिचें निरसन करण्याकरितां सिद्धान्ती ह्मणतात—वस्तुतः तें ध्यानही नव्हे. कारण आत्मानंद व अद्वैतानंद या दोन प्रकरणांत सांगितलेल्या ज्ञानाच्या व योगानंदांतील योगाच्या योगानें हें ध्यान होत नसतें. त्यामुळें हें ब्रह्मज्ञानच होय. तर मग ही ब्रह्मविद्या कशी उत्पन्न होणार ? या प्रश्नानें आतां उत्तर देतात— पूर्वोक्त ध्यानाच्या योगानें चित्त एकाग्र झालें असतां हें ब्रह्मज्ञान स्थिर होतें. ॥३०॥

आतां या ध्यानास ब्रह्मविद्या ह्मणण्याचें कारण सांगतातः—

**विद्यायां सच्चिदानंदा अखंडैकरसात्मताम् ॥**
**प्राप्य भांति न भेदेन भेदकोपाधिवर्जनात् ॥ ३१ ॥**

अन्वयः—विद्यायां सच्चिदानंदाः अखंडैकरसात्मतां प्राप्य भेदकोपाधिवर्जनात् भेदेन न भांति ।

**अर्थः—ज्ञानामध्यें सत्, चित् व आनंद हे अखंड व एकरसरूपतेस प्राप्त होऊन त्यांचा भेद करणारी उपाधि नसल्यामुळें भिन्न रूपानें भासत नाहींत.**

**विवरणः—प्रस्तुत ज्ञानमयी सत्, चित् व आनंद हे आत्म्याचे स्वरूपभूत गुण अखंड व एकरस आहेत. ह्मणजे त्यांच्यामध्यें परस्पर भेद नाहीं व दुसरा कोणताही गुण नाहीं, अशी प्रतीति येते. कोणत्याही पदार्थामध्यें भेद जो भासत असतो, तो उपाधीमुळें भासत असतो. प्रस्तुत समयीं कोणत्याही प्रकारची उपाधी नसल्यामुळें आनंदादि गुण भिन्न पणें भासत नाहींत. ॥ ३१ ॥**

आतां उपाधिमुळें आनंदादिकांत भेद कसा पडतो तें सांगतात:—

**शांता घोराः शिलाद्याश्च भेदकोपाधयो मताः**

**योगाद्विवेकतो वैषामुपाधीनामपाकृतिः ॥ ३२ ॥**

अन्वयः—शांताः घोराः च शिलाद्याः भेदकोपाधयः मताः । एषां उपाधीनां योगात् वा विवेकतः अपाकृतिः ।

अर्थ:—शांत, घोर व शिलादिक ह्या भेद करणाऱ्या उपाधि मानलेल्या आहेत. या उपाधींचा परिहार योग किंवा विवेक यांच्या योगानें होतो.

विवरण:—शांत व घोर या वृत्ति आणि शिलादिक पदार्थ, या आनंदादिकांत भेद उत्पन्न करणाऱ्या उपाधि आहेत. यांचा, चित्ताचें ऐकाग्र्य व आत्मा आणि अनात्मा यांचा विवेक यांच्या योगानें बाध होतो. ॥ ३२ ॥

**निरुपाधिब्रह्मतत्त्वे भासमाने स्वयंप्रभे ॥**

**अद्वैते त्रिपुटी नास्ति भूमानन्दोत उच्यते ॥ ३३ ॥**

अन्वयः—स्वयंप्रभे निरुपाधिब्रह्मतत्त्वे अद्वैते भासमाने सति त्रिपुटी न अस्ति अतः भूमानंदः उच्यते ।

अर्थ:—स्वयंप्रकाश, निरुपाधिक व अद्वैत असें ब्रह्मतत्त्व भासूं लागलें असतां त्रिपुटी नाहींशी होते. यास्तव त्यास भूमानंद म्हटलें आहे. ॥ ३३ ॥

विवरण:-अद्वैतसाक्षात्कार झाला असतां ज्ञाता, ज्ञान व ज्ञेयही त्रिपुटी नाहींशी होते. त्रिपुटी हें आत्माच्या अविद्येचें कार्य असल्यामुळें व आत्मज्ञानाच्या योगानें अविद्येचाच नाश झाल्यामुळें त्रिपुटीचा पत्ताही राहात नाहीं. यास्तव तोच भूमा संज्ञक आनंद होय.

आतां प्रस्तुत प्रकरणाचा उपसंहार करितात:—

**ब्रह्मानन्दाभिधे ग्रंथे पंचमोध्याय ईरितः ॥**

**विषयानन्द एतेन द्वारेणांतः प्रविश्यताम् ॥ ३४ ॥**

अन्वयः—ब्रह्मानंदाभिधे ग्रंथे अयं विषयानंदः पंचमः अध्यायः ईरितः । एतेन द्वारेण अंतः प्रविश्यताम् ।

अर्थ:—ब्रह्मानंदसंज्ञक ग्रंथांतील ह्या विषयानंद नामक पांचवा अध्याय सांगितला. या द्वारानें आंत प्रवेश करावा. ॥ ३४ ॥

विवरणः—ब्रह्मानंद नामक पांच अध्यायाच्या या ग्रंथाचा हा—पांचवा ह्मणजे शेवटचा अध्याय परिपूर्ण झाला. यास विषयानंद असें ह्मणतात. हा विषयानंद चित्त अंतर्मुख होण्यास फार उपयोगी पडतो. यास्तव हें चित्तैकाग्र्याचें द्वारच आहे, असें समजून बाह्यविषयांचा त्याग करावा व पूर्वोक्त युक्तीनें अंतर्मुख व्हावें. ॥ ३४ ॥

आतां या पंचदशीसंज्ञक ग्रंथाची समाप्ति करितात—

**प्रीयाद्धरिहरोऽनेन ब्रह्मानंदेन सर्वदा ॥**
**पायाच्च प्राणिनः सर्वान् स्वाश्रिताञ्छुद्धमानसान् ॥ ३५ ॥**

अन्वयः—हरिः च हरः अनेन ब्रह्मानंदेन सर्वदा प्रीयात् । च स्वाश्रितान् शुद्धमानसान् सर्वान् प्राणिनः पायात् ।

**अर्थः—या ब्रह्मानंदाच्या योगानें सर्वदा हरि व हर प्रसन्न होवोत. व आपले आश्रित आणि ज्यांचें मन शुद्ध आहे, अशा सर्व प्राण्यांचें पालन करोत. ३५**

विवरणः—विष्णु व शंकर यांच्यामध्यें ज्ञानी पुरुष भेद मुळींच धरीत नाहीं. हें सुचविण्याकरितां येथें ते दोघेही प्रसन्न होवोत असें ह्मटलें आहे. कांहीं वैष्णव शैवांची व शैव वैष्णवांची निंदा करीत असतात, पण तो शुद्ध मूर्खपणा आहे. ज्या-पंथामध्यें किंवा धर्मामध्यें निंदेसारखे महादोष असतात, तो सन्मार्गच नव्हे. यावरूनही सर्वत्र ईश्वराची भावना करण्याविषयीं उपदेश करणाऱ्या या आपल्या अद्वैत शास्त्राची योग्यता कळून येणार आहे. असो; ग्रंथकार सदय अंतःकरणानें ईश्वराची शेवटीं पुनः प्रार्थना करीत आहेत; तो हरिहरात्मक नियंता आपल्या शुद्धमनाच्या भक्तांचें सर्वदा रक्षण करो. खरोखर ग्रंथकारांची ही प्रार्थना आह्मां मूढांस आशीर्वादरूप होवो, अशी विवरणकाराचीही त्या नियंत्यास प्रार्थना आहे. परब्रह्म जरी एकरस आहे, तरी मोक्षावस्थेंत प्राण्यास वैषयिक सुखाप्रमाणेंच सुख होणें शक्य आहे असें जें कित्येकांस वाटत असतें, त्याचा या प्रकारणांत निरास केला आहे. कारण अद्वैतावस्थेंत त्रिपुटी नाहीं असें येथें स्पष्ट ह्मटलें आहे. तात्पर्य, या सर्व ग्रंथाचें तात्पर्य निर्गुण, निरवयव, अद्वैत, भूमानंद, स्वप्रकाश व आत्मरूप अशा ब्रह्मवस्तूमध्यें आहे. ॥ ३५ ॥

**याप्रमाणें श्रीभारतीतीर्थ व विद्यारण्यमुनिप्रणीत पंचदशीच्या विषयानन्दसंज्ञक पंधराव्या प्रकरणाचें श्रीमच्छंकराचार्यभक्त विष्णु वामन बापटकृत सान्वयार्थविवरण समाप्त झालें.**

**येथें प्रस्तुत ग्रंथही समाप्त झाला.**

**॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥**

---

# परिशिष्ट.

विकल्पो निर्विकल्पस्य सविकल्पस्य वा भवेत् ।

आद्ये व्याहतिरन्यत्रानवस्थात्माश्रयादयः ॥ ५० ॥ तत्वविवेक १.

या श्लोकाचा पूर्वापर संबंधासह भावार्थ असा:—महावाक्यानें अखंड ब्रह्म लक्षित होतें, असें तुह्मी ह्मणतां खरें, पण तें लक्षित होणारें ब्रह्म सविकल्प आहे की निर्विकल्प? अशा प्रकारचा जो तूं विकल्प केला आहेस तो विकल्प कोणत्या ब्रह्मविषयीं आहे? ह्मणजे सविकल्प ब्रह्मविषयीं तो विकल्प आहे किंवा निर्विकल्प ब्रह्मविषयीं? याचें उत्तर तूं कसेंही जरी दिलेंस तरी दोष येतो. ह्मणजे तो तुझा विकल्प उपपन्न होत नाहीं. कसा तो सांगतों. निर्विकल्प वस्तुविषयीं विकल्प आणणेंच अयोग्य आहे. कारण जी वस्तुच मुळीं निर्विकल्प ह्मणजे विकल्पशून्य तिच्या ठायीं विकल्प कसा राहाणार? व तो राहातो असें ह्मटल्यास किंवा खरोखरच तो तिच्या ठायीं राहूं लागल्यास ती वस्तुच निर्विकल्प कशाची? सारांश, निर्विकल्पाचा विकल्प असें ह्मटल्यास 'माझी माता वांझ आहे' या ह्मणण्याप्रमाणें त्याच्यावर वदतोव्याघात हा दोष येतो. वदतो-व्याघात ह्मणजे आपल्या बोलण्यानेंच आपल्या वचनाचा बाध होणें. बरें "सविकल्प ब्रह्मविषयीं हा विकल्प आहे," असें ह्मणशील तर त्याच्यावर आत्माश्रय, अन्योन्या-श्रय, चक्रिका व अनवस्था हे दोष येतात, ते कसे तेंच आतां क्रमानें सांगावयाचें आहे, पण त्यापूर्वी या पूर्वोक्त प्रश्नोत्तराचें सिंहावलोकन करितों. सिद्धान्त्यांनीं तत्वविवेकाच्या शेचाळीस व अठ्ठेचाळीस श्लोकांच्या उत्तरार्धांत क्रमानें "अखंडं सच्चिदानन्दं महावाक्येन लक्ष्यते" व "अखंडं सच्चिदानन्दं परं ब्रह्मैव लक्ष्यते" असें ह्मटलें आहे. त्या वाक्यांचा अर्थ पूर्वी होऊन गेलाच आहे. लक्ष्यते ह्मणजे लक्षणावृत्तीनें जाणिला जातो.

वृत्ति ह्मणजे शाब्दबोधास कारण होणारा पद व पदार्थ यांचा संबंध. या वृत्तीचे शक्ति व लक्षणा असे दोन भेद आहेत. शक्ति ह्मणजे पदाची अर्थाचे ठायीं मुख्य वृत्ति. जसें— घट या पदाची घागर या पदार्थाचे ठायीं असलेली वृत्ति. लक्षणा ह्मणजे

शक्यसंबंध. पदाचा मुख्य शक्य–वाच्य–अर्थ संभवत नसल्यास त्याच्याशीं संबद्ध अशा अर्थाचा बोध लक्षणेनें होतो. जसा–गंगेवर गवळ्याचा वाडा. या वाक्यांतील गंगा या पदाचा शक्य अर्थ जो प्रवाह त्याच्यावर वाडा असणें अशक्य असल्यामुळें तो येथें संभवत नाहीं. त्यामुळें प्रवाहसंबंधीं तीरावर गंगा शब्दाची लक्षणा करावी लागते. असो.

वेद परमात्म्याचा लक्षणावृत्तीनें बोध करितात, अशी प्रतिज्ञा आहे. व त्यामुळें 'तो हा देवदत्त' या वाक्यांतील तो व हा या पदांतील विरुद्ध अर्थाचा त्याग केल्या-नंतर त्यांवरून जसा लक्षणावृत्तीनें देवदत्ताचा बोध होतो, त्याप्रमाणें महावाक्यांवरून लक्षणावृत्तीनें अखंड ब्रह्माचा बोध होतो. असा त्या वाक्याचा सारांश आहे. हा वेदान्तसिद्धांताचा निर्णय आहे. पण असें असतांनाही वादी त्याच्याविषयीं विकल्प करीत आहे. विकल्पाचा स्थूल अर्थ संशय असा आहे. पण एकाच गोष्टीविषयीं दोन मतें प्रश्नरूपानें पुढें आणणें, यासही विकल्प असें ह्मणतात. वादीही एकोणपन्नासाव्या श्लोकांत अशा प्रकारचा विकल्प करूनच सिद्धांतावर दोष देण्याचा प्रयत्न करीत आहे हें पाहून सिद्धान्ती उष्ट्रलकुटिकान्यायानें त्याची खोड मोडण्याकरितां या पन्नासाव्या श्लोकांत त्याच्या विकल्पावरच विकल्पावरून दोष देत आहेत. उंट मस्त झाला असतां त्याच्या पाठीवरील लांकडानेंच त्यास समजवावें लागतें. या व्यावहारिक गोष्टीस अनुलक्षून हा न्याय प्रवृत्त झाला आहे.

असो; याप्रमाणें पूर्वापर संबंध दाखविल्यावर 'सविकल्पब्रह्माचा विकल्प' असें ह्मटल्यास आत्माश्रयादि दोष कसे येतात तें सांगतों.

१ आत्माश्रयः—"सविकल्पाचा विकल्प" असें वाक्य घेतल्यास–विकल्पानें युक्त असणारा असा जो परब्रह्मरूप धर्मी त्याचा विकल्प असा त्याचा अर्थ होतो. ब्रह्म ज्या विकल्पानें सविकल्प झालें आहे तो विकल्प येथें तृतीयांत आहे, व तूं केलेला जो त्याच्याविषयींचा विकल्प तो प्रथमांत आहे. ह्मणजे हे जे दोन विकल्प येथें आहेत ते दोन्ही एकच आहेत कीं ब्रह्माचे ठायीं असणारा विकल्प निराळा व तूं त्याच्याविषयीं केलेला हा विकल्प निराळा! ते दोन्ही विकल्प एकच आहेत, तर त्यांतील एकाची विभक्ति तृतीया व दुसऱ्याची प्रथमा अशा विभक्तींचा भेद . . .

असला तरी विकल्पामध्यें भेद नाहीं; असें जर ह्मणशील तर तो स्वतः एकच असणारा विकल्प, विकल्पाचा आश्रय असें जें सविकल्प ब्रह्म त्याचें विशेषण असल्यामुळें आपणच आपला आश्रय झाला. दंडानें युक्त असा जो पुरुष त्यास दंडी ह्मणतात. येथें दंड हें विशेषण आहे, त्याच न्यायानें 'विकल्पानें युक्त असें सविकल्प ब्रह्म' असें ह्मटल्यानें विकल्प हें त्याचें विशेषण झालें. विशेषणानें युक्त असणाऱ्या पदार्थास विशिष्ट ह्मणतात. विशिष्ट पदार्थामध्यें असणारा धर्म विशेषणामध्येंही असतो; असा नियम आहे. जसें:–"दंडी आला आहे." असें ह्मटल्यास येणें ही क्रिया दंडी या विशिष्ट पदार्थामध्यें जशी आहे तशीच ती दंड या विशेषणामध्येंही आहे. येथें दंड हें विशेषण, दंडी हें विशेष्य, व दंडी पुरुष हा विशिष्ट पदार्थ आहे. दंडी पुरुष आपल्या दंड या विशेषणावांचून 'येणें' ही क्रिया करूं शकणार नाहीं; व त्यानें त्यावांचूनच ती क्रिया केल्यास त्याला दंडी असें कोणी ह्मणणार नाहीं, हें उघड आहे. येथें दंड आधेय (आश्रित) व दंडी पुरुष आधार (आश्रय) आहे असो; याच न्यायानें प्रस्तुत स्थळीं सविकल्प ब्रह्म विशेष्य; तृतीयांत विकल्प विशेषण; व तृतीयांत विकल्परूप विशेषण विशिष्ट (युक्त) सविकल्प ब्रह्म विशिष्ट वस्तु आहे. अर्थात् विशिष्ट जें सविकल्प ब्रह्म त्याचे ठायीं असणारा विकल्प हा धर्म विशेषण जो तृतीयांत विकल्प त्याचे ठायीं असतो ह्मणजे आपणच आपला आश्रय व आश्रितही आहे असें सिद्ध झालें व आपल्या सिद्धीकरितां आपलीच अपेक्षा करणें हाच आत्माश्रय दोष होय.

२ अन्योन्याश्रयः—हा आत्माश्रय दोष घालविण्याकरितां पूर्वोक्त प्रथमांत व तृतीयांत विकल्प एक नसून ते दोन निरनिराळे विकल्प आहेत असें जर ह्मटलें तर तृतीयांत विकल्पही विकल्परूपच असल्यामुळें व त्याचा आधार किंवा आश्रय असें जें ब्रह्म तें सविकल्प असल्यामुळें तृतीयांत विकल्प मानला पाहिजे. ह्मणजे यावरून असें सिद्ध झालें कीं जो जो विकल्प तो तो विकल्पयुक्त आश्रयाचे ठायीं राहतो. निर्विकल्प आश्रयाचे ठायीं राहूं शकत नाहीं. त्यामुळें तुझा प्रथमांत विकल्प जसा सविकल्प वस्तूच्या आश्रयानें राहात आहे; तसेच सर्व विकल्प सविकल्प आश्रयाचे ठायींच राहणार, यांत कांहीं संशय नाहीं. तस्मात् तुझ्या प्रथमांत विकल्पाच्या

स्थितीकरितां तृतीयांत विकल्पाच्या योगानें विकल्पाश्रय असा जो ब्रह्मरूप धर्मी त्यास जसें सविकल्पत्व प्राप्त झालें आहे, त्याप्रमाणेंच तृतीयांत विकल्पाच्या स्थितीकरितां कोणत्या तरी एकाद्या विशेषणरूप विकल्पाच्या योगानें त्याचा आश्रय सविकल्प होणेंच युक्त आहे. अर्थात् या तृतीयांत विकल्पाच्या आश्रयाचें विशेषण असा जो विकल्प तो विशेषणीभूत विकल्प होय. पण तो विशेषणीभूत विकल्प प्रथमांत विकल्परूप आहे कीं प्रथमांत व तृतीयांत या दोन्ही विकल्पांहून भिन्न असा एकादा तिसराच विकल्प आहे ? प्रथम पक्ष स्वीकारल्यास ह्मणजे तो विशेषणीभूत विकल्प प्रथमांत विकल्परूपच आहे, असें ह्मटल्यास अन्योन्याश्रय दोष येतो. कारण परस्परांच्या सिद्धीविषयीं परस्परांची अपेक्षा असणें हें अन्योन्याश्रयाचें लक्षण आहे. व तें यापक्षीं पूर्णपणें प्रत्ययास येतें. तें कसें ह्मणून ह्मणाल तर सांगतों. प्रथमांत विकल्पाच्या स्थितीकरितां तृतीयांत विकल्पाची अपेक्षा आहे. व तृतीयांत विकल्पाच्या स्थितीकरितां तिसऱ्या विशेषणीभूत विकल्पाची अपेक्षा आहे. पण तो तिसरा विकल्प प्रथमांत विकल्परूप आहे, ह्मणजे त्याहून भिन्न नव्हे, असें तुझें ह्मणणें आहे. अर्थात् प्रथमांत विकल्पास जशी तृतीयांत विकल्पाची अपेक्षा आहे तशीच तृतीयांत विकल्पासही प्रथमांत विकल्पाची अपेक्षा आहे; असें झालें. ह्मणजे तोच अन्योन्याश्रय होय.

२ चक्रिका दोषः—आतां पूर्वोक्त दोष घालविण्याकरितां विशेणीभूत विकल्प प्रथमांत व तृतीयांत विकल्पाहून भिन्न तिसराच विकल्प आहे असें जर ह्मटलें तर त्या तिसऱ्या विकल्पासही पहिल्या दोन विकल्पांप्रमाणें विकल्परूपत्व असल्यामुळें त्याचा आश्रय असें जें ब्रह्म तें सविकल्प असणार हें उघड आहे. कारण जो जो विकल्प तो तो सविकल्प पदार्थाचे ठायींच प्रवृत्त होतो हें सविकल्पाविषयीं विकल्प केल्यानेंच ठरलें आहे. त्यामुळें त्या सविकल्प ब्रह्मरूप आश्रयाचें विशेषण असा चवथा एक धर्मी विशेषणभूत विकल्प मानावा लागतो. प्रथमांत, तृतीयांत व विशेषणीभूत अशी विकल्पास ओळखतां येण्याकरितां जशीं टीकाकर रामकृष्णांनीं वेर नांवें दिलीं आहेत, त्याचप्रमाणें येथेंही हा चवथा विकल्प त्या तीन्हीहून निराळा आहे, असें ओळखतां यावें ह्मणून यास धर्मी विशेषणीभूत असें नांव दिलें आहे. असो;

आतां या चवथ्या विकल्पाची प्राप्ति झाल्यावर आम्ही तुम्हा असें विचारितों कीं हा चवथा विकल्प प्रथमांत विकल्परूप आहे कीं त्या विकल्पाहून भिन्न आहे! प्रथमांत विकल्परूप आहे असें ह्मटल्यास चक्रिका दोष येतो. चक्राप्रमाणें जें भ्रमण त्यास चक्रक किंवा चक्रिका ह्मणतात. येथें विकल्पांचा संबंध दाखवितांना भ्रमण कसें होतें तें दाखवितों. प्रथमांत विकल्पाच्या स्थित्यर्थ तृतीयांत विकल्पाची अपेक्षा; तृतीयांत विकल्पाच्या स्थित्यर्थ विशेषणीभूत तिसऱ्या विकल्पाची अपेक्षा; त्याच्या स्थितीकरितां चवथ्या धर्मी विशेषणीभूत विकल्पाची अपेक्षा व तो तर स्वतः प्रथमांत विकल्पच होय ह्मणजे त्यास पुनः तृतीयांत विकल्पाची अपेक्षा; तृतीयांतास विशेषणीभूत विकल्पाची अपेक्षा व त्यास फिरून प्रथमांत रूप धर्मी विशेषणीभूत विकल्पाची अपेक्षा. या प्रमाणें कितीं वेळ जरी भ्रमण केलें तरी या तीन विकल्पांच्या चक्रांतून सुटतां येत नाहीं. यास्तव हा चक्रिका दोष होतो.

४ अनवस्था दोषः—हा दोष घालविण्याकरितां धर्मी विशेषणीभूत विकल्प प्रथमांतादि तीन विकल्पांहून भिन्न आहे असें जर ह्मटलें तर त्याचा आश्रय असें जें ब्रह्म तें सविकल्प व्हावें ह्मणून त्याच्या विशेषणरूप पांचव्या विकल्पाचा स्वीकार करावा लागतो. पण तो पांचवा विकल्पही विकल्परूप असल्यामुळें त्याचा आश्रय जें ब्रह्म तें सविकल्प व्हावें ह्मणून त्याच्या विशेषणरूप सहाव्या विकल्पाची कल्पना करावी लागते. याप्रमाणें एक मागून एक अशा अनेक विकल्पांची कल्पना करावी लागत असल्यामुळें निर्णय होत नाहीं. अशा निर्मूल व प्रमाणशून्य अनेक कल्पनांच्या प्रवाहास अनवस्था ह्मणतात.